प्रा. के. वि. (पू. बाबा) बेलसरे
यांचे साधकांबरोबर झालेले

# अध्यात्म संवाद

भाग- चौथा

प्रा. के. वि. बेलसरे (पू. बाबा)
यांचे साधकांबरोबर झालेले

# अध्यात्म संवाद

## भाग चौथा

संकलन व संपादन
म. वि. केळकर



त्रिदल प्रकाशन

प्रा. के. वि. बेलसरे (पू. बाबा)
यांचे साधकांबरोबर झालेले
अध्यात्म संवाद
भाग चौथा

प्रथमावृत्ती : श्रीदत्तजयंती, मार्गशीर्ष शके १९२२, १० डिसेंबर २०००
पुनर्मुद्रण : गुरुपौर्णिमा, २५ जुलै २००२
दत्तजयंती, २६ डिसेंबर २००४



संकलन व संपादन :
म. वि. केळकर

मांडणी व सजावट :
श्री. राजाभाऊ मराठे

प्रकाशक :
श्रीमती स्नेहल टिळक
त्रिदल प्रकाशन
राणी बिल्डिंग, प्रार्थना समाजजवळ,
गिरगाव, मुंबई-४०० ००४.
फोन : ३८५ ०१ ९२

अक्षरजुळणी :
अक्षय फोटोटाइपसेटर्स
१-चित्रकूट सोसायटी,
डॉ. आंबेडकर मार्ग,
ठाणे (पश्चिम)-४०० ६०१,

मुद्रक :
श्री. विश्वास गोखले
श्रीपाद प्रेस
नवी अमृतवाडी,
वि. प. रोड, मुंबई-४०० ००४.

किंमत : १५० रुपये

श्रीराम

अध्यात्मग्रंथ वाचून परमार्थमार्गात ज्यांना वाटचाल करावीशी वाटते त्यांना ते अवघडच जाते. यासाठी ज्ञानी माणसाकडून श्रवण केल्यास जरा सोपे जाते अशा चर्चा दर शुक्रवारी होत असत. काही काही वेळा त्या अतिशय रंगत असत. ते सर्व स्मरणात ठेवून लिहून काढण्याचे काम प्रा. केळकरांनी केले. हे कौतुकास्पदच होय. त्यामुळे तर आज ही पुस्तिका होत आहे. अशा संवादात श्रीब्रह्मचैतन्यमहाराजांना संमत अशा तऱ्हेने त्यांनी हा विषय स्पष्ट शब्दांत समजावून दिला; त्यांच्यावर श्रीमहाराजांचे अतिशय प्रेम होते. शिवाय विशेष कृपाप्रसादही होता. म्हणून या संवादरूपी पुस्तिकेला श्रीमहाराजांचे आशीर्वाद निःसंशय असणारच.

इंदिरा बेलसरे

# प्रस्तावना

*शोषणं भवसिन्धोश्च प्रापणं सारसम्पद:।*
*यस्य पादोदकं सम्यक् तस्मै श्रीगुरवे नम:॥*

**जयाचा जनीं जन्म नामार्थ झाला। जयानें सदा वास नामांत केला।**
**जयाच्या मुखीं सर्वदा नामकीर्ती। नमस्कार त्या ब्रह्मचैतन्य मूर्ती॥**

बावीस डिसेंबर १९९९ला, दत्तजयंतीदिवशी अध्यात्म संवादाच्या तिसऱ्या भागाचे प्रकाशन झाले. आता हा चौथा आणि शेवटचा भाग श्रीमहाराजांच्या चरणीं विनम्र भावाने अर्पण करीत आहे. पहिल्या दोन भागांप्रमाणे तिसरा भागही वाचकांना व साधकांना आवडल्याचे त्यांनी पत्रे लिहून आणि फोन करून कळविले. वाचकांच्या सोयीसाठी ह्या भागात शक्य तेथे इंग्रजी उताऱ्यांचे, संस्कृत श्लोकांचे व हिंदी पदांचे मराठी भाषेत अनुवाद दिले आहेत. तसेच नवीन वाचकांना ह्या लेखनाची पार्श्वभूमी माहीत व्हावी म्हणून पहिल्या भागाची प्रस्तावना पुन्हा छापली आहे.

दि. १ ऑक्टोबर १९९३ ते २ जानेवारी १९९८ पर्यंतच्या काळाचा या भागात समावेश केला आहे. ऑक्टोबर १९९७ च्या मध्यापासून पू. बाबांच्या आजारामुळे शुक्रवारी आम्ही त्यांच्याकडे गेलो तरी विशेष चर्चा अशी झाली नाही. ह्या भागातील संवादांमधील महत्त्वाचे विषय अनुक्रमणिकेत दिले आहेत पहिल्या तीन भागांमधील महत्त्वाचे विषय त्या त्या भागांचे पुनर्मुद्रण करतांना परिशिष्टामध्ये दिले आहेत. पुण्यतिथी उत्सवांमध्ये आणि नामसाधन शिबिरांमध्ये पू. बाबांच्या खोलीत होणाऱ्या चर्चेची टिपणे करणे थोडे गैरसोयीचे होत असे. कु. विदुला गद्रे, श्री. रत्ननाभ व श्री. नारायण हे दोघे बंधू आणि श्री. नागराज या साधकमित्रांनी ह्या काळातील टिपणे ठेवावी अशी मी त्यांना विनंती केली होती. त्यांनी उत्तम प्रकारे हे काम करून ती सर्व टिपणे संपादनासाठी मला उपलब्ध करून दिली याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. ज्या ज्या ठिकाणी त्यांनी ठेवलेल्या टिपणांचा उपयोग केला आहे त्या सर्व ठिकाणी पुस्तकात तसा उल्लेख केला आहे. तथापि एकूण संकलन व संपादन कार्यामधील त्रुटींप्रमाणे या भागातील त्रुटींची जबाबदारी माझी आहे.

दिनांक ३ मे १९९६ ते १० ऑक्टोबर १९९७ अखेरच्या चर्चेचा समावेश असलेले शेवटचे नोटबुक पू. बाबांनी पाहिलेले नव्हते. पुढे त्यांच्या आजारामुळे त्यांना ते दाखविणे शक्य झाले नाही. तथापि या काळातील चर्चेचे संपादन करण्यापूर्वी ती. आईंना मी ते नोटबुक दिले होते. त्यांनी ते वाचून तपशीलातील आणि व्यक्तींच्या व स्थळांच्या नांवांमधील चुका दुरुस्त केल्या आहेत. ह्या शेवटच्या भागाचेही बहुतेक सर्व पुनर्लेखन पूर्वी या चर्चेत भाग घेतलेल्या माझ्या साधकमित्रांना व ती. आईंना वाचून दाखविले आहे. पू. बाबा व ती. आईंचा मी ऋणी आहेच आणि तसा सदैव ऋणी राहणेच मला पसंत आहे पण हा भाग वाचतांना साधकमित्रांनी वेळोवेळी ज्या बहुमोल सूचना केल्या आणि काही मुद्द्यांवर पुन्हा चर्चा करून ते मुद्दे स्पष्ट केले त्याबद्दल त्यांचाही मी ऋणी आहे.

दि. १५ डिसेंबर पासून २४ डिसेंबर १९९७ अखेर श्रीमहाराजांचा पुण्यतिथी उत्सव झाला. त्यावेळी पू. बाबांची प्रकृती अतिशय नाजूक झालेली होती. उत्सवामध्ये पहिल्या दिवशी सुमारे ४५ मिनिटे, दुसऱ्या व तिसऱ्या दिवशी सुमारे ३५ मिनिटे आणि चौथ्या दिवशी फक्त १५ मिनिटे त्यांनी पू. आईसाहेबांच्या मंडपात बसून नेहमीप्रमाणे प्रवचने केली. त्यानंतर मात्र दररोज त्यांच्या खोलीतून पलंगावर झोपूनच त्यांनी प्रवचने केली. त्यावेळी दररोज सुमारे ३५-४० मिनिटे ते प्रवचन करीत होते. दि. २४ चे दहाव्या दिवशीचे गुलालाच्या वेळचे प्रवचन पहाटे त्यांना त्रास होऊ नये म्हणून दि. २६ रोजी रात्री ध्वनिमुद्रित केले होते. तथापि त्यानंतर दहाव्या दिवशीचे सकाळचे समारोपाचे प्रवचन त्यांनी त्यांच्या खोलीतूनच केले. त्यांची स्मृती त्यावेळीही ताजी टवटवीत होती आणि वाणी स्पष्ट होती. मात्र आवाजात थोडा कंप आलेला होता. लोकांना शुद्ध परमार्थ सांगावा, धीर द्यावा असे श्रीमहाराजांनी त्यांना सांगितले होते. खरोखरच त्यांनी ते प्राणपणाने सांभाळले आणि श्रीमहाराजांनी त्यांच्याकडून सेवा पूर्ण करून घेतली. ज्या वाचकांना पू. बाबांविषयी काहीच माहिती नाही त्यांच्यासाठी पू. बाबांचा थोडक्यात परिचय करून द्यावा असे काही वाचकांनी सुचविले होते. त्यांची ही सूचना योग्यच होती, म्हणून पू. बाबांचा परिचय एक स्वतंत्र लेखात दिला आहे.

अध्यात्म संवादाच्या पहिल्या भागास ती. आईंचे आशीर्वाद मिळाले. पू. बाबांच्या प्रेरणेने आणि श्रीमहाराजांच्या कृपेने सुरू झालेले काम आता पूर्ण

होत आहे म्हणून ह्या भागात ती. आईंनी काही लिहावे अशी मी त्यांना विनंती केली होती. ही विनंती मान्य केल्याबद्दल मी कृतज्ञता व्यक्त करतो.

पहिल्या तीन भागांप्रमाणे हा भागही सर्वांगसुंदर व्हावा म्हणून प्रा. श्रीपादराव बेलसरे यांनी पू. बाबांची व श्रीमहाराजांची छायाचित्रे दिली. श्री. राजाभाऊ मराठे, श्री. विश्वास गोखले आणि अक्षय फोटोटाइपसेटर्सचे फडके बंधू यांनी मांडणी, सजावट छपाई इत्यादी सर्व कामे अतिशय आपुलकीने केली त्याबद्दल या सर्वांचा मी कृतज्ञ आहे.

श्रीमती स्नेहल टिळक आणि त्रिदल प्रकाशन संस्थेतील त्यांचे सहकारी यांचे सुरुवातीपासून सहकार्य लाभल्यामुळेच हे सर्व भाग प्रसिद्ध करणे शक्य झाले. त्रिदल प्रकाशनाच्या परंपरेला साजेल अशा सुबक स्वरूपात त्यांनी हे सर्व भाग माफक किंमतीत उपलब्ध करून दिले याबद्दल मी त्या सर्वांचा ऋणी आहे.

प्रकाशकाने पुस्तक उपलब्ध करून दिले तरी शेवटी वाचकांकडून त्याचा स्वीकार होणे महत्त्वाचे असते. याबाबतीत माझ्या अपेक्षेपलीकडे वाचकांचा व साधकांचा प्रतिसाद मिळाला. त्या सर्वांचे आभार मानणेही मी माझे कर्तव्य समजतो.

- म. वि. केळकर.

बी ३८, कमलपुष्प सोसायटी
बांद्रा रेक्लमेशन (पश्चिम)
मुंबई - ४०००५०
फोन २६४२९६६०
दिनांक २१ नोव्हेंबर २०००.
Email : kelkar.mavi@gmail.com

# पहिल्या भागाची प्रस्तावना

***गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णु: गुरुर्देवो महेश्वर:।***
***गुरुरेव परब्रह्म तस्मै श्रीगुरवे नम:॥***

सन १९८४ पासून मी मालाडला दर शुक्रवारी संध्याकाळी ६-३० वाजता पू. बाबांकडे (प्रा. के. वि. बेलसरे) जाऊ लागलो. त्या वर्षी एक दिवस मी प्रा. श्रीपादराव बेलसरे यांना म्हणालो की पू. बाबा दर रविवारी ज्ञानेश्वरीवर निरूपण करतात ते ऐकावयाला यावे असे वाटते, पण घरच्या अडचणींमुळे रविवारी सकाळी बाहेर जाता येत नाही. ते म्हणाले, मग तुम्ही शुक्रवारी संध्याकाळी येत जा. शुक्रवारी संध्याकाळी पू. बाबांशी चर्चा करावयाला काही जण येतात; तुम्हीही येत जा. डॉ. रवीन्द्र ठोसर, डॉ. बाळासाहेब खापर्डे, श्री. दादा निकते आणि डॉ. दप्तरदार नियमित जात असत. आता मीही जाऊ लागलो. पुढे श्री. कवीश्वर आणि श्री. वसंतराव खरे येऊ लागले. शुक्रवारच्या चर्चा मंडळाची ही संख्या पू. बाबांनी शेवटपर्यंत कायम ठेवली. आमच्या खेरीज ती. आई, प्रा. श्रीपादराव आणि सौ. शोभावहिनी यांचा चर्चेत सहभाग असे. ते ह्या मंडळाचे पदसिद्ध सदस्यच होते. १९९३ मधील बॉम्बस्फोट आणि दंगलीनंतर संध्याकाळी ६-३० ऐवजी आम्ही ५-४५ वाजता जाऊ लागलो. शुक्रवारच्या चर्चांखेरीज गुरुपौर्णिमा, पू. बाबांचे वाढदिवस, गोंदवल्याचे पुण्यतिथी उत्सव आणि नाम साधन अभ्यास शिबिरे, हेबळ्ळीची शिबिरे अशा प्रसंगी पू. बाबांच्या खोलीत चर्चा होत असत त्यांचाही येथे समावेश केला आहे. ज्यावेळी मी चर्चेसाठी उपस्थित नसे त्यावेळी आमच्यापैकी कोणीतरी, विशेषत: डॉ. बाळासाहेब आणि श्री. खरे चर्चेची टिपणे लिहून नंतर ती मला देत असत.

सुरुवातीचे काही दिवस मी चर्चा फक्त ऐकत असे. पू. बाबांची चर्चेची शैली मोठी आकर्षक आणि आश्वासक होती. त्यामुळे अध्यात्मविषयाची विशेष माहिती नसतानाही मी या चर्चेत केव्हां भाग घेऊ लागलो याचा मला पत्ता लागला नाही. पुढे लक्षात आले की पू. बाबांची चर्चेची एक विशिष्ट पद्धत आहे. विचारलेल्या प्रश्नांची वा शंकांची उत्तरे चर्चेत भाग घेणारांकडूनच मिळावी अशा कुशलतेने ते चर्चेचे सूत्रसंचालन करीत असत. चर्चेत भाग

घेणारांपेक्षा आपण कोणी वेगळे, श्रेष्ठ आहोत असे ते कधीही दाखवत नसत. 'आपली दृश्याची ओढ का बरे कमी होत नाही?' 'आपण किती सहज श्रीमहाराजांना विसरतो!' अशा प्रकारची वाक्ये त्यांच्या तोंडी असत. वास्तविक, तुमची दृश्याची ओढ का बरे कमी होत नाही असे त्यांना विचारावयाचे असे, पण त्यांनी तसे कधी विचारले नाही. त्यांचे ज्ञान आणि साधन यांनी चर्चा करणारे दबून जात नसत. त्यामुळे साहजिकच चर्चेमध्ये मोकळेपणा रहात असे. श्री. सद्गुरु ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराजांचे (श्रीमहाराजांचे) जीवन आणि शिकवण हा चर्चेचा केन्द्रबिंदू असे. प्रामुख्याने अध्यात्मविषयावर चर्चा होई म्हणून ह्या चर्चेस अध्यात्म संवाद असे नांव दिले आहे.

दोन-एक वर्षांनी माझ्या लक्षात आले की चर्चेत काही विषय पुनःपुन्हा येतात आणि पूर्वी याबद्दल काय चर्चा झाली ते आम्ही बऱ्यापैकी विसरलेले असतो. म्हणून १९८७ पासून माझ्या रोजनिशीत मी मुख्य मुद्यांची अथवा चर्चेच्या गाभ्याची नोंद करावयास सुरवात केली. चर्चेसाठी येणाऱ्या इतरांना हे जेव्हां समजले तेव्हां त्यांनी ती टिपणे वाचावयास मागितली. रोजनिशी देणे शक्य नव्हते म्हणून मग मी ती एका नोटबुकात लिहून त्यांना दिली. त्यानंतर टिपणे रोजनिशीत लिहिण्याऐवजी नोटबुकात लिहू लागलो. रोजनिशीत लिहिताना त्या दिवसाच्या पानाची मर्यादा असे ती आता राहिली नाही म्हणून मग चर्चा जास्त विस्ताराने नोंदून ठेवू लागलो. त्यामुळे सुरुवातीची काही टिपणे संवाद रूपात नाहीत.

चर्चा चालू असताना मी टिपणे घेत नसे. शुक्रवारची चर्चा पुढच्या आठवड्यात आठवेल त्याप्रमाणे लिहून ठेवत असे. त्यामुळे तपशीलात क्वचित त्रुटी राहिल्या असण्याची शक्यता आहे. डॉ. ठोसर; श्री. निकते इत्यादींनी नोटबुक वाचल्यावर एक दिवस मी ते पू. बाबांना वाचायला दिले. त्यांनी ते वाचले व विचारले की हे तुम्ही कशासाठी लिहित आहात? झालेली चर्चा आम्ही विसरतो, लिहून ठेवले की ते पुन्हा पहाता येते असे मी म्हणालो. ते म्हणाले की हे लिहिलेले सर्व ठीक आहे पण प्रत्येक वेळी पूज्य बाबा असे कशाला लिहिले आहे? मी म्हणालो की ही माझ्या रोजनिशीतली पाने आहेत. त्यात कोणासंबंधी काय लिहायचे याचे मला स्वातंत्र्य नाही का? ते फक्त हसले. यानंतर प्रत्येक नोटबुक लिहून झाले की मी ते प्रथम पू. बाबा व आई यांना वाचावयास देत असे व त्यांचे वाचून झाल्यावरच इतरांना देत असे. ही

संपूर्ण चर्चा त्यांनी वाचलेली आहे. तथापि त्यात काही चुका राहिल्या असल्यास त्याची जबाबदारी माझी आहे.

बरीच नोटबुके लिहून झाल्यावर माझ्या मनात येऊ लागले की आता हे लिहिणे पुरे झाले. पण जेव्हां जेव्हां माझ्या मनात असे येत असे तेव्हां तेव्हां पू. बाबा चर्चा चालू असताना मधेच "नाना, हे महत्वाचे आहे. हे नीट लिहून ठेवा बरे का" असे म्हणत. काही वेळा चर्चा बहारीची होत असे. तेव्हांही ते आजची चर्चा नीट लिहून ठेवा असे सांगत. त्यामुळे पुढे हे लेखन माझे न रहाता पू. बाबांनी सांगितलेले मला आवडणारे काम झाले.

काही वर्षांपूर्वी चर्चेत सहभागी होणारांनी लिखाणाची प्रत आपल्याजवळ असावी अशी इच्छा व्यक्त केली म्हणून सर्व नोटबुकांच्या झेरॉक्स प्रती काढावयाचा विचार केला. किती प्रती काढावयाच्या ते ठरेना कारण प्रतींसाठी पू. बाबांनी काही नांवे सुचविली. श्री. श्रीपादरावांनी त्यात भर घातली. त्यामुळे ४०-४५ प्रतींपर्यंत आकडा गेला, म्हणून सध्या काहीच करू नका असे पू. बाबांनी सांगितले.

पू. बाबांच्या शेवटच्या आजारात याबाबतीत त्यांना काहीच विचारू शकलो नाही. पू. बाबा गेल्यावर एक दिवस पुस्तके आणि इतर कागदपत्रे आवरत असताना वाटले की आता या नोटबुकांचे काय करावयाचे? का ही रद्दीत जाणार? दि. ९ जुलै १९९८ गुरुपौर्णिमेदिवशी पू. बाबांची प्रार्थना करून त्यांना हा प्रश्न विचारला. पू. बाबांची प्रेरणा आली की चर्चा करणाऱ्या तुम्हा सर्वांची नांवे वगळून ही चर्चा लोकांच्या हाती देण्यास हरकत नाही. म्हणून त्या दिवशीच संपादनाच्या आणि पुनर्लेखनाच्या कामाला सुरुवात केली. प्रथम आमच्या नांवांऐवजी साधक असे लिहावयाचे ठरविले होते. (साधन करणारा तो साधक अशा मर्यादित अर्थानेच हा शब्द योजिला आहे). पण डॉ. ठोसर यांनी सुचविले की नुसते साधक लिहिल्यास एकच व्यक्ती परस्परविरोधी विधाने करत आहे असे वाटेल म्हणून साधकांच्या नांवांऐवजी काही संकेत चिन्हांचा उपयोग करावा म्हणजे पू. बाबांचा उद्देशही सफल होईल. म्हणून नांवांऐवजी साधक अ, साधक प इत्यादी संकेत अक्षरांचा उपयोग केला आहे.

पू. बाबांना चर्चा आवडत असे. तथापि निव्वळ बौद्धिक कसरतीचा त्यांना तिटकारा होता. चर्चेतून साधकाच्या अध्यात्मविषयक संकल्पना स्पष्ट व्हाव्या आणि साधनात त्याची प्रगती व्हावी असे त्यांना वाटत असे. हे करतांना त्यांची त्यामागची तळमळ दिसत असे. अनेक वेळा चर्चेसाठी वेगवेगळे संदर्भ

काढून ठेवून ते आमची उत्सुकतेने वाट पहात असत. माहीत असूनही, समोरच्या माणसाच्या दोषांचा त्यांनी कधी उच्चार केला नाही आणि त्याला त्या दोषांतून मुक्त करण्याची खटपट केली. ह्या दृष्टीने त्यांची भूमिका शिक्षकापेक्षा श्रेष्ठ होती. पण आपण कोणीतरी मोठे आहोत असा गुरुत्वाचा भावही त्यांच्या वागण्यात नसे. **Art lies in concealing art** असे म्हणतात. आपली विद्वत्ता आणि अध्यात्मिक उंची पू. बाबांनी सर्वांपासून लपवून ठेवली होती. श्रीमहाराजांनी त्यांना अमानित्वाचा अभ्यास करावयाला सांगितले होते. श्रीमहाराजांच्या सांगण्यापासून ते तसूभरही ढळले नाहीत. अभ्यासावर त्यांचा कटाक्ष असे. तुम्ही अभ्यास करा, तुम्हाला साधेल असे ते नेहमी सांगत असत.

अध्यात्मविषय स्पष्ट होण्यासाठी ह्या संवादांचा उपयोग होईल असे वाटते. वाचकांना पसंत पडल्यास संवादांचे पुढचे भाग आवश्यक ते संपादन करून यथावकाश प्रसिद्ध करण्याचा मानस आहे. ह्या कामास ती. आईंनी शुभाशीर्वाद दिले आहेत. त्यांचा आणि पू. बाबांचा ऋणी राहण्याचे भाग्य लाभले याचा मला आनंद वाटतो.

मित्रवर्य श्री. राजाभाऊ मराठे, श्री. विश्वास गोखले आणि फडके बंधू यांनी पुस्तक चांगले व्हावे म्हणून आपलेपणाने सजावट, मांडणी, छपाई इत्यादी कामे स्वीकारली. त्यांचे आभार मानणे त्यांना आवडणार नाही म्हणूनच मी त्यांचा केवळ नामोल्लेख केला आहे. श्रीमती टिळक आणि त्यांचे सहकारी यांनी त्रिदल प्रकाशनाच्या आत्तापर्यंतच्या परंपरेला साजेल अशा सुबक स्वरूपात आणि माफक किंमतीत हे पुस्तक आमच्या हाती दिले आहे. त्यांचाही मी ऋणी आहे.

- म. वि. केळकर

मुंबई - ४०० ०५०
दि. १० नोव्हेंबर १९९८

# प्रकाशकाचे पान

सद्गुरु श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराजांशी संबंध आलेल्या व्यक्तींची माहिती नसणाऱ्या काही वाचकांनी सूचना केली म्हणून पुस्तकात उल्लेख असलेल्या काही महत्त्वाच्या व्यक्तींविषयी संक्षिप्त माहिती देत आहोत.

**संदर्भ** : श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज : चरित्र आणि वाङ्मय लेखक : प्रा. के. वि. बेलसरे.

**(१) श्रीतुकामाई** : श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराजांचे गुरु. उच्च अशा आध्यात्मिक अवस्थेमध्ये वावरणाऱ्या या महात्म्याला गांवातील लोक 'वेडा तुक्या' म्हणत. त्यांची वृत्ति सदैव आनंदी असे. त्यांचा नामस्मरणावर दृढ विश्वास होता. स्वत: विठ्ठलोपासक असूनही त्यांनी श्रीमहाराजांना रामोपासना दिली. शके १८०९ मध्ये त्यांनी येहळेगांव येथें देह ठेवला. तेथें त्यांची समाधि असून दरवर्षी त्यांच्या पुण्यतिथीला तेथें मोठे अन्नदान होते.

**(२) श्रीआनंदसागर** : श्री. गोविंद अनंत कुलकर्णी. दहाव्या वर्षी यांचे वडील वारल्यानंतर प्रपंचाच्या दु:खमय अनुभवांनी यांची वृत्ति अंतर्मुख झाली. दासबोध वाचत असताना मन:चक्षूंसमोर श्रीमहाराजांची मूर्ती उभी राहिली व त्यांनी 'मला येऊन भेट' असे सांगितले. इंदूरला श्रीमहाराजांची भेट झाली. श्रीमहाराजांनी त्यांच्यावर व त्यांच्या आईवर अनुग्रह केला अणि रामसेवा करण्यास सांगितले. श्रीमहाराजांच्या आज्ञेवरून त्यांनी जालना येथे राममंदिर स्थापन केले. १९०७ साली चंद्रग्रहणादिवशी या थोर पुरुषाने देह ठेवला.

**(३) श्रीब्रह्मानंद** : श्री. अनंत रामभट्ट गाडगुळी. जन्म शके १७८० तर्क, साहित्य, व्याकरण व वेदांतशास्त्राचा गाढा अभ्यास. अभ्यास संपत आला तेव्हा हाताच्या बोटांवर कोडाचे डाग दिसू लागले आणि शास्त्रार्थ शिकणे व्यर्थ वाटू लागून एकंदर जीवनाचा अर्थ काय हा प्रश्न सतावू लागला. 'तू व्यंकटापूरला जा' असा दृष्टांत झाला म्हणून तेथें जाऊन भजन पूजन सुरू केले व देवाजवळ सद्गुरुभेटीचा ध्यास घेतला. इंदूरला श्रीमहाराजांची भेट झाली. श्रीमहाराजांनी अनुग्रह केला व 'ब्रह्मानंद' असे नांव ठेवले. श्रीमहाराजांच्या आज्ञेनुसार त्यांनी कर्नाटकात रामनामाचा प्रसार केला. व्यंकटापूर येथे त्यांनी व्यंकोबाचे भव्य मंदिर बांधले. श्रीमहाराजांनी १९१३ मध्ये देह ठेवल्यानंतर त्यांच्या पुण्यतिथी उत्सवाची जी पद्धत ब्रह्मानंदांनी घालून दिली त्यानुसार

आजही गोंदवल्यास उत्सव होतो. इ. स. १९१८ मध्ये नवबाग (कागवाड) येथें त्यांनी देह ठेवला. तेथें त्यांची समाधि व समाधी मंदिर बांधलेले आहे.

**(४) श्री. भाऊसाहेब केतकर** : जन्म इ. स. १८४७. प्रपंचात राहून श्रीमहाराजांची पूर्णकृपा संपादन करणारा शिष्योत्तम. वयाच्या पंचविसाव्या वर्षी श्रीमहाराजांची प्रथम भेट झाली. इ. स. १९०४ मध्ये इंजिनिअरिंग खात्यातून सेवानिवृत्त झाल्यावर गोंदवल्यास राहावयास गेले. श्रीमहाराजांच्या सांगण्यावरून त्यांनी आपला संसार श्रीमहाराजांवर सोपवला व नंतर विरक्त वृत्तीने प्रपंचात राहिले. श्रीमहाराजांविषयी मनामध्ये सदैव असणारा प्रेमाचा ओलावा हेच त्यांच्या परमार्थाचे साधन बनले. श्रीमहाराजांनी देह ठेवल्यानंतर त्यांच्या आज्ञेनुसार बारा वर्षे गोंदवल्यात राहिले. १९३९ मध्ये वयाच्या ९२ व्या वर्षी ते वारले.

**(५) पू. तात्यासाहेब केतकर** : श्री. रा. चिं. केतकर, श्री. भाऊसाहेब केतकरांचे चिरंजीव. भाऊसाहेबांप्रमाणे यांनीही आपला संसार श्रीमहाराजांच्या चरणीं अर्पण केला. त्यांचा जन्म १८८५ साली झाला. १९०४ मध्ये गोंदवल्यास ते श्रीमहाराजांना प्रथम भेटले. श्रीमहाराजांनी त्यांच्याकडून तेरा कोटी जपाचा संकल्प सोडविला. १९१७ मध्ये त्यांना मिलिटरी अकाउंटस्‌मध्ये नोकरी मिळाली. तेथून १९४८ मध्ये ते सेवानिवृत्त झाले.

इ. स. १९२५ पासून म्हणजे श्रीमहाराजांनी देह ठेवल्यानंतर बारा वर्षांनी श्रीमहाराज पू. तात्यासाहेबांच्या मुखाने बोलू लागले! श्रीमहाराजांचा फोटो व मराठी मुळाक्षरे लिहिलेली एक पेटी आहे. त्या पेटीसमोर बसून पू. तात्यासाहेब एक नाणे मुळाक्षरांवर ठेवत आणि त्यावर आपला उजवा हात ठेवत. नाणे फिरू लागल्यावर त्यांच्या मुखाने श्रीमहाराज बोलू लागत. ते लोकांना उपदेश करत आणि लोकांनी विचारलेल्या प्रश्नांची उत्तरेही देत. श्रीमहाराजांच्या वेळी त्यांच्याजवळ असणाऱ्या असंख्य मंडळींनी याविषयी आपली खात्री करून घेतली होती. पू. बाबा १९३१ मध्ये पू. तात्यासाहेबांना म्हणजे श्रीमहाराजांना प्रथम भेटले. पू. बाबा जेव्हा श्रीमहाराजांना विचारले किंवा श्रीमहाराजांनी सांगितले असे म्हणत तेव्हा त्याचा अर्थ पू. तात्यासाहेब पेटीसमोर बसलेले असत तेव्हा त्यांना विचारले किंवा त्यांनी सांगितले असा असे. १९६७ साली पू. तात्यासाहेबांचे प्रोस्टेटचे ऑपरेशन झाले व त्यातच त्यांचा अंत झाला.

**(६) श्री. रामकृष्णपंत दामले** : हे इंजिनिअर होते. त्यांच्या वयाच्या सहाव्या वर्षी त्यांना श्रीमहाराजांनी आपण होऊन नाम दिले. श्रीमहाराजांवर

त्यांचे अत्यंत प्रेम असल्याने श्रीमहाराजांचे चरित्र ऐकतांना त्यांचे डोळे भरून येत. १९५९ साली जलोदराने त्यांचा मृत्यू झाला. जायच्या आधी बारा तास ते बेशुद्ध होते पण प्राण जाण्यापूर्वी तासभर त्यांनी तारकमंत्राचा मोठ्याने जप केला!

**(७) भीमराव गाडगुळी** : ब्रह्मानंदाचे पुतणे. हे वकील होते. बेलधडी आणि वेंकटापूर येथील मंदिरांची व्यवस्था ब्रह्मानंदांनी यांचेवर सोपविली होती.

**(८) कृष्णशास्त्री उप्पिनबेटिगिरी** : हे कर्नाटकातील अतिशय विद्वान पंडित होते. यांची व श्रीमहाराजांची भेट बेलधडीला झाली. श्रीमहाराजांनी त्यांचा सत्कार केला व त्यांना गोंदवल्यास बोलावले. शास्त्रीबुवांचा आणि पंडित मदनमोहन मालवीय यांना फार स्नेह होता. १९२२ साली यांनी देह ठेवला.

**(९) डॉ. पाथरकर** : जन्म सन १८९२. हे वाडिया हॉस्पिटलमध्ये डॉक्टर होते. त्यांची लहानपणापासून ईश्वराच्या अस्तित्वावर आणि नामस्मरणावर निष्ठा होती. श्रीमहाराजांची भेट झाल्यावर ती आणखी दृढ झाली. त्यांची वृत्ति अत्यंत समाधानी होती. गरिबांबद्दल त्यांना कणव वाटे व कित्येकदा पदरमोड करून ते गरीब पेशंटस्ना औषधे देत. शेवटी त्यांना कॅन्सर झाला. त्यातच श्रीमहाराजांचे नांव घेत त्यांनी देह ठेवला.

**(१०) श्री. वेर्लेकर** : श्री. वासुदेव नारायण वेर्लेकर. जन्म जानेवारी १९१४. हे मूळ गोव्याचे. शिक्षण तेथेच झाले. १९४७मध्ये मुंबईस आले. व्यवसाय - सुवर्णकाम. अतिशय प्रेमळ पण शिस्तप्रिय असे श्रीमहाराजांचे निःसीम भक्त म्हणून हे सर्वांना परिचित होते. पू. बाबांवर त्यांची नितांत श्रद्धा होती. त्यांना भजनाची आवड होती. चारचौघांसारखाच प्रपंच, पण त्यांनी कधीही तक्रार केली नाही. अखंड नामस्मरण आणि कोणाचेही अंतःकरण न दुखवणे हे व्रत त्यांनी जन्मभर सांभाळले. जानेवारी १९९७मध्ये त्यांनी देह ठेवला.

**(११) डॉ. कुर्तकोटी** : (इ. स. १८७९ - १९६७) यांचे पूर्वाश्रमीचे नांव लिंगेशगौडा मेलगिरीगौडा पाटील. धारवाड जिल्ह्यात कुर्तकोटी या गावी वतनदार घराण्यात यांचा जन्म झाला. मॅट्रिक परीक्षा पास झाल्यानंतर त्यांनी काशी, कलकत्ता व शृंगेरी येथे राहून संस्कृत भाषा, धर्मग्रंथ आणि वेदान्ताचे अध्ययन केले. काशीच्या विद्वानांनी त्यांना 'विद्याभूषण' ही पदवी दिली. त्यांच्या गीतेवरील प्रबंधासाठी वॉशिंग्टन विद्यापीठाने त्यांना पीएच्. डी. पदवी दिली.

पू. ब्रह्मानंद महाराजांच्यामुळे ते श्रीमहाराजांकडे आले. त्यांना श्रीमहाराजांचा आठदहा वर्षे सहवास घडला. वैदिक काळी शिष्य ज्या रीतीने गुरूंची सेवा करीत, अगदी त्याच रीतीने त्यांनी श्रीमहाराजांची सेवा केली. श्रीमहाराज त्यांना 'महाभागवत' म्हणत असत.

श्रीमहाराजांनी देह ठेवल्यानंतर कुर्तकोटींनी संस्कृत विद्येच्या प्रसारासाठी व परधर्मात गेलेल्या हिंदूच्या शुद्धीकरणासाठी मोठे कार्य केले. १९१७ साली त्यांनी संन्यास घेतला. पुढे काही काल ते करवीर - संकेश्वर मठाचे शंकराचार्य झाले. त्यांनी अनेक चळवळी केल्या पण बाहेरील सर्व पसाऱ्यात त्यांचे अंतरंग मात्र श्रीमहाराजांच्या चरणी गुंतलेले असे.

**(१२) श्री. हुच्चूराव** : हे मूळ म्हैसूरचे पण पुढे बंगलोरला राहात असत. यांनी काही काळ रेल्वेत नोकरी केली व काही काळ व्यापारही केला. तथापि वृत्ती विरक्त असल्यामुळे त्यांनी कुंदगोळचे नारायणाप्पा कुंदगोळकर यांचा अनुग्रह घेतला. श्रीमहाराज (पू. तात्यासाहेब) बंगलोरला गेले होते तेव्हां त्यांची श्रीमहाराजांशी भेट झाली. पू. तात्यासाहेबांची त्यांनी मनापासून सेवा केली. यांचा स्वभाव करारी होता. एक शिस्तप्रिय साधक म्हणून लोक त्यांना ओळखत असत. गोंदवल्याच्या श्रीमहाराजांच्या मंदिराच्या कामासाठी व बंगलोरला श्रीमहाराजांचे मंदिर बांधण्यासाठी निधी जमवण्याचे मोठे कार्य त्यांनी केले. तथापि बंगलोरचे मंदिर बांधून झाल्यानंतर ते गोंदवल्यास येऊन राहिले. इ. स. १९९०च्या सुमारास बंगलोरला त्यांच्या पुतण्याच्या घरी त्यांनी देह ठेवला.

# प्रा. केशव विष्णु बेलसरे

**- प्रा. श्री. के. बेलसरे**

प्रा.केशव विष्णु बेलसरे म्हणजे सामान्य प्रपंचात राहून केवळ नामसाधनेच्या निष्ठापूर्ण अभ्यासाने उच्च अध्यात्मिक पातळीला पोहोचलेले व्यक्तिमत्व होय. प्रत्येक व्यक्तीमध्ये काही गुण दोष असतातच. परंतु आपले दोष ओळखून त्यांच्यावर मात करणारे थोडे असतात. ती.बाबा अशा थोड्या व्यक्तींपैकी एक होते. त्यांनी गुणदोषांसकट आपले जीवन श्रीगोंदवलेकर महाराजांना अर्पण केले. त्यामुळे त्यांचे संपूर्ण व्यक्तिमत्वच श्रीमहाराजांनी व्यापलेले होते. जीवनाच्या अनुकूल वा प्रतिकूल, कोणत्याही परिस्थितीत आणि देहाच्या विकलांग अवस्थेत सुद्धा मनाची प्रसन्नता व शांतता कमावलेले अत्यंत उच्च कोटीचे साधक, श्रीमहाराजांचे निस्सीम अव्यभिचारी भक्त अशी त्यांची ओळख सांगता येईल.

ती.बाबांचे व्यावहारिक जीवन सर्वसामान्य व्यक्तीच्या जीवनाप्रमाणेच होते. त्यांचा जन्म ८ फेब्रुवारी १९०९ रोजी सिकंदराबाद येथे झाला. त्यांना एक भाऊ व तीन बहिणी होत्या. त्यांचे शालेय आणि महाविद्यालयीन पहिल्या दोन वर्षांचे शिक्षण हैदराबाद येथे झाले. इंटर सायन्सच्या परीक्षेनंतर त्यांची प्रकृती बिघडल्यामुळे शिक्षणात थोडा खंड पडला. याच काळात त्यांचा क्रांतिकारकांशी संबंध आला पण तो थोडी वर्षेच टिकला. पुढे तत्त्वज्ञानाच्या अभ्यासासाठी ते मुंबईस आले. एम.ए. झाल्यावर त्यांचा विवाह झाला. त्यांना दोन अपत्ये झाली. त्यांपैकी थोरला मुलगा अल्पायुषी झाला. सध्या त्यांच्यामागे त्यांची पत्नी, मुलगा, सून व तीन नाती आहेत. नोकरीत सुरुवातीला त्यांनी हायस्कूलमध्ये शिक्षकाचे काम केले. पुढे त्यांना सिद्धार्थ महाविद्यालयात प्राध्यापकाची जागा मिळाली. प्राध्यापक म्हणून त्यांनी उत्तम नांवलौकिक मिळवला होता.

ती.बाबांना अध्यात्माची आवड लहानपणापासून होती. स्वभावत: त्यांची बुद्धी फार सतेज होती, स्मृती अत्यंत तीक्ष्ण होती आणि स्वभाव चिकित्सक होता. कोणतीही गोष्ट बुद्धीला पटल्याशिवाय ते मान्य करीत नसत. तरुणपणी त्यांची भटजीबापू या साधूंशी भेट झाली. भटजीबापूंचे त्यांच्यावर अतिशय प्रेम होते. त्यांच्या सांगण्यावरून ती.बाबांनी नामस्मरणाचा अभ्यास सुरू केला होता.' श्रीगोंदवलेकर महाराजांनी १९१३ साली देह ठेवला. तथापि १९२५ मध्ये ते पू.तात्यासाहेब केतकरांच्यामध्ये वाणीरूपाने प्रकट झाले. श्रीमहाराज वाणीरूपाने प्रकट झाल्यानंतर १९३१ साली ती. बाबांची श्रीमहाराजांशी भेट झाली. आणि त्यांचे

संपूर्ण जीवन बदलले. त्यानंतर ती. बाबांच्या अंगच्या सर्व अलौकिक गुणांचा विकास करत करत श्रीमहाराजांनी त्यांचे व्यक्तिमत्त्व घडविले. ती. बाबांच्या सर्व प्रश्नांना श्रीमहाराजांनी अतिशय तर्कशुद्ध उत्तरे देऊन त्यांच्या सर्व शंकांचे निरसन केले. त्यामुळे त्यांची श्रीमहाराजांवर निष्ठा बसली. या निष्ठेच्या आधाराने ती. बाबांनी श्रीमहाराजांची आज्ञा कधीही मोडली नाही. त्यांचे आज्ञापालन इतके कठोर होते की श्रीमहाराजांच्या आज्ञेपुढे त्यांनी समाज, नातेवाईक, कुटुंबातील इतर व्यक्ती, आपली प्रकृती, प्रतिष्ठा इत्यादी गोष्टींचा कधीही विचार केला नाही. श्रीमहाराजांनी सांगितलेले नामसाधन ती. बाबांनी अत्यंत चिकाटीने, निष्ठेने आणि प्रसंगी आपल्या प्रकृतीचीही पर्वा न करता अखंड केले. या प्रखर साधनामुळेच त्यांना मोठी अध्यात्मिक उंची गाठता आली.

ती. बाबांच्या स्वभावाचा एक पैलू असा होता की आपल्यापासून इतरांना कसलाही त्रास होऊ नये असे त्यांना वाटत असे. त्यामुळे त्यांचे घरात असणे, त्यांचे साधन, त्यांचा अभ्यास व लेखन याचा कोणालाही उपद्रव होत नसे. त्यांचे आपल्या घरातील सर्व मंडळींवर, विशेषत: तिन्ही नातींवर अत्यंत प्रेम होते. नाती लहान असतांना त्यांना शाळेत पोचवण्यास ते नेहमी जात असत. आपल्या घरातील लहानसहान कामेदेखील ते न चुकता बिनबोभाट करीत असत. न चुकता, न कंटाळता आपले कर्तव्य करण्यावर त्यांचा कटाक्ष होता. श्रीमहाराजांच्या आज्ञेनुसार ते दर रविवारी सकाळी प्रवचन करीत असत. अंगात ताप असतानाही यात खंड पडत नसे. गोंदवल्याचे पुण्यतिथी उत्सव, नामसाधना शिबिरे व इतर कार्यक्रम त्यांनी श्रीमहाराजांच्या आज्ञेनुसार केले. सद्गुरूंच्या आज्ञापालनाचा त्यांनी आदर्श घालून दिला.

ती. बाबांना अभ्यास प्रिय होता. त्यामुळे मनापासून अभ्यास करणारा त्यांना प्रिय होत असे. वाचन आणि त्याच्याबरोबर लेखन ही त्यांची अभ्यासाची पद्धत होती. त्यामुळे त्यांच्या हातून विपुल लेखन झाले. त्यांनी लिहिलेल्या पुस्तकांची यादी अन्यत्र दिली आहे. अभ्यासाचा विषय लिहून काढल्याने त्या विषयाचे ज्ञान स्पष्ट व अचूक होते असे ते म्हणत असत. पाश्चात्यांच्या ज्ञान मिळविण्याच्या तर्कशुद्ध विचार पद्धतीचे त्यांना आकर्षण वाटत असे. तत्त्वज्ञान विषयात संशोधन करणारे कित्येक लोक त्यांच्याकडे मार्गदर्शनासाठी येत असत.

पू. बाबांना जीवनाची कोणतीही बाजू वर्ज नव्हती. 'अथातो जीवनजिज्ञासा' असे ते म्हणत. खेळ, करमणूक, काव्य, विनोद, व्यायाम, नाट्य, संगीत या सर्वांची त्यांना आवड होती. ते म्हणत की आद्य शंकराचार्य जर तत्त्वज्ञानी झाले नसते तर ते

महाकवी झाले असते. या कारणामुळेही त्यांना ज्ञानेश्वरी अतिशय आवडत होती. जीवनात काहीही वर्ज नसावे पण प्रत्येक गोष्टीला योग्य ते स्थान द्यावे असे ते सांगत. उत्तम प्रतीचा विनोद त्यांना मनापासून आवडत असे. त्यांच्या जवळ विनोदी गोष्टींचा मोठा साठा होता. तथापि त्यांच्या जीवनाला श्रीमहाराजांनी इतके व्यापले होते की कोणत्याही गोष्टीवरून ते श्रीमहाराजांच्या सांगण्यावर व शिकवणुकीवर येत असत. श्रीमहाराजांच्या आठवणींचा ते चालता बोलता कोश होते. त्यांना श्रीमहाराजांच्या आठवणी सांगणे आणि ऐकणे याच्याइतके प्रिय दुसरे काहीही नव्हते. पू. तात्यासाहेबांच्या हयातीत रोज रात्री आरती झाल्यावर श्रीमहाराज व ती. बाबा यांची भेट होत असे. यानंतर पू. तात्यासाहेब व ती. बाबा यांचे श्रीमहाराजांविषयी बोलणे सुरू झाले म्हणजे त्यात किती वेळ गेला याचे कोणालाच भान नसे. पू.बाबांचे जीवन महाराजमय झालेले होते. त्यांनी आपल्या आवडीनिवडी मानमरातब, पारितोषिके व कुटुंब महाराजांच्या चरणीं अर्पण केले होते.

शेवटच्या काही वर्षात वाढत्या साधनामुळे पू. बाबांच्या व्यक्तिमत्वाला कमालीची धार येऊ लागली होती. त्यांना अनेक अध्यात्मिक अनुभव येत होते; मन अधिक विशाल, कोमल व शांत झाले होते. त्यांच्या चेहेऱ्यावर एक वेगळेच तेज दिसत असे. ते शांत पडलेले असले तरी त्यांचे नाम अखंड चालू असे. हे सर्व असूनही, मोठा अध्यात्मिक अधिकार प्राप्त झाला असला तरी त्यांनी ते सर्व अतिशय समर्थपणे लपवून ठेवले. "मी तुमच्यातलाच एक आहे" असे ते म्हणत. फक्त प्रवचनात किंवा इतर वेळी काही सांगतांना "मी हा अनुभव म्हणून सांगतो" किंवा "मी त्याचा अभ्यास करून सांगतो" असे अधिकारवाणीने सांगत. भेटायला येणाऱ्या अनेकांना त्यांची अवस्था कळत नसे. कुटंबातल्या सर्वांना ते अलौकिक आहेत इतके जाणवत असे. घरात त्यांचा शब्द शेवटचा असे आणि कोणीही त्यांच्या इच्छेविरुद्ध वागत नसे.

विविध क्षेत्रातील लोक ती. बाबांना भेटायला येत. आपल्या अडचणी मोकळेपणाने सांगत. ती. बाबा त्या त्या व्यक्तींशी त्यांच्या आवडीच्या विषयावर बोलत आणि त्यांचे सांगणे लक्षपूर्वक ऐकत. तो गृहस्थ पुन्हा भेटायला आला तर मधे पुष्कळ काळ गेला असला तरी त्याने पूर्वी सांगितलेल्या एखाद्या गोष्टीसंबंधी विचारत आणि याचे त्याला आश्चर्य व कौतुक वाटत असे. प्रत्येकजण त्यांना आपल्या आवडीचा विषय सांगत असल्याने त्यांच्याजवळ माहितीचा खजिना जमला होता. ती. बाबांना भारतीय संगीत, विशेषत: अभिजात संगीत आवडत असे आणि रोज रात्री एखाद्या मोठ्या गायकाचे गाणे ते ऐकत असत. त्यांना डॉक्टर मंडळी आवडत

असत. त्यांचे अनुभव आणि त्यांनी बरे केलेले रोग यांची ते माहिती घेत. तथापि कोणीही आले तरी त्यांना ते नामस्मरणाचे महत्त्व पटवून देत असत. साधकांच्या अडचणी ऐकून त्यांना मार्गदर्शन करीत असत. श्रीमहाराजांच्या शिकवणुकीमुळे व कृपेमुळेच हे शक्य झाले असे ते म्हणत. त्यांची लेखन वाचनातील एकाग्रता अशी होती की लेखन करतांना कोणी भेटावयास आला तर त्याच्याशी ते बोलत आणि तो गेला की लगेच एकाग्र होत.

अत्यंत कष्टाने आणि प्रयत्नाने साध्य केलेला त्यांच्या जीवनातील एक पैलू म्हणजे क्षमा. कोणाच्याही हातून अक्षम्य चूक झाली पण त्याने प्रांजळपणे ती कबूल केली व पुन्हा ती करणार नाही असे सांगितले तर ते त्या व्यक्तीला क्षमा करीत असत. खरोखर संताचे हे एक प्रधान लक्षण आहे. ते म्हणत की चुका होतात पण त्यातून सुधारण्याचा मार्ग मोकळा केला पाहिजे.

श्रीमहाराजांच्या आज्ञेमुळे ती. बाबांनी प्रवचने करणे सुरू केले आणि ते त्यांनी त्यांच्या शेवटच्या आजारातही चालू ठेवले. आज्ञापालनाचा हा आदर्शच होता. श्रीमहाराजांची आज्ञा कशी पाळावी याचे शिक्षण त्यांना श्री. भाऊसाहेब केतकर यांनी दिले. सर्व भक्त मंडळींना ती. बाबांच्यामुळे श्री. भाऊसाहेब केतकरांची योग्यता व थोरवी कळली. प्रवचनाच्या आधी विषय, त्याची मांडणी, खोली, तो कसा सांगावा याचा सूक्ष्म व सखोल विचार ते करीत असत. त्यासाठी लागणारे संदर्भ ग्रंथ पहात असत. १९६० च्या सुमारास नाशीकची काही मंडळी मुंबईस आली होती. त्यांनी ती बाबांना मानसपूजेवर सांगण्याची विनंती केली होती. दोनतीन दिवस ती. बाबांनी त्या विषयाची तयारी केली. पुढे त्यावेळी केलेल्या टिपणांवरूनच त्यांनी 'चित्रमाला'या ग्रंथात मानसपूजेवर अतिशय सुंदर लेख लिहिला.

ती. बाबांची सांपत्तिक स्थिती मध्यमच होती. अर्थार्जनाकडे व धनसंचयाकडे त्यांचे लक्ष नसल्यामुळे त्यात फारशी सुधारणा कधी झाली नाही. त्यांचा मूळ स्वभाव विरक्त अभ्यासकाचा असल्यामुळे कपडालत्ता, इतर वस्तू जमविण्यापेक्षा त्यांचे लक्ष पुस्तके जमविण्याकडे अधिक होते. सुट्टीच्या काळात इतर प्राध्यापकांप्रमाणे अर्थार्जन न करता ते तो काळ जास्ती अभ्यासासाठी व साधनासाठी देत असत. पुढे कुटुंबाची आर्थिक स्थिती सुधारल्यावरदेखील त्यांना सोयी मान्य असत पण इतर गोष्टींविषयी ते उदासीनच असत. साधनात प्रगती झाल्यावर त्यांची विरक्ती वाढू लागली. ते म्हणत की "मी पांढऱ्या कपड्यातील संन्यासी आहे" प्रपंचात असणाऱ्या साधकाची आसक्ती सुटल्यावर त्याची काय मनस्थिती असावी याचे हे एक उत्तम उदाहरण म्हणावे लागेल.

महाविद्यालयातून निवृत्त झाल्यावर ती. बाबांनी त्यांना त्यांच्या हक्काचे जे काही धन मिळाले ते व्यवस्थितपणे गुंतविल्यानंतर त्याचा पुन्हा कधीही विचार केला नाही. तसेच त्यानंतर अर्थार्जन करावयाचे नाही असे ठरवले. त्यानंतर त्यांनी दासबोध, आत्माराम, मनाचे श्लोक यांवर लिहिले. तसेच बृहदारण्यकोपनिषदातील संवादांचे संपादन केले. या ग्रंथांच्या चिंतनाचा त्यांच्या साधनाला जोर येण्यास अत्यंत उपयोग झाला.

"अध्यात्म संवाद" या ग्रंथातील चर्चेमध्ये ज्या साधकांचा सहभाग आहे त्यांना ती. बाबांचा विशेष सहवास व प्रेम लाभले. या चर्चांमध्ये आपली विद्वत्ता दाखविणे हा हेतु नसून साधकांच्या अडचणी सोडविणे हा होता. ती. बाबांना निष्फळ चर्चा आवडत नसे. लोक भेटायला आल्यावर त्यांच्या अडचणी ते सोडवीत असत. मनापासून नामस्मरण करणारी व्यक्ती व आपल्या सद्गुरूंवर नितांत प्रेम करणारी व्यक्ती त्यांना प्रिय असे. ते नेहमी म्हणत की माणूस चिकाटीने, श्रद्धेने नाम घेत राहील तर त्याच्या सर्व शंका नाहीशा होतील. ती. बाबांच्या शेवटच्या काळात त्यांनी सर्वांवर अत्यंत निस्वार्थी प्रेम केले. त्यांचा मूळचा रागीट, कठोर स्वभाव संपूर्ण बदलला होता. कुटुंबातल्या सर्वांवर त्यांनी प्रेमाच्या वर्षाव केला. असे प्रेम फक्त संतच करू शकतात. घरातल्या मांजरीला सुद्धा त्यांचा लळा होता.

त्यांच्या शेवटच्या आजारात ते सर्वस्वी परावलंबी झाले होते. प्रत्येक गोष्टीत त्यांना इतरांची मदत लागे. सर्वजण न कंटाळता बिनतक्रार त्यांची शुश्रूषा करीत होते. पण त्यांना त्याचा फार संकोच वाटे. असे असूनसुद्धा त्यांची प्रसन्नता कधीही ढळली नाही; शांती कमी झाली नाही. त्या अवस्थेतसुद्धा त्यांना विनोद सुचत असे. देहाच्या कोणत्याही अवस्थेत नाम अखंड चालू शकते व तसा अभ्यास प्रत्येकाने केला पाहिजे असे ते त्यांच्या आवडत्या डॉक्टरांना म्हणाले होते.

देहाचा शेवट अटळ असतो. प्रत्येक चांगली गोष्ट कधीतरी संपते. तसे ती. बाबा दि. ३ जानेवारी १९९८ रोजी सकाळी ८ वाजता अनंतात विलीन झाले!

कां झांकलिये घटींचा दिवा। नेणिजे काय जाहला केव्हां।
या रीती जो पांडवा। देह ठेवी॥ ८.९८॥

ही ज्ञानेश्वरीतील ओवी हा त्यांचा मृत्यूचा आदर्श होता आणि श्रीमहाराजांच्या कृपेने ह्या आदर्शानुसार त्यांची प्राणज्योत अनंतात विलीन झाली.

आता आहेत त्यांच्या आठवणी. आठवणी आल्या तर व्याकुळता मात्र येते आणि त्याबरोबर डोळ्यात पाणी!

# अनुक्रमणिका

## अध्यात्म संवाद भाग चौथा मधील महत्त्वाचे विषय

॥ श्रीराम प्रसन्न ॥

**शोषणं भवसिन्धोश्च प्रापणं सारसम्पदः।**
**यस्य पादोदकं सम्यक् तस्मै श्रीगुरवे नमः॥**

**जयाचा जनीं जन्म नामार्थ झाला।**
**जयानें सदा वास नामांत केला।**
**जयाच्या मुखीं सर्वदा नामकीर्ती।**
**नमस्कार त्या ब्रह्मचैतन्यमूर्ती॥**

**।३४५।** (१ ऑक्टोबर १९९३)

(दि. २९ च्या उत्तररात्री म्हणजे गुरुवार दि. ३० सप्टेंबरच्या उजाडता पहाटे चारच्या सुमारास मोठा भूकंप झाला. मराठवाडयातील लातूर आणि उस्मानाबाद जिल्ह्यात हजारो माणसे झोपेत असतांनाच मृत्युमुखी पडली. त्या पार्श्वभूमीवर आज संध्याकाळी ६ वाजता मालाडला पू. बाबांकडे नेहमीचे सर्वजण जमलो होतो.)

**पू. बाबा** : मागच्या शुक्रवारी सांगितले होते त्यावर विचार केला असेलच तुम्ही.

**साधक ब** : आश्चर्य वाटले पाहिजे यासंबंधीच ना?

**पू. बाबा** : श्रीमहाराजांचे अस्तित्व सतत जाणवले पाहिजे. हे जीवन त्यांच्या सत्तेने चालले आहे याची सतत जाणीव पाहिजे. आपण नाम घेतो याचेदेखील आश्चर्य वाटले पाहिजे. नामाचे खरेपण का वाटत नाही हा माझा प्रश्न होता. वास्तविक आपण शब्दावर विश्वास ठेवतो. एखाद्याचा अपशब्द किंवा केलेला अपमान मनात घर करून राहातो. म्हणजे शब्दाला खरेपण आहे. मग ते खरेपण नामाबद्दल कां वाटत नाही?

**साधक ग** : इतर शब्द आपल्या देहबुद्धीला धरून असतात; त्यामुळे ते जाणवतात. नाम त्याच्या पलीकडे आहे त्यामुळे ते तितके खरे वाटत नाही.

**साधक ज** : इतर शब्दांचे खरेपण भावनेचे आहे. कोणी अपमान केला तर ती अपमानाची भावना बोचते.

**पू. बाबा** : ते खरे; पण त्या भावनेच्याही आधी त्या शब्दांचा अर्थ आपल्याला जाणवतो. नामही अर्थरूपच आहे. खरे म्हणतांनाही दोन अर्थ

आहेत. एक, व्यावहारिक सत्य म्हणजे Truth आणि दुसरे, ज्याला आपण सत् म्हणतो ते म्हणजे Reality म्हणजेच पारमार्थिक सत्य. नामाच्या बाबतीत Reality ची जाणीव कां होत नाही? मी यावर विचार केला आहे तो सांगतो. स्थळ, काळ आणि निमित्त किंवा कार्यकारणभाव ह्या तीन बंधनांत आपण वावरतो. नाम हे ह्या तीन्हींच्याही पलीकडचे आहे. नाम घेतांना काळाचा विसर पडणे ही पहिली पायरी आहे. नामाला बसला की बसला; किती वेळ नाम चालू आहे याचे त्याला भानच राहाणार नाही. दुसरी पायरी स्थळाचा विसर पडणे ही आहे. ह्या दोन्ही पायऱ्या साधणे एकापरी शक्य आहे पण तिसरा कार्यकारणभाव नाहीसा होणे फार कठीण आहे. मी नाम घेतो; त्यातून अमुक व्हावे, समाधान मिळावे, ज्ञान व्हावे असे काहीतरी राहातेच. नामासाठी नाम घेतो, नाम घेण्याला काही कारण नाही असे होत नाही. आपल्या जीवनात कारणरहित असे काही आहे का? विचार केला तर लक्षात येते की माझ्या 'असण्याला' काही कारण नाही. मी आहे म्हणजे आहे. त्याला दुसरे काही कारण नाही. माझे असणे सिद्ध करायला दुसऱ्या कशाची जरुरी नाही. अर्थात मी कां जगतो हा प्रश्न निराळा. त्याचे काहीतरी उत्तर मिळेल, पण मी कां आहे याला उत्तर नाही . तसे नाम केवळ आहे. माझे असणेपण जसे मला जाणवते तसे नामाचे असणेपण जाणवणे, म्हणजेच नामाचे नसणेपण कधीही नसणे ही नामाची Reality आहे. मी जसा जिवंत आहे तसे नाम जिवंत आहे. ते सत् आहे तसे चित्‌ही आहे. हा नामाचा Dynamic aspect आहे. नाम सत् आणि चित् आहे तसेच ते आनंदही आहे. आनंदाशिवाय् त्यात काही नाहीच. नामाची ही Reality जाणवण्यासाठी काय करावे सांगा.

**साधक प :** नाम समाधानरूप आहे. ते घेतांना समाधान वाटले पाहिजे. तुम्ही म्हणता तसे तीन्ही अवस्थांमध्ये नाम राहाणे हा आदर्श आहे. स्वप्नातदेखील नामाची आठवण झाली पाहिजे; ती होत नाही. जागेपणी आपण नामात राहाण्याचा प्रयत्न करतो पण स्वप्नात आपला खरा लपलेला मी वर येतो.

**पू. बाबा :** होय हे खरे आहे. नाम घेतांना विचार थांबणे कठीण आहे. निर्विचार होता येऊ लागले की आत्मज्ञान होते असे पतंजलींनी म्हटले आहे.

यानंतर, विषयातून मला आनंद मिळतो तसा नामाचा थोडा जरी आनंद मिळाला तरी मी त्याच्यामागे जाईन; नामाचे प्रेम, 'तद्विस्मरणे परमव्याकुलता' ही फार पुढची पायरी आहे; श्रीभाऊसाहेबांसारखे, 'महाराज भेटले, झाले!' असे

वाटणे किती कठीण आहे इत्यादी पूर्वी झालेल्या गोष्टींवर चर्चा झाली. चर्चेतला नवीन मुद्दा म्हणजे मनाची उपेक्षा केल्याखेरीज ते क्षीण होणार नाही. साधन कटाक्षाने केलेच पाहिजे पण त्यात भावनेचा ओलावाही पाहिजे. हा भावनेचा ओलावा आणि तळमळ नामच सर्वस्व आहे असे वाटू लागल्याशिवाय, वैराग्याशिवाय निर्माण होणार नाही.

## | ३४६ | (८ ऑक्टोबर १९९३)

आमच्यापैकी एका साधकांनी भ्रम आणि सत्य यांवर प्रकाश टाकणारे एका गणितज्ञाचे पुस्तक पू. बाबांना पहायला दिले. ते पुस्तक पाहून पू. बाबा म्हणाले की त्यांनी एकदा Mathematics चा अभ्यास सुरू केला होता. त्यांनी ते श्रीमहाराजांच्या कानावर घातले तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, हे सारे कशाला करायचे ? मूळ सत्ता किंवा सद्वस्तु जाणली की बाकी सर्व जाणले जाते. त्यामुळे तो प्रयत्न पुढे तसाच राहून गेला. तथापि तुम्ही दिलेले हे पुस्तक पाहून देईन.

पू. बाबा पुढे म्हणाले, मला तुम्हाला कृष्णमूर्तींचे काही वाचून दाखवायचे आहे. श्रीमहाराजांनी जे सांगितले तेच जो सांगतो त्याचे ते सांगणे खरे अशी आपली माझी test - कसोटी आहे. त्या कसोटीला हे किती उतरते ते पहा. श्रीमहाराजांना एकदा विचारले होते की देव भेटतो म्हणजे काय होते ? तुम्हांला माहीत आहे की त्या वेळी जुन्या घरात आम्ही पहिल्या मजल्यावर आणि श्रीमहाराज तळमजल्यावर राहात होते. माझा प्रश्न ऐकल्यावर श्रीमहाराज म्हणाले, तुम्ही वरून खाली येता तेव्हां भगवंत खाली आला असे वाटले की देव भेटला. तुम्ही जेथे जाता तेथे, जे करता त्यात सर्व ठिकाणी तो जाणवू लागतो - नव्हे, तो तुमच्यावर येऊन आदळतो. कृष्णमूर्ती येथे (Note Book Page 185) म्हणतात की ते एका गृहस्थांबरोबर बोलत बोलत बाहेर पडले आणि त्यांना एकाएकी जाणवले की तो (दुसरा) तेथे आहे. ही जाणीव इतकी तीव्र होती की त्यांचे बोलणे एकदम थांबले आणि बराच वेळ त्याच्या अस्तित्वाची जाणीव टिकून राहिली. (The moment one stepped out of the house, talking with another of quite different things, that otherness, that unknowable was there. It was so unexpected, for one was in the midst of serious conversation and it was there with such urgency. All talk came to an end, very easily

and naturally.) श्रीमहाराजांचे ते येऊन आदळते म्हणणे आणि कृष्णमूर्तींचे It came with such urgency म्हणणे, दोन्ही एकच.

आपण बरेच दिवस नामाच्या सत्यतेबद्दल विचार करत आहोत. नाम आपल्याला सत्य (Reality) वाटत नाही. जीवनात आपल्याला सत्याचा काही अनुभव आहे का?

**साधक प** : मी आहे याबद्दल मला शंका नाही.

**पू. बाबा** : मी आहे असे मी कशाला म्हणतो? देहाला मी म्हणतो का? तसे म्हणावे तर देह नाहीसा झाला तरी मी असेन असेही म्हणतो.

**साधक ग** : देहापलीकडे मी आहे हे बुद्धीला पटले तरी तसे वाटत नाही. देह गेला की मी गेलो असे वाटते.

**साधक प** : 'मी आहे' मधे देखील माझ्या असणेपणाला महत्त्व आहे ते आत्ता मी आहे इतकेच. म्हणजे वर्तमानातला मी खरा आहे. तसेच केवळ असणेपणाला महत्त्व नाही, सत्यता नाही, उदाहरणार्थ, येथे हे टेबलही आहेच. पण माझे असणेपण जिवंत आहे. मला त्याचे भान आहे.

**पू. बाबा** : पण तरीदेखील मी आहे म्हणजे नेमके काय आहे? आणि माझ्या असण्याचा जो सत्यपणा आहे तो नामाला का देता येत नाही?

**साधक ब** . आपण विचाराचे खरेपण मानतो पण नाम विचाराच्याही पलीकडचे आहे. म्हणून त्यासाठी आधी निर्विचार झाले पाहिजे

**पू. बाबा** : निर्विचार होण्यात देखील मी निर्विचार झालो आहेच.

**साधक प** : मला खरा वाटणारा मी अहंकार आहे. तो गेल्याशिवाय नाम खरे वाटणार नाही.

**साधक क** : अहंकार आणि वासना गेल्याखेरीज मी खरा वाटणार नाही.

**पू. बाबा** : श्रीमहाराज म्हणाले तसा प्रत्येकाला बुडविण्याइतका अहंकार असतोच, पण हे संपले पाहिजे. म्हातारपण येण्यापूर्वी हा अभ्यास करा बाबानो! म्हातारपण फार कठीण आहे.

## |३४७| (१५ ऑक्टोबर १९९३)

**पू. बाबा** : गुरुदेव रानडे हे फार श्रेष्ठ साधक होते. साधक कसा असावा याचा ते आदर्श आहेत असे त्यांच्याबद्दल श्रीमहाराज म्हणत. A coustructive survey of Upanishadic Philosophy हा त्यांचा ग्रंथ १९२६ मधे प्रसिद्ध झाला. हा ग्रंथाची जगभर कीर्ती झाली. पण आपले मोठेपण

त्यांनी साधनाच्या आड येऊ दिले नाही. त्यांनी बोलावले म्हणून एकदा मी त्यांच्याकडे गेलो होतो तेव्हां नामात सगळे योग येतात असे त्यांनी दोनदा सांगितले. शेवटच्या आजारात जवळ जवळ पाच दिवस त्यांनी खाणे सोडले होते. शरीर शक्य तितके स्वच्छ करून ते भगवंताला परत द्यायचे ही भावना! अगदी शेवटच्या दिवशी देखील संध्याकाळी बाहेर जाऊन त्यांनी नेहमीचा नेम (जप) केला व रात्री देह ठेवला. (गुरुदेवांच्या निर्याणानंतर डॉ.पी.डी.खानोलकरांनी एका लेखात गुरूदेवांच्या शेवटच्या पाच दिवसांचे पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे "...During the last five days before his departure (Niryan) he was completely detached from the world.....During these last five days he did not take even a morsel of food or a drop of water, but took particular care to get his bowels cleared by laxatives. The doctor on examination found the lungs clear and he did not find any abnormality except extreme asthenia and it was astonishing for him to see that no faecal matter was lodged in the colon....Thus did the revered and elevated Soul depart, with a complete control over his disease; giving up his clear body to the creator , as did Kabir and Sri Nimbargi Maharaj." Quoted by Sri M. S. Deshpande in his book Dr. Ranade's life of light. Bharatiya vidya Bhavan pages. 192, 193) ह्या पुस्तकात श्री. देशपांडे पुढे लिहितात.

Thursday the 6th June 1957 was his last day on earth. On that day Sri Gurudev went into his car for meditation, on the road to Inchagiri, He spent about two hours in meditation . After his return from meditation he did not leave his bed. .. He suggested to his disciples to perform the bhajan. ... After it was over camphor was lit for performing arati. At about 10-30 p.m. the arati was over; all the disciples loudly uttered, 'Vithal Vithal!' the flame of the camphor was extinguished, and at that very moment the flame of Sri Gurdeva's Soul flew out of his frame and got merged in the Lord!"(page 193) (आपल्या

निर्याणापूर्वीचे अखेरचे पाच दिवस ते (गुरुदेव रानडे) जगापासून पूर्णपणे अलिप्त झाले होते. या शेवटच्या पाच दिवसात त्यांनी घासभर अन्न किंवा पाण्याचा थेंबही घेतला नाही, पण सौम्य रेचक घेऊन आतडी स्वच्छ ठेवण्याची विशेष काळजी घेतली. डॉक्टरांनी तपासले तेव्हा त्यांची फुफ्फुसे स्वच्छ होती आणि अतिशय अशक्तपणाखेरीज त्यांच्या शरीराची काहीही असाधारण स्थिती नव्हती आणि आश्चर्य वाटावे अशी गोष्ट म्हणजे त्यांच्या मोठया आतड्यात (बृहदांत्र) थोडाही मळ नव्हता.....अशा प्रकारे आपल्या व्याधींवर पूर्ण नियंत्रण ठेवून त्या आदरणीय उन्नत आत्म्याने आपला देह ठेवला. कबीर आणि श्रीनिंबर्गी महाराजांप्रमाणे त्यांनी स्वत:चे निर्मळ शरीर विधात्याला परत केले - एम्. एस्. देशपांडे यांच्या रानडे यांचे दिव्य जीवन या ग्रंथातून पृष्ठे १९२ -१९३ -भारतीय विद्या भवन.)

गुरुवार दि. ६ जून १९५७ हा त्यांचा या पृथ्वीवरचा शेवटचा दिवस होता. त्या दिवशी गुरुदेव आपल्या मोटारीतून इंचगिरीच्या रस्त्यावर ध्यानासाठी गेले. ध्यानामधे त्यांनी सुमारे दोन तास घालविले. तेथून परत आल्यावर मात्र त्यांनी अंथरूण सोडले नाही....आपल्या शिष्यांना त्यांनी भजन करायला सांगितले....भजन झाल्यावर आरती करण्यासाठी कापूर पेटविण्यात आला. रात्री १०-३० च्या सुमारास आरती झाली आणि सर्व शिष्यांनी विठ्ठल विठ्ठल असा विठ्ठलनामाचा गजर केला! आरतीतील कापूर विझला आणि त्या क्षणीच गुरुदेवांची प्राणज्योत मालवली आणि त्यांच्या देहातून आत्मा बाहेर पडून भगवंतात विलीन झाला. (पृष्ठ १९३)

साधनात शिस्त असावी तर अशी! जगप्रसिद्ध विद्वान असूनही विद्येपेक्षा त्यांनी नामाला महत्त्व दिले. ग्रंथलेखनाबद्दल ते एकदा श्री.काकासाहेब तुळपुळ्यांना म्हणाले की एकसारखे नाम घेण्याची शक्ती नाही म्हणून मग त्याला पोषक असे काहीतरी करतो. शक्ती असती तर चोवीस तास नामच घेतले असते.

ब्रह्मानंद महाराजही येवढे पंडित, पण ही विद्या व्यर्थ आहे म्हणाले आणि त्यांनी ती श्रीमहाराजांच्या पायावर वाहिली. पुढे एकदा त्यांना काही पंडितांनी वेदान्तातला काही प्रश्न विचारला तेव्हां ते माझी जिव्हा मी नामाला विकली आहे असे म्हणाले. आज त्यांची पंचाहत्तरावी पुण्यतिथी म्हणून ही आठवण झाली. एकदा श्रीमहाराजांना म्हणालो की ब्रह्मानंद महाराजांसारखे नामाचे प्रेम मला द्या. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले की ह्या एकाच जन्मात होणाऱ्या गोष्टी नाहीत.

(गुरुदेव आणि ब्रह्मानंद महाराज ही खरी मोठी माणसे असूनही त्यांनी सर्व प्रकारच्या मानसन्मानांचा मोह टाळला हे सांगतांना पू. बाबांनी अप्रत्यक्षरीत्या त्यांच्या वागण्यामागचे तत्त्व सांगितले.)

नंतर पू. बाबांनी पुण्याच्या एका बाईंनी त्यांना लिहिलेल्या पत्राचा काही भाग वाचून दाखवला. पाच सहा वर्षांपूर्वी त्या पू. बाबांना भेटल्या होत्या त्यावेळी पू. बाबांनी त्यांना रोज जप आणि मानसपूजा करायला सांगितले होते. आता त्या रोज पाच हजार जप करतात. त्याशिवाय येता जाता जप चालू असतो. त्यांना होऊ लागलेली कुंडलिनी जागृतीची लक्षणे त्यांनी पत्रात लिहिली आहेत. पू. बाबा म्हणाले की ह्या लक्षणांना अध्यात्मात तसे महत्त्व नसले तरी साधन करताना त्यांचा Milestones (खुणेचे दगड) म्हणून उपयोग होतो. आपण (म्हणजे तुम्ही) इतकी वर्षे नामस्मरण करीत असूनही अनुभव का येत नाहीत याचा प्रत्येकाने शोध घ्यावा व ते कारण दूर करावे. आपण नामस्मरण करतो पण संसारातल्या अगदी क्षुल्लक गोष्टींनी देखील खाली येतो. त्या विचारातच रमून जातो आणि मग मन एकाग्र होत नाही.

**साधक प** : कपडा जसा अनेक उभ्या आडव्या धाग्यांचा मिळून होतो, प्रत्येक धागा क्षुल्लक वाटतो तसे आपले जीवन देखील अनेक लहान लहान घटनांचे मिळूनच बनलेले असल्यामुळे त्या घटना तशा क्षुल्लक वाटल्या तरी त्या मन व्यापावयाला पुरेशा असतात. त्याबरोबर इतरांच्या विचारांचाही आपल्यावर परिणाम होत असतो.

**पू. बाबा** : पण हे आता थांबले पाहिजे. अजूनही साधनाची उत्कटता वाटली नाही तर ती यापुढे केव्हां वाटू लागणार?

## |३४८| (२२ ऑक्टोबर १९९३)

काल साधक प पू. बाबांना भेटले होते तेव्हां त्यांनी पू. बाबांना विचारले होते की आम्ही नाम घेतो पण ते घेतांना मन एकाग्र होत नाही. एकाग्रता साधल्यावर त्यामधून जर समग्रतेमधे जायचे असेल तर एकदमच समग्रतेचा अभ्यास का करू नये? समग्रतेचा एकदम अभ्यास करायचा झाला तर तो कसा करायचा? त्यांच्या कालच्या ह्या प्रश्नांचा संदर्भ घेऊनच पू. बाबांनी सांगायला सुरुवात केली.

पू. बाबा म्हणाले, ध्यान किंवा योगमार्ग मनाची एकाग्रता शिकवतो; पण ती साधली म्हणजे आत्मज्ञान होतेच असे नाही. त्यासाठी समग्र जीवनाकडे पहाता

यावे लागते. भक्तिमार्गात देखील सचेतन शरीर, मन (त्यात बुद्धीही आली) आणि अहंकार यांचे अस्तित्व मान्य करावे लागते. साधन करायचे म्हणजे मन भगवंताच्या नामात गुंतवायचे. म्हणजेच विचार, भावना, कल्पना इत्यादी मनाची जी जी कार्ये आहेत ती सर्व भगवंताने भरून टाकायची. हे साधले की आपल्या जीवनातला भगवंताचा हात साधकाला दिसू लागतो. मग मुख्यत: त्याचा अहंकार क्षीण होऊ लागतो. अहंकार क्षीण झाला की मी नाही, तू (भगवंत)आहेस अशी त्याची खात्री होते.

समग्रपणे विचार करायचा म्हणजे सुरुवातच मुळी जे जे घडते आहे ते ते त्याच्या सत्तेने घडते आहे आणि म्हणून ते बरोबरच आहे अशी करावी लागते. एकनाथ महाराजांचे जीवन असे होते. भागवतात त्यांनी म्हटले आहे -

''गृहाश्रमु न सांडितां। कर्मरेखा नोलांडितां।
निजव्यापारीं वर्ततां। आत्मबोधु सर्वथा न मैळे ॥९.४३५॥

'कर्मरेखा नोलांडितां' म्हणजे तुमच्या वाट्याला जे कर्म आले आहे ते बरोबर करावयाचे. हे कर्म करतांना वरवर पहाता तो सामान्य माणसाप्रमाणेच राहातो, सामान्य माणसासारखाच दिसतो पण त्याचा आत्मबोध थोडासा देखील मलीन होत नाही. केव्हांही पहा, आतमधे तो भगवंताशी तादात्म्यच झालेला असतो.

कृष्णमूर्तींनी देखील हा holistic view घेतलेला आहे. ते सांगतात की तुम्ही देव मानू नका, गुरु करू नका, नाम घेऊ नका पण जीवन सहजपणे जगा आणि त्याकडे साक्षित्वाने पहा. Understanding आणि Choiceless awareness वर त्यांचा भर होता. त्यांची झेप एकदम दृश्यापलीकडे होती. तथापि जर जीवनाकडे समग्रतेने पहाता आले तर ते फार उत्तम आहे. मग आपणच काहीतरी संकल्पना (Concepts) करायच्या आणि त्यांच्यामागे धावायचे हे होणार नाही. माझे सगळे जीवन -मग त्यात जशा मोठ्या घटना आल्या तशा लहान सहान अगदी क्षुल्लक वाटणाऱ्या घटनाही आल्या -त्यांच्या इच्छेनुसार आहे, माझे साधनही तेच करून घेत आहेत असे वाटले पाहिजे. संकटे आली असतां भगवंताची आठवण राहाते म्हणून 'विपद: सन्तु न: शश्वत् येन संस्मर्यते हरि:। असे कुंतीने मागितले. आपली स्थिती देखील अशीच आहे. संकटात महाराजांची आठवण होते आणि संकट टळले की ती आठवणही गायब होते. पण सारखी संकटे आपल्याला सोसतील का?

पू. बाबा पुढे म्हणाले, श्रीमहाराजांनी मला सांगितले की मला माझा संसार नीट करता आला नाही; पण मला विकतचे श्राद्ध घ्यायची सवय आहे. मी

दुसऱ्याचा संसार नीट करून दाखवतो, पण माझ्यावर कोणी सोपवीतच नाही. आता तुम्ही तरी सोपवा. त्यांचे सांगणे तेव्हां समजले नाही. खरे सोपवणे भाऊसाहेबांनी केले. महाराजांनी ही मुले माझी म्हटल्यावर त्यांच्याबद्दलचे सुखदु:ख, अपेक्षा यातून ते मोकळे झाले. वास्तविक त्यांना शिक्षणाची आवड होती पण एकही मुलगा मॅट्रिक देखील झाला नाही. पण सर्व काही महाराजांवर सोपवल्यामुळे त्यांनी त्याची खंत मानली नाही. नामही त्यांनी श्रीमहाराजांना आवडते म्हणून घेतले!

**साधक ब** : हे अगदी बरोबर आहे. नामातून अमुक व्हावे, तमुक होईल अशा अपेक्षा करण्यापेक्षा त्यांनी सांगितले आहे म्हणून मी नाम घेतो हेच केले पाहिजे. उगीच नसत्या उड्या मारण्यात अर्थ नाही.

**पू. बाबा** : सकाळी उठल्यापासून रात्री झोपेपर्यंत प्रत्येक गोष्ट त्यांना सांगून करावी. त्यांची एकसारखी आठवण राहावी. एकप्रकारचे भानच म्हणाना! जर जीवनात ते सर्वकाळ शिरले तरच समग्रतेचा अभ्यास साधला असे म्हणता येईल. समग्रतेच्या साधनाच्या दृष्टीने तुकाराम महाराजांचा 'बोलावा विठ्ठल पहावा विठ्ठल। करावा विठ्ठल जीवभाव।'हा अभंग महत्त्वाचा आहे. या अभंगात वर्णन केलेली स्थिती येण्यासाठी सुरुवात म्हणून रोजच्या जीवनात घडणाऱ्या घटनांच्या बाबतीत एक प्रकारचा holy indifference (पवित्र समवृत्ती) पाहिजे.

चर्चेचा एकंदर रोख असा होता की मन एकाग्र करण्यासाठी लागणारी परिस्थिती, वय, शक्ती इत्यादी आज आपल्याजवळ नाही. साक्षीभावाने जगाच्या प्रवाहाकडे पाहणे, तटस्थ राहणे साधत नाही. त्यासाठी पर्याय म्हणून, आपण जगाचाच भाग आहोत, जगापासून वेगळे नाही हे ओळखून समरसतेचा अभ्यास करावा. त्यासाठी जीवनात जे जे घडते त्याबद्दल कसलीही अपेक्षा किंवा तक्रार असू नये. सर्व काळ सद्गुरूंची आठवण ठेवावी. ते मला सदैव पाहातात असा भाव ठेवता आला तर हातून वावगे कृत्य होणारच नाही. श्रीमहाराज जेव्हां एका बाईचा मुलगा मेला म्हणून रडले आणि त्यानंतर लगेच एका लग्नसमारंभात आनंदाने सामील झाले तेव्हां त्यांचे हे नाटक नव्हते, तर दोन्ही घटनांत ते सारखेच समरस झाले होते. त्यांची सहानुभूति, प्रेम, आनंद सगळेच खरे होते. मुलगा झाला नाही तर घरात ठेवून घेणार नाही असे नवरा म्हणतो असे एका गरोदर बाईने सांगितले तेव्हां ते ऐकून त्यांच्या डोळ्यात पाणी आले कारण त्यांचे हृदय आईचे होते.

**पू. बाबा :** बरी आठवण झाली. अलीकडेच एक बाई भेटायला आल्या होत्या. रविवारी प्रवचनाला येतात. डॉक्टर आहेत. त्यांनी सांगितलेली हकिगत सांगतो. ह्या बाई त्यांच्या मामाबरोबर निसर्गदत्त महाराजांकडे जात असत. एक दिवस निसर्गदत्त महाराजांनी आपण होऊन बाईंना अनुग्रह दिला आणि सांगितले की मी येवढेसे (नाम) दिले आहे पण ते नीट जप. तेव्हांपासून बाई त्यांना दिलेल्या मंत्राचा नियमित आणि मनापासून जप करतात. इथल्याच एका हॉस्पिटलमधे नोकरी करतात. मुलगी लहान होती तेव्हां वैधव्य आले. आता ती मुलगी सुमारे वीस वर्षांची आहे. ह्या डॉक्टरीण बाईंच्या हाताखाली काम करणाऱ्या एका कॉम्पाउंडरने औषधांच्या बाबतीत सुमारे पाच लाख रुपयांची अफरातफर केली आणि कागदपत्रांवर बाईंच्या बनावट सह्या करून त्यांच्यावर आळ घातला. साहजिकच बाईंना मोठी काळजी लागली. एका रात्री जप करतांना त्यांना निसर्गदत्त महाराजांचे शब्द ऐकू आले की काळजी करू नको; मी आहे. पुढे तो कॉम्पाउंडर त्यांच्या घरी आला. त्याने आपण बनावट सह्या केल्या म्हणून कबूल केले आणि तसे लिहून दिले. त्याचप्रमाणे सर्व पैशांची भरपाई करण्याचेही मान्य केले. लोकांनी त्या कॉम्पाउंडरविरुद्ध पोलिसात तक्रार नोंदवायचा बाईंना सल्ला दिला; पण पुन्हा गुरूंनी आता या भानगडीत पडू नको म्हणून सांगितले. हकिगत सांगून पू. बाबा म्हणाले, खरी श्रद्धा असली तर तुमचे गुरु तुम्हांला सांभाळतात. म्हणून सर्व काही त्यांच्यावर सोपवावे.

## ।३४९।

मुक्काम गोंदवले. नामसाधन अभ्यास शिबीर (९) रविवार दि. ३१ ऑक्टोबर ते गुरुवार दि. ४ नोव्हेंबर १९९३. रोज संध्याकाळी साडेसात नंतर पू. बाबांच्या खोलीत झालेल्या चर्चेचा सारांश

## ।३४९ - १। (३१ ऑक्टोबर १९९३)

काल संध्याकाळी नामाच्या खरेपणाबद्दल चर्चा सुरु झाली होती. त्याच संदर्भात आज संध्याकाळी चर्चा पुढे चालू झाली.

दृश्य खरे वाटते; आपला देह खरा वाटतो तसे नाम खरे वाटत नाही. तथापि आपण नाम घेत राहिलो तर आपले गुरु आपल्याला मदत करतात. त्यांच्या कृपेनेच मग दृश्याचे खरेपण कमी होऊ लागते. नाम शक्तिस्वरूप आहे. साधन वाढायला सत्संगती आवश्यक आहे पण ती दुर्मिळ आहे. अशा वेळी अन्य

साधकांच्या संगतीचाही फार उपयोग होतो. त्यांना आपल्या अडचणी समजतात. एकमेकांशी चर्चा करून साधनमार्गातले गैरसमज नाहीसे होतात आणि मग समजून केलेले साधन लाभदायक होते.

ब्रह्मानंद महाराजांनी जसे आज्ञापालन केले तसे जर करता आले तर मग दुसऱ्या कोणत्याही गोष्टीची आवश्यकता नाही. विचाराने नामाचे खरेपण पटणे कठीण आहे म्हणून भावना - श्रद्धा वाढविली पाहिजे.

## | ३४९ - २ | (१ नोव्हेंबर १९९३)

आपण आपल्या प्रतिक्रिया बदलल्या पाहिजेत. आपल्या प्रतिमेचा भंग केला पाहिजे. त्याचबरोबर तितिक्षेचा अभ्यास केला पाहिजे. राग येतो तेव्हां आपण रागस्वरूप होतो. सुरुवातीला राग आवरता आला नाही तरी त्याचा पश्चात्ताप तरी झाला पाहिजे. तथापि पश्चात्तापाची देखील सवय होण्याची भीती असते. तितिक्षेच्या बाबतीत प्रथम शरीरदु:ख सहन करायला शिकले पाहिजे. तक्रार करता कामा नये. काहीही घडो, असू दे असे वाटले पाहिजे. तसेच कोणतीही घटना घडल्यावर माझ्या साधनाला याचा काय आणि कसा उपयोग होईल हे पहायला शिकले पाहिजे. प्रत्येक घटनेत श्रीमहाराज मला काहीतरी शिकवत आहेत असे वाटावे.

## | ३४९ - ३ | (२ नोव्हेंबर १९९३)

**पू. बाबा :** आज सकाळी आपण ज्ञानेश्वर महाराजांच्या हरिपाठातला चौथा अभंग पाहिला. त्यात ते म्हणतात "भावेविण भक्ति भक्तिविण मुक्ति। बळेंविण शक्ति बोलूं नये॥" याच्या उलट 'ज्ञानादेव तु कैवल्यम' असे वचन आहे. या दोहोंचा मेळ कसा घालायचा? बरे, भक्तीतून ज्ञान होते आणि मग मुक्ती होते म्हणावे तर भक्तीला गौणत्व येते. ज्ञानपूर्व भक्ती, ज्ञानोत्तर भक्ती यासंबंधीही चर्चा झाली.

**साधक ग :** 'भक्तीचें उदरीं जन्मलें ज्ञान' असा एक अभंग मागे एकदा आपण सांगितला होता.

**पू. बाबा :** होय, एकनाथ महाराजांचा अभंग आहे. नाथांनी भक्ती आणि ज्ञान यांच्या संबंधाचे फार चांगले वर्णन केले आहे. मुक्ती म्हणजे बंधनरहित होणे. त्यासाठी प्रथम वासनारहित झाले पाहिजे. सत्त्व, रज आणि तम हे तीन

गुण बंधनाला कारण होतात. म्हणून बंधनरहित होण्यासाठी या तीन्ही गुणांपलिकडे गेले पाहिजे. अमृतानुभवात आणि गीतेतही ज्ञान हा देखील बंध आहे असे सांगितले आहे. 'सुखसंगेन बध्नाति ज्ञानसंगेन चानघ' (भगवद्गीता १४.६) ज्ञानाशिवाय भक्ती होऊ शकते कारण भक्तीच्या मुळाशी भावना असते आणि प्रत्येकाला भावना असतेच; प्रमाण फार तर कमी जास्ती असेल. ज्ञान रुक्ष आहे तर भक्तीमधे मानवता आहे, तळमळ आहे. नामामध्ये पावित्र्याची भावना आहे. गुरु ज्ञानस्वरूप असल्यामुळे त्यांनी दिलेले नाम मी प्रेमाने घेतो म्हणजे ते ज्ञान मलाही होणारच अशी श्रद्धा पाहिजे. ज्ञानमार्गात विवेकाला - एकूण साधनचतुष्टयाला महत्त्व आहे तर भक्तीमध्ये श्रद्धा महत्त्वाची आहे. तुम्ही कसेही नाम घ्या तेथे सद्गुरूंचे अस्तित्त्व असतेच.

दुसऱ्या दिवशी म्हणजे बुधवार दि. ३ ला सकाळच्या निरूपणात पू. बाबांनी ज्ञानमार्ग आणि भक्तिमार्ग यांमधील संबंध आणखी स्पष्ट केला. ते म्हणाले, की हे दोन्ही मार्ग दोन-तृतीयांश वेगवेगळे आहेत पण पुढे ध्यानाच्या स्थितीपासून ते एकत्र येतात. सुरुवात ज्ञानमार्गाने किंवा भक्तिमार्गाने होते पण शेवटचे एक -तृतीयांश चालणे एकाच मार्गावरून होते.

भक्तिमार्गाखेरीज अन्य मार्गात येणाऱ्या अडचणी किंवा कठीण भाग असा: कर्ममार्गात मी कर्ता हा अहंकार सहज जात नाही. ज्ञानमार्गात मला कळत नाही असे पूर्णपणे वाटत नाही, तर योगमार्गात प्रत्याहार साधणे कठीण जाते. भक्तिमार्गात मी त्याचा आहे हा भाव वाढवावा लागतो. गुरुवचनावर पूर्ण श्रद्धा ठेवून तसे आचरण करावे लागते.

(भक्ति आणि ज्ञान यांचा संबंध स्पष्ट करणारा एकनाथ महाराजांचा अभंग :

भक्तीचे उदरीं जन्मलें ज्ञान। भक्तीनें ज्ञानासी दिधलें महिमान॥ १ ॥
भक्ति तें मूळ ज्ञान तें फळ। वैराग्य केवळ तेथींचे फूल॥ २॥
फूल फळ दोनी येरयेरा पाठीं। ज्ञान वैराग्य तेविं भक्तीचे पोटीं॥ ३॥
भक्तीविण ज्ञान गिंवसिती वेडे। मूळ नाहीं तेथें फळ केविं जोडे॥ ४॥
भक्तियुक्त ज्ञान तेथें नाहीं पतन। भक्ति माता तया करितसे जतन॥ ५॥
शुद्धभक्तिभाव तेथें तिष्ठे देव। ज्ञानासी तो ठाव सुख वस्तीसी॥ ६॥
शुद्ध भाव तेथें भक्तियुक्त ज्ञान। तयाचेनि अंगें समाधी समाधान॥ ७॥
एकाजनार्दनीं शुद्ध भक्ति क्रिया। ब्रह्मज्ञान त्याच्या लागतसे पाया॥ ८॥

## |३४९-४| (३ नोव्हेंबर १९९३)

डॉ.आप्पासाहेब आठवले पू. बाबांना तुमचे साधन काळातील काही अनुभव सांगा म्हणाले. पू. बाबा काहीच बोलले नाहीत. थोड्या वेळाने म्हणाले की साधन करतांना मला उपयोगी पडत असलेल्या काही गोष्टी सांगतो; त्या लक्षात ठेवा.

आता माझे वय झालेले आहे. मृत्यू केव्हांही येऊ शकतो; आता साधन करावयास थोडेच दिवस राहिले आहेत असे वाटू लागले, म्हणजेच मृत्यूचे निरोगी भान ठेवले की साधनाला जोर येतो. मृत्यूची तशी भीती नाही. पण I am counting my days.

मृत्यूची भीती वाटत नसली तरी आजार झाला तर साधन होणार नाही. पॅरेलिसिस झाला, स्मृती गेली असे काहीही होऊ शकते. गेल्या वर्षी गुडघ्यात पाणी झाले तेव्हां आठ दिवस झोप नव्हती. जागचे हालता येत नसे. घरातली बाकीची सर्व मंडळी झोपलेली असत. अशा वेळी केवळ नामानेच साथ दिली. त्यामुळे तेव्हांपासून हे जास्त वाटू लागले. आज हाताशी आहे तो दिवस खरा हे लक्षात ठेवून शक्य तितके जास्त साधन आजच केले पाहिजे.

नंतर पू. तात्यासाहेब आणि भाऊसाहेब यांच्या गोष्टी निघाल्या.

**पू. बाबा :** वास्तविक पू. तात्यासाहेबांच्या मुखाने श्रीमहाराज बोलत. तरीदेखील एकदा श्रीमहाराज म्हणाले की त्याचे (म्हणजे पू. तात्यासाहेबांचे) साधन त्यालाच करावे लागेल. यावरून दिसते की उद्धरेत् आत्मनात्मानम्. गुरु कृपा करतात, मार्गदर्शन करतात पण ज्याचे साधन त्यालाच करावे लागते. साधन होण्यासाठी सत्संगती खूप उपयोगी आहे.

श्री. भाऊसाहेबांच्या पत्नी (सौ. बाई) आजारी होत्या. अगदी मरणोन्मुख वाटल्या म्हणून सगळ्यांनी संध्याकाळी लवकर जेवणे उरकून घेतली तेव्हां भाऊसाहेब म्हणाले की गडबड नको, ती तुमच्या आड येणार नाही. पुढे त्या आजारातच त्या गेल्या. त्यांच्यानंतर श्री. भाऊसाहेब सुमारे सात आठ वर्षे होते. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले की भाऊसाहेब इतके जगतील असे वाटले नव्हते, नाहीतर त्यांना (सौ. बाईना) ठेवणे कठीण नव्हते!

यावरुन मणकर्णिका घाटावर श्रीमहाराजांनी प्रेत उठविले या त्यांच्या चरित्रात दिलेल्या घटनेचा कोणीतरी उल्लेख केला. पू. बाबा म्हणाले, श्रीमहाराजांना या घटनेबद्दल विचारले तेव्हां प्रथम ते म्हणाले की तो माणूस खरे

तर मेलेलाच नव्हता. मग म्हणाले की तो मेलेला उठला असे लोक काहीतरी म्हणतात. पण जास्त खोदून विचारल्यावर म्हणाले की गेलेला जीव त्या शरीरात परत येण्याची धडपड करीत असतो. त्याला आत ढकलले इतकेच.

पू. तात्यासाहेब गेल्यानंतर दोन दिवसांनी दिनकरला (श्री. दिनकरराव केतकर) रडू आवरेना. तो म्हणाला की माझे नुकसान झाले. तेव्हां ताई (त्यांची आई) म्हणाल्या की अरे, असे कां म्हणतोस? माझे केवढे मोठे नुकसान झाले ते बघ! पण श्रीमहाराजांची इच्छाच तशी होती. पुढे त्या आजारी असतांना मला म्हणायच्या की श्रीमहाराजांच्या काही गोष्टी सांगा आणि त्यांनीच पूर्वी सांगितलेल्या काही गोष्टी मी त्यांना सांगायचो आणि त्या ऐकतांना त्या स्वत:ला विसरून जायच्या. हे गुरूवरचे खरे प्रेम! एकदा मी त्यांना कबीराच्या एका दोह्यातला 'राम हमारा जप करे, हम बैठे आराम' हा चरण सांगितला तेव्हां त्या झोपलेल्या होत्या त्या एकदम उठून बसल्या आणि म्हणाल्या की हे अगदी खरे आहे.

गुरुदेव रानडे "Pathways to God in Hindi Literature" हे पुस्तक लिहीत होते तेव्हांची गोष्ट. मी त्यांना भेटायला गेलो होतो तेव्हां ते म्हणाले की पुस्तकासाठी एखादा दोहा अगर पद सांगा. मी कबीराचा 'लौन गला पानी मिला फिरही न भरि है गौन। सुरत शब्द मेला भया काल रहा गहि मौन॥ हा दोहा सांगितला. दोहा ऐकून गुरुदेव वाहवा, वाहवा म्हणाले आणि त्यांनी ह्या दोह्याचा त्यांच्या पुस्तकात समावेश केला. दोह्याचा अर्थ असा आहे : मिठाने भरलेली गोणी पाण्यात सोडली तर गोणीतले मीठ पाण्यात विरघळून जाते. ते परत गोणीत भरता येत नाही. तसे जीव नामात विरघळून गेला की साधकाचे देहभान नाहीसे होते, काळ स्तब्ध होतो म्हणजेच जीव काळाच्या बंधनापलीकडे जातो.(पहा : अध्यात्म संवाद भाग ३ संवाद क्र २५५)

नाम कसे घ्यावे, श्रीमहाराजांजवळ काय मागावे याबद्दल पू. बाबा म्हणाले, नाम घेतांना मी महाराजांकडे जात आहे, किंवा गोणीमधे माप टाकत आहे, नाम अतिशय पवित्र आहे असा आपल्या मनोरचनेनुसार रुचणारा भाव ठेवावा म्हणजे मग नामाची सत्यता जाणवू लागेल. नामाला जीवनात सर्वोच्च स्थान पाहिजे. 'जेथें नाम तेथें माझे प्राण' असे श्रीमहाराजांनी सांगितले आहे म्हणून समाधीसमोर जाऊन त्यांची प्रार्थना करा. त्यांना म्हणावे की 'नामामधें तुमचें अस्तित्व आहे, तें अस्तित्व आतां माझ्या जाणिवेमधें येऊ द्या.' तुम्ही नाम घेता म्हणजे तेथे महाराज आहेतच. त्याची खूण जाणिवेत आली की मग

नामस्मरण वाढायला हरकत नाही. खऱ्या तळमळीने प्रार्थना केलीत तर ते निश्चित त्यांची प्रेमखूण देतील. मग साधन कर असे सांगावे लागणार नाही.

ज्ञानमार्गी आणि भक्तिमार्गी यांच्यातला भेद सांगतांना पू.बाबा म्हणाले की ज्ञानी दृश्याचा निरास करीत करीत परमात्म्यापर्यंत पोचतो. यालाच व्यतिरेक म्हणतात; नेति, नेति. यासाठी चित्ताची एकाग्रता लागते. याच्या उलट भक्तिमार्गी प्रत्येक गोष्टीत, घटनेत, व्यक्तीत परमात्म्याचा हात पाहतो आणि असे पाहाता पाहाता आपोआप दृश्याचा निरास होतो. यालाच अन्वय म्हणतात. यासाठी चित्ताची समग्रता लागते. परवा मी सांगितले तसे मार्ग कोणताही असो, ध्यानातूनच पुढे जावे लागते. जो खूप नाम घेतो त्याची कुंडलिनी जागृत होते.

श्रीमहाराज एकदा म्हणाले की जगात दोनच गोष्टी आहेत. एक 'आहे' आणि दुसरे 'झालेले'. जे 'आहे' ते स्वयंभू आहे म्हणून ते धरावे आणि जे 'झालेले' आहे ते सोडून द्यावे. घड्याळाला किल्ली दिली की आतली सगळी चक्रे जशी फिरतात तसे जीवनात एकसारखे नाम चालू असले की जे जे घडते ते ते बरोबरच घडते हे समजू लागते आणि मग तक्रार राहात नाही.

श्रीमहाराजांना एकदा म्हटले की आपण इतके सांगता; ऐकतांना ते पटतेही, पण मग आम्ही त्याप्रमाणे वागत नाही. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले की एका बाईला तिच्या नवऱ्याचे भूत लागले होते. कोणी सांगितले म्हणून तिने नाशिकच्या रामकुंडात स्नान केले. तिला बरे वाटले पण नंतर पुन्हा भुताने झपाटले. भुताला विचारल्यावर ते म्हणाले की मी त्या कुंडाच्या बाहेरच उभा होतो! तसे तुमच्या प्रपंचाचे भूत आहे. येथून बाहेर पडलात की ते तुम्हाला धरते!

## |३५०| (१२ नोव्हेंबर १९९३)

**पू. बाबा :** गेल्या रविवारी निरूपणानंतर एक बाई भेटल्या. त्या नुकत्याच गोंदवल्याला झालेल्या शिबिराला आल्या होत्या. त्या सांगत होत्या की तेथे त्यांचे नामस्मरण चांगले झाले आणि मनाच्या त्या चांगल्या अवस्थेतच त्या मुंबईला परत आल्या. येथे आल्यावर त्यांच्या नवऱ्याने त्याचा भाऊ (बाईंचा दीर) परगावाहून काही दिवसांसाठी येणार आहे म्हणून सांगितले. बाईंना त्यामुळे नामस्मरणात व्यत्यय येणारसे वाटले म्हणून त्या नवऱ्याला म्हणाल्या की ते नंतर नाही का येऊ शकणार? याचा नवऱ्याला राग आला. तो म्हणाला

की तुझे हे नेहमीचेच आहे. बाईंना याचे दु:ख झाले आणि त्यांची नामस्मरणातली गोडी गेली!

पू. बाबा पुढे म्हणाले, आपण निमित्तालाच टेकलेले असतो. थोडे चांगले नाम होते आणि लगेच असा शक्तिपात होतो. याचे कारण आपले ध्येय निश्चित झालेले नसते. तसेच आपला अहंकार आपल्या साधनाच्या आड येतो. अगदी सामान्य गोष्ट, पण त्यामुळे त्या बाईंचा अहंकार दुखावला. म्हणून असा विचार केला पाहिजे की दुसरा कसा का वागेना मी माझ्या साधनाच्या आड येईल असे वागणार नाही. पाहुणे असतांना, घरकाम करतांना नामाचा अभ्यास करीन, त्यासाठी श्रीमहाराजांनीच ही संधी दिली आहे.

अखंड नामस्मरण केले तर ते नामच पुढचा मार्ग दाखवते. म्हणून नामालाच शरण जावे. त्याची प्रार्थना करावी. नामाने शक्तिसंचय होतो. ही शक्ती शहाणी आहे. काहीतरी कार्य केल्याशिवाय ती राहात नाही म्हणून साधनविरोधी कार्याकडे ती वळत नाही ना इकडे आपण सावध राहून लक्ष दिले पाहिजे. नामाच्या पावित्र्याबद्दल सांगतांना एकदा श्रीमहाराज म्हणाले, नाम घेता आणि तीर्थयात्रेला जावं असं तुम्हाला वाटतं! भावार्थ असा की नामाने सर्व पापे नाहीशी होतात यावर तुमची श्रद्धा नाही आणि म्हणून तीर्थयात्रा कराव्या असे तुम्हाला वाटते.

साधक कसा असतो हे पू.बाबांनी स्वामी रामदासांच्या God Experience part II मधून वाचून दाखवले, तो उतारा असा :

89. Devotee : How should an aspirant behave in society or live a life helpful for his progress ?

**Papa** : A spiritual aspirant should be very careful in regard to these three things - right food, right company and right action. It is very difficult to control external circumstances when moving in society with various sorts of people. So sadhana must he continuous and intense. He will then be able to keep away all obstacles. He must prepare himself by intense meditation during early hours of the morning and before retiring to bed. In the daytime at least he can be alret, but in sleep the mind gets out of control and he is liable to get bad dreams. Therefore, he must prepare the mind morning

and evening so that it can withstand the attacks of outside influence.

During the Sadhana period, Ramdas was somehow inspired to go to solitudes. He did not live in cities or households. He was driven to solitude or places where saints lived. God gave him the company of sadhus. Ramnam was an armour for him. External attacks did not touch him the least.

So if you keep Ramnam continuously on your tongue, nothing can affect you even when you are active in the world. But it is better to be on guard while moving with all classes of people. You do not know when a powerful Rajasic or Tamasic influence will drag you down. (त्या बाईचेच पहा ना! पू. बाबा.) After experiencing a relative peace for sometime, if you lose it suddenly for some reasons of this kind, you feel as if you are in fire. That is called the 'dark night of the soul'. In that state the mind refuses to think of God and you are utterly helpless and miserable; it is in a whirlpool; and solitude does not help. You have then to go to a holy man. How would you feel if you come to the cool shade of a tree after walking in the hot sun ? In the same way, when you are burning with desires and you cannot control yourself, the company of a holy man will relieve you and your mind will be bathed in peace.

...The rules of discipline should be self-imposed. The details are to be worked out by each one for himself in regard to food, company and work. The same rule cannot hold good for everybody.

(God Experience part II by Swami Ramdas. Second Edition 1987 pages 85 and 86)

(८९. **भक्त** : साधकाने समाजात कसे वागावे? त्याच्या प्रगतीस साहाय्य होईल असे त्याचे जीवन कसे असावे?

**पपा** : आध्यात्मिक साधना करणाऱ्या साधकाने आपला आहार, संगत आणि कृति या तीन बाबतीत अतिशय जपून राहिले पाहिजे. समाजामध्ये विविध प्रकारच्या लोकांत वावरतांना बाह्य परिस्थितीवर नियंत्रण राखणे अतिशय अवघड असते. म्हणून साधना अखंड आणि उत्कट असली पाहिजे. मग साधक अडचणींपासून दूर राहील. पहाटे आणि रात्री झोपण्यापूर्वी खोल ध्यान करून त्याने सावध राहिले पाहिजे. दिवसा, एक वेळ तो जागरूक राहू शकेल पण रात्री झोपेत मनावरचा ताबा सुटतो आणि मग साधकाला वाईट स्वप्ने पडण्याची शक्यता असते. म्हणून बाहेरून होणाऱ्या आक्रमणांच्या आघातांविरुद्ध उभे राहाण्यासाठी त्याने सांजसकाळ आपले मन तयार केले पाहिजे.

कशी ते माहीत नाही, पण साधनाकालात रामदासाला एकांतात जाण्याची स्फूर्ती झाली. मग तो कोणाच्या घरी किंवा गावात राहिला नाही. संतांचा वास असलेल्या ठिकाणी किंवा एकांतात तो ढकलला गेला. भगवंताने त्याला साधूंची संगति दिली. रामनाम हेच त्याचे कवच झाले. बाह्य आघातांचा त्याला यत्किंचित स्पर्श झाला नाही.

म्हणून जर तुम्ही आपल्या जिभेवर अखंड रामनाम ठेवले तर व्यवहाराच्या जगात तुम्ही काम करत असलात तरी तुमच्यावर कशाचाही परिणाम होणार नाही. तथापि विविध प्रकारच्या लोकांत वावरतांना सावध राहाणे चांगले. बलवान असणारे राजस आणि तामस प्रभाव आपल्याला केव्हां खाली खेचतील याचा नेम नाही. शांतीचा काही काळ अनुभव घेतल्यानंतर अशा आघातांमुळे तुम्ही खाली घसरलात तर आगीत होरपळतो आहोत असे वाटू लागते. यालाच 'आत्म्याची अंधारी रात्र' म्हणतात. या स्थितीत मन ईश्वराचा विचार करायला तयार नसते आणि त्यामुळे साधक दीन आणि असहाय होतो. हा एक भोवराच असतो. या स्थितीत एकांताचाही काही उपयोग होत नाही. अशा वेळी सत्पुरुषांकडेच जावे लागते. कडक उन्हातून चालतांना वृक्षाच्या थंडगार सावलीत आल्यावर कसे वाटते? त्याचप्रमाणे अनावर वासनांनी पोळत असतांना साधुपुरुषांच्या संगतीत आराम मिळतो आणि मन शांतीमध्ये न्हाऊन निघते.

शिस्तीचे नियम आपले आपल्यालाच लावले पाहिजेत. आहार, संगत आणि आपले काम यांबाबतचे तपशील ज्याचे त्यालाच ठरवावे लागतील. त्याबाबतीत प्रत्येकाला एकच नियम लावता येणार नाही.)

## |३५१| (१९ नोव्हेंबर १९९३)

श्री.दत्ताण्णा, गुरुराज, रत्ननाभ इत्यादी सर्वजण आज आले होते. आम्ही गेलो तेव्हां पू. बाबा एक पुस्तक वाचत बसले होते.

**पू. बाबा :** जे. कृष्णमूर्तींचे हे पुस्तक वाचतो आहे. यामधे त्यांनी Brain is universal असे म्हटले आहे. हे खरे असेल तर Body also is universal म्हणावे लागेल. Brain universal म्हणतांना त्यांना काय म्हणायचे आहे?

**साधक प :** कृष्णमूर्ती किंवा बहुतेक पाश्चात्य विचारवंत Mind म्हणजे मन या अर्थाने Brain शब्द वापरतात. तेव्हां येथे त्यांना Mind is universal असे म्हणावयाचे असावे.

**पू. बाबा :** Mind is universal असे आपल्याला (तरी) वाटते का?

**साधक प :** आपण खंडित विचार करतो. तसेच स्मृतींमुळेही आपले मन स्वच्छ राहात नाही. तथापि रोजच्या व्यवहारासाठी लागणारी स्मृती आवश्यक आहे. तिच्यामुळे सवय निर्माण होते.(habit formation).

**पू. बाबा :** भाषा आणि विचार यांचा निकटचा संबंध आहे. त्याचप्रमाणे निवेदन(communication) आणि पुनरावृत्ती (repetition) ही ज्ञानाची दोन अंगे आहेत. पण नाम ज्ञानस्वरूप असूनही आपल्याला त्याचे बरोबर निवेदन होत नाही; आणि पुनरावृत्ती कंटाळवाणी होते. असे का? हे कसे टाळता येईल?

**साधक ब :** प्रयत्न, प्रार्थना आणि सत्संगती यानेच हे साध्य होईल.

**पू. बाबा :** साधन करतांना त्यात प्रेम असले पाहिजे. यासाठी आत जाणे आवश्यक आहे. आज आपली इंद्रिये आणि वृत्ती बहिर्मुख आहेत; ती अंतर्मुख झाली पाहिजेत. त्याखेरीज ध्यान साधणे शक्य नाही. म्हणून जीवनात साक्षीभाव आला पाहिजे. दत्ताण्णा तुम्ही काही सांगा.

**श्री. दत्ताण्णा :** आज आपले सगळे जगणे उपाधिपूर्ण आहे. आपण उपाधींशिवाय जगूच शकत नाही. अशा स्थितीत निरुपाधिक नाम घेणे शक्य नाही म्हणून आपण नामाला वेळेची, स्थानाची, संख्येची, माळेची अशी काहीतरी उपाधी लावावी. त्या उपाधीतूनच पुढे निरुपाधिक नाम येऊ लागेल. काट्याने काटा काढावा तसे हे आहे. नामाची स्वत:मागे इतकी उपाधी लावून घ्यावी की त्यामुळे दुसऱ्या प्रापंचिक उपाधींना वेळच मिळू नये.

**पू. बाबा :** अखंड नामस्मरणाचा आणि त्याच अनुसंधानात राहायचा संकल्प करावा. नामात मस्त व्हावे. श्रीमहाराजांचे एक भाटिया भक्त होते.

मूळजी जेठा मार्केटमधे त्यांचे कापडाचे दुकान होते. मूलबाळ नव्हते. पुढे एकदा त्यांना हार्ट ॲटॅक आला. त्यानंतर त्यांनी सर्वांची देणी भागवून दुकान बंद केले आणि नामाला वाहून घेतले. ते तरुण असतांना त्यांचे एक मित्र त्यांना उपासनी महाराजांकडे घेऊन गेले आणि त्यांनी शेठजींना मूलबाळ नसल्याचे उपासनी महाराजांना सांगितले. तेव्हां शेठ म्हणाले की मी त्याकरता तुमच्याकडे आलो नाही. खिशातली माळ काढून ती उपासनी महाराजांना दाखवून म्हणाले की ह्यातले काही देणार असाल तर द्या. यावर उपासनी महाराज म्हणाले की ते तुमच्या गुरूंनी तुम्हाला दिले आहे. श्रीमहाराजांना ते 'मला नामात मस्त ठेवा' असे नेहमी म्हणत आणि श्रीमहाराजांना ते फार आवडत असे. मी नेहमी नवे नवे ग्रंथ वाचत असे. सगळेच शिकविण्यासाठी आवश्यक असत असे नाही. एकदा श्रीमहाराज मला म्हणाले, कशाला वाचनात इतका वेळ घालवता? त्यापेक्षा नामात मस्त राहा.

गुरुदेव रानड्यांच्या विद्वतेची आणि साधनात त्यांना आलेल्या अनुभवाची गोष्ट सांगतो. गुरुदेवांची विद्वत्ता अशी होती की त्यांनी नवीन सूत्रांची रचना केली असती. पातंजल योगसूत्रांच्या साधनपादात ''शौचात् स्वांगजुगुप्सा परै: असंसर्ग:। २.४०।'' असे सूत्र आहे. त्याचा अर्थ सांगतांना गुरुदेव म्हणाले, शुचिता साधली की माणसाला स्वत:च्या शरीराची किळस वाटू लागते. दुसऱ्यांशीही संबंध नको असे वाटू लागते कारण त्यांची शरीरे देखील घाणेरडी वाटू लागतात. इतकेच नाही तर पुरुषाला स्त्रीच्या शरीराची आणि स्त्रीला पुरुषाच्या शरीराची घाण येते आणि विषयभोग त्याज्य वाटू लागतो.

## ।३५२। (३ डिसेंबर १९९३)

**पू. बाबा :** आज तुम्हाला ज्ञानेश्वर महाराजांची एक गौळण वाचून दाखवणार आहे; पण त्याआधी त्याचे कारण सांगतो. जालन्याचे श्री. बाबा मेरेकर यांनी इथे एकदा कीर्तन केले. कीर्तन चांगले झाले. कीर्तनात त्यांनी नाथांची एक गौळण म्हटली होती. कीर्तन संपल्यावर त्यांना श्रीमहाराजांनी विचारले की परमार्थाचे मर्म काय? यावर ते गप्प बसले व मग म्हणाले, महाराज, आपणच सांगा. तेव्हां माझ्याकडे वळून श्रीमहाराजांनी विचारले की आणखी कोणी कोणी गौळणी रचल्या आहेत? तेव्हां मी म्हणालो की ज्ञानेश्वर महाराजांच्या आहेत, तुकाराम महाराजांच्या आहेत. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले

की ज्ञानेश्वर महाराजांची एखादी गौळण सांगा. तेव्हां आता मी वाचणार आहे ती गौळण सांगितली होती. एक गौळण तिच्या सखीला सांगते आहे :

पंढरपुरीचा निळा लावण्याचा पुतळा।
विठा देखियेला डोळां बाई ये वो॥ १॥
वेधलें वो मन तयाचिया गुणीं।
क्षणभर न विसंबे विठ्ठलरुक्मिणी॥ २॥
पौर्णिमेचें चांदिणें क्षणक्षणां होय उणें।
तैसें माझें जिणें एका विठ्ठलेंवीण॥ ३॥
बाप रखुमादेविवरु विठ्ठलुचि पुरें।
चित्त चैतन्य मुरे बाईये वो॥ ४॥

गौळण ऐकून श्रीमहाराजांनी विचारले की भगवंताच्या इतर स्त्रिया असतांनाही संतांनी गौळणीच का रचल्या? पुढे आपणच म्हणाले की गौळणी जशा कृष्णाला चिकटल्या तशा इतर स्त्रिया चिकटल्या नाहीत. गौळणींसारखे भगवंताला चिकटणे हे परमार्थाचे मर्म आहे.

अभंग समजावून सांगतांना पू. बाबा म्हणाले, वास्तविक पंढरपूरचा पांडुरंग काळा आहे पण गोपीला तो प्रेमामुळे निळा दिसतो. त्याच्याशी तिची इतकी जवळीक आहे की ती त्याला विठा म्हणते. ती क्षणभरदेखील त्याच्यापासून वेगळी राहू शकत नाही. त्याच्या गुणवर्णनाने तिचे मन भरून आले आहे. त्या मनात त्याच्याशिवाय दुसरे काही नाहीच. त्याच्याशिवाय जगणे म्हणजे पौर्णिमेनंतर क्षीण होत जाणाऱ्या कृष्णपक्षातील चंद्राप्रमाणे निस्तेज होऊन झिजणे आहे. अर्थात तो जवळ असेल तर सर्व काळ पौर्णिमाच आहे. अशा त्या विठ्ठलाच्या पायी तिचे मन गुंतल्यामुळे ती त्या चैतन्यात मुरून गेली आहे.

पू. बाबांनी विचारले की आपली अशी स्थिती का होत नाही? आज इतकी वर्षे आपण नामस्मरण करतो आहोत, पण शिस्तीचे रोजचे नामस्मरण सोडले तर बाकीचा वेळ नाम का घेतले जात नाही? आड काय येते?

**साधक ख :** सर्वकाळ नाम घेण्यासाठी लागणारी श्रद्धा आणि चिकाटी आमच्याजवळ नाही.

**साधक ग :** अद्यापि संसाराची ओढ आहे. त्यात तोच तोपणा असला तरीही ती ओढ आहे. त्यात सुख वाटते.

**साधक ब :** आपल्याला तेच ते करण्याची सवय आहे. ह्या सवयीचा नामासाठी उपयोग केला पाहिजे पण तो होत नाही.

**साधक ग** : संसारातील त्याच त्या गोष्टी करण्यात उपाधी आहेत. तर नामामध्ये उपाधी नाही त्यामुळे ते होत नाही. नाम घेतांना थकवा किंवा कंटाळा येतो.

**साधक ब** : नामात श्रीमहाराज आहेत हे जाणिवेत आले की कंटाळा येणार नाही. मग नामच घेत राहावे असे वाटू लागेल.

**साधक ज** : मला खरा आनंद नामातच मिळणार आहे अशी स्वयंसूचना द्यावी. रोजची संख्या न ठरवता महिन्यात अमुक इतका जप करायचा असे ठरवावे व ते पार पाडावे. एखाद्या दिवशी काही कारणाने जप कमी झाला तर ते दुसऱ्या दिवशी भरून काढावे.

**पू. बाबा** : मागच्या आठवड्यात आपण संकल्पाबद्दल बोललो होतो तसा संकल्प करावा. हा अभ्यास आहे. तो चिकाटीने केला पाहिजे. आता आधीच उशीर झाला आहे. आता हे केले नाही तर केव्हां करणार? पुढचा जन्म कोणता येईल कोणास ठाऊक? तेव्हां जे काही साधन करायचे ते आजच केले पाहिजे. यात अडचण काय आहे?

**साधक ग** : आज जे जीवन चालले आहे ते ठीक चालले आहे, शक्य तितके साधनही करतो आहेच असे वाटते. ही जी आत्मसंतुष्टता (Complacency)आहे ही खरी धोक्याची आहे. जे चालले आहे ते ठीक नाही असे आतून वाटत नाही. म्हणजेच नामाची नड वाटत नाही.

**साधक ज** : साधन वाढावे असे वाटते पण त्यासाठी आवश्यक तितके वैराग्य नाही. साधनमार्गाच्या जे जे आड येते त्याचे negation केले पाहिजे; ते दूर सारले पाहिजे.

**पू. बाबा** : साधन करतांना केवळ संकल्प उपयोगी पडत नाही. तो पार पाडण्यासाठी चिकाटी पाहिजे. हे मी करणारच अशी साधन करतांना जिद्द पाहिजे.

## **।३५३।** (१० डिसेंबर १९९३)

**पू. बाबा** : पुण्याच्या फर्गसन कॉलेजात चिंतामण गंगाधर भानू नांवाचे एक इतिहासाचे प्रोफेसर होते. त्यांचा गीतेचा चांगला अभ्यास होता. गीतेवर त्यांनी एक पुस्तकही लिहिले होते. लोकमान्य टिळकांनी गीतारहस्य लिहिल्यावर त्या पुस्तकाची एक प्रत प्रो.भानूंना पाठविली होती. त्यातील एका श्लोकाचा अर्थ चुकीचा आहे असे ते लोकमान्यांना म्हणाले तेव्हां लोकमान्यांनी भानूंनी

त्यांच्या पुस्तकातही तोच अर्थ दिल्याचे दाखवून दिले! हे भानू पुढे वृद्ध झाले असतांना पुण्यात एकदा श्रीमहाराजांना भेटायला आले तेव्हां म्हणाले की गीतेत मांडलेला कर्मयोग बरोबर वाटत नाही. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले की ते काही मला माहीत नाही; पण माझ्याकडे पाहून म्हणाले की हे येथे एक विद्वान आहेत त्यांना पाहिजे तर तुमची शंका विचारा. त्यांनी मला विचारले तेव्हां कसे सुचले कोणास ठाऊक, पण मी म्हणालो की महाराजांचे जे मत आहे तेच माझे आहे. नंतर महाराजांनी भानूंना सांगितले की गीतेचे मर्म साक्षित्वात आहे. प्रा. भानूंनी विचारले की साक्षित्व म्हणजे काय आणि ते कसे साधायचे? तेव्हां श्रीमहाराज म्हणाले की तुम्हाला लवकरच त्याचा अनुभव येईल. पुढे दोन दिवसांनी ते श्रीमहाराजांकडे आले. त्या दिवशी त्यांचे व्याख्यान होते पण एकाएकी घसा बसल्यामुळे त्यांना मोठ्याने बोलता येत नव्हते. ते म्हणाले की आत सगळे ज्ञान आहे. ते मी जाणतो आहे पण सांगू शकत नाही. श्रीमहाराज म्हणाले, म्हणजे त्या ज्ञानाला तुम्ही केवळ साक्षी आहात असेच नव्हे का? ते गप्प बसले. पू. बाबांनी आम्हाला विचारले की आपल्याला साक्षित्वाचा अभ्यास करता येईल का?

**साधक प** : साक्षित्व म्हणतांना त्यात भोक्तृत्व येते का?

**पू. बाबा** : साक्षित्वात केवळ पाहणे आहे.

**साधक प** : एखादा सत्पुरुष जेव्हां जगातील किंवा एखाद्या माणसाच्या जीवनातील दु:खद घटना पाहतो तेव्हां त्याला वाईट वाटते ना?

**पू. बाबा** : तुम्ही ज्या अर्थाने सुखदु:ख मानता तसे ते नसते. त्या सत्पुरुषामधली मानवता द्रवते. अरविंदांनी Life Divine मधे म्हटले आहे : "The extension of our coneciousness to be satisfying, must necessarily be an inner enlargement from the individual into the cosmic existence. For the witness, if he exists, is not the individual embodied mind born in the world but the cosmic consciosness embracing the universe and appearing as an immanent Intelligence in all the works."(The Life Divine page 20, 21)

(जाणिवेचा विस्तार होऊन त्यातून समाधान पाहिजे असेल तर हा विस्तार व्यक्तीच्या अस्तित्वाची वैश्विक अस्तित्वात वाढ होण्यातच आहे. साक्षी जर अस्तित्वात असेल तर तो ह्या जगात जन्मलेल्या व्यक्तीच्या सीमित मनात नसून

सर्व विश्वाला व्यापणाऱ्या वैश्विक जाणिवेमध्ये आहे. ही जाणीव माणसाच्या सर्व कार्यातील अंगभूत शहाणपणामधून व्यक्त होते.)

सत्पुरुषाचे वाईट वाटणे तुमच्या आमच्या वाईट वाटण्यासारखे नसते. विश्वमनाशी तादात्म्य पावलेल्या सत्पुरुषाच्या मानवतेचा तो भाग असतो. तो द्रवतो त्याच वेळी त्याला जे घडले आहे ते भगवंताच्या इच्छेने घडलेले आहे, ते बरोबरच आहे हे माहीत असते.

**साधक भ :** श्रीमहाराजांचेच नाही का! त्यांची आई गेली तेव्हां 'दास दु:खी देहधारी। अंतरीं आनंदाच्या लहरी॥' असे त्यांनी त्यांच्या स्थितीचे वर्णन केले आहे.

**साधक प :** जे घडते आहे ते बरोबर आहे हा भाव साक्षित्वात असला तर मला वाटते की 'माळियें जेउतें नेलें। तेउतें निवांतचि गेलें।' अशी ती स्थिती असावी.

**साधक ग :** यामध्ये साक्षित्वाचा अभ्यास नसून, माझे कर्तृत्व नाही, खरा कर्ता तो आहे याचा अभ्यास आहे.

**साधक ब :** मी कर्ता नाही हे खरेच आहे. तथापि ते जेव्हां साधनाच्या आड येते तेव्हां तुम्ही काहीही करा पण मला सांभाळा. म्हणजे माझे साधन व्यवस्थित चालू द्या अशी प्रार्थना केली पाहिजे. अशा प्रार्थनेचा निश्चित उपयोग होतो. साक्षित्वाचा अभ्यास कठीण आहे.

**पू. बाबा :** असे कां म्हणता? ते (श्रीमहाराज) तुमच्या अभ्यासात देखील तुम्हाला मदत करायला तयार आहेत. आपण दार उघडत नाही ही खरी अडचण आहे.

**साधक प :** अडचणीत भगवंत मदत करीलही. पण ज्याला अडचण आहे त्याला त्याची मदत हवी असे कळवळून वाटले पाहिजे ना?

**पू. बाबा :** आपला मुख्य मुद्दा बाजूला राहातो आहे. साक्षित्वाचा अभ्यास कसा करायचा ते सांगा.

**साधक प :** साक्षित्वाची अवस्था ही फार पुढची अवस्था आहे. त्यासाठी सुरुवात म्हणून कर्तृत्व सोडता आले पाहिजे.

**पू. बाबा :** आपण साधन करतो त्याच्याकडेही अभ्यास म्हणून साक्षित्वाने पाहावे. नाम घेतो त्यात त्यांचे अस्तित्व आहे ते त्यांच्याकडून आलेले आहे आणि मी नाम घेतो ते त्यांच्यापर्यंत पोचते आहे असा भाव ठेवावा आणि स्वत:कडे वेगळेपणाने पाहावे. (साधक ज ना) तुम्ही काहीच बोलत नाही.

**साधक ज** : साक्षित्वाचा अभ्यास म्हणजे आपणच आपल्या खांद्यावर बसायचा प्रयत्न करण्यासारखे आहे असे मला वाटते.

**पू. बाबा** : ते कसे काय?

**साधक ज** : देहबुद्धीमुळे आज जीव आणि आत्मा वेगळे आहेत. जीव कर्मे करतो आणि सुखदु:ख भोगतो. आत्मा त्याच्याकडे केवळ साक्षीभावाने पाहातो. जीव जोपर्यंत जीवपणाने वेगळा आहे तोपर्यंत तो स्वत:कडे साक्षित्वाने कसा पाहाणार? आणि आत्म्याशी ऐक्य झाले की तो जीवपणाने वेगळा राहाणारच नाही.

**पू. बाबा** : तसे नाही. जीव जीवपणाने देखील स्वत:कडे पाहू शकतो जीवपणाचे मूळ अहंकारात आहे. त्यामुळे मी माझ्याकडे पाहाणे शक्य आहे. ते आपल्याच खांद्यावर बसण्यासारखे नाही.

**साधक ज** : नामस्मरणाच्या बाबतीत साक्षित्वापेक्षा देखील, मी मागे म्हणालो त्याप्रमाणे श्रीमहाराज माझ्या हृदयात सतत नाम घेत आहेत; मी लक्ष देऊन ऐकतो तेव्हां ते मला ऐकू येते हा भाव मला तरी जास्त उपयोगी येतो.

**पू. बाबा** : मी कर्ता नाही, राम कर्ता आहे हा भाव पाहिजे तर Psychological आहे म्हणा. साक्षीभाव Metaphysical आहे. त्यामुळे तो जास्त खोल आहे.

**साधक प** : साक्षित्वावर केवळ शाब्दिक चर्चा करण्यापेक्षा आज आत्तापासून प्रत्येकाने त्याचा अभ्यास करावा म्हणजे तो करतांना कोणत्या अडचणी येतात ते अनुभवाने समजेल.

**पू. बाबा** : पाहू; पुढच्या शुक्रवारी आपण जास्त पाहू.

## |३५४| (२४ डिसेंबर १९९३)

**पू. बाबा** : आपण 'निरंतर' म्हणजे सतत, एकसारखे, Continuous असा अर्थ सामान्यत: करतो. श्रीमहाराज म्हणाले 'निरंतर' म्हणजे सुरुवातीला असा एकच क्षण येतो की तेव्हां भगवंताच्या अस्तित्वाची सत्यता पटते. तद्रूपतेने ज्ञान होते. नंतर असे क्षण वारंवार येऊन ती सत्यता स्थिर होते. भगवंताची सत्यता अशा प्रकारे स्थिर होणे हे निरंतर आहे.

**साधक क** : श्रीमहाराजांनीच म्हटले आहे की क्षणांचा दिवस, दिवसांचे महिने, महिन्यांचे वर्ष आणि वर्षांचेच आयुष्य असते. त्यामुळे क्षणोक्षणी भगवंताचे अस्तित्व जाणवणे हे निरंतर आहे.

**पू. बाबा** : परवाच्या निरूपणानंतर एक गृहस्थ भेटले. ते म्हणाले, तुम्ही मनाबद्दल इतके सांगता, मन बदलले पाहिजे म्हणता पण हे मन म्हणजे काय आहे ?

**साधक ब** : मला जाणवले आहे ते सांगतो. मन वृत्तींचे बनलेले आहे. मनात एकसारख्या वृत्ती उठत असतात. म्हणून कोणतीही वृत्ती उठली तरी लगेच तिच्यावर नामाचा उतारा देणे म्हणजे वृत्तीच्या तोंडी नाम देणे आहे. वृत्ती उठली की लगेच नाम घेता येते असा माझा अनुभव आहे.

**साधक प** : मनाचे अनेक अर्थ आहेत. तुम्ही मन म्हणता तेव्हां काय अभिप्रेत आहे ?

**पू. बाबा** : मनाचा विचार करतांना त्याचे structure (संरचना) आणि function (कार्य) असा विचार करता येतो. उदाहरणार्थ स्मृती घ्या.

**साधक प** : मनाची जी जी कार्ये (functions) आहेत त्यांची आता प्रायोगिक नक्कल (simulate) करता येते. कॉम्प्यूटरला मेमरी (स्मृती) असते. जे जे म्हणून तुम्ही डिफाइन करू शकता (व्याख्या करू शकता) ते ते जडाच्या ठिकाणी दाखवता येते.

**साधक ग** : मी आहे ही जाणीव जडाच्या ठिकाणी आणता येते का ?

**साधक प** : मी आहे म्हणजे काय हे डिफाइन करता आले तर ते देखील येईल. त्यामुळे मनाचा जड भाग समजू शकतो पण मन म्हणजे त्या जडाच्या पलीकडे काही तरी शक्ती आहे.

**साधक क** : योगवासिष्ठात तिसऱ्या भागात सांगितले आहे की जड आणि चेतन मिळून मन बनलेले आहे. जडावर चेतनाचा आणि चेतनावर जडाचा जो आरोप झाला आहे त्यामुळे सगळा गोंधळ आहे. मनाच्या जड भागाकडून चेतनाकडे नेणारी साखळी म्हणजे नाम आहे.

**पू. बाबा** : मन शक्तिरूप आहे. तथापि जडामधेदेखील शक्ती आहे. आणि एका प्रकारची शक्ती दुसऱ्या प्रकारच्या शक्तीत बदलता येते. उदाहरणार्थ उष्णतेचे विजेत किंवा प्रकाशात रूपांतर करता येते. तथापि मेंटल एनर्जी मात्र (मानसिक ऊर्जा) दुसऱ्या प्रकारात बदलता येत नाही. दृश्यात तिचे परिणाम दिसतात. मनाची शक्ती वाढते, क्षीण होते, गळून जाते हेही आपण पाहातो. मन भगवंताच्या नामात गुंतवून ठेवले तर संसारातील कर्तव्ये तर होत राहतात पण भक्ताला त्याचे ओझे वाटत नाही. हे कसे घडते ते समजावून सांगण्यासाठी श्रीमहाराजांनी एक गोष्ट सांगितली होती. ते म्हणाले, एका बाईकडे पाहुणे आले

म्हणून पाणी आणण्यासाठी मोठी घागर घेऊन ती लगबगीने नदीवर गेली. घागर भरून तिने डोक्यावर ठेवली आणि परत येतांना पाहुण्यांच्या विचारात ती इतकी गढून गेली की डोक्यावर ठेवलेल्या घागरीवर तिचा हातही राहिला नाही. वाटेत एका माणसाला ते पाहून आश्चर्य वाटले आणि त्याबद्दल त्याने तिला विचारले तेव्हां ती म्हणाली, ''बापया! पाहुण्यांच्या विचारात डोक्यावर घागर आहे हे देखील मी विसरले.'' तसे नामात स्वत:ला क्षणभर विसरलात तर संसाराचे ओझे डोक्यावर असूनही त्याचे भान नाहीसे होते.

**साधक प** : साधनात स्वत:ला विसरणे ही फार मोठी अवस्था आहे. नामाची शक्ती ते घडवून आणते हे निश्चित आहे; मात्र तशी श्रद्धा पाहिजे. श्रद्धा मनाच्या पलीकडे आहे. ती सत्याची धारणा आहे.

**पू. बाबा** : नामाची श्रद्धा मनाला त्याच्या आजच्या dimension मधून (आयामातून) पलीकडे नेते.

## |३५५| मुक्काम गोंदवले

(गोंदवले येथील श्रीमहाराजांच्या पुण्यतिथी उत्सवात पू. बाबांबरोबर वेळोवेळी झालेल्या चर्चेची कु. विदुला गद्रे यांनी नोंद केली होती. त्या नोंदींच्या साहाय्याने त्या मुक्कामातील संवाद लिहिले आहेत : -संपादक)

### |३५५-१| (२८ डिसेंबर १९९३)

(पू. बाबांची खोली. संध्याकाळी ७ वाजता)

**पू. बाबा** : आज एक डॉक्टरीण बाई भेटायला आल्या होत्या. पुण्यात प्रॅक्टिस करतात. मनासारखे साधन होत नाही म्हणून त्या अस्वस्थ होत्या. साधनात येणाऱ्या अडचणी त्यांनी सांगितल्या त्यावरून लक्षात आले की खरोखर नामाला चिकटणे हे आध्यात्मिक भाग्यच आहे. गुरुआज्ञापालनासारखा दुसरा उत्तम मार्ग नाही असे श्रीमहाराज म्हणायचे; त्याचा अर्थ आता समजायला लागला आहे. हा मार्ग फार अवघड आहे. खरे आज्ञापालन ब्रह्मानंद महाराजांनी केले. केवढे विद्वान आणि केवढी श्रद्धा! खरोखर नामस्मरण हा रॉयल रोड आहे. नॅशनल हायवे म्हणाना! हैद्राबादला रीजंट होता. त्याचे ऑफीस ज्या रस्त्यावर होते त्या रस्त्याला रीजन्सी रोड म्हणत. पुढे उस्मानअली गादीवर आल्यावर त्या रस्त्याचे नांव बदलून त्याला 'शाह राहे उस्मान' म्हणू लागले. तसा नामस्मरणाचा मार्ग हा 'शाह राहे चैतन्य' आहे.

आमच्या नातीला शाळेमधे बाईंनी सांगितलेले गणित चुकीचे असले तरी प्रमाण वाटते. दुसऱ्या कोणी ते बरोबर करून दिले तरी ते पटत नाही. ते पाहून मला वाटले की आमच्या गुरूंवर आमची तेवढीदेखील निष्ठा नाही. श्रीमहाराजांनी सांगितले की 'तुम्ही नुसते नाम घ्या, बाकी सगळे मी करतो.' त्यांनी हे आश्वासन दिलेले असूनही आम्ही 'पण' म्हणतो. हा पण म्हणजे संशय काढायलाच पाहिजे. उगीच इकडे जा तिकडे जा हे थांबवलेच पाहिजे.

एकदा श्री. चौबळ श्रीमहाराजांना भेटले. ते काही कामासाठी दिल्लीला जाणार होते, म्हणून तीन आठवडे आधी त्यांनी रिझर्वेशन करून ठेवले होते. श्रीमहाराजांना त्यांनी हे सांगितल्यावर श्रीमहाराज म्हणाले, हो का! तीन आठवडे आधी रिझर्वेशन मिळते? मला हे माहीत नव्हते. नंतर म्हणाले, माझं तोंड ज्यांच्या कानाला लागलं त्यांचं मी असंच रिझर्वेशन करून ठेवलं आहे. तुमचं रिझर्वेशन दोन तीन आठवड्यांचं असतं, माझं मात्र संपूर्ण जीवनाचं असतं!

खरे म्हणजे परमार्थ करणाऱ्याला घर सोडून कुठे जायची जरूरच नाही. श्रीमहाराज म्हणत self contained block असतो त्यामधे सर्व काही त्या ब्लॉकमधे असतं त्यामुळे बाहेर जाण्याची जरूर नसते; त्याप्रमाणे आपल्या शरीरामधेच परमार्थाची सगळी व्यवस्था आहे.

पू. बाबा पुढे म्हणाले, आत्मा हा स्वच्छ आहे. तो शुद्ध आहे असे म्हणत नाहीत कारण जे अशुद्ध नाही ते शुद्ध पण आत्म्याला अशुद्ध माहीतच नाही. आत्म्यावर जसं बिंब पडतं तसं प्रतिबिंब त्यातून मिळतं. एखादा लबाड माणूस भेटला तर त्याच्याशी तेवढ्यापुरतं लबाड वागावं. पण तो लबाड आहे हे आपल्या मनावर कायमचं ठसतं; ते होता कामा नये. याला उपाय असेल तर शर्ली मॅक्लीनने म्हटल्याप्रमाणे The world is mathematically perfect हे मनात ठसवलं पाहिजे. शंकराचार्यांनी म्हटल्याप्रमाणे जग त्रिगुणात्मक आहे. म्हणून प्रत्येक युगात लबाड माणसे असायचीच. श्रीमहाराज म्हणत, फसवणे हे जितके पाप आहे तितकेच फसणे हे पाप आहे. याला फक्त संतच अपवाद असतात. तुकाराम महाराज एकदा कोंकणात मीठ विकायला गेले! तेथे एका माणसाने त्यांना सोन्याची म्हणून पितळेची कडी दिली. ह्या घटनेबद्दल बोलतांना श्रीमहाराज म्हणाले की तुकाराम महाराज व्यापारी होते. त्यांनी का हे ओळखले नसेल? पण संतांचा स्वभाव उदार असतो. त्यामुळे ते म्हणाले असतील, जाऊ दे!

पू. तात्यासाहेबांच्या कमरेला नेहमी एक रुपयाचे नाणे लावलेले असे. कोणी बाळंतीण मुलाला घेऊन आली की तो काढून त्या मुलाला देत असत. एका माणसाला हे समजल्यावर तो दर तीन चार दिवसांनी यायचा आणि म्हणायचा मी गरीब आहे, मला पैसे द्या आणि पू. तात्यासाहेब कनवटीचा रुपया काढून त्याला द्यायचे. दिनकररावांनी हे पाहिल्यावर ते त्या माणसाला बाहेरच्या बाहेर परतवून लावू लागले. पू. तात्यासाहेबांना मी हे सांगितल्यावर ते म्हणाले, अहो, मला हे समजत होतं, पण मी म्हणायचो की जाऊ दे, घेऊ दे त्याला!

भाऊसाहेब गोंदवल्याला राहायला आले त्यानंतर सौ. बाईंच्या (भाऊसाहेबांच्या पत्नी) सोन्याच्या पाटल्या चोरीला गेल्या. ज्या बाईने त्या चोरल्या होत्या तिच्याकडे श्रीमहाराज गेले आणि म्हणाले, पाटल्या माझ्याकडे द्या; मी त्या रस्त्यात सापडल्या म्हणून सांगेन. श्रीमहाराजांनी त्या बाईचा तिरस्कार केला नाही. त्यांना माहीत होते की ती अज्ञानी आहे, वासनेमुळे ती चोरी करते आहे. त्यामुळे ते रागावले नाहीत. भाऊसाहेबांचेही विलक्षणच होते! पाटल्या गेल्याचे कळल्यावर ते म्हणाले, जाऊ दे महाराज; पाटल्या गेल्या तर गेल्या!

पॉंडीचेरीच्या मदरनी म्हटले आहे की दुसऱ्याचे दोष तुम्हाला सुधारता येत असतील तरच त्यांचे दोष काढण्याचा तुम्हाला अधिकार आहे.(Never complain of the behaviour of anyone, unless you have the power to change his nature what makes him act in this way; and if you have the power, change him instead of complaining). म्हणजे आपल्यासारख्यांनी त्या बाबतीत तोंड बंदच ठेवले पाहिजे. दुसऱ्यांविषयी नेहमी चांगले विचारच मनात आणले पाहिजेत.

नामस्मरण हे असे साधन आहे की त्यामधे संघर्ष नाही; आणि आपल्या जीवनात तर सगळीकडे संघर्ष आहे. नामस्मरणाचे वैशिष्ट्य हे की त्याला थोडीदेखील उपाधी नाही. अहंकार ही आपली सर्वात मोठी उपाधी आहे. त्यामुळे आपण उपाधीरहित नाम घेऊ शकत नाही. आपली धाव बाहेर आहे, दृश्य खरं वाटतं, देह खरा वाटतो. शरीराचं जाऊ द्या, पण मनात तरी नाम कसं उपाधीरहित आहे ते ठसलं पाहिजे. त्यासाठी गोणीमधे मापच टाकायला पाहिजे. नामस्मरण करतांना मी गोणीमधे माप टाकतो आहे असं वाटलं पाहिजे. आणि माप किती टाकायचं - तुका म्हणे देह भरिला विठ्ठलें अशी अवस्था होईपर्यंत. कुणाची घाण किती आहे कोणास ठाऊक! म्हणून एकसारखे नामच घेतले पाहिजे.

उद्यापासून गीतेच्या १२व्या अध्यायातील अभ्यासापासून सर्वकर्मफलत्यागापर्यंत घेऊ. सर्व कर्म करून काही न करणे - अलिप्त राहाणे आपल्याला माहित नाही - नव्हे, त्याची कल्पनाही करता येत नाही. श्रीमहाराज म्हणाले, समर्थांचं सामर्थ्य कशात होतं, तर सर्व करून ते कशातही गुंतले नाहीत.

**|३५५ - २|** (२९ डिसेंबर १९९३)

उत्सवाचा पहिला दिवस.(सकाळी ११ वाजता)

**पू. बाबा :** आपल्याला आता हे दहा दिवस करून पहायला हरकत नाही. चोवीस तासातली झोपेची वेळ सोडून बाकी सर्व वेळ नामस्मरण करायचे. मी कालपासूनच सुरुवात केली आहे. जागृतीत नाम टिकवणे जर अवघड आहे तर तीन्ही अवस्थांत ते टिकवणे किती कठीण असेल? तथापि इथे आपल्याला सोय आहे; कारण येथे व्यवहाराशी आपला काडीचाही संबंध येत नाही. उत्सवाचे महत्त्व असे की त्यासाठी आलेले लोक एकाच भावाने आलेले असतात. त्यामुळे सर्व वातावरण भारले जाते आणि त्याची आपल्या साधनाला मदत होते.

नामापासून काही अपेक्षा न ठेवता नाम घेणारा फारच थोर असला पाहिजे, कारण परमार्थ करतो म्हणणारेसुद्धा नामस्मरणाखेरीज इतर भानगडीत गुंतलेले दिसतात. म्हणून सावधानता बाळगून मार्गात (On the track) राहावे. मी एकदा श्रीमहाराजांना म्हणालो की आपण किती लोकांच्या अंत:करणात प्रेम लावून गेलात! हे ऐकल्यावर श्रीमहाराजांना एकदम भरून आले आणि ते म्हणाले, 'जो मनुष्य येतो तो वेगळा असे मला वाटतच नाही.' आपल्याला श्रीमहाराज मिळाले, म्हणजे अमूल्य हिरा मिळाला आहे. तो मी चोवीस तास जपतो आहे असे वाटले पाहिजे. इतके प्रापंचिक मी पाहिले पण भाऊसाहेबांसारखा नि:स्वार्थी माणूस पाहिला नाही. अखंड नाम घ्यावे. ते काही अशक्य नाही; ती एक कला आहे असे श्रीमहाराजांनी आडवीरावांना सांगितले होते.

एकदा श्री. भीमराव (गाडगुळी) त्यांच्या चुलत्यांचे म्हणजे ब्रह्मानंद महाराजांचे पाय चेपीत बसले होते. थोड्या वेळाने ब्रह्मानंद महाराज त्यांना म्हणाले, पुरे, माझे (पायावरचे) कोड तुला लागेल. भीमराव म्हणाले, लागू दे. तेव्हां ब्रह्मानंद महाराज म्हणाले, कोड लागलं म्हणून काही महाराजांचं प्रेम

लागणार नाही! वेंकटापूरचे मंदिर, बेलधडीचे मंदिर यांसारखी मोठी बांधकामे ब्रह्मानंद महाराजांनी केली. त्याबद्दल बोलतांना ते भीमरावांना म्हणाले, बिल्डिंग बांधतानाही आतला दोरा (भगवंताचे अनुसंधान) तुटत नाही.

लकुंडीचे हणमंतराव कुलकर्णी मोठे योगी असूनही त्यांनी सर्वस्वी नामाला वाहून घेतले होते. योगमार्गातील त्यांच्या अधिकाराविषयी एकदा ते नारप्पाला म्हणाले, "मला सारखे सारखे काही विचारू नका; एकदाच सांगतो, ह्या हिंदुस्थानात माझ्याइतका योग शिकलेले फार थोडे आहेत".

पू. बाबा पुढे म्हणाले, अर्धा-पाऊण तास बसून नाम घेतले की पुढे थोडा वेळ ते आपोआप चालते; त्यासाठी प्रयत्न करावा लागत नाही. आज सकाळी जपाला बसलो तेव्हां मनात विचार आला की ज्ञानामधे repetition आणि communication (वारंवारता आणि निवेदन) असते. आपले कम्युनिकेशन होत नाही. नाम त्यांच्याकडून आलेले आहे, त्यांनी दिलेले आहे म्हणून नाम घेतांना श्रीमहाराजांच्या अस्तित्वाची जाणीव पाहिजे. हीच नामाची खरी संगत होय.

सत्पुरुषांचे फोटो पाहूनही श्रीमहाराजांना त्यांचे अंतरंग समजत असे. पू. बाबांनी ह्याविषयीची एक आठवण सांगितली. एकदा त्यांनी गुरुदेव रानड्यांचा फोटो श्रीमहाराजांना दाखवला. तो पाहून श्रीमहाराज म्हणाले, हे मोठे सात्त्विक आहेत. रमण महर्षींचा फोटो दाखवला तेव्हां म्हणाले की हे ज्ञानी आहेत. आणि आइनस्टाइनचा दाखवला तेव्हां म्हणाले की हा विचारी आहे. मग पू. बाबांनी सांगितले की हा फोटो आइनस्टाइनचा आहे. तेव्हां श्रीमहाराज, 'असं का, मला माहीत नाही' येवढेच म्हणाले.

वासना कर्माला उद्युक्त करते म्हणून वासनाच अशी ठेवावी की वेळ मिळाला की नाम घेईन. यासाठी मरणाचे निरोगी स्मरण ठेवता आले तर त्याचा फार उपयोग होतो.

## |३५५ - ३| (२९ डिसेंबर १९९३)

संध्याकाळी सात वाजता खोलीत गेलो तेव्हां पू. बाबांनी विचारले की नामस्मरणाच्या आड काय येते? नामस्मरणात उत्कटता का वाटत नाही? आतापर्यंतच्या जीवनाविषयी पश्चात्ताप झाला तर ते होईल का? आपल्याला पश्चात्ताप होत नाही असे नाही पण पुरेसा विवेक नसल्यामुळे तो भाव टिकत नाही. आता असे ठरवा की वेळ मिळाला की नामच घ्यायचे. हे जर साधले तर

असे होईल की आधी नाम आणि वेळ मिळाला तर मग काम. पुढे नामापुढे काम नकोसे वाटू लागेल आणि एकदा का नामाची दृढता झाली की काम करतांनासुद्धा आत नाम चालेल. प्रपंच सुटलेला नाही आणि नाम धरलेले नाही अशी आज आपली विचित्र अवस्था आहे. तथापि मनाची समतोल स्थिती राहणे हा नामाचाच अनुभव आहे.

**।३५५-४।** (३० डिसेंबर १९९३)

(पुण्यतिथी उत्सवाचा दुसरा दिवस)

सकाळी साडेनऊ वाजता पू. बाबांकडे गेलो तेव्हां ते म्हणाले, आता नाम effortless (प्रयत्नाविना) होते. ते आपोआप चालते. आपण नामस्मरण करतो तेव्हां आत कोठेतरी मी असतो. पण हा मी गायब होऊन आपोआप नाम चालू राहिले की ते effortless होते असा अनुभव आहे. इथे (गोंदवल्यात) किती तरी लोक भेटायला येतात. नेहमीचेच प्रश्न आणि त्यांची नेहमीचीच उत्तरे हे चालू असते पण त्या वेळीही आत नाम चालू राहाते.

नंतर पू. बाबांनी दासबोधाच्या चौथ्या दशकातील सख्यभक्तीचा समास वाचून नंतर त्याचा अर्थ स्पष्ट केला. ते म्हणाले, आपली सुखदु:खं शेअर करायला (वाटून घ्यायला), मन मोकळं करायला जीवनात कोणीतरी सखा - companion लागतो. माझे मायबाप, नातेवाईक, मित्र, सगळं ते (श्रीमहाराज) वाटले पाहिजेत. माझ्या जीवनात खरं माझं कोण आहे? तर महाराज माझे आहेत असं वाटलं पाहिजे. आपल्या जीवनात ज्या ज्या लहानमोठ्या घटना घडतात त्या सर्व सख्यत्वाच्या भावनेने त्यांना सांगाव्या. ह्या सख्यामधे ते थोर आहेत senior companion, ही जाणीव असते. सर्व काही त्यांना सांगण्याची सवय केली की त्यांनाही ती सवय होते. मग ते आपल्या भक्तीप्रेमामुळे खाली येऊन (वाकून) आपल्याशी सख्यत्वाने वागतात. आपण त्यांच्यापेक्षा कितीतरी लहान (junior) असूनही ते आपल्याशी अगदी बरोबरीने वागतात. मला याचा अनुभव आहे. एकदा उन्हाळ्यात कर्नाटकात जायचे होते. तिकडे उन्हाळा फार कडक. मला श्रीमहाराज म्हणाले, याला (पू. तात्यासाहेबांना) उन्हाळ्याचा त्रास होईल पण मला जायला पाहिजे. वास्तविक मी तो काय, पण बरोबरीच्या मित्राशी बोलावे तसे बोलले.

सकाळी आठ वाजता ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायावर निरूपण झाले होते. पू. बाबांनी काही ओव्यांचा पुन्हा उल्लेख केला :

जे मन बुद्धि इहीं। घर केलें माझ्या ठायीं।
तरि सांगें मग काई। मी तूं ऐसें उरे॥९९॥
उचललेया प्राणासरिसीं। इंद्रियेंही निगती जैसीं।
तैसा मनोबुद्धिपाशीं। अहंकारु ये॥१०१॥
म्हणोनि माझिया स्वरूपीं। मनबुद्धि इयें निक्षेपीं।
येतुलेनि सर्वव्यापी। मीचि होसी॥१०२॥

पू. बाबा म्हणाले, मन आणि बुद्धी यांनी भगवंताच्या ठिकाणी घर केले म्हटले आहे ते मला फार आवडले. काल रात्री तीन-चार वेळा उठलो पण डोक्यामधे तेच होते. घर केले म्हटले आहे, तसे नामस्मरण हे आपले घर व्हायला पाहिजे. घरात कसा मोकळेपणा असतो. कोणतेही टेन्शन नसते. आपण feeling at home म्हणतोच. नामस्मरण करतांना कोणतेही टेन्शन नाही, मोकळे झालो असे वाटले पाहिजे. श्रीमहाराज म्हणत, सूर्याच्या मागे जशी त्याची प्रभा आपोआप जाते तसा मन आणि बुद्धीच्या मागे अहंकार जातो. आत्ताच सांगितलेल्या ओव्यांमधली एक ओवी राहिली ती सांगतो. तीमधे ज्ञानेश्वर महाराजांनी दिवा आणि सूर्य हे दृष्टान्त घेतले आहेत.

म्हणोनि दीप पालवे। सवेंचि तेज मालवे।
कां रविबिंबासवें। प्रकाशु जाय॥१००॥

नुसता अहंकार मारणे कठीण आहे म्हणून मन व बुद्धी यांनी भगवंताच्या ठिकाणी घर केले की अहंकाराला जागाच राहात नाही. तो भगवंताच्या ठिकाणी लीन होतो. मन आणि बुद्धी यांच्या मागोमाग त्याला जावेच लागते.

श्रीमहाराज म्हणत की गोंदवल्याला आले की माहेरी आल्यासारखे मोकळे वाटले पाहिजे. मुलगी माहेरी आली की न्हायल्यानंतर केस मोकळे सोडून अस्ताव्यस्त झोपते. तिथे मग सासरची बंधने नसतात, तसे गोंदवल्याला at home वाटले पाहिजे. त्याच्याहीपुढे नामस्मरण हे आपलं घर वाटलं पाहिजे. नामस्मरणात सुरक्षितता वाटली पाहिजे. बाहेर अस्वस्थता वाटली की गेला घरात - नामस्मरणात. बाहेर कितीही सुखसोयी असल्या तरी आपल्या घरी आल्यानंतर आईच्या हातचं अन्न खातांना जसं वाटतं तसं नामस्मरण करतांना वाटलं पाहिजे. माणसाला घराची ओढ साहजिक असते तशी नामस्मरणाची ओढ पाहिजे. आणि हे सांगितले आहे कोणी? तर ज्यांना समाजानं वाळीत टाकलं होतं त्या ज्ञानेश्वर महाराजांनी!

नंतर पू. बाबांनी इमर्सन ह्या थोर अमेरिकन कवी आणि तत्त्वज्ञाची एक गोष्ट सांगितली. एकदा त्याची गाय चरायला गेली होती. अंगणात वासरू होते ते काही केल्या गोठ्यात जात नव्हते. मागून ढकलले, कान धरून ओढले तरी ते दाद देईना. त्याची मोलकरीण ते पहात होती. तिने आपले बोट त्या वासराच्या तोंडात दिले आणि गाईचे आचळ चोखत असल्यासारखे तिचे बोट चोखत ते वासरू तिच्यामागे गोठ्यात गेले. तिच्याप्रमाणे आपणही नामाचे बोट दिले की महाराज आपोआप मागे येतील!

पू. तात्यासाहेबांच्या एका मुलीचे लग्न बरेच दिवस जमत नव्हते. मी त्यांना विचारले, तुम्हाला काळजी नाही का वाटत? ते म्हणाले नाही वाटत; ती समोरून गेली की हिचे लग्न व्हायचे आहे अशी फक्त आठवण होते. ही खरी श्रद्धा. आपल्याला थोडी तरी श्रद्धा नको का? श्रीमहाराजांची पुष्कळ वचने पाठ आहेत पण त्यांचे महत्त्व आपल्याला समजत नाही. कितीजणांचे अंतकाळ त्यांनी साधले. तुम्ही नुसते नाम घ्या, अंतकाळी मी उशाशी आहे, म्हणाले. गोंदवल्याचे वातावरण नामाने भारलेले आहे. त्याचा फायदा करून घ्या.

आपल्याला पश्चात्ताप होतो, पण तो शंभर डिग्रीपर्यंत जात नाही. पाच, दहा, अगदी फार म्हणजे पन्नास डिग्रीपर्यंत जातो. तेथेही टिकत नाही. आपण पुन्हा खाली रोजच्या रटाळ जीवनात येतो. पश्चात्ताप ही वास्तविक मोठी स्थिती आहे; पण पाणी जसे शंभर डिग्रीला उकळते तसा तो पराकोटीला गेला पाहिजे आणि तेथे टिकला पाहिजे. खरा पश्चात्ताप झालेला माणूस मग पाण्याची जशी वाफ होते तसा आतून पूर्णपणे बदलून जाईल. अशा वेळी वाट दाखविणारा सद्गुरु नसेल तर तो कदाचित आत्महत्याही करील.

दुसंगे नांवाच्या त्या तरुण मुलाला बाईबरोबर ओढ्याकाठी झोपलेला पाहून श्रीमहाराजांनी आपली कफनी पांघरूण घातली. त्यांच्या तोंडून फक्त "अरेरे!" एवढेच शब्द बाहेर पडले. केवढी दया! तुम्ही असं का म्हणाला म्हणून विचारल्यावर म्हणाले, ज्या देहाने भगवंताची प्राप्ती करून घ्यायची त्या देहाचा असा उपयोग केलेला पाहून वाईट वाटले. (राग नाही आला!) त्याला त्यांनी काही उपदेश केला नाही पण त्याच्या देहावरच नव्हे तर दोषांवरही पांघरूण घालून त्याला आतून बदलून टाकले. (पहा : श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज चरित्र आणि वाङ्मय. प्रकरण ६वे - कुमतीची सुमती झाली.) बाळंभटालाही पश्चात्ताप होताच रामापुढे शपथ घ्यायला लावून व्यसनातून सोडविले. (पहा : पूर्वोक्त प्रकरण ६वे - बाळंभटाचें व्यसन सुटलें)

वेगळ्या अर्थाने श्रीब्रह्मानंद महाराजांचे असेच झाले. त्यांनी काही पाप केले नव्हते. तथापि भगवंताच्या प्राप्तीसाठी जी विद्या मिळवली तिने भगवंताची प्राप्ती होत नाही असे समजल्यावर त्यांनी ती विद्या श्रीमहाराजांच्या पायावर वाहिली. पुन्हा संस्कृतात बोलले नाहीत माझी जिव्हा मी रामनामाला विकली आहे असे म्हणाले.

श्रीमहाराज म्हणाले, सहजसमाधि ही झाडावरचे पिकलेले फळ तोडून घेण्यासारखे आहे. पिकलेले फळ झाडापासून अलगद वेगळे होते; त्यात झाडाला कष्ट होत नाहीत आणि फळाला दु:ख होत नाही. नुसत्या समाधीत कष्ट आहेत पण नामसमाधीत ते नाहीत.

## ।३५५-५। (३१ डिसेंबर १९९३)

(पुण्यतिथी उत्सवाचा तिसरा दिवस)

सकाळी दहा वाजता पू. बाबांकडे गेलो तेव्हां ते म्हणाले, बाकी सगळं जाऊ दे, आपण नाम घेतलं पाहिजे. निंदा सहन करायला शिकलं पाहिजे. केवळ सहनशक्ती वाढवण्यासाठी म्हणून नाही, तर मी निंदा कशासाठी सहन करतो ते समजून केलं पाहिजे. समजून नामस्मरण करण्याला फार महत्त्व आहे. अहंकार जाण्यासाठी पदोपदी सावधानता पाहिजे. त्यासाठी लीनतेसारखा दुसरा उपाय नाही."लीनतेसारखे रत्न। उदंड केला जरी प्रयत्न। तरी न जोडे यत्न। केला पाहिजे॥" असे समर्थ सांगतात. मी त्यांच्यामुळं (माझ्या गुरुंमुळं) आहे असं खरं खरं वाटलं पाहिजे. पू. तात्यासाहेब किती लीन असत. एकदा एक थोर गृहस्थ श्रीमहाराजांना भेटायला आले. नंतर जेवायला बसलो असतांना पू. तात्यासाहेबांना म्हणालो; 'आपल्याला किती मोठी माणसे भेटायला येतात.' हे ऐकताच त्यांना रडू आले. ते म्हणाले, 'माझ्याकडे नाही; ती महाराजांकडे येतात.'

एकदा रात्री एक माणूस श्रीमहाराजांना भेटायला आला तेव्हां पू. तात्यासाहेब अगदी अजीजीने सुनेला म्हणाले, अहो, यांना काही देता कां? सौ. निर्मलाबाईंनी चिवडा आणून दिला. मी त्यांना विचारले, आपण इतक्या अजीजीने कां विचारलेत? तेव्हां ते म्हणाले, 'पुढे या घराची तीच मालकीण आहे.' किती घेण्यासारखे आहे!

नाम व्यापक आहे. म्हणून नाम घेता घेता नामात राहाता आले पाहिजे. ज्याला नामाची संगत लाभली तो खरा भाग्यवान. तो सतत नामात राहातो.

आपण हा अभ्यास केला पाहिजे आपले केवळ शब्दज्ञान होते ती भावना (feeling) पाहिजे. आज आपल्याला जग खरं वाटत. इतकंच नव्हे तर ते सुख देईलस वाटत. नामाच्या खरेपणाचे feeling येण्यासाठी एक तर सत्पुरुषांची संगत नाहीतर अखंड नामस्मरणाचा अभ्यास केला पाहिजे घड्याळाला किल्ली दिली की त्याची सगळी चाके फिरायला लागतात तसे अंत:करणापैकी एक इंद्रिय म्हणजे मन कार्य करू लागले की बाकीची इंद्रिय कार्य करू लागतात म्हणून निर्विचार होण्याचा अभ्यास करावा. त्याखेरीज अध्यात्म साधणार नाही.

**साधक ग** 'मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय असे भगवंतांनी सांगितले आहे मन आणि बुद्धी भगवंताच्या पायी ठेवता आली की त्यापाठोपाठ अहंकारही जाईल असे ज्ञानेश्वर महाराजांनी सांगितले आहे. मन आणि बुद्धी भगवंताच्या ठायी कशी ठेवायची ?

**पू. बाबा** . बुद्धी निश्चय करते आणि त्याप्रमाणे मन कृती करतं. आपली बुद्धी निश्चय करते पण आपले मन त्याप्रमाणे कृती करत नाही कारण निश्चय तरी डळमळीत असतो किंवा मनाला बुद्धीचं ऐकायची शिस्त लावलेली नसते. तथापि हे लक्षात ठेवावं की कृती इंद्रियांनी करायची असते मन सांगेल तसं ती वागतात म्हणून सगळा परमार्थ मन बदलण्यात आहे मन बदलण्यासाठी वासना बदलायला पाहिजे इतर वासना असू देत, पण त्यांमधेच 'भगवंता, तू मला हवास' ही वासना निर्माण करावी सत्पुरुष हे काम करतात. नामस्मरणाने ही वासना निर्माण होते. एकसारखे नामस्मरण झाले नाही तरी चालेल पण हेच सत्य आहे याची सतत आठवण ठेवावी. श्रीमहाराज म्हणाले, काही नाही केले तरी चालेल, पण करायचेच झाले तर नामस्मरण करावे.

योगात आणि भक्तीत सावधानता लागते. योगात पतनाचा धोका आहे नामस्मरणामधे ही भीती नाही. श्रीमहाराजांसारखे गुरु भाग्यानेच लाभतात. किती दया होती त्यांच्या अंत:करणात! प्रापंचिकाचे अंत:करण न दुखवता त्यांना शिकवणे किती कठीण आहे! कित्येकदा मला म्हणूनच ते बोलायचे पण म्हणायचे तुम्हाला नाही, मी सगळ्यांना सांगतोय खरोखर, आठवू लागलो की महाराजांच्या सहवासात गेलेले दिवस स्वप्नासारखे वाटतात महाराजांनी गोंदवल्याला काय स्थान निर्माण केलं आहे बघा! आपण इतकी माणसं, कुठली कोण, इतक्या प्रेमानं इथं येतो आणि आपलेपणानं राहतो. तुम्ही इथं काय करता याची चौकशी कोणी करीत नाही आणि तरी प्रेमानं तुमच्याशी वागतात. खरोखर केवढे उपकार आहेत हे महाराजांचे! मग थोडं तरी नको का आपण करायला ?

**| ३५५ - ६ |** (१ जानेवारी १९९४)

(पुण्यतिथी उत्सवाचा चवथा दिवस)

सकाळच्या प्रवचनानंतर साडेनऊ वाजता पू. बाबांकडे गेलो तेव्हा ते म्हणाले : महाराजांच्याबद्दलची कृतज्ञतेची भावना एकसारखी त्याच emotional pitch वर (भावनात्मक तीव्रता) राहिली पाहिजे. खरोखर, मला महाराजांनी प्रेमाने मारले (लाजवले). महाराज उपकार करून मारतात. एकदा गुरुपौर्णिमेच्या उत्सवाचा तिसरा दिवस होता. दुपारी मी बाहेर गेलो होतो, तेव्हां माझ्यासाठी मुगाच्या डाळीची आमटी काढून ठेवायला श्रीमहाराजांनी सांगितले हे मी कसे विसरेन?

श्री. गणपतराव मला म्हणाले की महाराजांच्या तोंडात सारखे तुमचे नाव येते; तुमचे किती भाग्य आहे! त्यावेळी मला त्याचे महत्त्व कळले नाही पण आता समजायला लागले आहे. मी दिसलो नाही की श्रीमहाराज यांना (ती. सौ. आईंना) केशवराव कुठे आहेत म्हणून विचारायचे. मला पुण्याला प्रोफेसरची नोकरी मिळाली होती. श्रीमहाराजांना मी म्हणालो की मला जावेसे वाटत नाही. त्यावेळी ते काही बोलले नाहीत; नंतर म्हणाले, एका ज्योतिषाने एका माणसाला त्याचा हात पाहून भविष्य सांगितले. पुढे त्या माणसाचा हात तुटला. पण म्हणून ज्योतिषाच्या भविष्यात काही फरक पडेल का? तसे मी देहात होतो आणि आता ह्या रूपात (केवळ वाणीने) आहे म्हणून माझ्यात काही फरक नाही. खरोखर त्यांनी इतके पुरविले आहे की त्यांनी विचारले तुला काय पाहिजे सांग तर काय सांगता येईल? अगदी मानवी पातळीवर तरी त्यांची एवढी अपेक्षा असेल ना, की आता एवढे दिलेले आहे तेव्हां मला आवडते म्हणून तरी नाम घ्या.

श्रीमहाराजांनी माझ्यावर किती उपकार केले. सगळे विचारभांडार उघडे करून ठेवले त्यामुळे हे सगळे कळायला लागले. आज प्रवचनाहून परत येतांना ह्या विचाराने मला रडूच आले. त्यांचे उतराई कसे व्हायचे? महाराजांनी सांगितलेलेच ज्ञानेश्वरीत कसे आहे ते आता समजू लागले आहे. गुरुदेव रानडे जसे नामाच्या ताब्यात गेले होते तसं आपण नामाच्या आधीन व्हायला पाहिजे सूक्ष्म होऊन नामात गेलं पाहिजे.

श्रीमहाराज गेल्यानंतर त्यांच्या दिवसांसाठी म्हणून नागपूरच्या पटाईत मावशी (श्रीमती साखरदांडे) पुण्याला श्री. गणपतराव दामल्यांकडे आल्या

तेथून पुढे त्या गोंदवल्याला येणार होत्या. रात्रभर दामल्यांकडे त्यांच्या श्रीमहाराजांसंबंधीच्या गोष्टी झाल्या. सकाळी उठल्यानंतर महाराज नसलेल्या गोंदवल्यात जायला त्यांचे मन घेईना आणि तेथूनच त्या नागपूरला परत गेल्या. महाराजांवर त्यांचे खरे प्रेम होते आणि श्रीमहाराजही त्यांच्याशी शिव्या देऊन मोठ्या प्रेमाने बोलायचे. एकदा एक माणूस चेहेरा करून (हजामत करून) आला होता. पटाईत मावशींनी त्याच्याकडे पाहिले तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, 'सटवे, त्याच्या रूपाला भुलू नकोस.'

गोंदवल्याला श्री. आण्णासाहेब घाणेकर रोज जेवणे झाली की पंधरा-वीस ताटे डोक्यावर घेऊन नदीवर धुवायला जात. श्रीमहाराजांना हे समजले तेव्हां एकदा आण्णासाहेब ताटे गोळा करीत असतांना श्रीमहाराज तेथे गेले आणि म्हणाले, ''असू दे, आण्णासाहेब, बाकीची माणसं करतील. श्रीमहाराजांनी सांगितले म्हणून त्यावेळी आण्णासाहेब थांबले आणि नंतर त्यांनी ताटे धुवून आणण्याचा क्रम तसाच चालू ठेवला. पुढे श्री. आण्णासाहेबांना अर्धांग झाले तेव्हां श्रीमहाराज मला बरोबर घेऊन बेळगावला त्यांना भेटायला गेले. आण्णासाहेबांचे शरीर लाकडासारखे झाले होते. गेल्याबरोबर श्रीमहाराज त्यांना भेटले. महाराज आले आहेत म्हणून त्यांना सांगितले तेव्हां प्रथम त्यांना समजले नाही. पण समजल्यावर ते मोठ्याने रडू लागले. श्रीमहाराज म्हणाले, त्यांचा भावनेचा भर ओसरल्यावर आपण त्यांना भेटू. नंतर (पेटीवर) भेटल्यावर श्रीमहाराजांनी त्यांना विचारले, 'आण्णासाहेब, नाम चालू आहे ना?' तेव्हां हृदयाकडे हात दाखवून ते म्हणाले, 'ऍथे चालू आहे.' कंटाळा वाटत नाही ना म्हणून विचारल्यावर नाही म्हणाले. फक्त माझ्यामुळे ह्या लोकांना कष्ट होतात याचे वाईट वाटते असे म्हणाले. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, 'आण्णासाहेब, त्याची जबाबदारी माझ्याकडे लागली.' पुढे म्हणाले, 'माझी माणसे कशी आहेत ते दाखवायला ह्या मुलाला आणले आहे.' आणि मला म्हणाले, 'माझ्या गळसरीतला एकेक मणी गळून पडत आहे.' (पहा : अध्यात्मसंवाद भाग १ संवाद. १०४)

एकदा श्रीमहाराजांनी मला विचारले,'तुम्हाला पोहायला येते का?' मी म्हणालो, 'हो, चांगले येते.' श्रीमहाराज म्हणाले, पोहोल्यावर ज्यांना सर्दी होते ते लोक अंगाला तेल लावून पोहतात; त्यामुळे मग सर्दी होत नाही. तसे नामाचे तेल लावून प्रपंचात राहावे म्हणजे मग प्रपंच बाधत नाही.

कीर्तन ऐकतांना एका उंटाच्या डोळयात पाणी येत असे. तसेच एक कुत्रा एकादशीला उपास करीत असे. श्रीमहाराजांना ह्या घटना सांगितल्या तेव्हां ते

म्हणाले, ह्या जगात काय अशक्य आहे? ज्या भगवंताने मेंदू निर्माण केला त्याला देहाची काय आडकाठी आहे? पू. बाबा म्हणाले, जडभरत हरिणाच्या चिंतनाने हरीण होऊन जन्मला तरी पूर्वजन्मीचे ज्ञान त्याला होतेच. तसेच रमणांची सेवा करणारी अम्मा सेवा करण्याची इच्छा राहिली म्हणून पुन्हां गाय होऊन त्यांच्या दारी आली.

पू. बाबा म्हणाले, नामस्मरण करतांना पदोपदी श्रीमहाराजांना आवाहन करावे. माझे नाम टिकवा अशी त्यांच्याजवळ प्रार्थना करावी. त्यामुळे दोन्ही होते. नामस्मरणही होते आणि महाराजांच्या अस्तित्वाची जाणीव होते. अनाहत नाद हे भगवंताचे दिव्य संगीत (Divine Song) आहे असे श्रीमहाराज म्हणत त्याचा अनुभव घेतला पाहिजे.

**|३५५-७|** (२ जानेवारी १९९४)

(पुण्यतिथी उत्सवाचा पाचवा दिवस)

सकाळी साडेनऊ वाजता पू. बाबांकडे गेलो. सकाळच्या प्रवचनात गीतेच्या बाराव्या अध्यातील 'अथ चित्तं समाधातुं' हा श्लोक होता. ह्या श्लोकावरील टीकेत ज्ञानेश्वर महाराजांनी म्हटले आहे:

अथवा हें चित्त। मनबुद्धीसहित।
माझां हातीं अचुंबित। न शकसी देवों॥ १०४॥
तरि गा ऐसें करी। यां आठां पाहारांमाझारीं।
मोटके निमिषभरी। देतु जाय॥ १०५॥
मग जें जें कां निमिख। देखेल माझें सुख।
तेतुलें अरोचक। विषयीं घेईल॥ १०६॥

**पू. बाबा** : आठ प्रहरांमध्ये निदान एक क्षण द्यायची जबाबदारी तुमची आहे. सबंध दिवसात तो एक क्षण जर देता आला तर मग पुढच्या अवस्था आपोआप येतील. कारण ज्या ज्या क्षणी भगवंताशी मन समरस होईल त्या त्या क्षणी दृश्यातून वाटणारे सुख कमी होईल.'तेतुलें अरोचक। विषयीं घेईल॥'

**साधक प** : एक क्षणच, पण तो असा द्यायचा आहे की त्यावेळी दुसरे काही नसेल. ते देवाच्या दारी क्षणभर उभे असणेच आहे. एकदा का त्या सुखाची गोडी समजली की तो क्षण पुन्हा पुन्हा यावा म्हणून साधक उत्साहाने साधन करू लागेल. दृश्यातल्या अनेक अनुभवांवरून मी कर्ता नाही हे कळते पण भोक्तेपण जाणे फार अवघड आहे.

**पू. बाबा** : श्रीमहाराज म्हणाले की ह्या अहंकाराच्या कला आहेत. आपले भोक्तेपण, आपला आनंद दृश्यातला, दृश्यावर आधारलेला असतो, पण नामातून मिळणारा आनंद सूक्ष्मातला असतो. आजाऱ्याला बदामाचा शिरा सोसत नाही तसा भगवंताचा आनंद आपल्याला झेपत नाही. एकदा श्रीमहाराजांना म्हणालो की माझा राग जात नाही. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, रागाचे काय आहे? त्याची शेंडी धरून त्याला काढून टाकीन; पण एक तर तुम्ही वेडे व्हाल नाहीतर मरून जाल!

मालाडच्या प्रवचनांमधे बुद्धीचा भाग जास्त असतो, पण इथे गोंदवल्यात भाव जास्त असतो. इथल्या वातावरणाचा हा परिणाम असला पाहिजे. इथे भाव नकळत येतो. नाम जास्ती होते आणि चांगले चालते. शरीर हलके होते. नामाची ही सूक्ष्मता समजायला लागली की मनुष्य नामाच्याच मागे लागेल

संसारात केवळ निरासक्तच नव्हे तर अलिप्त कसे असावे ते भाऊसाहेबांना पाहून समजले. भाऊसाहेबांच्या एका जावयाची सांपत्तिक स्थिती चांगली होती. पण पुढे कशामुळे कोणास ठाऊक, त्यांचे पैशाचे मोठे नुकसान झाले, संसार मोठा होता. त्यात गरिबी आली त्यामुळे भाऊसाहेबांच्या मुलीला धुणेभांडी, सैपाक सगळे घरी स्वतःला करावे लागू लागले. एकदा जावई सासुरवाडीस आलेले असतांना भाऊसाहेबांनी त्यांना विचाले की नुकसान कशामुळे झाले? जावई गप्प बसले. त्यांनी काहीच उत्तर दिले नाही. ते गप्प बसले म्हणून मग भाऊसाहेबही गप्प बसले. त्यांनी पुन्हा खोदून विचारले नाही, इतकेच नव्हे तर पुन्हा स्वतःकिंवा दुसऱ्या कोणामार्फत ह्याबद्दल चौकशी केली नाही. सामान्य माणसाच्या आवाक्याबाहेरचीच ही गोष्ट आहे.

संध्याकाळी सात वाजता पू. बाबांनी चर्चेसाठी तुकाराम महाराजांचा अभंग काढला. अभंग असा :

विठ्ठल सोयरा सज्जन सांगाती। विठ्ठल हा चित्तीं बैसलासे॥ १॥
विठ्ठल हें अंग व्यापिली हे काया। विठ्ठल ही छाया माझी मज॥ २॥
बैसला विठ्ठल जिव्हेचिया माथा। न वदे अन्यथा आन दुजे॥ ३॥
सकळ इंद्रिया मन हें प्रधान। तेहीं करी ध्यान विठ्ठलाचें॥ ४॥
तुका म्हणे या विठ्ठलासी आतां। न ये विसंबिता माझें मज॥ ५॥

विठ्ठल हा माझा सोयरा आहे, आप्त आहे. 'सौजन्य तेथें सोयरीक.' तो सज्जन आहे, साधू आहे, माझा सांगाती - companion आहे. आतां चित्तामधे तोच आहे. चित्तामधे स्मृती, आठवणी त्याच्याच आहेत. एकसारखे

त्याचेच चिंतन होते आहे. आता मी नाहीच. काया तशी छाया. त्यामुळे आता माझी, तुकारामाची सावलीही नाहीशी झाली आहे. आता तीही विठ्ठलाचीच झाली आहे. आता जिभेवर विठ्ठलाखेरीज दुसरा शब्दच येत नाही. तुलसीदासांना लोक रामबोला म्हणून आळखू लागले होते तसे हे आहे.

**साधक प** : जिभेवर आता विठ्ठल बसला आहे, त्यामुळे जे शब्द माझ्या तोंडातून येतात ते खरोखर मी बोलत नसून तोच बोलतो आहे.

**पू. बाबा** : वा! हा अर्थही छान आहे.

**साधक ग** : या अभंगाचे आणखी एक वैशिष्ट्य आहे. तुकारामांचे अभंगही आता त्यांचे राहिलेले नसून विठ्ठलाचे झालेले आहेत. अभंगाच्या प्रत्येक चरणात विठ्ठल शब्द आला आहे.

**पू. बाबा** : होय, कारण आता विठ्ठलाखेरीज दुसरा विचारच उठत नाही. आता या विठ्ठलाला मी सोडू शकत नाही. एकीकडे भगवंत, दुसरीकडे मी आणि मधे मन आहे. आणि गंमत अशी आहे की हे मन दोन्हीचे भोग घेते आहे. 'हृदयमें न जाने, प्राण है कि कान्ह है' अशी ही अवस्था आहे.

## **।३५५-८।** (३ जानेवारी १९९४)

(पुण्यतिथी उत्सवाचा सहावा दिवस)

सकाळी साडेनऊ वाजता पू. बाबांच्या खोलीत गेलो होतो तेव्हां ते म्हणाले, आपले चित्त स्मृतींनी बनलेले आहे. वासना स्मृतिरूपाने वर येतात. ह्या स्मृती दुसऱ्या स्मृतींनीच काढल्या पाहिजेत. नामाचे स्मरण एकसारखे ठेवले, नामाची आवृत्ती करीत राहिले की प्रपंचाच्या स्मृतीच्या जागी नामाच्याच स्मृती येतील. मग वासना उठेल ती नामाचीच उठेल. अशा रीतीने नामाची वासना होणे ही नामात गोडी येण्यास सुरुवात झाली असल्याचे लक्षण होय.

नामाची संगत कशी लाभेल असा प्रश्न विचारून पू. बाबा म्हणाले, श्रीमहाराजांनी म्हटले आहे की नाम हे सत्संगतीचा पाया आणि कळस आहे. साधन या अर्थाने नाम पाया आहे पण पुढे तेच साध्य म्हणजे कळस होतो. नामात बदल होत नाही, बदल नाम घेणाऱ्यामधे होतो. नामाची संगत होण्यासाठी माझे मन नामात रमले पाहिजे. त्यासाठी ध्येयाची एकसारखी आठवण पाहिजे. 'तू मला हवा आहेस' हे माझे ध्येय आहे. ह्या ध्येयाची एकसारखी आठवण राहणे, नाम घेतांना नामाचा अर्थ लक्षात येऊन नाम घेणे म्हणजे नामाची संगत आहे.

आज एकीकडे माझे नाम चालू असते आणि एकीकडे मनात दुसरे विचार चालू असतात. म्हणून मनात दुसरे विचार येऊ लागले तर थोडा वेळ थांबावे आणि प्रत्येक नाम घेतांना मी ते कशासाठी घेत आहे, माझे ध्येय काय आहे याची जाणीव ठेवून पुन्हा नाम घ्यायला लागावे. असे केले तर प्रत्येक नाम जिवंत वाटेल. त्यात नाविन्य येईल. अशा प्रकारे समजून नाम घेणे हे सूक्ष्मात जाणे आहे. सुरुवातीला हे अवघड जाईल पण एकदा समजले म्हणजे लवकर जमेल.

वासना जशी तीव्र होते तशी श्रीमहाराजांच्याबद्दलची भावना तीव्र व्हायला काय करावे? श्रीमहाराज माझे मायबाप, माझे सर्वस्व आहेत असे वाटले पाहिजे. ब्रह्मानंद महाराजांना श्रीमहाराज गेल्याची तार मिळाली तेव्हां त्यांना एकाएकी रडू कोसळले. दोन रुपये खर्च करून (रेल्वे तिकिटाला) साक्षात ब्रह्माचे दर्शन मिळत होते म्हणाले आणि गोंदवल्याला न जाता तीन दिवस कोठे तरी निघून गेले.

संध्याकाळी सात वाजता पू. बाबांकडे गेलो तेव्हां ''जाणोनि नेणते करी माझें मन। तुझी प्रेमखूण दावोनिया॥'' ह्या पूर्वी चर्चा झालेल्या तुकाराम महाराजांच्या अभंगावर चर्चा सुरू केली. (पहा : अध्यात्म संवाद भाग २ संवाद १७५) चर्चेचा समारोप करतांना पू. बाबा म्हणाले, संपूर्ण शरणागतीच्या आधीची ही अवस्था आहे. तुकाराम महाराज म्हणतात, आत्तापर्यंत मी साधण्यासाठी साधन केले. त्या साधनाने काही साधत नाही याची जाणीव झाली. साधनाची हद्द झाली. मी करून साधत नाही हे समजले. त्यामुळे साधनात थकवा आलेला आहे. सर्व काही शीण वाटत आहे. म्हणून माझे मन आता तू जाणिवेतून नेणिवेत ने. मात्र हे करतांना तुझ्या माझ्यावरील प्रेमाची मला खूण दे. तुझी प्रेमखूण म्हणजे तू मला आपला म्हटले आहेस हे मला जाणवू दे. असे झाले म्हणजे पहिल्यांदा अनासक्ती येईल. कमळाचे पान जसे पाण्यात राहूनही अलिप्त असते तसा मी संसारात राहीन. उदाहरणार्थ, अभ्यास केला नाही म्हणून पू. तात्यासाहेबांनी दिनकररावांना मारले तेव्हां भाऊसाहेब त्यांना म्हणाले, अरे, कां मारलेस? तो महाराजांनी दिला आहे ना? ते पहातील. भाऊसाहेबांना महाराजांची प्रेमखूण मिळून ही अलिप्तता आली होती. ह्याच्या पुढची पायरी म्हणजे व्यवहारात जे काही घडते ते रजिस्टरच होत नाही. कोण काय बोलतो याच्याकडे लक्षच नसते. निंदा स्तुती कानावर आली तरी त्याचे काही सुखदु:ख होत नाही. तिसरी पायरी म्हणजे प्रपंच स्वप्नासारखा वाटू लागतो.

नामाची संगत कशी लाभेल? नामात असा कोणता गुण आहे की त्यामुळे आपण आत जाऊ शकू? नाम घेतांना श्रीमहाराजांशी संबंध आहे, नाम हा श्रीमहाराजांचा आवाज आहे असं वाटलं पाहिजे. महाराजांनीच सांगितल्याप्रमाणे श्रद्धेच्या नळीतून नाम घेतलं पाहिजे.

**।३५५-९।** (४ जानेवारी १९९४)

(पुण्यतिथी उत्सवाचा सातवा दिवस) सकाळी साडेनऊ वाजता.

**पू. बाबा :** नामस्मरण करतांना जेव्हां आपल्या मनात चांगले विचार येतात तेव्हां श्रीमहाराजांच्या अस्तित्वाची जाणीव होते. कृतज्ञतेचा भाव येतो तेव्हां ती नामाचीच शक्ती असते; कारण देहबुद्धीतून हे येणेच शक्य नाही. मी सारखे नामच घेत असतो. तुमचा अखंड नामाचा अभ्यास चालू आहे ना?

**साधक प :** आपण विचार करतो तेव्हां विचाराबरोबर त्याचा अर्थ आपल्याला प्रतीत होतो. तुम्ही नामस्मरण करता तेव्हां तुम्हाला कोणता अर्थ प्रतीत होतो.

**पू. बाबा :** नामस्मरण डोक्यात चालत असल्यामुळे त्यावेळी इतर विचार मंदावतात. नामस्मरण करतांना मला हे श्रीमहाराजांनी करायला सांगितले आहे असा भाव असतो. कधी कधी, मला आनंद पाहिजे, समाधान पाहिजे असा भाव असतो. कधी, महाराजांनी माझ्यासाठी किती केलं असा कृतज्ञतेचा भाव येतो. प्रपंचाकडे पाहून असे वाटत असले तरी त्याला नामाचीच बाजू असते; प्रपंचाची बाजू नसते. श्रीमहाराजांच्या अस्तित्वाची जाणीव मात्र सतत असते. पुष्कळ नामस्मरण केल्याने मनाला समाधान निश्चित मिळते.

पहाटे अडीच वाजता उठल्यापासून सकाळी सहा-साडेसहा वाजेपर्यंत मी मौन धरतो. आत नामस्मरण सुरू असते. त्यानंतर शवासन केल्यावर नाम आणखी आत जाते. सुरुवातीला त्याची जाणीव असते पण अगदी आत गेल्यावर समजत नाही. तथापि शवासनातून बाहेर आल्याबरोबर नाम सुरू असते. म्हणजे शवासनात ते चालू असलेच पाहिजे. सहा-साडेसहानंतर मी थोडे कषाय घेतो. थोडे बोलणेही असते पण त्यावेळीही आत नामस्मरण चालूच असते. बोलण्याचा प्रसंग आला तरी बोलणे थांबल्यावर नाम सुरू होते. इथेच पहा, प्रसादाला काय द्यायचे ते मी समोर पहात असलो तरी आत तो विचार नसतो; आत नामच चालू असते.

श्रीमहाराजांचे चरित्र पुन्हा पुन्हा वाचल्याने जसा त्याचा वेगवेगळा नवा अर्थ प्रतीत होतो तसे नामस्मरण अधिकाधिक केल्याने त्याचा जास्त अर्थ प्रतीत होतो

सकाळचे नामस्मरण चांगले होण्यासाठी पोट साफ पाहिजे. त्यासाठी त्रिफळा चूर्ण घ्यायला हरकत नाही रात्री जेवण झाल्यानंतर थोड्या वेळाने अन्न खाली गेल्यानंतर घ्यावे. कोमट पाण्यामधे एक चमचा त्रिफळा चूर्ण भिजत घालावे आणि सुमारे पंधरा-वीस मिनिटे भिजल्यावर वरचे फक्त पाणी प्यावे पोट हलके राहण्यासाठी पू. तात्यासाहेब रात्री रव्याची खीर घेत. नंतर महाराजांनी त्यांना कॉम्प्लान घ्यायला सांगितले. त्यामुळे पोटात जडपणाही वाटत नाही आणि त्यापासून शक्ती मिळते

नंतर पू. बाबांनी काही आठवणी सांगितल्या.

श्री. दत्तोपंत गांधी श्रीमहाराजांना (पेटीवर) भेटत. श्रीमहाराज बोलू लागले की ते ऐकतांना त्यांना कृतज्ञताभाव अनावर होऊन रडू येत असे. नंतर ते मला विचारत की महाराजांनी काय सांगितले? म्हातारपणी त्यांना फक्त समोरच दिसत असे. एकदा रस्ता ओलांडताना दोन्ही बाजूंनी जाणाऱ्या मोटारींमधे ते सापडले. एक मोटार त्यांच्या अंगावर येऊन आदळणार इतक्यात कोणीतरी त्यांना बाजूला ओढले. नंतर तुम्हाला कोणी बाजूला केले म्हणून विचारल्यावर ते म्हणाले, कृष्णाने कशावरून म्हणून विचारल्यावर म्हणाले, तो मला बाजूला करून जात असतांना मला त्याचा पाठमोरा मुकुट दिसला! पू. बाबा म्हणाले, आपल्यालाही अनुभव येतात पण त्या अनुभवांचे सातत्य राहात नाही; ते राहाणे महत्त्वाचे आहे. त्यासाठी नामाचे सातत्य राहिले पाहिजे.

श्री पाचलेगावकरांची मलकापूरला श्रीमहाराजांशी भेट झाली होती. श्रीमहाराज त्यांना म्हणाले की अनुसंधान टिकत असेल तर हे सर्व (धर्मकारण) करावे पण जेव्हां अनुसंधान टिकत नाही असे वाटेल तेव्हां सगळे सोडून जगलात निघून जावे.(पहा : अध्यात्मसंवाद भाग १ संवाद क्र.११०)

सध्याकाळी सात वाजता पू. बाबांच्याकडे गेलो तेव्हां ते म्हणाले, महाराज म्हणाले, नामाला गुरूच्या प्रेमाची जोड द्यावी. मी म्हणतो, महाराजांचे प्रेम म्हणजेच नामाचे प्रेम कारण ते नामावतार आहेत "नामात प्रेम का येत नाही? नाम घेत नाही म्हणून." असे श्रीमहाराजांचे एक वचन आहे. एक शेर आहे :

" वो सर सर नहीं जिसमें न हो सौदा किसीका
वो दिल दिल नहीं जो न हो दीवाना किसीका"

मला शबरीचे उदाहरण अप्रतिम वाटते किती निर्मळ अंत:करण होते तिचे! रामासाठी उष्टी बोरे ठेवली आणि म्हणाली मी माझ्या शुद्ध दातांनी चावून उत्तम तेवढीच चाखून ठेवली आहेत! तिचे ते निर्व्याज प्रेम पाहून ती खाताना रामाला किती आनंद झाला असेल? शबरी म्हणाली, मी एक स्त्री आहे, अडाणी आहे आणि माझी जातही हलकी आहे तेव्हा श्रीराम म्हणाले, मी यातलं काहीच पहात नाही. मी प्रेम तेवढ पाहतो

एकदा एका गृहस्थाकडे पू. तात्यासाहेब जेवायला गेले होते. त्यांची आई म्हातारी होती. तिला नीट दिसत नव्हते तिने जेवायला भाकरी आणि डाळिंब्यांची उसळ केली होती. केलेल्या भाकऱ्या चुलीमागे ठेवल्या होत्या, त्यांना मुंग्या आल्या होत्या ते काही बाईला दिसले नाही पू. तात्यासाहेबांनी ती भाकरी थोडी झटकून असू दे, असू दे म्हणून खाल्ली त्या बाईचे वागणेही इतके सहज होते की भाकरीला मुंग्या आल्याचे समजले तेव्हा ती म्हणाली, हो का, मला दिसल नाही!

एकदा श्रीमहाराज हर्द्याला असताना त्याना खोकला येत होता. डॉ कुर्तकोटी रात्रभर खोलीच्या बाहेर बसून असत. एकदा श्रीमहाराजांना खोकल्याची उबळ आली असतांना पिकदाणी सापडेना तेव्हां कुर्तकोटींनी कफ आपल्या ओंजळीत घेतला श्रीमहाराजाना संकोच वाटला पण कुर्तकोटींना आनद वाटला! प्रेम येण्यासाठी गुरूशी सबंध जोडला पाहिजे आपल्या प्रपंचातले प्रश्न जसे आपण एखाद्या जवळच्या माणसाला सांगतो तसं सगळ काही आपल्या गुरूंना सांगावं प्रेमामधे मोकळेपणा असतो. गुरूंना सांगताना तो असावा. त्यांच्याशी आपलेपणा ठेवावा जसे असू तसे त्यांच्यासमोर जावे लबाड असाल तर ते नि:संकोचपणे त्यांना सांगावे. त्यांना ते माहीत असतेच, कारण ते अंतर्यामी आहेत. पण तुम्ही सांगता तेव्हां तुम्हाला आपल्या दोषांची जाणीव होते आणि ते दोष घालवायला गुरु मदत करतात.

गुरूंचे प्रेम येण्यासाठी ज्यांना गुरूंचे प्रेम वाटते अशा माणसांजवळ जावे त्यांच्याजवळ शिकायला मिळते. एखाद्या बाईला महाराजांची मुलगी म्हणून प्रेमाने त्यांच्या मांडीवर डोके ठेवण्यात किती आनंद आणि धन्यता वाटेल!

गुरूंना आवडते ते करणे हा प्रेमाचा एक प्रकार आहे त्यांना नाम आवडते; ते घेत जावे.

ज्या शिष्याचे गुरूंवर खरे प्रेम असते त्या शिष्याजवळ गुरूही आपले अंतरंग उघडे करतात. श्रीमहाराजांनी एकदा पंढरपूरला असतांना ब्रह्मानंद महाराजांना आपल्या आयुष्याची रूपरेषा सांगितली होती.

मालाडला एकदा महाराजांच्या तसबिरीवरचा बल्ब जळला तेव्हां घरात होता तो मोठा बल्ब तेथे बसवला. नंतर भाऊसाहेबांनी महाराजांचे दर्शन घेतले तेव्हां महाराज त्यांना भाऊसाहेब, मला उकडतंय असं म्हणाले. हे तादात्म्य. अर्थात लगेच तसबिरीवरचा बल्ब बदलण्यात आला.

**| ३५५ - १० |** (५ जानेवारी १९९४)

(पुण्यतिथी उत्सवाचा आठवा दिवस) सकाळी साडेनऊ वाजता.

**पू. बाबा :** काही माणसे व्यवहारदृष्ट्या abnormal - असामान्य असतात. उदाहरणार्थ आइनस्टाइन. बालगंधर्वांना आंघोळीसाठी रोज बर्फ घातलेले ५-६ हंडे थंडगार पाणी लागत असे. तसे व्यवहारदृष्ट्या normal - सामान्य राहून परमार्थदृष्ट्या आपले मन abnormal झाले पाहिजे. सुखदु:ख, आसक्ती, अपेक्षा सगळं नाहीसं झालं पाहिजे. जीवाची उलथापालथ झाली पाहिजे. आज केन्द्रस्थानी मी आहे तेथे श्रीमहाराज आले पाहिजेत. त्यांचे कर्तेपण जाणवण्यासाठी नामस्मरणाला 'राम कर्ता' ही जोड द्यावी.

श्रीमहाराजांना मन दिलं की ते कसं बनतं याचं एक उदाहरण सांगतो. भाऊसाहेबांना (केतकर) त्या काळात नव्वद रुपये पेन्शन होती. दर महिन्याला पेन्शनचे पैसे आले की ते सगळे ते श्रीमहाराजांना देत असत आणि मग श्रीमहाराज देतील तेवढ्या पैशातच घरखर्च भागवीत! एकदा श्रीमहाराजांची तसबीर पुसायची होती तर त्यासाठी सौ. ताईंनी (पू. तात्यासाहेबांच्या पत्नी) नवे धोतर फाडून दिले! पू. तात्यासाहेब गेल्यानंतर त्या रडल्या नाहीत. डॉक्टर म्हणाले की त्या रडल्या नाहीत तर मेंदूवर परिणाम होईल. पण महाराजांची इच्छा म्हणून त्या स्वस्थ राहिल्या. इतकेच नव्हे तर त्यानंतर रामनवमीचा उत्सवही नेहमीप्रमाणे करा; महाराजांचे काही कमी होता कामा नये असे त्यांनी सांगितले. (पहा : श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज - चरित्र आणि वाङ्मय लेखक प्रा. के. वि. बेलसरे. प्रकरण १५ मधील यमुनाबाई केतकर)

नंतर गीतेच्या बाराव्या अध्यायातील 'अभ्यासेप्यसमर्थोसि मत्कर्मपरमोभव' ह्या श्लोकावर आणि ह्या श्लोकावरील ज्ञानेश्वरीतील ओव्यांवर चर्चा झाली. चर्चेच्या शेवटी पू. बाबा म्हणाले, नुसते शब्दांनी समजले तरी आपल्याला किती आनंद होतो मग हे आचरणात आणले तर किती आनंद होईल?

संध्याकाळी सात वाजता पू. बाबांच्या खोलीत गेलो तेव्हां तुकाराम महाराजांनी त्यांच्या पत्नीला उपदेश केलेले जे अभंग आहेत त्यातील एक अभंग पू. बाबांनी वाचून दाखवला. अभंग असा :

देव पहावया करीं वो सायास। न धरी हे आस नाशिवंत॥ १ ॥
दिन शुद्ध सोम सकाळीं पातला। द्वादशी घडला पर्वकाळ॥ २ ॥
द्विजां पाचारूनी शुद्ध करीं मन। देईं वो हें दान यथाविध॥ ३ ॥
नको चिंता करूं वस्त्रा या पोटाची। माउली आमुची पांडुरंग॥ ४ ॥
तुका म्हणे दुरी सांगतों पाल्हाळीं। परी तो जवळी आहे आम्हां॥ ५ ॥

**पू. बाबा :** तुकाराम महाराजांनी संसारातले लक्ष काढून घेतले होते त्यामुळे जिजाईलाच मुलांचे सगळे करावे लागत होते, घर चालवावे लागत होते. तथापि हाही तिचा भ्रमच होता. कारण ते सांगतात 'नको चिंता करूं वस्त्रा या पोटाची। माउली आमुची पांडुरंग।' इतकेच नाही तर आहे ते या पर्वकाळी ब्राह्मणांना दान दे म्हणतात. जिजाईला त्यांच्या उंचीवर पोचणे शक्यच नव्हते. तथापि तुकाराम महाराजांनी तिला नांवे ठेवली नाहीत.

'नको चिंता करूं वस्त्रा या पोटाची।' श्रीमहाराजांनीही म्हटले आहे की जो माझ्या नांवाने म्हणजे मी सांगितले आहे म्हणून नामस्मरण करतो त्याला अन्नवस्त्र पुरविण्याची जबाबदारी माझ्यावर आहे. ते म्हणत, पैसा किती असावा? अन्नवस्त्राला कमी पडू नये आणि मेल्यावर वर्गणी गोळा करायला लागू नये. त्यांचा पैशाबद्दल हा दृष्टिकोन होता. आज पैशाची आसक्ती हा दोष मला स्पष्टपणे जाणवतो आहे. हा दोष काढण्यासाठी श्रीमहाराजांची मनापासून प्रार्थना करणे हाच उपाय आहे.

साधकाने कुठलीही तक्रार करू नये. एकदा मी श्रीमहाराजांना म्हणालो, आपल्यासारखे गोड बोलणे आले पाहिजे. ऐकून महाराज गप्प बसले, काही बोलले नाहीत. आता लक्षात येते की गोड बोलणे आतूनच आले पाहिजे.

श्रीमहाराजांजवळ दादोबा नांवाचा एक गृहस्थ होता. अन्न, वस्त्र, निवाऱ्यासाठी तो आणि त्याचे कुटुंब सर्वस्वी श्रीमहाराजांवर अवलंबून होते. तो स्वत: काहीही काम करीत नसे. एकदा ब्रह्मानंद महाराजांनी त्याला श्रीमहाराजांना जेवायला बोलवायला पाठविले. श्रीमहाराज त्याला म्हणाले, दादोबा, नुसतं बसू नये, काहीतरी काम करावं. तेव्हां तो म्हणाला, महाराज, चऱ्हाट पुरे की! आता जेवायला चला. ते ऐकून श्रीमहाराज गप्प बसले आणि करुणा अशी की त्यांनी त्याचा शेवटपर्यंत सांभाळ केला. त्याचा अंतकाळ

आला तेव्हां त्याला रामासमोर निजवले होते. रामासमोर पडदा होता. मरण्यापूर्वी त्याने तो पडदा बाजूला करायला सांगितले.

पू. बाबा म्हणाले, श्रीमहाराजांनी आपल्या लायकीपेक्षा आपल्याला किती जास्त दिलं आहे. म्हणून कृतज्ञताभाव आपल्या सगळया जीवनाला व्यापून राहिला पाहिजे. प्रार्थना हादेखील आपल्या साधनाचा भाग झाला पाहिजे. त्यात कमीपणा वाटायचं कारण नाही. प्रार्थना ही मानवतेला धरूनच आहे. आपली मुलं त्यांचं प्रारब्ध घेऊन येतात. त्यांच्या प्रारब्धानुसार ती वागतात आणि जगतात. पण हे पटायला आधी मी माझ्या प्रारब्धानुसार जगतो आहे हे पटले पाहिजे. मग तक्रार राहाणार नाही. अमुक घडावे, तमुक घडू नये असे आपल्याला वाटत असते आणि मग मनाविरुद्ध झाले की वाईट वाटते. मनाविरुद्ध वाटणे ही तक्रारच आहे. तक्रार जायला वासना नाहीशा झाल्या पाहिजेत असेच यावरून दिसते. तथापि तक्रार नाहीशी व्हायला आणखी एक मार्ग आहे. त्यांच्या अस्तित्वाची एकसारखी जाणीव राहिली तर तक्रार राहाणार नाही. मग जे घडते आहे ते तुमच्या इच्छेने घडते आहे असे वाटेल. प्रारब्धाच्या कठोर सिद्धान्तापेक्षा यात जास्त मानवता आहे.

पुष्कळ लोक करतात म्हणून करणे ही काही खरी सेवा नव्हे. आत बदल झाला पाहिजे. The only revolution is inner revolution असे कृष्णमूर्ती म्हणत ते खरे आहे. यासाठी साधकांच्या संगतीचा चांगला उपयोग होतो. इथे येऊन हे शिकायचे आहे. संपूर्ण शरणागती आली की तो जवळच आहे. तो मग उचलूनच घेईल. सूरदासांनी म्हटले आहे की बाकीचे आधार सुटले की नामाचाच आधार राहातो. ''अपबल, तपबल, बाहुबल, चौथा बल है दाम। सूर स्याम किसोरतें हारे को हरिनाम॥''

## ।३५५ - ११। (६ जानेवारी १९९४)

(पुण्यतिथी उत्सवाचा नववा दिवस) सकाळी साडेनऊ वाजता.

**पू. बाबा** : प्रार्थनेतून शरणागती येईल पण त्यासाठी प्रार्थना सळसळून आली पाहिजे. प्रार्थना करतांना राम दाता ही भावना पाहिजे. त्याच्या पदरी पडल्याची खूण म्हणजे निर्भयता आली पाहिजे. तुकाराम महाराजांचा एक अभंग आहे :

आम्ही विठ्ठलाचे दास झालों आतां। न चलेचि सत्ता आणिकांची॥ १॥
नावरे तयासी ऐसें नाहीं दुजें। करितां पंढरीराजें काय नव्हे॥ २॥

कोठें तुज ठाव घ्यावयासी धांवा। मना तूं विसावा घेई आतां॥ ३॥
इंद्रियांची बोढी मोडिला व्यापार। ज्या अंगें संचार चाली तुज॥ ४॥
तुका म्हणे आम्ही जिंकोनियां काळ। बैसलों निश्चळ होऊनियां॥ ५॥

अभंगाचा अर्थ सांगतांना पू. बाबांनी विचारले की आपले नामस्मरण दिव्य कसे होईल? पुढे तेच म्हणाले, नामस्मरण दिव्य होण्यासाठी आधी आपण दिव्य झाले पाहिजे. त्यासाठी पहिली गोष्ट म्हणजे क्षुद्र होणे सोडले पाहिजे. नाम घेतांना आपण श्रीमहाराजांच्या अस्तित्वाची जाणीव ठेवली पाहिजे. नाम हा त्यांचा प्राण आहे. त्याला धक्का लागेल असे काहीही करता कामा नये.

श्रीमहाराजांना आपण नामावतार म्हणतो. अवतरण म्हणजे वरून खाली येणे. परा वाणी हे नामाचे निजधाम आहे. भगवंत जसा निजधामाहून खाली येतो - अवतार घेतो आणि अवताराचे कार्य झाले की निजधामाला परत जातो तसे नाम परा वाणीतून वैखरीपर्यंत खाली येते आणि त्याचे कार्य (जीवाचा उद्धार) झाले की पुन्हा परेपर्यंत परतते. म्हणून वैखरीने नाम घेण्याला महत्त्व आहे. "पुढें वैखरी राम आधी वदावा" असे समर्थांनी सांगितले आहे. श्रीमहाराजांनीही "दीनदास म्हणे सांगतो तें ऐका। अभ्यास वैखरी सोडूं नका॥" असे म्हटले आहे.

**साधक आ** : श्री. हुचूरावही म्हणत की रोज दोन माळा तरी मोठ्याने जप करावा.

**पू. बाबा** : आपल्याला नामाच्या दिव्यतेची कल्पना नाही. सर्व कर्मे करतांना त्यांमधे नामाची आठवण राहिली तर सगळी कर्मे दिव्य होतील. म्हणजेच कर्म दिव्य व्हायला प्रत्येक कर्मामधे अनंताचा स्पर्श पाहिजे. अशा प्रकारे कर्म दिव्य झाले की ते करणाऱ्याच्या जीवनात सहजता येते. श्री. भाऊसाहेबांच्या जीवनात अशी सहजता आली होती. त्यांची सर्व कर्मे श्रीमहाराजांच्या स्मरणात होत असल्यामुळे आपल्या पानातले कडबू श्रीमहाराजांच्या पानात कसे वाढू असे त्यांना वाटले नाही.

एका गृहस्थांचे कोणाकडून तरी पैसे यावयाचे होते आणि श्रीमहाराजांनी त्यांना सांगितले तर पैसे परत मिळतील याची त्यांना खात्री होती; पण महाराज काही सांगत नव्हते. म्हणून त्या गृहस्थांनी भाऊसाहेबांच्या मागे टुमणे लावले की तुम्ही श्रीमहाराजांना त्या माणसाला पैसे दे असे सांगायला सांगा. भाऊसाहेबांनी श्रीमहाराजांना तसे सांगितल्यावर श्रीमहाराज म्हणाले की भाऊसाहेब तो पैसा मिळणे त्याच्या हिताचे नाही. भाऊसाहेबांनी त्या गृहस्थांना श्रीमहाराज काय

म्हणतात ते सांगितल्यावर ते गृहस्थ म्हणाले की पैसे मिळाल्यावर काय होते ते माझे मी पाहीन. तुम्ही श्रीमहाराजांमार्फत त्या माणसाला पैसे द्यायला सांगा. पुढे भाऊसाहेबांना स्वप्न पडले की स्वत: श्रीमहाराज त्या गृहस्थाला पैसे देत आहेत. हे स्वप्न नसून सत्यच आहे अशी त्यांची धारणा झाली आणि त्या गृहस्थाने पुन्हा पैसे मागितल्यावर भाऊसाहेब म्हणाले की अहो, श्रीमहाराजांनी स्वत: पैसे तुम्हाला दिले आणि त्यावेळी मी तेथे हजर होतो! शेवटी पैसे मिळणे शक्य नाही हे ओळखून त्या गृहस्थांनी तो नाद सोडला!

पू. बाबा पुढे म्हणाले, श्रीमहाराजांनी आपल्याला सर्वांना इतके दिले आहे की आता एवढे तरी (नामस्मरण) करावे अशी त्यांची आपल्याकडून अपेक्षा असणारच. नाम चांगलं व्हायला आपला प्रपंच प्रारब्धानुसार चालला आहे हा विचार मनामधे स्थिर झाला पाहिजे. तथापि प्रारब्धावर इतका विश्वास बसणे कठीण आहे. सर्व काही श्रीमहाराजांच्या इच्छेप्रमाणं चाललं आहे असं म्हणणं त्यापेक्षा सोपं. तथापि तेही नुसतं म्हणून उपयोगी नाही. तसं वाटलं पाहिजे आणि ते आपल्या वागण्यात दिसलं पाहिजे.

सत्संगतीचे महत्त्व मोठे आहे. त्याबद्दल सांगतांना पू. बाबा म्हणाले, आपले नामस्मरण चांगले झालेले असते आणि त्यानंतर व्यवहारात उतरलो की मनाला आलेली ती सूक्ष्मता जाते. काय होतं कुणास माहीत, पण आपल्या मनावर दृश्याचा पडदा येत असावा. म्हणून यापुढे आपण नामाचीच संगत करण्याचा प्रयत्न करावा. मघाशी माझ्याकडे एक माणूस आला होता. चारही मुलींची लग्नं झाली आहेत. बायको वारली. त्याला थोडा प्लूरसीचा त्रास आहे. तो म्हणाला की आता एकाकी वाटतं. तेव्हां मी म्हणालो, नामाची संगत आहे की! तेव्हां माझे दोन्ही हात हातात घेऊन तो म्हणाला, तेवढी देण्याची कृपा करा!

आपल्या वागण्यात सहजपणे लीनता पाहिजे. त्यासाठी आपल्या गुरूंचे प्रेम फार उपयोगी पडते. मुद्दा स्पष्ट करतांना पू. बाबा म्हणाले, गुरुदेव रानडे एवढे विद्वान असूनही नामाला चिकटलेले होते. त्यांचे गुरु पू. भाऊसाहेब उमदीकर गेल्यानंतर गुरुदेवांना इतके दु:ख झाले होते की पुढे सहा-सात महिने गुरूंच्या आठवणीने रोज रात्री त्यांची उशी अश्रूंनी भिजत असे!

एकदा मी श्रीमहाराजांना म्हणालो की काही चमत्कार सांगा. तेव्हां ते म्हणाले, तुम्ही गिरगावात राहाता. पैसा असून इतर कोठे न जाता शनिवार, रविवार इकडे येता हा तुमचा चमत्कार आणि मी असा हीन, दीन, अज्ञानी असूनही रामाने मला आपला म्हटले हा माझा चमत्कार! ब्रह्मानंद

महाराजांच्याइतकं आपल्यावरही श्रीमहाराजांचं प्रेम आहे. ब्रह्मानंद महाराजांनी नाम सर्वस्व मानलं; आपण मात्र त्याबाबतीत कमी पडतो. श्रीमहाराज म्हणाले की ब्रह्मानंद बुवांपेक्षा मी स्वत:ला जास्त विसरलो म्हणून गुरुपद माझ्याकडं आलं. नाहीतर तेही तयारच होते. श्रीमहाराजांना त्यांच्या आईबद्दल सांगा म्हटलं तेव्हां म्हणाले, आंबा लागला त्याअर्थी झाड आंब्याचंच असणार. त्यांच्या बोलण्यात खुबी होती. आपण हे कसं बोलता म्हणून विचारलं तेव्हां म्हणाले, माझं मलाच कळत नाही. एकदा ते मला म्हणाले, उशीरा झालेल्या मुलाची हा केव्हां वयात येतो (हाताशी येतो) म्हणून बाप वाट पहात असतो तशी मी तुमची वाट पाहतो आहे.

एक गृहस्थ खूप जप करीत असत. त्यांचे त्यांच्या धंद्यात काही नुकसान झाले. त्या चिंतेत ते असतांना ब्रह्मानंद महाराज त्यांच्याकडे गेले. त्यांनी ब्रह्मानंद महाराजांना बसायला खुर्ची दिली पण नमस्कार केला नाही. तथापि त्याकडे लक्ष न देता ब्रह्मानंद महाराज त्यांना म्हणाले, काळजी कशाला करतोस? सगळे ठीक होईल. आणि पुढे त्या धंद्यातच ते सावरले.

ब्रह्मानंद महाराजांना आणि आनंदसागरांना वाटत असे की आपल्याला मारुतीसारखा गुरु मिळावा आणि त्यांना श्रीमहाराज भेटले. ब्रह्मानंद महाराज लहानपणी म्हणायचे, मी शिकायला नाही, शिकवायला आलो आहे.

एकदा श्रीमहाराज मला म्हणाले, ''तुमचे कल्याण व्हावे यापलीकडे - रामाची साक्ष सांगतो, मला कसलीही अपेक्षा नाही.''

## | ३५५ - १२ |

संध्याकाळी ७ वाजता

आज इतकी वर्षे आपण गोंदवल्याला येतो आहोत पण त्या मानाने आपली प्रगती का होत नाही असा प्रश्न उपस्थित करून पू. बाबा म्हणाले की साधन करतांना साधनाची पथ्ये सांभाळली पाहिजेत. राग, लोभ, द्वेष, कामवासना इत्यादी विकार कमी झाले पाहिजेत. त्याला तीन उपाय आहेत.

(१) आपल्या दोषांची जाणीव झाली पाहिजे. श्रीमहाराज येथील थोरल्या रामाचे वैशिष्टच सांगत की त्याच्यासमोर उभे राहिले की माणसाला आपल्या दोषांची जाणीव होते.

(२) दुसऱ्याला नांवे ठेवू नयेत. याबाबत श्रीमहाराज नेहमी एक गोष्ट सांगत. एका हॉस्पिटलमधे दोन रोगी बरेच दिवस होते. त्यातला एक रोगी दुसऱ्या

रोग्याला म्हणाला, काय रे! आज किती दिवस तू इथे आहेस, बरा का होत नाहीस? तेव्हां दुसरा रोगी पहिल्याला काय म्हणाला, तू काय दिवे लावलेस म्हणून मला विचारतोस? आपले तसे होते इतकी वर्षं इथ येतो पण रोग आहेच. हॉस्पिटलमधून बरे होऊन बाहेर पडायचे नाव नाही

(३) ध्येय निश्चित झाले पाहिजे. हे सगळ्यात महत्त्वाचे आहे. आपले ध्येय दृश्यातले नसल्यामुळे आज आपल्याला त्याला चिकटता येत नाही. त्यामुळे साधनात सातत्य राहात नाही. इथे आपण एकसारखे त्या विचारात, त्या वातावरणात आहोत पण घरी गेल्यावर ती तीव्रता राहात नाही. म्हणून आज मला जे दृश्यातले खरे वाटते, माझे विकार मला खरे वाटतात त्यांवर हल्ला केला पाहिजे. साधनाची पहिली पायरी म्हणून विकार कमी करणे हे ध्येय ठेवले पाहिजे.

आपण दुसऱ्यांचे असलेले नसलेले दोष शोधत असतो आणि ज्यांना खरोखर दोष दिसतात ते मात्र त्याबद्दल काही न बोलता ते कसे जातील याचा प्रयत्न करतात. श्रीमहाराज सांगत, दात किडलेला एक माणूस दातांच्या डॉक्टराकडे गेला. डॉक्टरसमोर तोंड उघडल्याबरोबर त्याच्या तोंडाची घाण आली तरी डॉक्टर त्याला नांवे न ठेवता ती नाहीशी करण्याचा प्रयत्न करतो. गुरूही त्या डॉक्टरासारखे असतात. (पहा : अध्यात्म संवाद भाग ३ संवाद क्र ३१४) आपल्याकडे येणाऱ्या लोकांचे अज्ञान त्यांना दिसत असते पण त्याबद्दल त्यांना नांवे न ठेवता त्यांचे अज्ञान नाहीसे कसे करता येईल हे ते पाहतात. श्रीमहाराज आपल्यासाठी इतके करतात; त्यांच्याबद्दल आपलेपणा नको का वाटायला? लहान मूल जसे प्रत्येक गोष्ट आईला सांगून करते तसे प्रत्येक गोष्ट त्यांना सांगून करावी. त्यांना आवडते ते करावे. साधन आवश्यक आहेच, पण अध्यात्म हे त्याच्याही वरचे आहे. नुसते साधन करून समाधान मिळत नाही. त्यासाठी तीन उपाय सांगता येतील.

(१) नामस्मरण करतांना दहा-पंधरा मिनिटे श्रीमहाराजांच्या विचारांचे चिंतन करावे.

(२) श्रीमहाराज आहेत ही सारखी जाणीव ठेवावी.

(३) नामाचे अनुसंधान ठेवण्याचा प्रयत्न करावा. यासाठी मृत्यूची निरोगी आठवण उपयोगी पडते. रेल्वेमधून प्रवास करणारा मनुष्य डबा खातांना त्याचे स्टेशन आले तर खाणे अर्धवट सोडून उतरतो तसे आपला संसार अर्धवट सोडूनच आपल्याला जावे लागते.

## |३५५ - १३| (७ जानेवारी १९९४)

पुण्यतिथीचा - गुलालाचा दिवस.

सकाळी ११ वाजता.

**पू. बाबा** : ह्या परिसरात नाम भरले आहे त्याचा फायदा करून घेतला पाहिजे. नाम घेतांना ते पवित्र आहे असे वाटले पाहिजे. प्रत्येक नाम जिवंत आणि नवे वाटले पाहिजे. आपले समाधान वाढले पाहिजे. त्यासाठी होऊन गेलेल्या प्रिय, अप्रिय घटनांचे चिंतन करणे आणि भविष्याच्या कल्पना करणे हे सोडलेच पाहिजे. नामस्मरणाची संगत घडण्यासाठी त्याला श्रीमहाराजांच्या वचनांची जोड द्यावी.

कृष्णमूर्ती You don't change म्हणाले ते खरे आहे. आपल्यात बदल का होत नाही? आपले अवगुण आपल्याला कळतात. ते घालवण्यासाठी आपण प्रयत्नही करतो; पण तो प्रयत्न अगदी वरवरचा असतो. आपण त्यांच्या मुळाशी जात नाही. मुळाशी जायला भगवंताचा संस्पर्शच पाहिजे. अगदी संस्पर्श नसला तर निदान तो व्हावा अशी तळमळ तरी पाहिजे. आपण आपले अवगुण घालवू शकत नाही. खरं म्हणजे We don't want to change. बदल व्हावा असं आपल्याला वाटतच नाही. काळजीचं आणि आपलं जुळत असलं पाहिजे असं दिसतं. बदल कसा होतो याबद्दल बोलतांना श्रीमहाराज म्हणाले, 'आत्ता कुमारी होती आणि आता सौभाग्यवती झाली.' आपण सौभाग्यवती होतच नाही; कुमारीच आहोत. आता वृद्धकुमारी म्हणा पाहिजे तर! तेव्हां दिसतंच आहे की आपला मार्ग क्रममुक्तीचा आहे. विहंगम मार्ग आपल्यासाठी नाही. 'देखें उत्प्लवनासरिसा। पक्षी फळासि झोंबे जैसा।' आपल्यासाठी नाही.

## |३५५ - १४|

संध्याकाळी ७ वाजता.

**पू. बाबा** : वेळ मिळाला की नामस्मरण, वेळ मिळाला की नामस्मरण असं झालं पाहिजे. एक वेळ नामस्मरण झालं नाही तरी चालेल पण चिंतन सारखं पाहिजे. आपल्या ज्या कर्मांमधे व्यवहाराचा फारसा संबंध नसतो, जी सवयीने बरीचशी यांत्रिक बनलेली असतात ती करतांना नाम टिकलेच पाहिजे. उदाहरणार्थ, आंघोळ करणे, भाजी आणणे इत्यादी. श्रीमहाराजांनी मला सांगितले की कॉलेजमध्ये वर्गात शिकवायला जातांना आणि वर्गातून बाहेर

पडतांना नामस्मरण करावे म्हणजे मधे मी आहेच, आणि मी तसे करीत असे.(पहा : अध्यात्म संवाद भाग १ संवाद क्र. ५९)

नामस्मरणात उत्साह पाहिजे आणि चिंतनात स्थिरता पाहिजे. नामामधे उत्साह म्हणजे नाम घेतांना मन वरच्या पातळीवर गेले पाहिजे. त्यासाठी मी असा अभ्यास केला. नामस्मरणाला बसतांना श्रीमहाराजांची वचने वाचायची. प्रत्येक वचनात नामाचे महत्त्वच सांगितलेले आहे; त्यामुळे उत्साह वाढतो. तसेच श्रीमहाराजांच्या चरित्रातील एखादे पान वाचायचे आणि दिवसभर त्याचे चिंतन करायचे.

पुण्याला गुरुदेव रानड्यांना भेटायला मी गेलो होतो. तिथेच त्यांना भेटायला श्री. रा. ब. आठवले आले होते. त्यांनी नामाचे महत्त्व सांगणारा एक मोठा अभंग म्हटला. तेव्हां गुरुदेव रानडे म्हणाले, "अरे, एवढा मोठा अभंग कशाला म्हणतोस? बायबलमधील एखादे वचन किंवा कबीराचा एखादा दोहा वाचून दिवसभर त्याचे चिंतन करावे." मी तसा अभ्यास केला. तुकाराम महाराजांचा एखादा अभंग वाचून त्याचे चिंतन करीत असे. समर्थांचा नामस्मरणाचा समास (दशक ४, समास ३) यासाठी फार उपयोगी आहे.

टी. व्ही. वर चित्रगीत पाहतांना मी पाहिले की ती मुलगी त्या मुलाच्या हातात हात देऊन नाचत होती. तसं प्रपंचात नाचतांना आपण महाराजांच्या हातात हात द्यावा. मुख्य म्हणजे नामाला चिकटलं पाहिजे. अगदी बसूनच नाम घ्यायचे असे बंधन घालू नये. उठता-बसता, जाता-येता सारखे नाम घ्यायचेच. वेडे होऊन नाम घेतले पाहिजे. नामस्मरण कठीण आहे रे बाबानो! इतर साधनांपेक्षा सोपं इतकंच! आज आपलं नामस्मरण देहावर अवलंबून आहे. देहाला थोडं कमीजास्त झालं की नाम होत नाही. म्हणून देहाला सांभाळलंच पाहिजे. कृष्णमूर्तींनी आपला देह किती पवित्र ठेवला; खाणे फार थोडे असे. त्यांना ते (ती प्रेरणा) आतूनच येत असले पाहिजे. We should be serious about it. म्हातारपणी काय होईल ते सांगता येत नाही, पॅरलिसिस झाला, हाय ब्लडप्रेशर झालं तर नामस्मरण करू शकाल?

प्रत्येक गोष्ट श्रीमहाराजांना सांगून करण्याचा अभ्यासच केला पाहिजे. एकदा मालाडला पू. तात्यासाहेब बाहेर हॉलमधे आले तर पोस्टाने आलेला केसरीचा अंक वेष्टन काढून कोणीतरी उघडलेला दिसला. ते पाहून पू. तात्यासाहेब म्हणाले, अरे, महाराजांना दाखवून मग उलगडायचा! नवी चप्पल आणली म्हणजे तीसुद्धा महाराजांना दाखवून मग वापरीत. अगदी प्रत्येक

गोष्ट त्यांना दाखवली नाही तरी आतून स्मरण पाहिजे. घरातल्या सगळ्या वस्तू पाहून पू. तात्यासाहेब म्हणत, हे सगळं महाराजांच्यामुळं आहे. भाऊसाहेब महाराजांच्या गोष्टी सांगत. पू. तात्यासाहेब विशेष सांगत नसत. त्यांचा स्वभाव अबोल आणि संकोची होता. ते म्हणत, तुम्हाला जितके महाराज कळले तितकेच मला कळले. इथे गोंदवल्यात जेवतांना आपल्याला महाराजांचे अन्न खातो आहोत ही थोडी तरी जाणीव असते; तशी घरी राहायला पाहिजे. त्यांना नैवेद्य दाखवूनच आपण जेवतो म्हणजे त्यांचा प्रसादच घेतो.

उद्या एकादशी आहे. आता काही कार्यक्रमही नाही. तेव्हां उद्या दिवसभर अखंड नामस्मरण करायचा संकल्प करा.

## | ३५५ - १५ | (८ जानेवारी १९९४)

(मार्गशीर्ष वद्य एकादशी) संध्याकाळी ५ वाजता.

**पू. बाबा :** गोपींखालोखाल कृष्णाने आपल्या सवंगड्यांवर प्रेम केले. श्रीमहाराजांच्याबद्दल प्रेम निर्माण व्हायला त्यांच्या लीलांचे चिंतन हा उपाय आहे. मनाने त्या लीला पाहाव्यात. आपण जसे प्रत्यक्ष पाहतो तशा त्या कल्पनेने आपल्यासमोर साकार झाल्या पाहिजेत.

आपलेपणामधे 'मी तुझा आहे' अशी भावना केली तर तू माझी आई, माउली आहेस; मी आहे हा असा आहे, मी चुकणारच. तुम्हाला विसरून मी आत्तापर्यंत जगलो हे पापच आहे. माझे अपराध पोटात घाला अशी प्रार्थना करावी.

**साधक ग :** 'पुत्राचे सहस्र अपराध। माता काय मानी तयाचा खेद। तेवीं तूं कृपाळू गोविंद। मायबाप मजलागी॥' असे व्यंकटेशस्तोत्रात म्हटले आहे.

**पू. बाबा :** होय, तथापि अशा रीतीने प्रेम करण्यापेक्षा सहजमार्गाने त्यांच्याकडे जाता आले तर त्यात जास्त सौंदर्य आहे. त्यासाठी श्रद्धा पाहिजे. श्रद्धा हा प्रेमाचा पाया आहे. श्रीमहाराजांच्याबरोबर मी जालन्याला गेलो असतांना आनंदसागरांच्या खोलीत नाद ऐकायला आला. श्रीमहाराजांना मी ते सांगितले तेव्हां श्रीमहाराज एकदम म्हणाले, 'येथे भरलेले आहे; लुटून न्या, लुटून न्या.' त्यावेळी श्रीमहाराज रामासमोरच बसलेले होते. नंतर संध्याकाळी मी त्यांना विचारले, लुटून न्या म्हणजे काय? तेव्हां ते म्हणाले, 'इथे , प्रेम भरलेले आहे. तुमचे डोळे फुटलेत; तुम्हाला दिसत नाही!'

आज त्यांचे प्रेम येण्यासाठी आपण नामस्मरण करतो. पण नाम हे जिवंत परमात्मस्वरूप आहे असे आपल्याला वाटत नाही. ते होण्यासाठी आपण

आपल्या पदवीवर जितके प्रेम करतो तितके स्वार्थी प्रेम तरी नामावर केले पाहिजे. निदान वाटेल तरी पडून राहिले पाहिजे. श्रीमहाराज म्हणाले, वाटेवर पडून राहिलात तर वाटेचा वाटसरू येऊन तुम्हाला वाट दाखवेल. यासाठी श्रद्धा आवश्यक आहे. शेवटी महाराजांना शरण जाऊन प्रार्थना करणे हाच उपाय आहे.

आपण इथे येतो, नामस्मरण करतो, त्यांची प्रार्थना करतो हे काय आपले कर्तेपण आहे? हे त्यांच्याकडून आलेले आहे. श्रीमहाराज म्हणायचे, 'माझा मनुष्यच माझ्याकडे येतो.' समजा, आपण वयाच्या वीस-पंचवीस वर्षांनंतर इकडे आलो, तर इकडे येण्याच्या अगोदरपासूनच श्रीमहाराजांचे आपल्याकडे लक्ष आहे. मागच्या जन्मी आपला त्यांच्याशी संपर्क आलेला असलाच पाहिजे.

श्रीमहाराजांच्या वेळेला एक कुत्रा होता. श्रीमहाराज जेवायला बसले की तो दारापाशी येऊन उभा राहायचा आणि श्रीमहाराजांनी त्याला तुकडा टाकला की मग जायचा. एकादशी करायचा. सर्व लोकांकडे काही पंचांग नसायचे. त्यामुळे त्या कुत्र्याने काही खाल्ले नाही की लोकांना समजायचे की आज एकादशी आहे. श्रीमहाराज गेल्यानंतर त्यांचा देह रामासमोर आणून ठेवला तेव्हां मंदिरात कधीही न शिरणारा तो कुत्रा आत आला आणि त्याने श्रीमहाराजांचा देह हुंगला. श्रीमहाराजांचा देह अग्नीच्या स्वाधीन केला तेव्हां त्याने तेथे चितेभोवती फेरी मारली आणि नंतर तो कायमचा गायब झाला! याला तुम्ही कुत्रा म्हणाल? आपण ज्ञानेश्वरीचा प्रेमाने इतका अभ्यास करतो त्याअर्थी ज्ञानेश्वर महाराजांच्या वेळी आपण रेडा तरी असलोच पाहिजे!

श्रीमहाराजांच्या वेळेला अशी माणसे होती की बाहेरून कडक दिसली तरी आतमधे प्रेम होते. श्री. आप्पासाहेब भडगावकर बोलतांना शिव्या देत पण आतून किती प्रेम होते! आपण जाणार असे ज्यांना श्रीमहाराजांनी सांगितले होते त्यामधे ते एक होते. श्रीमहाराज गेले त्याच संध्याकाळी आप्पासाहेब पंढरपुराहून आले आणि त्यांनी सगळीकडे कुलुपे लावली; नाहीतर गोंदवल्याची वाताहत झाली असती. नंतर ब्रह्मानंद महाराज पंधराशे रुपये घेऊन आले होते. लोकांनी श्रीमहाराजांजवळ पैसे, दागिने ठेवायला दिले होते. ज्यांचे पैसे नव्हते तेही मागायला यायला लागले तेव्हां ब्रह्मानंद महाराज म्हणाले, जो खोटेपणाने वागेल, ज्याचे पैसे नसतील तो घरी जाईपर्यंत सरळ राहाणार नाही.

श्री. गणपतराव दामले चाळीस वर्षे इथे गोंदवल्याला पंच होते. पुढे त्यांचे गुडघे दुखायला लागले. गोंदवल्यास येता येत नसे. तेव्हां म्हणायचे, मेल्यानंतर

मी पहिल्यांदा गोंदवल्याला जाणार. आपलेही तसेच होणार हे निश्चित! तिकडे आपला बारावा, तेरावा दिवस चालू असला तरी आपण गोंदवल्यात असणार!

श्रीमहाराज आपल्याला घडवीत आहेतच. आपणही आपल्याकडून त्यांना सहकार्य केले पाहिजे. श्रीमहाराज म्हणायचे एखादा चांगला मुलगा असेल तर शाळेमध्ये त्याला एकदम वरच्या वर्गात घालतात. तसेच मी करतो. तुम्ही अभ्यास केलात तर डबल प्रमोशन देतो. त्यांचा कुठेतरी स्पर्श झाल्याशिवाय हे होणार नाही. त्यासाठी नामस्मरण करीत ती अपेक्षा ठेवून वाट पाहात राहाणे एवढेच आपण करू शकतो. ह्या Waiting period मधे (प्रतीक्षा कालात) चिकाटीची फार आवश्यकता आहे. सुरुवातीला थोडा कंटाळवाणेपणा आहे. श्रीमहाराजांवर प्रेम करणे दृश्यावर प्रेम करण्यासारखे सोपे नाही. ते देतील तेव्हांच प्रेम येईल. म्हणून ते प्रेम द्या अशी तळमळून प्रार्थना करावी. 'प्रेम देवाचें देणें। देहभाव जाय जेणें॥' 'हरी मुखें म्हणा हरी मुखें म्हणा। पुण्याची गणना कोण करी॥' श्रीमहाराजांचे प्रेम यायला एक उपाय म्हणजे त्यांची आतली संगत घडली पाहिजे. आतमधे सारखे त्यांच्यासंबंधीचे विचारच घोळत राहिले पाहिजेत.

### |३५६| (१४ जानेवारी १९९४) मालाड

**पू. बाबा** : (साधक प ना) गोंदवल्याला तुम्ही एक प्रश्न विचारला होता. कदाचित तुम्हाला आठवत नसेल. पतंजलींच्या 'निर्विचारवैशारद्येऽ-ध्यात्मप्रसाद:॥ १.४७॥' ह्या सूत्रानंतरचे सूत्र तुम्ही विचारले होते. तेव्हां ते माझ्या लक्षात नव्हते म्हणून परत आल्यावर पाहिले. ते सूत्र 'ऋतम्भरा तत्र प्रज्ञा॥ १.४८॥' असे आहे. ऋत हे खरे या अर्थाने आणि अनृत हे खोटे या अर्थाने आपण वापरतो. पण ऋत आणि सत्य असे दोन वेगवेगळे शब्द वापरतात. म्हणजे ऋत हे सत्यापेक्षा वेगळे आहे. श्रीमहाराजांना ऋतचा अर्थ विचारला तेव्हां ते म्हणाले की सगळ्या विश्वाची व्यवस्था (order) हे ऋत आहे. आपल्या आणि इतरांच्या जीवनात जे घडते ते सर्व ऋत आहे. राम कर्ता हा भाव हे ऋतच आहे. विचाररहित होण्यात प्राविण्य मिळाले, हुकमीपणा आला की साधकाची प्रज्ञा ऋताने भरते. म्हणजे जे जे घडते ते ते विश्वाच्या नियमानुसार म्हणजेच रामइच्छेने घडते हा भाव स्थिर होतो. नंतर काय करावे काय करू नये इत्यादी आदेश आतून येतात. साधक स्वत: निर्विचार झालेला असल्यामुळे अर्थातच येणारे विचार तिकडून भगवंताकडून आलेले असतात.

त्याबद्दल साधकाच्या मनात कोणताही संदेह राहात नाही असे श्रीअरविंदांनी म्हटले आहे. मन निर्विचार होण्यासाठी योगमार्गाचा किंवा नामस्मरणाचा अवलंब केला पाहिजे. नाम इतके घ्यावे की मनात दुसरा विचार राहू नये.

नंतर झालेल्या चर्चेतील महत्त्वाचा मुद्दा असा की रसना जिंकणे परमार्थास अतिशय आवश्यक आहे. हा मुद्दा नीट लक्षात येण्यासाठी नाथभागवतातील भिक्षुगीत व हंसगीत पहाण्यासारखे आहेत.

**साधक प** : रसना जिंकण्यासाठी निवड करावी लागते ती स्थूलामध्ये; पण असे जरी असले तरी सूक्ष्मामधील हवेनकोपण जावे लागते आणि त्यानंतर रसना जिंकणे शक्य होते.

**|३५७|** (४ फेब्रुवारी १९९४)

पू. बाबांची प्रकृती गेले काही दिवस बरी नव्हती त्यामुळे आज तीन आठवड्यांनंतर आम्ही पुन्हा एकत्र जमलो. सुरुवातीला पू. बाबांच्या प्रकृतीसंबंधी बोलणे झाले.

**साधक ब** : आमचे नामस्मरण अद्यापि देहाच्या स्थितीवर अवलंबून आहे. म्हणून आज देह सुस्थितीत आहे तोपर्यंत साधन देहाच्या स्थितीपलीकडे गेले पाहिजे. असे झाले तरच अंतकाळी नाम टिकेल. नाहीतर उद्या हा देह थकला, काही आजार झाला की मग नाम कसे होईल ?

**पू. बाबा** : Mother's Agenda मधील काही भाग मला महत्त्वाचा वाटला म्हणून तुम्हाला सांगतो. ती म्हणते की नामस्मरणामुळे Now I am with the Eternal rhythm म्हणजे ह्या विश्वाला एक लय आहे; त्या लयीशी मी एकरूप झाले आहे. कोणातरी गवयाला विचारले पाहिजे की प्रत्यक्ष गात नसतांनाही तो त्या लयीत कसा असतो.

**साधक प** : मला वाटते की गवयाच्या बाबतीत ती लय त्याच्या डोक्यात असते कारण मेंदूत speech centre (वाचेचे केन्द्र) आहे. मदरनी वर्णन केलेला Eternal rhythm जास्त खोल आहे. त्याचे स्थान हृदयात असले पाहिजे.

**पू. बाबा** : सत्प्रेमने An eternal rhythm म्हटले तेव्हां मदर म्हणाली No, Eternal rhythm. (E capital) म्हणजे ती लय तिची व्यक्तिगत नसून ती साऱ्या विश्वाची आहे. ती आणखी म्हणते की जेव्हां मी व्यवहारात असते तेव्हां माझ्या फक्त काही cells चे त्या लयीशी तादात्म्य असते आणि माझा

नेहमीचा 'ॐ नमो भगवते' हा जप सुरू केला की पुन्हा ती लय सर्व शरीरभर पसरते. काय दिव्य अनुभव आहे बाईचा!

**साधक ब** : त्या लयीचा आपल्या हृदयाशी संबंध आहे. आपल्या हृदयातूनच सर्व शरीरात रक्त जाते आणि पेशींचे पोषण होते. नाम मेंदूतून हृदयात उतरले पाहिजे. असे झाले म्हणजेच ते सर्व शरीराला व्यापून राहील.

## |३५८| (८ फेब्रुवारी १९९४)

आज पू. बाबांचा वाढदिवस. आज त्यांना ८६ वे वर्ष लागले. पू. बाबांनी पाँडीचेरीच्या मदरचे Mind of the cells मधील काही भाग - वाक्ये वाचून दाखविली. cells ना मन आहे. त्या मनाची तिने प्रार्थना केली आहे की साधनासाठी ह्या cells नी तिला शक्ती द्यावी. मदर म्हणतात की श्रीअरविंदाच्या मृत्यूनंतरही मदरना त्यांची गरज वाटे तेव्हां त्या स्तब्ध बसल्या की लगेच त्यांचा श्रीअरविंदांशी संपर्क किंवा संदेशन (कम्युनिकेशन) निर्माण होत असे. श्रीअरविंद देहात होते तेव्हांही ते त्यांच्या खोलीत व मदर स्वत:च्या खोलीत कामात मग्न असतांनादेखील आवश्यक तेव्हां प्रत्यक्ष न भेटताही त्यांचे असे कम्युनिकेशन होत असे.

सेवेसंबंधी बोलणे निघाले तेव्हां पू. बाबा म्हणाले की सेवा कशी करायची ते टेमकरांजवळ शिकावे. भटजीबापू आजारी असतांना माझ्या मेहुण्यांनी त्यांची खूप सेवा केली. भटजीबापू त्याबद्दल त्यांची खूप प्रशंसा करीत असत.

## |३५९| (१८ फेब्रुवारी १९९४)

**पू. बाबा** : आठ तारखेला तुम्ही आला होता. त्याच्या आदल्या दिवशी (म्हणजे दि. सात रोजी) बंगलोरचे एक गृहस्थ आले होते. दिनकर (श्री. दिनकरराव केतकर) त्यांना घेऊन आला होता. मला भेटल्यावर ते म्हणाले, So, you are still alive! सुमारे चाळीस वर्षांपूर्वी मी श्रीमहाराजांबरोबर चिंतामणीला रामस्थापनेला गेलो होतो तेव्हां ते तेथे भेटले होते; सेशन जज्ज होते तेव्हां. आता तेही म्हातारे झाले आहेत. त्यांच्या त्या उद्गारांचा परिणाम म्हणा की काही म्हणा, दुसरे दिवशी (दि. आठला) पहाटे नेहमीप्रमाणे दोन वाजता उठलो. हात पाय तोंड धूत होतो आणि माझ्या मनात आलं की खरंच का मी जिवंत आहे? मी स्वत:चं शरीर चाचपून पाहिलं. तशी मृत्यूची भीती वगैरे नव्हती पण स्वत:च्या जिवंतपणाचा संशय आला आणि लक्षात आलं की

आपलं दृश्यातील म्हणजे देहामधील जगणं हे खरं जगणं नाहीच आहे. सूक्ष्मातील जगण्याला खरा अर्थ आहे, आणि मग आठवलं दिनकर एकदा श्रीमहाराजांना (पेटीवर) म्हणाला होता की महाराज, आपलं दर्शन द्या तेव्हा महाराज म्हणाले, अरे, मी आता नाही आहे ही कल्पना मनातून काढून टाक की मी आहेच. मी Mother's Agenda वगैरे पुस्तके श्री. भागवतांकडून वाचायला आणतो. ते म्हणतात की तुमचा आणि मदरचा पूर्वीचा काहीतरी संबंध असला पाहिजे. पण ते जाऊ द्या. पण मदरनी म्हटले आहे की You die by habit. किती खरं आहे तिचं म्हणणं! तुम्ही म्हातारपणाचा विचार करता, मरणाचा विचार करता आणि खरोखर मृत्यूला आमंत्रणच देता. वरच्यावर मरण्याची (आणि जन्मण्याची) तुम्हाला सवय झाली आहे. असं असेल तर जे नामात राहातात तेच खरे जिवंत राहातात म्हटलं पाहिजे. तसं जिवंत का राहाता येत नाही? अखंड नामात का राहाता येत नाही?

**साधक प** : स्थूल देहापेक्षा सूक्ष्म देहातले जगणे खरे आहे. म्हणून जोपर्यंत नाम सूक्ष्म देहात स्थिर होत नाही तोपर्यंत अखंड नामात राहाणे अवघड आहे.

**पू. बाबा** . नाम सूक्ष्म देहात जाऊन स्थिर का होत नाही?

**साधक प** : आपल्या सूक्ष्म देहात अनेक वासना आहेत. त्या पूर्ण होण्यासाठी आपण धडपडत असतो. त्यामुळे नाम होत नाही. मग सूक्ष्म देहात जाऊन ते स्थिर होण्याची गोष्ट दूरच.

**पू. बाबा** . याचाच अर्थ इतर वासनांच्या जागी नाम घेण्याची वासना प्रबळ झाली पाहिजे. ती कशी होईल?

**साधक ब** : मी पाहिले आहे की जे घडायचे आहे ते घडत असते. मला मात्र उगीचच मी कर्ता असे वाटते. म्हणून जोपर्यंत सर्व काही खऱ्या अर्थाने पूर्णपणे त्यांच्यावर सोपवता येत नाही तोपर्यंत खरे नामस्मरण होणार नाही.

**साधक क** : कर्तृत्वापेक्षाही भोक्तृत्व जास्त बाधते.

**साधक ग** : समर्थांनी 'मना वासना वासुदेवीं वसो दे।' म्हटले आहे. म्हणजे दुसरे काही नको, तू हवास असे वाटायला पाहिजे. तसे वाटणे ही बंधनमुक्त होण्याची सुरुवात आहे.

**पू. बाबा** : आपण खऱ्या अर्थाने मरणाचा विचारच करत नाही, की चालले आहे ते ठीक चालले आहे असे आपल्याला वाटते?

**साधक ग** : मला तर नेहमीच वाटते की माझी आत्मसंतुष्टताच माझ्या साधनाच्या आड येते. आणि हे लक्षात येऊनही ती कमी होत नाही. साधनाची तळमळ लागत नाही.

**साधक ज** : मला वाटते, नाम घेतांना ते मला हवे आहे, त्यात माझे हित आहे, मला ते आवडते असे स्वत:ला एकसारखे सांगू लागलो तर सहवासाने नामाचे प्रेम येईल.

**पू. बाबा** : पण ती कवाईत होता कामा नये.

**साधक ब** ते माझ्या कल्याणाचे करतात हे मनात पक्के पाहिजे; मग काहीही घडो. जास्तीत जास्त काय होणार आहे? दारिद्र्य आले तर इतर दरिद्री लोक भीक मागतात तशी मी मागेन ही तयारी हवी.

**पू. बाबा** : एकदर विश्वाचा विचार करतांना आपण किती नगण्य आहोत हे लक्षात घेतले तर आपला अहंकार नाहीसा व्हायला मदत होते.

**साधक प** . पृथ्वीवरील जीवन - त्यात झाडे, पशुपक्षीदेखील आले - आज लाखो वर्षे चाललेले आहे आणि त्यात माणूस अगदी अलिकडचा आहे.

**साधक क** : जीवनाकडे डोळसपणे पाहता आले पाहिजे आत्मकेंद्रित असलेले मन विशाल झाले पाहिजे. श्रीरामकृष्णांनी त्यांच्या शेवटच्या दिवसात विवेकानदांना विचारले की तुला काय पाहिजे? विवेकानद म्हणाले, आपल्याप्रमाणे समाधीत मग्न राहून जगाचा विसर पडावा. तेव्हां श्रीरामकृष्ण म्हणाले, किती कोती बुद्धी आहे तुझी? स्वत:पुरते समाधीत मग्न राहाण्यापेक्षा एखाद्या विशाल वटवृक्षासारखे जगाच्या उपयोगी पडतांना समाधी अवस्था भोगता येते याचा अनुभव घे. श्रीमहाराजाचेही अगदी असेच होते रोजचा व्यवहार एखाद्या प्रापचिकासारखा होता पण आतली स्थिती आत्मानदात मग्न असलेल्या पुरुषाची होती

**पू. बाबा** : होय ते म्हणत डोळे मिटून समाधी काय कामाची? उघड्या डोळ्यांनी समाधीत राहाता आले पाहिजे.

**साधक ड** : खरोखर त्यांचे जीवन हे दिव्य जीवन होते. त्या कानडी माणसाला त्याच्या व्यसनाधीनतेमुळे श्रीमहाराजांना पुन्हा भेटायची लाज वाटत होती पण श्रीमहाराज त्याला म्हणाले की सगळ्या जगानं तुला टाकलं तरी मी तुला सोडणार नाही. खरोखर ह्या गोष्टीच्या आठवणीनंदेखील माझ्या अंगावर शहारे येतात.

**साधक ग :** आणि परचुरे शास्त्र्यांचे नाही का! त्यांना महारोग झाला तेव्हां ते श्रीमहाराजांना म्हणाले की मी या हातांनी तुम्हाला दोष देणारं पत्र लिहिलं म्हणून का मला हे झालं?.

**पू. बाबा :** तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, नाही हो शास्त्रीबोवा, मी इतका निर्दय नाही! काही म्हणा, परमार्थात सत्संगाचं महत्त्व फार आहे. तो नाही मिळाला तर सद्ग्रंथाचा त्या भावनेनं अभ्यास करावा.(पहा : अध्यात्म संवाद भाग २ संवाद क्र. २२०)

**साधक क :** श्रीमहाराजांचं दयासिंधु हे वर्णन किती योग्य आहे!

**|३६०|** (२५ फेब्रुवारी १९९४)

**पू. बाबा :** चार दिवसांपूर्वी एक गृहस्थ भेटायला आले होते. पावसच्या स्वामी स्वरूपानंदांचे शिष्य. रत्नागिरीला राहाणारे, त्यामुळे स्वामींकडे बरेचदा जात असत. तथापि ते कोणी मोठे योगी, महात्मा आहेत अशी जाणीव त्यांना नव्हती. असेच एकदा ते स्वामींकडे गेलेले असतांना स्वामींना म्हणाले की मला काही शिकवा. तेव्हां स्वरूपानंदांनी त्यांना समोर बसवून सोऽहंची साधना दिली. तथापि त्या गृहस्थांना हा आपल्याला अनुग्रह दिला आहे असे काही वाटले नाही, कारण अशा काही गोष्टीची त्यांना कल्पनाच नव्हती. त्यानंतरही वरचेवर ते स्वामींकडे जात असत. स्वामींना अखेरच्या दिवसात ते एकदा भेटायला गेलेले असतांना त्यांनी स्वामींना विचारले की मी येथे तुमच्याजवळ बसू का? स्वामी म्हणाले, नको, बाहेरच्या खोलीत बसा. मनातून नाराज होऊन, पण काही न बोलता ते बाहेर निघाले तेव्हां स्वामींनी त्यांना परत बोलावले आणि विचारले की साधना चालू आहे ना? ते हो म्हणाले. तेव्हां स्वामी म्हणाले, इथे बसा, पण नुसते बसू नका; माझ्या अंगावरून हात फिरवा. स्वामींच्या अंगात जाकीट होते. ते गृहस्थ म्हणाले, स्वामींच्या हातांवरून हात फिरवतांना हात अगदी लिबलिबीत वाटले. मी त्यांना विचारले, एखाद्या भाजलेल्या वांग्यासारखे का? तेव्हां ते म्हणाले की तुम्ही बरोबर वर्णन केलेत. हे सगळे सांगायचे कारण असे की परवा पहाटे मी उठलो तेव्हां मला स्वतःला आपले शरीर फार हलके झाले आहे; कदाचित चालतांना आपण पडू असे वाटू लागले. आंघोळ करून जपाला बसलो तेव्हां एकदम आतून स्फुरले की माझ्या शरीरातील cells (पेशी) हलक्या झाल्या आहेत आणि हा जपाचा परिणाम आहे. Mother's Agenda च्या सहाव्या भागात तिने जर aspiration

(उत्कट इच्छा) असेल तर असे होते असे म्हटले आहे. तथापि शरीर हलके झाल्याची जाणीव एकसारखी राहात नाही. याचा अर्थ ते aspiration टिकत नाही. हे aspiration काय आहे? आणि ते का टिकत नाही?

**साधक क** : साधकाला Aspirant म्हणतात. Aspiration म्हणजे साधक भाव म्हणता येईल.

**पू. बाबा** : Aspiration चे आकांक्षा, स्पृहा असे भाषांतर केलेले आहे. पण ही कशाची स्पृहा आहे? नामात मन रंगले म्हणजे ते होते का?

**साधक प** : Aspiration मधे एक goal (ध्येय) आहे. भगवंताचे दर्शन व्हावे; तो मला हवा असे काहीतरी आहे. नामात रंगण्याच्या पलीकडे ते आहे.

**साधक ब** : आपले मन अतिशय जड झालेले आहे. साधनाने ते सूक्ष्म बनले की त्याचा परिणाम जडावर - देहावर होतो आणि साधनामुळेच तो टिकून राहातो.

**साधक प** : मृत्यूनंतर म्हणजे जड देह नाहीसा झाल्यावर सूक्ष्म देहात संस्कार राहतात; पण माणसाखेरीज इतर सर्व जन्मात केवळ भोगभूमी असल्यामुळे तेथे साधनात प्रगती होत नाही. त्यासाठी पाप आणि पुण्य समान झाले की पुन्हा मानवदेह घेऊन या कर्मभूमीत यावे लागते.

**साधक ब** : नाम खोल शिरले की देहालादेखील ते नाम एकसारखे घ्यावे असे वाटते. केव्हां एकदा नामाला बसतो अशी आतुरता उत्पन्न होते.

**पू. बाबा** : Aspiration ला आतुरता हा शब्द येथे बरोबर वाटतो. ही आतुरता एकसारखी टिकली पाहिजे. यालाच श्रीमहाराजांनी अनुसंधान म्हटले आहे.

**साधक ज** : मला इथे जरा घोटाळा वाटतो. साधनाने मनाला सूक्ष्मता येते. त्यातून ते स्थूलावर - जडावर परिणाम करते. त्यामुळे ते संस्कार दृढ होतात असे म्हणतांना सूक्ष्माचे महत्त्व कमी होत नाही का? मृत्यूनंतर सूक्ष्म देहातही साधना का चालू राहू नये?

**पू. बाबा** : साधनाला देह पाहिजेच. फार तर असे म्हणा की आज आपले साधन फक्त अन्नमय कोषाच्या पातळीवर आहे ते प्राणमय कोषात स्थिर होऊन पुढे मनोमय कोषात गेले पाहिजे.

## **।३६१।** (४ मार्च १९९४)

आज दुपारी दोन वाजल्यापासून पू. बाबांकडे माणसे येत होती त्यामुळे त्यांना बराच वेळ बसावे लागले. पावलांवर सूज आलेली दिसत होती. तथापि

त्यांचा उत्साह नेहमीसारखा होता. आज पू. बाबांनी काही महत्त्वाच्या हकिगती सांगितल्या.

**पू. बाबा** : एकदा पुण्याला जात असतांना गाडीत पू. सोनोपंत (मामा) दांडेकर भेटले. बोलतांना गुरुदेव रानड्यांचा विषय निघाला तेव्हां मामांनी सांगितले ते सांगतो पू. मामांना गुरुदेव शिकवायला होते. बी. ए. ला असतांना मामांनी Special Philosopher म्हणून शंकराचार्यांचा अभ्यास करायचे ठरवले होते. गुरुदेवांनी त्यांना बोलवून घेतले आणि सांगितले की तुम्ही शंकराचार्यांचा अभ्यास केव्हांही कराल. ह्या वर्षी मी मूळ ग्रीक ग्रंथांचा उपयोग करून प्लेटो शिकवणार आहे, तेव्हां तुम्ही प्लेटोचा Special Philosopher म्हणून अभ्यास करा. पू. मामांनी मग त्या वर्षी प्लेटोचा अभ्यास केला. पुढे काही वर्षांनी युनिव्हर्सिटीच्या कामाच्या संदर्भात पू. मामा गुरुदेवांना भेटायला निंबाळला गेले होते स्वच्छ सारवलेल्या जमिनीवर एका आसनावर गुरुदेव बसलेले होते. पू. मामांना बसायला पाट दिला होता. काम झाल्यावर पू. मामांनी गुरुदेवांना सध्या आपली काय अवस्था आहे म्हणून विचारले तेव्हां गुरुदेवांनी तुकाराम महाराजांच्या शब्दात सांगितले, "न कळे दिवसराती। अखंड लागलीसे ज्योती॥." अनुसंधान किती खोल गेले पाहिजे ते यावरून लक्षात येते.

(२) पुंजाजी नावाचे एक सत्पुरुष लखनौला असतात. बरेचदा ते निर्विचार अवस्थेत असतात. समोरच्या माणसावर दृष्टीने शक्तिपात करतात. बेळगावच्या एक बाई त्यांना बरेचदा भेटायला जातात. त्या येथे आल्या होत्या तेव्हां त्यांनी मला सांगितले की पुंजाजी रमण महर्षींना भेटले तेव्हां रमण महर्षींनी त्यांना विचारले, प्रपंच नाही का करत? तेव्हां पुंजाजी म्हणाले की तो आपोआप (सहज) होतो. भगवान म्हणाले की भगवंत विचारांपलीकडे आहे म्हणून प्रथम विचार थांबवावे. ते कठीण असले तरी श्रद्धेने घडते. श्रद्धा विचारांपलीकडे असते

ही हकिगत सांगून पू. बाबांनी विचारले की आपली कोठे श्रद्धा आहे का? तेच पुढे म्हणाले, आपल्या देहावर आपली श्रद्धा आहे त्याऐवजी भगवंतावर श्रद्धा बसली पाहिजे. त्यासाठी देह खरा व भगवंत खरा अशी सुरुवात करावी पुढे साधन करता करता, मी खरा नाही, केवळ भगवंतच खरा आहे हे समजू लागेल.

हे कसे घडेल याबद्दल चर्चा झाली; त्या चर्चेतील काही महत्वाचे मुद्दे

(१) इतर काही साधन न करता सत्पुरुष सांगतात त्यावर श्रद्धा ठेवून तेरा कोटी जप करावा. याला खूप काळ लागेल. इतका वेळ मिळणे आणि सर्व

काळ श्रद्धा टिकणे कठीण जाते म्हणून साधन करतांना त्याला विचार आणि विवेक यांची जोड द्यावी. ज्याला हे साधेल त्याला पुढे निर्विचार होणे जमेल.

(२) आपण सत्पुरुषांच्या ज्या अवस्थेबद्दल बोलतो ती अवस्था फार उच्च असते. तसे करणे, वागणे आपल्याला शक्य नसते म्हणून आपण खऱ्या साधकाच्या जीवनाचा घाट पहावा आणि तसे करण्याचा, वागण्याचा प्रयत्न करावा. एकदम उच्च अवस्थेचा विचार करण्यापेक्षा आपली खाजगी अडचण ओळखून ती बाजूला करण्याचा प्रयत्न करावा. त्यासाठी शमदमाची आवश्यकता आहेच पण त्याचबरोबर प्रार्थनेची जोड द्यावी.

(३) राम इच्छेवर जीवन सोडणे फार अवघड आहे. ज्याला ते जमले त्याला राजमार्ग खुला झाला; कारण मग काहीही सुखाचे वा दुःखाचे घडले तरी त्याची तक्रार राहाणार नाही.

(४) सत्संगाचे महत्त्व फार आहे. साधन हे फूल तर सत्संग हे फळ आहे. साधन करता करता नामाचीच खरी सत्संगत होईल कारण तेच सत् आहे. सत्पुरुषाच्या देहाची संगत मिळणे कठीण. ती मिळाली तरी पूर्ण श्रद्धा बसून ती टिकणे आणखी कठीण म्हणून नामातच आपल्या गुरूंची संगत शोधावी.

(५) सुरुवातीला मी करतो म्हणून साधन करावे. पुढे लक्षात येईल की साधन होते ते केवळ गुरुकृपेनेच होते. आपल्या शक्तीने ते होत नाही हे जाणवू लागले की मीपणा कमी होईल आणि त्याबरोबर कर्माचा आग्रहही कमी होऊ लागेल. अहंकार अतिशय सूक्ष्म असल्यामुळे माझ्या प्रयत्नांनी तो नाहीसा करता येत नाही हे कळले की शरणागतीचा आणि प्रार्थनेचा उगम होतो.

आपला देह हे आत्म्याचे अशुद्ध रूप आहे. देह, प्राण, मन, बुद्धी अशा पायऱ्या आहेत. आपल्या कर्मांना लागणारी शक्ती प्राण पुरवितो. नाम चांगले झाले की श्वास अगदी मंद आणि सावकाश होतो. त्यावेळी कर्म करणारा देहही शांत थंड राहातो. अर्थात यासाठी सगळ्या बाजूंनी प्रयत्न करावा लागतो. बुद्धीने सद्विचारांची मदत घ्यावी, प्राणावर बंधन घालावे आणि कर्म करतांना विचाराने विवेकाचे पोषण करावे. कर्म करतांना विवेक बाळगणे हेच वैराग्य.

## **। ३६२ ।** (१८ मार्च १९९४)

**पू. बाबा :** दोन दिवसांपूर्वी सावे नांवाचे एक गृहस्थ भेटायला आले होते. त्यांच्याबरोबर एक गृहस्थ आले होते. रंगअवधूतांचे ते शिष्य आहेत. (रंगअवधूत - पूर्वाश्रमीचे रत्नागिरीचे श्री. वळामे. दत्ताचे उपासक. पुढे

बडोद्याजवळ नारेश्वर येथे राहात होते.) त्या गृहस्थांनी रंगअवधूतांना विचारले की नामाचे प्रेम कसे येईल? प्रथम स्वामींनी त्यांच्या प्रश्नाकडे लक्ष दिले नाही. पण पुन्हा विचारल्यावर म्हणाले त्यासाठी गोंदवल्याच्या बुवाकडे जा. त्यांनी मला हा प्रश्न विचारला तेव्हां मी त्यांना म्हणालो की तुमच्या गुरूंनी तुम्हाला नंतर काही सांगितले नाही का? ते म्हणाले, स्वामींनी सांगितले की दृश्य जितकं खरं वाटतं तितकं नाम खरं वाटलं पाहिजे. ते कसं वाटायचं म्हणून विचारल्यावर स्वामी म्हणाले दृश्यामधे तुम्हाला शब्द खरा वाटतो, इतकेच नव्हे तर ती एक घटना असते. उदाहरणार्थ, मुलासाठी तुम्ही मुलगी पाहिलीत आणि ती पसंत आहे म्हणून सांगितले तर ती एक सत्य घटना असते. तसं नाम घेतांना ज्याचं नाम घेतो त्याचं (किंवा तुमच्या गुरूंचं) अस्तित्व खरं वाटलं पाहिजे. व्यवहारात तुम्ही जसं सहज बोलता तसं सहज नाम घ्या. नाम म्हणजे तुम्ही तुमच्या देवतेला (गुरूंना) मारलेली हाक असते. किती बरोबर सांगितलं त्यांनी! आपल्याला असं का वाटत नाही?

**साधक प** : ते खरं न वाटायला आपणच कारण आहोत. आपल्याला दृश्य खरं वाटतं. त्याच्यापलीकडे आपण जातच नाही. वास्तविक देह आणि मन मोकळे सोडले तर त्यांची स्वाभाविक गती नामाकडेच आहे. पण आपण त्याच्या आड येतो.

**साधक ब** : नाम आणि आमचं मन यांच्या दोन वेगवेगळ्या पातळ्या आहेत. नाम सूक्ष्म असल्यामुळे वरच्या पातळीवर आहे तर देहबुद्धीमुळे आमचे मन खाली जडात आलेले आहे. काही वेळा जेव्हां ते जडातून सूक्ष्माकडे जाते तेव्हां नाम चांगलं होतं. पण पुन्हा मन खाली येतं. मन शुद्ध झाल्याखेरीज ते सतत वरच्या पातळीवर राहाणार नाही.

**पू. बाबा** : ते कसं व्हायचं? नामस्मरण ही Spiritual event वाटली पाहिजे. त्या आध्यात्मिक घटनेपुढे दुसरं काही टिकता कामा नये. स्वामी रामदासांनी नाही का, नुसतं नाम घेतलं. देव-बिव कशाच्याही भानगडीत ते पडले नाहीत.

**साधक प** : त्यांची गोष्ट वेगळी होती. ते निराकार मानत होते आणि त्याच्यापेक्षाही विशेष म्हणजे नामामध्ये त्यांच्या मनाला स्वाभाविक शांती वाटत होती. व्यवहारात उतरले की ते अस्वस्थ होत होते. तसं आपलं होत नाही.

**पू. बाबा** : त्याला आपणच कारण आहोत. एक असं करता येईल. ती कावळ्याची गोष्ट आहे ना? भांड्यात तळाशी पाणी होतं आणि तेथपर्यंत

त्याची चोच पोचत नव्हती म्हणून तो भांड्यात खडे टाकू लागला आणि मग पाणी वर आलं. तसं नामाचं माप टाकत राहावं.

**साधक ज** : नाम घेतांना काय भाव असावा यासंबंधी मागं मी आपल्याला काही शंका लिहून विचारली होती. त्यात मी काही पर्याय मांडले होते. उदाहरणार्थ, 'श्रीराम जयराम जयजयराम' हा जप करतांना रामाचे रूप, गुण, चरित्र यांचे चिंतन करावे किंवा आपले मन गोळा करून नाम हे ब्रह्माचे रूप आहे, ॐकार आहे असा भाव ठेवावा किंवा मन हृदयात, भ्रूमध्यात किंवा टाळूत केंद्रित करून जप करावा इत्यादी. आता मला वाटते की ह्याचा नियम असा ठरविता येणार नाही. ज्याच्या त्याच्या मनोरचनेप्रमाणे हे साधेल. किंवा नामाचे शब्द न ठेवताही नामाचे चिंतन करता येईल.

**पू. बाबा** : म्हणजे अर्थरूप म्हणून.

**साधक प** : चिंतन म्हणजे त्यात विचार राहाता कामा नये. कारण विचार म्हटले की त्यात आपली interpretations येतात.

**साधक ग** : ह्या सगळ्यामध्ये मुख्य अडचण आपण आड येतो हीच आहे. वरवर विचार केला तर आता काही पाहिजे असे वाटत नाही पण आतून मन अद्यापि प्रपंचालाच चिकटलेले आहे.

**पू. बाबा** : साधक ब म्हणतात तेच खरं आहे. मनावरच ताबा आणला पाहिजे.

**साधक प** : मन म्हणजे त्यात स्मृतीदेखील आल्या. ज्याला मन ताब्यात आणता आलं त्याला व्यक्ती किंवा वस्तू समोर असतांना त्यांचे ज्ञान असेल पण नंतर त्यावर चिंतन होणार नाही. पू. तात्यासाहेबांना जसं मुलगी समोर आली की अद्यापि तिचे लग्न व्हायचे आहे हे वाटत असे, तसे.

**पू. बाबा** : दिनकरनं (श्री. दिनकराव केतकर) सांगितलेलं तुम्हाला सांगतो. सांगलीला सौ. ताई (पू. तात्यासाहेबांच्या पत्नी) आजारी होत्या. सांगलीचे सिव्हिल सर्जन मालशे यांचे औषध चालू होते. रात्री पू. तात्यासाहेब बाहेरून घरी आले तेव्हां दिनकरने सांगितले की आजची रात्र कठीण आहे म्हणून डॉक्टरनी सांगितले आहे. 'राम करेल ते खरं' असं पू. तात्यासाहेब म्हणाले आणि नेहमीसारखा बोटांवर जप करून आडवे झाले ते लगेच घोरू लागले! पुढे सौ. ताई त्या आजारातून बऱ्या झाल्यानंतर मी तात्यासाहेबांना विचारलं की तुम्हाला त्या रात्री लगेच झोप कशी लागली? तेव्हां ते म्हणाले की एकदा रामावर (श्रीमहाराजांवर) सोपवलं की आपण चिंता कशाला करायची?

**साधक क :** श्रीरामकृष्णांनी म्हटलं आहे की त्यांचं मन स्वाभाविकच ऊर्ध्वगामी होतं. पाणी, तंबाखू, एखादी व्यक्ती यांची आठवण ठेवून प्रयत्नानं ते खाली आणावं लागे!

**साधक ब :** आमचं मन बरोबर याच्याउलट आहे.

**पू. बाबा :** आपला आपल्या कर्तृत्वावर भर असतो. पण सगळं आपल्या मनासारखं कुठं होतं! उदाहरणार्थ, आपले contemporary (समकालीन) कोण असावे हे का आपण ठरवतो? रामाच्या काळातच मारुती आणि रावण होते. आपले आईबाप, भाऊबहिणी, बायको, मुले ही त्या त्या काळात अमुकच माणसे का आली याला काही उत्तर आहे का? आणि लक्षात ठेवा, एक वेळ व्यसनी माणूस चालेल पण अहंकारी माणसाला परमार्थ साधायचा नाही. माणसाला पैशाची कशी स्वाभाविक ओढ असते. तसं नामाचं झालं पाहिजे. नुसतं नाम घेतलं तरी ते काम करीलच, पण ते समजून केलं तर काम लवकर होईल.

**साधक क :** नामस्मरणाला विवेकाची आणि त्यातून निर्माण होणाऱ्या वैराग्याची जोड पाहिजे.

**पू. बाबा :** सूक्ष्म देहात नाम स्थिर होईपर्यंत कष्ट आहेत. एकदा ते तिथं स्थिर झालं की काम झालं!

## ।३६३। (२५ मार्च १९९४)

आमच्यापैकी एका साधकांना सध्या स्पॉंडिलायटिसचा थोडा त्रास होतो आहे. त्यांच्या प्रकृतीची चौकशी करून पू. बाबा म्हणाले, अजून आपले साधन आपल्या देहाच्या स्थितीवर अवलंबून आहे. देहाला काही झाले की साधन होत नाही. म्हणून साधन देहाच्या स्थितीपलीकडे गेले पाहिजे. देहाला काहीही होवो, त्यामुळे साधनाची तीव्रता कमी होता कामा नये. याचा अर्थ असा की साधन स्थूलातून सूक्ष्मात गेले पाहिजे. हे होत नाही कारण आपल्या मनाची शक्ती कमी पडते. जगात सर्वत्र शक्तीचा खेळ चाललेला आहे. गंमत अशी की शक्ती दाखवता येत नाही. पण दिवा लागला त्याअर्थी तारांमधून वीज वाहाते आहे असे आपण म्हणतो. म्हणजे कार्यावरून शक्ती ओळखता येते. शरीराच्या कार्यावरून शरीर सशक्त आहे, अशक्त आहे असे आपण म्हणतो. चालतांना कोणाचा धक्का लागला आणि पडलो तर आपण अशक्तपणा वाढला आहे असे म्हणतो. पण शरीराच्या शक्तीचा जसा विचार करतो तसा आपण

मनाच्या शक्तीचा विचार करत नाही. काही घटना मनाविरुद्ध घडली की जर मनाचा समतोल बिघडत असेल आणि जप करतांना तीच घटना जर मनात एकसारखी येत असेल तर त्या धक्क्याने शरीराप्रमाणेच मन पडले आहे, अशक्त झाले आहे, काहीही करून त्याची शक्ती परत वाढवली पाहिजे असे वाटत नाही.

पूर्वी झालेल्या घटनेने किंवा पुढे होऊ शकणाऱ्या घटनेच्या कल्पनेने, आपल्या किंवा घरातल्या इतरांच्या आजाराने, आलेल्या एखाद्या पत्राने किंवा एखाद्या अगदी क्षुल्लक कारणानेदेखील मनाचा समतोल बिघडतो, तो बिघडता कामा नये. अनेक वाटांनी आपल्या मनाची शक्ती कमी होत असते आणि ती गळती थांबवण्याचा प्रयत्न आपण करीत नाही. वास्तविक, इतके दिवस साधन केल्यानंतर ते सूक्ष्मात गेले पाहिजे. बाहेर काहीही होवो, त्याचा साधनाला धक्का लागता कामा नये. याचा अर्थ नाम घेतांना प्रत्येक वेळी मन त्यात रंगून जाईलच असा नाही, पण साधनाची एक उंच पातळी राहील. हे का घडत नाही यावर मी खूप विचार केला आहे. त्यामुळे माझी खात्री झाली आहे की ह्या सगळ्याचे कारण आपले ध्येय निश्चित होत नाही. त्यासाठी काय करावे?

पू. बाबांच्या ह्या प्रश्नाच्या अनुषंगाने जी चर्चा झाली त्यातले महत्त्वाचे मुद्दे असे :

(१) जोपर्यंत साधन करतांना अहंकार कमी होत नाही, विकारांवर ताबा येत नाही तोपर्यंत साधन नीट चालले आहे असे म्हणता येणार नाही. म्हणून साधन करतांना श्रीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे अखंड सावधानता हवी.

(२) राम कर्ता ही खात्री होण्यासाठी आधी मी कर्ता हा भाव नाहीसा झाला पाहिजे. आज काही एका मर्यादेपर्यंत मी कर्ता व त्याच्यापलीकडे राम कर्ता असे वाटते. तथापि तीही पूर्ण खात्री नाही.

(३) साधनात प्रगती होण्यासाठी शरणागती आवश्यक आहे.

(४) साधन सूक्ष्मात गेले की साधकाला त्याचे अनुभव येतात.

अनुभवांबद्दल बोलतांना पू. बाबा म्हणाले की श्रीअरविंदांनी त्यांच्या आर्काइव्हजमध्ये (दफ्तरात) त्यांना जवळजवळ दररोज येणाऱ्या अनुभवांची नोंद करून ठेवली आहे. ज्ञानेश्वर महाराजांच्याही 'सगुणाची सेज निर्गुणाची बाज' किंवा 'मोगरा फुलला' सारख्या अनेक अभंगांत त्यांच्या अनुभवांची श्रीमंती दिसून येते.

**।३६४।** (२९ मार्च १९९४)

आज आमच्यापैकी एक साधक त्यांच्या काही मित्रांबरोबर पू. बाबांकडे संध्याकाळी गेले होते. पू बाबा त्यांना म्हणाले :

म्हातारपण सुखाचे जावे आणि शांतपणे मृत्यू यावा म्हणून तरी साधन करावे.

**एकजण** : साधन करतांना येणाऱ्या अडचणी दूर कशा होतील?

**पू. बाबा :** मनापासून साधन करीत असाल आणि खरी तळमळ असेल तर वाटेचा वाटसरू येऊन तुमची अडचण दूर करून जातो. आपण जसे सद्गुरूंच्या शोधात असतो तसे सत्पुरुषही खऱ्या शिष्याच्या शोधात असतात. त्यांच्याजवळ असलेली विद्या योग्य माणसाला द्यायची त्यांनाही तळमळ असते. शिवाय करुणा असतेच. ॲनी बेझंटनी एक गोष्ट सांगितली आहे. एक गुरु आणि त्यांचा शिष्य एका गावाहून दुसऱ्या गावाला जात होते. ते पोचले त्यावेळी रात्र झाली होती आणि सगळीकडे सामसूम झाले होते. रात्र कोठे घालवावी हा प्रश्न होता. तेव्हां गुरु गावाजवळच्या एका टेकडीवर चढले आणि तेथून त्यांनी गावाकडे पाहिले तेव्हां एका घरात दिवा आहे असे त्यांना दिसले. खाली उतरून शिष्याबरोबर ते त्या घरी गेले आणि तेथे त्यांच्या रात्रीच्या मुक्कामाची सोय झाली. ही गोष्ट सांगून ॲनी बेझंटनी म्हटले आहे की त्या गुरूप्रमाणे सत्पुरुष वर (वरच्या पातळीवर) असतात. तेथून ते भगवत्प्रेमाचा दिवा कोणाच्या अंत:करणात लागला आहे ते पाहातात व जेथे तो दिसेल तेथे येऊन त्याचे काम करतात.

याच संदर्भात पू. बाबांनी आणखी एक हकिगत सांगितली. एकदा गुरुदेव रानड्यांबरोबर ते हुटगीहून सेकंड क्लासने प्रवास करीत होते. (पूर्वी रेल्वेचे फर्स्ट, सेकंड, इंटर आणि थर्ड असे चार क्लास होते) सांगलीच्या राजेसाहेबांचा एक मुसलमान चपरासी गुरुदेवांच्या पाया पडण्यासाठी डब्यात आला. गुरुदेवांनी त्याची मोठ्या आस्थेने चौकशी केली आणि तो उतरून गेल्यावर पू. बाबांना ते म्हणाले **Some people are after us, but we are also after some people!** (काही लोक आमच्या मागे येतात पण आम्हीही काही लोकांच्या शोधात असतो!)

आपण साधन कसे वाढवले ते गुरुदेवांनी सांगितले आहे. त्यांची प्रकृती यथातथाच होती. जपासाठी फार वेळ बसवत नसे म्हणून सुरुवातीला ते फक्त

पाच मिनिटे जपासाठी बसू लागले. नंतर त्यांनी रोज एक मिनीट वाढवायला सुरुवात केली आणि महिन्याभरात ते रोज अर्धा तास बसू लागले. मग काही दिवस वेळ वाढविला नाही. अर्धा तास पचनी पडल्यानंतर पुन्हा रोज एक मिनीट वाढवत एका तासापर्यंत पोचले. पुन्हा काही दिवस वेळ वाढवणे थांबवले. असे करत करत ते एका वेळी अडीच ते तीन तास बसू लागले. आपणही असेच करावे. काही दिवस रोज एक मिनीट वाढवावे, मग थांबावे. तेवढा वेळ अंगवळणी पडला की पुन्हा वेळात वाढ करावी.

**|३६५|** (१ एप्रिल १९९४)

**पू. बाबा** : दोन दिवसांपूर्वी एक गृहस्थ भेटायला आले होते. ते पाच वर्षे पॉंडीचरीला मदरजवळ होते. ते म्हणाले की त्यांच्या माहितीचे एक गृहस्थ श्रीअरविंदांच्या तत्त्वज्ञानावर व्याख्याने देत पण स्वतः मुलामधे फार गुंतलेले होते. यावरून लक्षात येते की परमार्थ किती कठीण आहे. पॉंडीचरीला राहायला जाण्यापूर्वी ह्या गृहस्थांना मेनन नांवाच्या एका केरळी सत्पुरुषांनी मंत्र दिला होता. त्याचा ते जप करीत असत. पण त्यामधे त्यांना गोडी वाटत नव्हती म्हणून त्यांनी मदरना जप कसा करावा, तुम्ही जप कसा करता असे विचारले. त्या म्हणाल्या की येथे माझ्याजवळ बैस. ते सुमारे पंधरा मिनिटे तेथे बसले आणि त्यांना जाणवले की मदरचा 'ॐ नमो भगवते' हा मंत्र सगळीकडे भरला आहे. (hovering around me हे त्यांचे शब्द) त्यांनी हा अनुभव मदरना सांगितल्यावर त्या म्हणाल्या की तू तुझ्या गुरूकडे जा आणि श्रीअरविंदांच्या समाधीवर मंत्र घेण्याची परवानगी त्यांच्याकडे माग. त्याप्रमाणे ते श्री. मेनन यांच्याकडे गेले आणि श्री. मेनन यांनी त्यांना समाधीवर मंत्र घेण्याची परवानगी दिली. त्यानंतर मदरबरोबर त्यांनी श्रीअरविंदांच्या समाधीची पूजा केली. फुले वाहून झाल्यावर मदरनी त्यांना पूर्वीचाच मंत्र दिला आणि तेव्हांपासून त्यांचे नामस्मरण चांगले चालले आहे. म्हणून तुम्हाला सांगतो की अनुग्रह ही Spiritual event असते. गुरु जेव्हां तुम्हाला नाम देतात तेव्हां आपली शक्ती घालून ते नाम देतात. नाम घेतांना त्यांची संगत वाटली पाहिजे. ती कां वाटत नाही? बरे, नाम सूक्ष्म असल्यामुळे त्याची संगत होत नाही म्हणावे तर आपल्या गुरूंच्या असणेपणावरही आपली पूर्ण श्रद्धा नाही. संगतीसाठी काय आवश्यक आहे? जिवंत माणसाची संगत वाटते, इतकेच नव्हे तर कुत्र्यामांजरांची आणि घरातल्या वस्तूंची संगत वाटते.

**साधक प** : संगतीसाठी सहवास हवा, पण त्याचबरोबर ज्याची संगत करायची ते आपणापासून वेगळे हवे. वास्तविक मी देह नव्हे, त्यामुळे मला देहाची संगत वाटली पाहिजे. पण देहाचे वेगळेपण विसरल्यामुळे, म्हणजेच मी देह आहे असे वाटू लागल्यामुळे देहाची संगत वाटत नाही.

**पू. बाबा** : हे बरोबर आहे. ज्याची संगत करायची ते आपल्यापासून वेगळे हवे. त्याचबरोबर मला त्याचे महत्त्व वाटले पाहिजे. म्हणजे Valuation पाहिजे.

**साधक ब** : संगतीसाठी समान पातळी हवी. नाम सूक्ष्माच्या पातळीवर आहे आणि आम्ही जडाच्या पातळीवर खाली आहोत. अशा स्थितीत नामाची संगत कशी होणार? त्यासाठी वर सूक्ष्मात प्रवेश झाला पाहिजे.

**पू. बाबा** : मुख्य म्हणजे नामाची संगत व्हावी अशी प्रबळ इच्छा पाहिजे. आपण नाम घेतो पण ते अनेक वाटांनी खर्च होऊन जाते. ते थांबले पाहिजे.

**साधक ड** : नाम चांगले झाले आणि त्या दिवशी बाकीची कामे चांगली झाली म्हणजे नकळत त्या बाकीच्या कामांसाठी ते नाम वापरल्यासारखे होते.

**पू. बाबा** : ब्रदर लॉरेन्सला याची बरोबर जाणीव झाली. मला त्याचे फार कौतुक वाटते. अनपढ आणि काहीसा धांदरट माणूस. पण त्याला नामाची संगत साधली. त्या ईस्टर्न मॉंकने इनव्होकेशन ऑफ द नेममधे म्हटल्याप्रमाणे वर तरंगता आले पाहिजे. (पहा : अध्यात्म संवाद भाग १ संवाद क्र.२४). (साधक ब ना) तुम्ही आमचे मन जड झाले आहे म्हणता ते खरे आहे. घारीसारखा पक्षी कसा उंच आकाशात संथपणे तरंगत असतो आणि थोडा खाली आला तरी लगेच पंख हालवून वर जातो. त्या पक्षाप्रमाणे नामात राहाता आले पाहिजे आणि त्यासाठी प्रथम ते सर्वोच्च मूल्य आहे हे पटले पाहिजे.

## **। ३६६ ।** (८ एप्रिल १९९४)

**पू. बाबा** : मी एकदा महाराजांना म्हणालो की दारिद्र्यात साधन टिकणे कठीण आहे. यावर श्रीमहाराज म्हणाले, आणि देहदु:ख असतांना. यांपैकी दारिद्र्याची आता शक्यता नाही. पण आता वय जसे वाढत आहे आणि शरीर साथ देईनासे झाले आहे तसे देहदु:खात नाम टिकवणे किती कठीण आहे ते समजू लागले आहे.

नुकतेच एक पुस्तक वाचत होतो त्यात योगी श्रीअरविंदांसंबंधी दिले आहे. एकदा (२४ नोव्हेंबर १९३८ रात्री दोन वाजता) रात्री उठून ते बाथरूमला

चालले होते. वाटेत व्याघ्राजिन होते. त्यावरून जातांना वाघाच्या डोक्याकडच्या भागाला अडखळून ते पडले आणि त्यांच्या उजव्या गुडघ्याला फ्रॅक्चर झाले. उठता येईना. रात्र असल्याने सगळे झोपलेले होते. हाड मोडल्याच्या वेदना असणारच. प्रयत्न करूनही उठता येईना, तेव्हां दोन तास तसेच पडून राहिले. मदरना जाग आली तेव्हां आश्रमात काहीतरी गडबड आहे असे त्यांना जाणवले आणि त्यांनी इमर्जन्सी बेल वाजवली त्याबरोबर सर्वजण उठले. पहातात तों श्रीअरविंद पडलेले. त्यांना उचलून अंथरुणावर नेऊन ठेवावे लागले. पुढे दोन अडीच महिने ते दुखणे झाले पण त्या काळातही त्यांचे साधन आणि नित्याचे व्यवहार, पत्रांना उत्तरे सांगणे इत्यादी चालू होते.

श्री. भाऊसाहेबांनाही (केतकर) म्हातारपणी देहदु:ख होतेच. दिसत नव्हते. एका कानानेच थोडेसे ऐकू येत होते. लोक काय बोलतात ते समजत नसे. ते म्हणत लोक हसले की मी हसतो. त्यांनी एकदा श्रीमहाराजांना मला आता कां ठेवलं आहे म्हणून विचारलं तेव्हां श्रीमहाराजांनी विचारलं की काही त्रास आहे कां? यावर ते म्हणाले की नाही, मी आनंदात आहे. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले की हे (देहाच्या ह्या स्थितीतही माणूस आनंदात राहू शकतो) दाखवण्यासाठीच तुम्हाला ठेवलं आहे. त्यानंतर या बाबतीत भाऊसाहेबांनी पुन्हां कधी विचारलं नाही. खरं म्हणजे त्यांची देहस्थिती चांगली नव्हती. रात्री लघवी धरवत नसे. उठण्यापूर्वीच अंथरूण ओले होई. तरी तक्रार न करता बाजूला ठेवलेले धोतर बदलत. शरीरदु:खामुळे त्यांच्या आतील समाधानाला धक्का लागला नाही. म्हातारपणी इंद्रिये विकल होतात. पहाणे, ऐकणे कमी होते, आठवेनासे होते; पण एक नाम तेवढे राहाते, इतके ते खोल आहे. परेतून त्याचा उगम आहे. आज शरीर साथ देत आहे तोपर्यंत शक्य तितके जास्तीत जास्त साधन करा. पुढे काय होईल कोणास ठाऊक!

नंतर पू. बाबांनी त्यांना आलेल्या दोन पत्रांमधील काही भाग वाचून दाखविले.

१) पहिले पत्र उस्मानाबादच्या एका गृहस्थांचे आहे. त्यांनी मे १९७६ मधे गोंदवल्याला समाधीवर अनुग्रह घेतला पण अजूनही त्यांना जपाला बसवत नाही. कोणी खेचून उठवते आहे असे वाटते. अनुग्रह घेतल्यानंतर दोन दिवसांनी रात्री थोरल्या राममंदिरात ते एका खांबाला टेकून बसले होते तेव्हां त्यांना वाटले की श्रीमहाराज खोलीतून बाहेर आले आहेत. रागाने लालबुंद झाले आहेत. ह्या गृहस्थांकडे पाहून श्रीमहाराजांनी त्यांना पोथीची (श्री. फडके यांनी

लिहिलेले 'सदगुरुलीलामृत' हे ओवीबद्ध चरित्र) अकरा पारायणे करा असे सांगितले. पण प्रयत्न करूनही आजपर्यंत (म्हणजे सुमारे अठरा वर्षांत!) अकरा पारायणे झाली नाहीत. साधन होत नाही याची खंत वाटते तरी आपण मार्गदर्शन करावे.

पत्रातील ही हकिगत वाचून झाल्यावर पू. बाबा म्हणाले, एकूण असे वाटते की ह्या गृहस्थांचे व्यक्तिमत्त्व दुभंगलेले आहे. मानसशास्त्रात अशा प्रकारच्या **Schizophrenia** ची उदाहरणे दिलेली आहेत. साधन तर करवत नाही आणि त्याची खंतही वाटते. तिकडे ते एकटे पडलेले असावे. म्हणजे साधक किंवा सत्पुरुषांचा सहवास नसावा. श्रीमहाराजांचे चरित्र व वचने वाचून त्यांवर चिंतन केले तर त्याचा उपयोग होईल. त्याचबरोबर श्रीमहाराजांची प्रार्थना करावी. एका जागी बसून नाम घेववत नाही तर चालतांना किंवा फेऱ्या मारत नाम घ्यावे, पण नाम सोडू नये.

२) दुसरे पत्र एका संस्कृत पंडितांचे आहे. त्यांचा केवळ संस्कृत साहित्याचाच अभ्यास नाही, वेदान्ताचाही अभ्यास झाला आहे. रमण महर्षींच्या चरित्राचा काही भागही त्यांनी संस्कृतात लिहिला आहे. ते म्हणतात की इतका अभ्यास केला पण समाधान नाही. वाङ्मयाने आनंद मिळतो पण तो तात्पुरता असतो. त्यातून समाधान मिळावे ही त्यांची अपेक्षाही चुकीची आहे. परमार्थ हा निव्वळ विचाराचा नसून कृतीचा आहे. कृतीवर नियंत्रण आणून वृत्ती आवरण्याचा अभ्यास केला पाहिजे. मनावर ताबा येण्यासाठी, मनात विचार येणे हीदेखील कृतीच आहे अशी खूणगाठ बांधली पाहिजे.

## ।३६७। (१५ एप्रिल १९९४)

आज आम्ही गेलो तेव्हां पू. बाबांनी त्यांच्याकडे आलेल्या एका गृहस्थांना थांबायला सांगितले होते. पू. बाबांनी त्यांना त्यांचे अनुभव आम्हाला सांगावयाला सांगितले.

त्या गृहस्थांनी त्यांची ओळख थोडक्यात करून दिली. सुमारे चाळीस वर्षांचे असावे. ऑर्गेनिक केमिस्ट्रीत पीएच्.डी. केलेली असून एका कंपनीत कामाला आहेत. ते म्हणाले की वयाच्या विसाव्या वर्षापासून त्यांना तत्त्वज्ञानाची पुस्तके वाचायचा नाद लागला. विशेषत: विवेकानंद आणि त्यांचे गुरु श्रीरामकृष्ण यांचे आकर्षण होते. श्रीगोंदवलेकर महाराजांचे चरित्र वाचले पण विशेष काही वाटले नाही. तथापि १९९१ च्या सुरुवातीस त्यांनी

गोंदवल्यास समाधीवर अनुग्रह घेतला. प्रथम पाच सहा महिने वैखरीने व पुढे अखंड नामस्मरण सुरू केले आणि सप्टेंबर १९९३ मधे त्यांना आत्मज्ञान झाले! श्रीरामांनी दर्शन देऊन विजयी हो असा आशीर्वाद दिला. आता ज्या देवाचे ते स्मरण करतात तो देव त्यांच्यापुढे साकार होतो.

मध्यंतरी स्कूटरवरून जातांना मोठा अपघात होऊनही ते आश्चर्यकारक रीतीने त्यात बचावले. अपघात झाला तेंव्हांही महाराज वाचवा असा विचार मनात आला नाही, तरीदेखील वाचलो कारण श्रीमहाराजांची तशी इच्छा आहे असे ते म्हणाले. ते म्हणाले की जे घडते ते श्रीमहाराजांच्या प्रेरणेने घडते. आता आतबाहेर मी महाराजमय आहे; मला वेगळेपण राहिलेले नाही इत्यादी .

नंतर त्या गृहस्थांच्याबद्दल बोलतांना पू. बाबा म्हणाले की ते चांगले आहेत. त्यांची साधनाची उत्कटता घेण्यासारखी आहे. पण त्यांची कल्पनाशक्ती फार तरल आणि जोमदार असल्यामुळे ऐकून वाचून परमार्थाच्या ज्या कल्पना होतात त्या त्या प्रत्यक्ष घडल्या असे त्यांना वाटत असावे. तथापि ते साधनात बरेच पुढे गेले आहेत हे निश्चित. अनुभवाच्या बाबतीत मी तुम्हाला तीन गोष्टी सांगतो.

(१) परमार्थाच्या मार्गावरचे अनुभव युनिव्हर्सल म्हणजे सार्वत्रिक असतात.

(२) हे अनुभव स्थिर राहिले पाहिजेत. They must come to stay. आणि

(३) या अनुभवांनंतर आपले कर्तेपण नाहीसे झाले पाहिजे.

या गृहस्थांच्या बाबतीत ते काही प्रमाणात घडलेले असावे.

पू. बाबा नंतर म्हणाले की दर रविवारी निरूपणाला येणाऱ्या एका गृहस्थांनी त्यांना फार मार्मिक प्रश्न विचारला. त्यांनी विचारले की कर्म, भक्ति आणि ज्ञान या तीन्हींमध्ये साधन म्हणून नामस्मरणाचे स्थान काय आणि या तीन मार्गात नामस्मरण कसे चालते ?

पू. बाबांनी त्यांना सांगितले की कर्म म्हणून प्रथम सकाम आणि पुढे निष्काम नामस्मरण होते. नंतर ह्या नामस्मरणाचे पर्यवसान भक्तीमधे होते. भक्तीमधे सगुणाला फार महत्त्व आहे कारण सगुणाची पूजा केल्याखेरीज भक्तिप्रेम निर्माण होत नाही. ह्या भक्तीची परिणती पुढे अशी होते की भगवंत भक्ताच्या अंकित होतो. उद्धवाने गोपींना जेव्हां उपदेश केला तेव्हां त्या म्हणाल्या की तुझा उपदेश ठीक आहे पण आम्ही बोलावले आणि कृष्ण आला नाही असे होणेच शक्य नाही. भक्तीतून ज्ञान निर्माण झाले तरी भक्तीचे सुख

वेगळेपणाशिवाय नाही. म्हणून भगवंताशी एकरूप झाल्यानंतरही भक्त प्रेमसुखासाठी वेगळेपणाने राहातो. ह्या पायऱ्या अशा : तस्येवाहम् - मी त्याचा आहे नंतर तवेवाहम् - मी तुझा आहे. तस्येवाहम् म्हणतांना भगवंत भक्तापासून दूर आहे. तवेवाहम् म्हणतांना भगवंत आणि भक्त समोरासमोर आलेले आहेत. आणि त्यानंतर मदीयत्वम् - तू माझा आहेस आणि शेवटी मी तूच आहे ही स्थिती झाली आहे. म्हणून अभेदाने ज्ञान झाल्यानंतरही नामस्मरण चालू राहाते. यालाच पराभक्ती म्हणतात. मारुतीचे अखंड नामस्मरण चालू असे. तथापि श्रीरामांनी जेव्हां त्याला तू कोण आहेस असा प्रश्न केला तेव्हां दास्यभक्ती करणारा मारुती म्हणाला, 'देहबुद्धया तु दासोऽहं जीवबुद्धया त्वदंशक:। आत्मबुद्धया त्वमेवाहमिती मे निश्चिता मति॥' (देहबुद्धीतून विचार केला तर मी तुझा (रामाचा) दास आहे, जीव (शिव) विचार केला तर मी तुझा (शिवाचा) अंश आहे आणि आत्मबुद्धीने विचार केला तर मी तूच आहे अशी माझी खात्री आहे.)

**साधक ग :** तुकाराम महाराजांनीही "नको ब्रह्मज्ञान आत्मस्थितिभाव। मी भक्त तूं देव ऐसें करीं॥" असे म्हटले आहे.

**पू. बाबा :** सुरुवात कशीही होवो त्याचे पर्यवसान भक्तीत होईल. तथापि त्यासाठी अथक प्रयत्न, शरणागती आणि चित्तशुद्धी यांची आवश्यकता आहे.

## ।३६८। (२२ एप्रिल १९९४)

**पू. बाबा :** ह्या आठवड्यात एक गृहस्थ भेटायला आले होते. त्यांना स्वामी स्वरूपानंदांचा पाच-सहा वर्षे सहवास घडला. म्हणजे स्वामी असतांना पाचसहा वर्षे वरचेवर ते त्यांच्याकडे जात असत. ते एकदा स्वामींना म्हणाले की मला साधूची प्रचीति पाहिजे ती तुम्ही मला द्या. यावर स्वामी म्हणाले की अरे, मी साधू नाही तर मी तुला त्याची प्रचीति काय देऊ? तथापि तू मी सांगितलेले सोऽहं साधन करीत राहा. त्याप्रमाणे ते करीत असतांना काही दिवसांनी दोन-तीन दिवस असे गेले की त्यांना एकसारखे स्वामींचे सान्निध्य जाणवत होते. म्हणजे ते चालू लागले की स्वामी त्यांच्याबरोबर चालू लागत, ते बसले की त्यांच्या बाजूला बसत. दोन-तीन दिवसांनंतर स्वामींच्या निकट अस्तित्वाचा तो भाव नाहीसा झाला तो प्रयत्न करूनही पुन्हा आला नाही.

मी तुम्हाला विचारतो की नामाची संगत घडण्यासाठी आपण काय करावे? नामात मी आहे असे श्रीमहाराजांनी सांगितलेले आहे.

या प्रश्नावर चर्चा झाली व त्या चर्चेतून निघालेले महत्त्वाचे निष्कर्ष असे :

१) त्या गृहस्थांना जशी प्रचीति आली तशी आपल्यालाही येते; पण ती टिकून राहात नाही. कोणताही अनुभव स्थिर झाला पाहिजे. त्यासाठी लागणारी चित्तशुद्धी अद्यापि झालेली नाही.

२) आजच्या जीवनाचा उबग आला पाहिजे. त्यामधे अस्वस्थता आली पाहिजे. यासाठी आत्मानात्मविवेक करून अनात्म सोडण्याची तयारी हवी. बाहेरचे जीवन तसेच राहील पण आतून बदल झाला पाहिजे.

३) बाहेरील जीवनाचा घाट तसाच राहून आतून बदल होतो/करावा लागतो की बाहेरील जीवनाचा घाट बदलून मग आतील जीवन बदलते याबाबतीत दोन्ही शक्यता गृहीत धरल्या पाहिजेत. बाहेरील जीवन आणि आतील जीवन ही दोन्ही एकमेकांना लागून असल्यामुळे त्याबाबत सावधानता ठेवली पाहिजे.

४) जीवनाचे ध्येय निश्चित ठरले पाहिजे आणि आपली प्रत्येक कृती ते साध्य करण्यासाठी झाली पाहिजे. आज विचाराने ध्येय ठरलेले असले तरी त्यानुसार कृती होत नाही. कृतीसाठी लागणारा भावनेचा जोर कमी पडतो. त्यामुळे काहीसे स्टॅग्नेशन (कोंडमारा) झाले आहे. हे स्टॅग्नेशन विचारांपलीकडे जाण्यानेच नाहीसे होईल. विचार थांबलेच पाहिजेत कारण आपले सगळे विचार देहबुद्धीतून येतात. हे करतांना धाडस आहे. हा जन्म नामाला दिला म्हटले पाहिजे. हे धाडस आता करणार नाही तर केव्हां करणार? साधन मी करणार, शरण मी जाणार यांसारखे विरोधाभास (Paradox) राहाणारच, पण त्यात गुंतता कामा नये. मिळेल तो सगळा वेळ नामाला दिला पाहिजे.

## ।३६९।

(मुक्काम गोंदवले. मंगळवार दि.२६ एप्रिल ते शनिवार दि. ३० एप्रिल १९९४, पाच दिवस दहावे नाम-साधन अभ्यास शिबीर झाले. रोज पू. बाबांच्या खोलीत चर्चा होत असे. या चर्चेची टिपणे कु. विदुला गद्रे हिने दिली त्यांचा येथे उपयोग केला आहे - संपादक)

## ।३६९ - १। (२५ एप्रिल १९९४)

संध्याकाळी साडेसहा वाजता.

**पू. बाबा** : उद्या पहाटेपासून पाच दिवस शुभ काल सुरू होत आहे. म्हणून हे पाच दिवस एकसारखे नामात राहाण्याचा अभ्यास करावा. इथे आपण

शक्तीच्या केंद्रस्थानी आलेले आहोत. इथे नाम भरलेले आहे. घरी उपाधी जास्त असते. इथे नामाचे वातावरण आहे. अनुसंधान वगैरे बाजूला ठेवा. ती पुढची पायरी आहे. इथे फक्त सर्वकाळ नाम घ्यायचा अभ्यास करा. आपले दृश्याचे प्रेम जात नाही आणि त्यामुळे श्रीमहाराजांचे प्रेम येत नाही. म्हणून आज शाश्वताला धरायचा नाम हा एकच उपाय आहे हे मर्म संतांनी सांगितलेले आहे.

रात्री जागून नामस्मरण करण्याचे काही कारण नाही. दिवसाचे बारा तास तुम्ही नामात घालवा. जाग आल्याबरोबर नामच घ्या. श्रीमहाराजांनीच हे सांगितलेलं आहे. कंटाळा आला तर थोडा वेळ (फार तर अर्धा तास) थांबा पण नंतर परत नामच घ्या. जेवतांना, स्नान करतांना, रामाला जातांना आणि परत येतांना कटाक्षाने नाम घेतलेच पाहिजे थोडक्यात म्हणजे नामाच्या मागे लागले पाहिजे. नामाची चटक लागली पाहिजे. चटक लागणे म्हणजे काय याची एक हकिगत सांगतो येथे येणाऱ्या एका गृहस्थांच्या मुलीला अंगठा चोखायची सवय होती. लहान मुलांना ती असते पण मुले मोठी झाली की ती जाते. ह्या मुलीच्या बाबतीत मात्र लग्न झाल्यानंतरही ती आठवण आली की ती एका कोपऱ्यात बाजूला जाऊन अंगठा चोखून यायची! तसे नामाचे झाले पाहिजे. थोडा वेळ मिळाला की लगेच नाम चालू झाले पाहिजे. ज्ञानेश्वर महाराजांनी म्हटलेच आहे की "आवडी आणि लाजवी। व्यसन आणि शिणवी। पिसें आणि न भुलवी। तरी तें काइ॥६.१२४॥" हे खरं आहे. मी म्हटलं तसं अनुसंधान ही पुढची अवस्था आहे. ते म्हणजे पाडाला लागलेल्या आंब्यासारखं आहे. त्यानंतरची अवस्था म्हणजे ध्यानच.

सहवासाने प्रेम कसे निर्माण होते पहा. पूरकर नांवाचे श्रीमहाराजांचे एक भक्त गिरगावात राहात असत. दोन खोल्यांचे घर. पूरकरांच्या तीन पिढ्या तेथे राहिल्या. साठ वर्षे त्यांनी त्या घरात काढली. पुढे त्यांच्या मुलाने चार खोल्यांचे घर विलेपार्ल्याला बांधले म्हणून ते त्याच्याकडे राहायला गेले आणि करमत नाही म्हणून दोन दिवसांनीच पुन्हा जुन्या घरी राहायला आले!

एकदा मी श्रीमहाराजांना म्हणालो, शंकराचार्यांनी साधनचतुष्टय सांगितले आहे पण भक्तिमार्गात ते नाही. एकदम श्रीमहाराज म्हणाले, काय, म्हणता काय तुम्ही! श्रीमहाराज मला इतकं कडकपणानं कधीच बोलत नसत. पण त्यावेळी त्यांनी मला मूर्खात काढलं. म्हणाले, नामाने साधत नाही अशी कोणती गोष्ट आहे? नाम घेणाराच्या पायाशी साधनचतुष्टय आहे.

स्वामी रामदासांनी नामाच्या गोडीच्या त्यांच्या अनुभवाबद्दल बऱ्याच ठिकाणी सांगितलेले आहे. गुरुदेवांप्रमाणे तेही नामाच्या ताब्यात गेले होते. ते सांगतात की नामाची गोडी आली तर तुम्ही वेडे व्हाल.

The Gospel of Swami Ramdas मधे ते सांगतात.

"Ramdas was concentrating on the sound of the Name. Ramnam was so sweet that whenever he sang the Name to himself, waves of joy rose in his heart. He never cared for any form then and was fully satisfied with the joy that arose from within on chanting the Name. He was immersed in that joy so much that he forgot even the body. Then the repetition stopped. After remaining in that blissful state for a while, when he came down to body consciousness, repetition automatically started."

"In those days, whenever he attended bhajans, on hearing one or two songs, he used to get absorbed in a divine rapture and sit for hours, unconscious of the body. But now Ramdas does not go into that state because the joy or bliss he gets is there in all conditions. He sees now that all beings and things are the embodiments of that divine bliss which he is constantly experiencing. Now every particle of his body is filled with that ecstatic joy; it is controlled now, whereas in early days he could not but dance as he was overcome by that joy,...forms come and vanish but you can keep the Name on your tongue always and unceasingly."

"It is like this. First Ramdas took Ramnam and later Ramnam caught him never to leave him till he reached the goal. It burnt away all his desires just like the fire which burns away the wood and at the end both the wood and the fire disappear. So Ramnam having burnt the vasanas, both Ramnam and the vasanas have ceased. Now pure ananda alone remains." The Gospel of swami Ramdas Recorded by

swami Satchidananda, Second Edition Anandashram, Kanhangad, Kerala, India, 671531 - para 389, pp 373.74

[''(त्याकाळी) रामदास नामाच्या ध्वनीवर चित्त केंद्रित करत होता. रामनाम त्याला इतके गोड वाटत होते की तो जेव्हां जेव्हां रामनाम घेई तेव्हां तेव्हां त्याच्या हृदयात आनंदाच्या लहरी उचंबळत असत. तेव्हां त्याने विशिष्ट अशा रूपाचा कधी विचारच केला नाही कारण नामस्मरणाने अंतरातून जो आनंद उसळत असे त्यात त्याला पूर्ण समाधान वाटत होते. त्या आनंदात तो इतका बुडालेला होता की त्याला त्याच्या देहाचाही विसर पडे आणि असे झाले की नाम थांबे. आनंदाच्या त्या अवस्थेत काही काळ राहिल्यानंतर जेव्हां तो परत देहभानावर येई तेव्हां नामस्मरण आपोआप सुरू होत असे.''

''त्या काळात रामदास जेव्हां एखाद्या भजनाच्या कार्यक्रमास उपस्थित राही तेव्हां एक-दोन भजने ऐकतांच दिव्य आनंदात बुडून कित्येक तास त्याची देहाची जाणीव नाहीशी होत असे. आता त्याची ती अवस्था होत नाही कारण आता तो दिव्य आनंद त्याला सर्व काळ आणि सर्व स्थितीत मिळतो आहे. आता तो ज्या दिव्य आनंदाचा अनुभव घेत आहे त्या आनंदाचीच सर्व प्राणिमात्र आणि वस्तू ही रूपे आहेत याचे त्याला ज्ञान झाले आहे. आता त्याच्या शरीराचा प्रत्येक कण त्या दिव्य आनंदाने भरलेला आहे. सुरुवातीला त्या आनंदाचा भर येऊन रामदासाला नाचल्याशिवाय राहावत नसे. आता मात्र तो आनंद संयत झालेला आहे. रूपे येतात आणि जातात, तथापि नाम मात्र तुम्ही आपल्या जिव्हेवर नेहमी आणि अखंड ठेवू शकता.''

''ते असे (झाले) आहे. प्रथम रामदास रामनाम घेत असे. मात्र नंतर ध्येय साध्य होईपर्यंत रामनामाने त्याला पकडले. अग्नीने जसे प्रथम इंधन जळून जाते व नंतर अग्नीही शांत होतो त्याप्रमाणे रामनामाने रामदासाच्या सर्व वासना जळून गेल्या. त्यानंतर (आता) रामनाम आणि वासना दोन्हीही नाहीसे होऊन केवळ शुद्ध आनंद उरला आहे.'']

श्री. दत्ताण्णा बऱ्याच लोकांना बरोबर घेऊन बदरीकेदारच्या यात्रेला गेले होते. तेथे एक साप निघाला. दत्ताण्णांनी तो साप हाताने पकडला तेव्हां उलटून त्या सापाने त्यांना धरले (हाताला विळखा घातला.) तसे प्रथम नामाला आपण घट्ट धरावे म्हणजे नामच उलटून आपल्याला धरेल. सापाच्या विषाने मृत्यू ओढवतो पण नामामृत मुखीं पडले की ''विषयाचें विष शोषून घेई। ऐसी आहे

नामाची प्रचीति॥'' नामाने सोडले तर उद्या भेटायला येईन असे गुरुदेव रानड्यांनी शंकराचार्यांना सांगितले त्याचा हा अर्थ आहे.

खरं सांगतो. नामाची गोडी फार आहे हे मी अनुभवानं सांगतो आहे. मी साखर खाल्ली आहे. मी जो अनुभव घेतला त्याचा मला फायदा झाला आहे. तुम्हालाही तो व्हावा म्हणून मी पुनःपुन्हा सांगतो आहे; आणि तुम्हाला फायदा झाला तर त्यात माझे नुकसान काहीच नाही! श्रीमहाराजांची शक्ती मदत करायला आहेच. त्या शक्तीला कळवळून प्रार्थना करून आवाहन केलं पाहिजे. पदर पसरतांना नम्रता पाहिजे. एका बाईचे लग्न झाले. तिने पंजाबी पोशाख केला होता. ओटी भरायच्या वेळी ओटीचा नारळ घ्यायला पदरच नव्हता; तसे आपले होऊ नये. यासाठी सर्व काळ नम्रतेचा पदर पसरुन प्रार्थना करावी. ''लीनतेसारिखे रत्न। उदंड केला जरी यत्न। तरी न जोडे परी यत्न। केला पाहिजे॥''

रेल्वेमधून प्रवास करणारा माणूस जसा खिशातला पगाराचा चेक सांभाळून बाकी सगळे व्यवहार करतो तसे नाम सांभाळून बाकीचे व्यवहार करा. यासाठी अखंड सावधानता पाहिजे.

## ।३६९-२। (२८ एप्रिल १९९४)

सकाळी दहा वाजता.

**पू. बाबा :** माणसाला त्याच्या अपूर्णतेची जाणीव असते; त्यामुळे तो आधार शोधत असतो. पण त्याच्या लक्षात येत नाही की जो आधार किंवा आलंब शोधायचा तो आलंब स्थिर पाहिजे. असा स्थिर आलंब केवळ भगवंत किंवा आपले सद्गुरु असतात. तो आलंब धरायचा असेल तर त्यासाठी बाकीचे आलंब सुटावे लागतात. म्हणून मीराबाई म्हणते ''मेरे तो गिरिधर गोपाल, दूसरो न कोई।'' बाकीचे आलंब सोडले तरच सर्व आलंब भगवंताशी एकवटतात.

विशेषतः बाहेरचे आलंब एकवेळ सुटतील पण देहाचा आलंब सुटणे फार कठीण आहे. यासाठी स्वतःवरच प्रयोग करावा लागतो. हे एक साहस (adventure) आहे. प्रत्येक कर्म भगवंतासाठी केले पाहिजे. भूक त्याच्या इच्छेने लागते, झोप त्याच्या इच्छेने येते. आता माझी इच्छा नाहीच; जे घडते ते त्याच्या इच्छेने घडते असा एकविध भाव झाला पाहिजे. नामस्मरणाबरोबरच प्रत्येक गोष्टीमधे श्रीमहाराजांच्या इच्छेची सवय लावून घेतली तर साधन स्थिर

होऊन मन स्थिर होईल. काळजी, भीती, चिंता, तळमळ इत्यादी नाहीसे होऊन खऱ्या शांतीचा अनुभव येईल.

खरी अडचण अशी आहे की आपल्या बुद्धीला समजते पण ते भावनेत उतरत नाही. यासाठी श्रीमहाराजांना appeal आवाहन केलं पाहिजे. जे जे होतं ते ते त्यांना सांगून केलं पाहिजे म्हणजे भाव येईल. नामस्मरणाच्या अभ्यासात चिकाटी पाहिजे. त्याशिवाय, मला सांगा, कसं होईल ?

**। ३६९ - ३ ।** (२८ एप्रिल १९९४)

संध्याकाळी सात वाजता.

**साधक ब :** इथे साधन चांगलं होतं; ते घरी कसं न्यायच ?

**पू. बाबा :** याबद्दल पूर्वी आपण बोललो होतो, तरी पुन्हा सांगतो.

१) रोज पाच मिनिटेच का होईना, पण प्राण ओतून अगदी मनापासून नाम घ्यावे.

२) श्रीरामाच्या आणि श्रीमहाराजांच्या चरित्राचे चिंतन करावे म्हणजे नामस्मरण चांगले होते.

३) ध्येयाची सतत आठवण ठेवावी. पाहिजे तर श्रीमहाराजांना काय आवडते आणि काय आवडत नाही याची यादी करावी. त्यांना जे आवडत नाही ते टाळावे आणि जे आवडते ते आचरणात आणावे. यालाच Practice of the Presence of God म्हणतात.

श्रीमहाराजांच्या विशिष्ट गुणांचा अभ्यास केला आणि ते आचरणात आणण्याचा प्रयत्न केला तर आपला प्रपंच उत्तम होईल आणि पारमार्थिक उन्नती साधेल. साधी वृत्ती, लीनता, सहनशीलता, निरलसता, संतोष, आर्जव, जनप्रियत्व, कोणतीही गोष्ट मनापासून करणे, झाल्यागेल्याचा विसर आणि पुढच्याचा विचार आणि व्यवहाराचा परमार्थासाठी उपयोग (म्हणजे परमार्थ हे ध्येय साधण्यासाठी व्यवहार साधन म्हणून करणे) हे श्रीमहाराजांचे दहा विशिष्ट गुण त्यांच्या चरित्रात दिलेले आहेत. त्यांचे चिंतन करून ते आपल्या आचरणात आणण्याचा प्रयत्न करावा. जनप्रियत्व हा त्यांचा आवडता गुण होता. श्रीमहाराज जर आपल्या घरी आले तर आपल्या वागण्यात बदल करावा लागणार नाही असे आपले वर्तन असावे. त्यांचे अस्तित्व आपल्या जाणिवेत आले तर आपल्या हातून काही वावगे घडणारच नाही.

नामस्मरण उत्कटतेने करावे उत्कटता नसेल तर नामस्मरण करू नये असे नव्हे तर उत्कटता का कमी झाली याचा शोध घ्यावा. त्याबद्दल वाईट वाटून रडू आलं पाहिजे. श्रीमहाराजांना असं वाटलं पाहिजे की हा मला आवडेल असं वागण्याचा प्रयत्न करतो आहे. याला केव्हां पाहू असं त्यांना वाटलं पाहिजे

नाम अत्यंत पवित्र आहे असं वाटलं पाहिजे. खरोखर नामाइतकं पवित्र दुसरं जगात नाही; पण दृश्यात गुंतल्यामुळं आपल्याला तसं वाटत नाही. श्रीमहाराजांनी दिलेली माळ (अनुग्रहाची माळ) जितकी पवित्र वाटते तितकं नाम पवित्र वाटत नाही. महाराज म्हणाले, नाम माझा प्राण आहे. म्हणजे ते किती पवित्र असलं पाहिजे!

रामाच्या चरित्रातला शबरीचा कथाप्रसंग मला फार आवडतो. राम आज येईल, उद्या येईल म्हणून उत्कटतेने आणि थोडीही निराश न होता ती प्रतीक्षा करते. दिवस जातील तशी ती उत्कटता वाढत जाते. राम केव्हांही येईल याची तिला खात्री असते आणि म्हणून दररोज ती त्याच्या स्वागताची तयारी करते. तिचे भाग्य असे की श्रीराम स्वत: तिला नवविधा भक्ती सांगतात. (पहा :अध्यात्म संवाद भाग १ संवाद क्र ९६)

साधन चांगले होण्यासाठी ध्येयाची सारखी आठवण राहाणे हा एक उपाय आहे. मी नामासाठी, भगवताच्या दर्शनासाठी जगतो आहे याची सतत आठवण असावी. नाहीतर दुसरा उपाय म्हणजे डोळ्यावर पट्टी बांधून (सद्गुरूंनी सांगितले आहे म्हणून) एकसारखे नाम घेत राहावे.

कोणतीही गोष्ट मनापासून करावी. जेवण मनापासून करावे, गप्पागोष्टी मनापासून कराव्या, खेळ मनापासून खेळावे म्हणजे नामस्मरणदेखील मनापासून होईल. मग कोणत्याही गोष्टीची तक्रार राहाणार नाही. साधन चांगले होण्यासाठी 'मी' शून्य झाला पाहिजे; म्हणजे अहंकार गेला पाहिजे. आज आपली स्थिती अशी आहे की अगदी लहान सहान गोष्टीदेखील आपल्या मनासारख्या व्हाव्या असे आपल्याला वाटते. हा आग्रह नामानेच नाहीसा होईल. यासाठी मी काल म्हणालो तसा लीनतेचा अभ्यास करावा.

## |३६९-४| (२९ एप्रिल १९९४)

संध्याकाळी सात वाजता.

**पू. बाबा** : एक दिवस सकाळपासून श्रीमहाराजांना भेटायला एकसारखी माणसे येत होती. दुपारचे बारा, एक, दोन वाजले. सगळेजण जेवणासाठी

खोळंबले होते. एक शेतकरी श्रीमहाराजांना विचारत होता, महाराज, माझी म्हैस हरवली आहे, काय करू? श्रीमहाराज त्याला सांगत होते, काळजी करू नकोस, सापडेल. इतक्यात कोणीतरी त्या शेतकऱ्याला म्हटले की आता आणखी काही विचारू नको, जेवायला उशीर झालाय, नंतर बघू. श्रीमहाराजांना ते आवडले नाही. ते म्हणाले, तुमच्या जेवणापेक्षा त्याच्या म्हशीची किंमत जास्त आहे. पुढे म्हणाले, मागणारा मनुष्य मला आवडतो. मी देतो अशी त्याची भावना असते. त्याचे मागणे मी फक्त भगवंताकडे वळवतो.

पू. बाबा पुढे म्हणाले, सद्गुरूच्या लीलाचरित्राचे चिंतन करतांना एक प्रकारची तृप्ती येते. यालासुद्धा कारण आहे. आपण अपूर्ण आहोत. सद्गुरु पूर्णपुरुष असतात. त्यांच्या चरित्राचे चिंतन करतांना आपल्याला त्यांचा सहवास घडतो आणि त्या सहवासाने तृप्ती येते.

श्रीमहाराजांच्या विशाल दृष्टिकोनाबद्दल सांगतांना पू. बाबा म्हणाले, एकदा श्रीमहाराजांना विचारले की आपल्याजवळ काही नसतांना रोज चार-पाचशे माणसे जेवायची हे कसे? तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, एक माणूस झोपला होता. त्याच्या उशाशी झरा वाहात होता. झोपून उठल्यावर त्याने त्यातले एक दोन ओंजळी पाणी घेऊन इकडे तिकडे टाकले तर त्या झऱ्याच्या वाहाण्यात काही फरक पडेल का? तसे सृष्टीमधे इतके कोट्यवधि जीव खात आहेत, त्यातली चार-पाचशे माणसे इथे जेवली तर विशेष काय झालं!

श्रीमहाराजांनी औंधहून बाळंभट जोशी यांना आणले आणि दत्ताच्या देवळातील पूजेचे काम त्यांच्याकडे सोपवले. रोज एक आण्याचा गांजा आणून देण्याच्या अटीवर त्यांना जप नेमून दिला. एक दिवस गांजा द्यायचा राहिला म्हणून संतापून ते श्रीमहाराजांकडे गेले. त्यांच्याकडे लक्ष जाताच बाळंभट, आज विसरलो पण आत्ता व्यवस्था करतो असे श्रीमहाराज म्हणाले. श्रीमहाराजांची लीनता पाहून ते विरघळले आणि त्यांचे व्यसन सुटले ही हकिगत तुम्हाला माहीत आहेच. (पहा : श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज चरित्र आणि वाङ्मय लेखक के. वि. बेलसरे. सुधारलेली तेरावी आवृत्ति १९९५ प्रकरण ६ पृष्ठे ११२-११३) त्याच बाळंभटांची गोष्ट. त्यांना गोड फार आवडायचे म्हणून श्री. भाऊसाहेब दर दोन-तीन दिवसांनी त्यांना बोलावून भांडभर तूपसाखर खायला द्यायचे. ते खाऊन बाळंभट त्यांना म्हणायचे, भाऊसाहेब, महाराज तुमचं कल्याण करतील.

श्री. मुनशी नांवाच्या श्रीमहाराजांकडे येणाऱ्या एका गुजराथी गृहस्थांची अहमदाबादहून मुंबईला बदली झाली. राहायला फ्लॅट मिळाला पण तेथे टेलिफोन नव्हता. मालाडला आलेले असतांना श्रीमहाराजांच्या तसबिरीसमोर उभे राहून हात जोडून ते म्हणाले, Maharaj, I want telephone. मी त्यांना म्हणालो, हा काय नॉनसेन्स (वेडेपणा) आहे? यावर ते म्हणाले, Let the old man have some work! आणि आठ दिवसात त्यांना टेलिफोन मिळाला! मुनशींसारखी श्रद्धा असली तर महाराज का देणार नाहीत? निश्चित देतील. एकदा श्रीमहाराज म्हणाले की कर्तेपणा कमी झाला की पदोपदी चमत्कार दिसतील.

पू. बाबा पुढे म्हणाले, इथे येऊन काय शिकायचं? तर अनंतपणाचा कारभार पाहायचा. विश्वामधे आणि आपल्या प्रपंचामधेही तोच सारं काही करतो आहे याची हे पाहिलं की खात्री होते. एकदा श्रीमहाराज गोपाळस्वामींना (पूर्वीचे एक पंच) म्हणाले, पोती रिकामी केल्याशिवाय ती कशी भरतात ते कसे समजेल?

## |३६९-५| (१ मे १९९४)

सकाळी साडेसात वाजता.

काल संध्याकाळी दहाव्या नामसाधन अभ्यास शिबिराचा समारोप झाला. काल सुमारे साडेतीन तास लोकांना प्रसाद देण्याचे श्रम झाले असतानाही आज सकाळी पू. बाबा ताजेतवाने आणि प्रसन्न आहेत.

**साधक प** : मला वाटते की प्रत्येक गोष्ट भगवंताला, आपल्या गुरूंना किंवा नामाला सांगून करावी. आपल्या समस्या, उदाहरणार्थ, मनासारखे नामस्मरण होत नाही ही समस्यादेखील नामालाच सांगावी.

**पू. बाबा** : साधन चांगले होण्यासाठी जे काही करावेसे वाटते ते आत्ता ह्या क्षणापासून सुरू करावे. नुसते ध्येय निश्चित होऊन चालणार नाही. प्रतिक्षणी त्याची तीव्रतेने आठवण हवी. त्यासाठी अगदी दररोज आपल्या रोजनिशीत मी भगवंतासाठी जगतो आहे असे लिहावे. त्याचा खूप उपयोग होतो.

## |३७०| (१३ मे १९९४) मालाड

गोंदवल्याहून परत आल्यानंतर पू. बाबांना थकवा आला होता म्हणून दि. ६ रोजी आम्ही मालाडला गेलो नव्हतो. आज अक्षयतृतीया असल्याने बरेच लोक पू. बाबांना भेटायला येत होते.

**पू. बाबा** : गोंदवल्याला पाच दिवस दररोज अडीच तास निरूपण करावे लागत होते. शिवाय खोलीतही एकसारखे लोक भेटायला येत होते म्हणून मी थोडे खात होतो. जास्त खाल्ले तर सुस्ती यावयाची म्हणून ते टाळत असे. त्यामुळे थोडा थकवा आला. आता ठीक आहे.

नंतर बोलण्याच्या ओघात श्री.भाऊसाहेबांचे (केतकर) नांव आले. पू. बाबा सांगू लागले, श्रीमहाराज गेले त्याच्या आधी दोन दिवस ते भाऊसाहेबांना म्हणाले, 'भाऊसाहेब, मला आतां जाणें जरूर आहे. मी सोमवारीं जाणार! तेव्हां भाऊसाहेब त्यांना म्हणाले, महाराज, आपल्या मांडीवर मरण यावे म्हणून मी येथे आलो. आपल्या मांडीवर मरण येणे हा उत्सव आहे. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, तसा योग दिसत नाही. भाऊसाहेबांनी विचारले, मग मी काय करू? बारा वर्षे इथे राहा, महाराज म्हणाले. (पहा : श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज चरित्र आणि वाङ्मय ले. के. वि. बेलसरे. सुधारलेली तेरावी आवृत्ति. प्रकरण १२ पृष्ठ ३२८) श्रीमहाराज गेल्यानंतर बारा वर्षे भाऊसाहेब गोंदवल्यात राहिले. तेव्हां तिथली परिस्थिती आजच्यासारखी नव्हती. शिवाय श्रीमहाराज गेल्यानंतर लोकांचे तेथे जाणे-येणेही एकदम कमी झाले होते. धाकट्या रामाच्या मंदिरात मागच्या बाजूला खोल्या काढलेल्या होत्या, तेथे भाऊसाहेब राहत असत. दुपारी श्रीमहाराजांना नैवेद्य दाखविण्यासाठी अनवाणी समाधिमंदिरात जात असत. एकदा बोलतांना मला म्हणाले, उन्हाळ्यात पायांना फार चटके बसत. त्या संदर्भात मी एकदा श्रीमहाराजांना (पेटीवर) म्हणालो की त्यांची (भाऊसाहेबांची) ही बारा वर्षे तपश्चर्याच झाली. यावर महाराज एकदम म्हणाले, काय म्हणता? हे त्यांनी प्रेमापोटी केले. भावार्थ असा की तपश्चर्येत कष्ट असतात आणि काहीतरी मिळवण्याचा हेतू असतो. एखाद्या आईला जसं आपल्या आजारी मुलाचं करतांना कष्ट होतात पण प्रेमामुळं तिला त्या कष्टांची जाणीव नसते तसं भाऊसाहेबांचं होतं. आणि 'महाराज भेटले, झालं; आतां काय मिळवायचं राहिलं आहे' अशी त्यांची वृत्ती असल्यामुळे श्रीमहाराजांची सेवा करतांना त्यांना त्यातून काही मिळवायचं नव्हतं.

पू. बाबा पुढे सांगू लागले, ह्यावेळी गोंदवल्याच्या मुक्कामात थकवा आला पण जप फार चांगला झाला. तिथल्या वातावरणाची फार मदत होते. पंचमंडळी भेटायला आली होती तेव्हां म्हणालो की इथलं वातावरण घरी नेता आलं पाहिजे. तेव्हां श्री. आण्णासाहेब गाडगीळ म्हणाले, 'त्यात काय कठीण आहे? इथलं विश्वमन - Cosmic mind तिकडं नेलं की झालं!' मी पाहिलं आहे की

इथं आलो की आपण व्यवहारात उतरतो आणि परत खाली येतो. अद्यापि देहाच्या भूमिकेवरच असल्यामुळे हे घडते. मन त्या भूमिकेच्या वर गेलं पाहिजे.

**साधक प** : सगळ्या साधनात अहंकार आड येतो. जे काही करायचं ते 'मी' करायचं आहे असं वाटतं तोपर्यंत साधनात सूक्ष्मता येणार नाही. देहाच्या भूमिकेपलीकडे '**मी**' जायचं आहे. '**मी**' त्यांच्याजवळ मागायचं आहे. शरण '**मी**' जाणार आहे इत्यादि. आज जगात ज्या सुधारणा होत आहेत, जे शोध लागत आहेत त्यात देहाला अतिशय महत्त्व दिलं आहे. तथापि डॉ. सोनारांसारखी ज्याची दृढ श्रद्धा आहे त्याला साधन सोपे जाईल. त्यांनी सगळं काही हरीकाकांवर सोपवलं आहे. त्यामुळे ते निर्भय आहेत.

**पू. बाबा** : सध्या गीतेच्या पाचव्या अध्यायातील 'कायेन मनसा वाचा' हा श्लोक चालला आहे. ज्ञानेश्वर महाराज सांगतात की योग्यांच्या बाबतीत काया, वाचा आणि मन ही तीन्ही स्वतंत्रपणे कर्मे करतात. त्यासाठी त्यांनी दिलेली उदाहरणेही बहारदार आहेत.

**साधक प** : लहान मुलाचे हात पाय हलवणे मन आणि वाणीची साथ न घेता केवळ देहाकडून घडत असते. झोपेत देह आणि वाणी स्वस्थ असतात पण स्वप्न पडते तेव्हां मन कर्म करत असते आणि स्वप्नात माणूस सुखीदु:खी होतो. वेडा किंवा पिशाच्चबाधा झालेला माणूस बोलतो पण तेथे त्याचा देह व मन नसते. मला वाटते, शरीराला सवय लावता येईल, वाणीवर ताबा मिळवता येईल पण वासनेचा जोर इतका असतो की मन स्वाधीन करणे कठीण आहे आणि साधनातली ही मोठी अडचण आहे.

**पू. बाबा** : विचाराने हे करणे कठीण आहे म्हणून प्रेमाच्या मार्गाचा अवलंब करावा.

**साधक ज** : आज आपण संकुचित आहोत ते विशाल व्हायला पाहिजे. त्याकरता केवळ स्वत:चा, स्वत:च्या कुटुंबाचा विचार न करता इतरांचा विचार केला पाहिजे. त्यांच्यासाठी काहीतरी प्रत्यक्ष केले पाहिजे.

**साधक प** : तुम्ही म्हणता ते योग्यच आहे. पण दुसऱ्यासाठी, विशेषत: समाजकार्य करतांना एक धोका आहे. मी दुसऱ्यांसाठी जे काही करतो त्याची वाहवा (appreciation) व्हावी, लोकांनी चांगले म्हणावे अशी सूक्ष्म इच्छा राहाते आणि त्यातून अहंकार पोसला जातो.

**साधक क** : आणि तामसी किंवा राजसी अहंकार घालवणे एकवेळ सोपे आहे पण सात्त्विक अहंकार जाणे कठीण आहे.

## | ३७१ | (२० मे १९९४)

**पू. बाबा** : नुकतेच एक गृहस्थ आणि त्यांची बायको भेटायला आले होते. दोघेही साधनी आहेत. बेळगावच्या कलावती देवींजवळ ते दोघे सेवा करण्यासाठी बरीच वर्षे राहिले होते. त्या बाई सांगत होत्या की कलावती देवी विशेष शिकलेल्या नव्हत्या पण अनुभवाने समृद्ध होत्या. एकदा त्यांनी सांगितले की मी आता जाणार. या बाईंनी विचारले की कोठे जाणार? तेव्हां म्हणाल्या की जेथून आले तेथे जाणार. यावर बाईंनी विचारले की सिद्धारूढ स्वामींच्याकडे (त्यांचे गुरु) का? तेव्हां त्या म्हणाल्या, ते सांगायची परवानगी नाही. मग पुन्हा म्हणाल्या, ते कसे सांगता येईल? कृष्णमूर्तीही त्यांच्या अखेरच्या दिवसात असेच म्हणाले होते. खरोखर हे काहीतरी गूढ आहे. तथापि हे निश्चित की यात काहीतरी योजना आहे. ह्या जन्मी आपली भेट झाली ती आपातत: (by chance) झाली असे समजू नका. यापूर्वी आपण बरेचदा भेटलो आहोत आणि पुढे भेटणार आहोत. पण हे चक्र संपले पाहिजे. का जन्मोजन्मी हेच करीत राहायचे? आपले साधन चांगले का होत नाही? शक्ती कमी पडते वगैरे हे खरे नाही.

**साधक प** : परमार्थ समजून करायचा असला तरी बोलण्यापेक्षा करण्याला महत्त्व आहे. आणि जोपर्यंत 'मी' करतो हा भाव जात नाही तोपर्यंत खरे साधन होणार नाही.

**साधक क** : साधन करायचे म्हणजे आत उतरायचे आम्हाला माहिती नाही. क्वचित कधी आत उतरलो तरी ते कसे झाले हे समजत नाही. ते हुकमी झाले पाहिजे.

**पू. बाबा** : त्यासाठी नामाचे खरेपण ठसले पाहिजे. कसे ते सांगतो. डॉ. पाथरकर शेवटी आजारी झाले तेव्हां त्यांना मालाडला आणले होते. लिव्हरचा कॅन्सर असावा अशी त्यांना शंका होती. बायोप्सीत ते निदान नक्की झाल्यावर ते म्हणाले की शंका खरी ठरली! आपल्याला कॅन्सर झाला हे सहन होत नाही. बायोप्सीनंतर कॅन्सरचे खरेपण जसे ठसले तसे गुरूंनी नाम दिलेले असूनही त्याचा खरेपणा ठसत नाही.

**साधक प** : नाम शक्तिमय आहे. त्याच्या शक्तीची खात्री पटण्यासाठी, प्रचीति येण्यासाठी नामालाच, माझे साधन चांगले करून घे, विकार कमी कर वगैरे सांगावे. ते घडेल याबद्दल शंका नाही. पण तो प्रत्यक्ष अनुभव आला की साधनाला जोर येईल.

**।३७२।** (१० जून १९९४)

दि. २६ मे ते ३० मे हेबळ्ळीला चवथे नामसाधन अभ्यास शिबीर झाले. दि. ३ जूनला पू. बाबांना शिबीर व प्रवासाचा थकवा वाटत होता म्हणून भेटलो नव्हतो. आज गेलो तेव्हां ते खूप प्रसन्न दिसत होते.

**पू. बाबा** : हेबळ्ळीला नाम इतकं चांगलं झालं की परत आल्यावर मला तिथलीच स्वप्नं पडत होती. हेबळ्ळीहून श्री. दत्ताण्णांचा फोन आला होता. पुढच्या शिबिरात ध्यानासंबंधी सांगा असं ते म्हणाले. ध्यानासंबंधी पुष्कळांनी सांगितलेलं आहे. श्री. काका दीक्षित कृष्णमूर्तींची व्याख्याने ऐकून येत आणि त्याबद्दल श्रीमहाराजांना सांगत. त्यांच्या सांगण्यात काही वेळा घोटाळा असे. एकदा श्रीमहाराज म्हणाले, ते कृष्णमूर्तींचे म्हणून सांगतात त्यात खरोखरच कृष्णमूर्तींचे किती असते कोणास ठाऊक!

ध्यानाबद्दल एकदा मी श्रीमहाराजांना विचारले होते, तेव्हां ते म्हणाले की त्या Meditation शब्दाचा मूळ अर्थ मोजणे असावा म्हणून मी डिक्शनरी पाहिली तेव्हां मूळ लॅटिनमधे त्याच्या जवळपास अर्थ असल्याचे आढळले आणि श्रीमहाराजांच्या ज्ञानाने मी थक्क झालो. वास्तविक श्रीमहाराज चार यत्ताही शिकले नव्हते आणि पू. तात्यासाहेबही नॉनमॅट्रिक होते! पण जेथून ज्ञानाचा उगम होतो तेथे पोचलेल्याला अगम्य असे काय आहे?

श्रीमहाराज म्हणाले की साधन करून सांताने अनंताकडे जायचे आहे. सांतामधे अनंताचे काही गुण असल्याखेरीज ते शक्य नाही. शंकराचार्यांनीदेखील जीव हा शिवाचा अंश आहे असे म्हटले आहे. ध्यानामधे सांत हा अनंताच्याजवळ जात राहातो. प्रवाहातून तो पुढे पुढे जात असतो म्हणून हे पुढे जाणे मोजतांना ध्यान ही एक अवस्था येते. एका विषयावर सर्व चित्त गोळा करणे म्हणजे ध्यान असे विवेकानंदांनी म्हटले आहे. केवळ 'असणे' (Being) म्हणजे ध्यान असे कृष्णमूर्ती सांगतात आणि ते बरोबर आहे. कोरे 'असणे' आपल्याला माहीतच नाही.

गोंदवल्याला किंवा हेबळ्ळीला जसे श्रीमहाराजांचे अस्तित्व जाणवते, ते तिथे भरलेले आहेत हे जाणवते तसे ते घरी आल्यावर टिकले पाहिजे. दृश्याची खेच आपल्याला हळू हळू खाली आणते ते थांबवले पाहिजे. स्वामी रामदासांनी म्हटले आहे की त्यांनी सगुणाची पूजा केली नाही, ध्यान केले नाही, पण एकसारखे अगदी वेड्यासारखे म्हणाना, नाम घेतले पण त्याला साधक प

म्हणतात त्याप्रमाणे वैराग्याची पार्श्वभूमी होती. त्यांच्या कारखान्याला लागलेली आगदेखील ते मजेत पाहात बसले होते कारण त्यामागेही भगवंताचा हात आहे हे त्यांना जाणवले होते. तेथे जसे आपल्याला श्रीमहाराजांचे अस्तित्व जाणवते तसे घरी कां जाणवत नाही? नाना, तुम्ही सांगा.

**साधक** : आपण तिकडे जातो तेव्हां श्रीमहाराजांच्या घरी जात आहोत अशी जाणीव असते पण येथे मात्र 'मी' त्यांना 'माझ्या' घरी आणतो. वास्तविक ते सगळीकडे आहेत आणि ज्याला मी माझे घर म्हणतो ते त्यांचे घर आहे, पण असे वाटत नाही.

**पू. बाबा** : जेथे नाम तेथे मी आहे असे श्रीमहाराजांनी सांगितले आहे; तेव्हां नसती चिकित्सा सोडून एकसारखे त्यांना आवडते म्हणून नाम घ्यावे.

## **।३७३।** (१७ जून १९९४)

आम्ही गेलो तेव्हां पू. बाबांकडे चार-पाच वृद्ध माणसे येऊन बसलेली होती. ती गेल्यानंतर सुमारे साडेसहा वाजता पू. बाबांनी आम्हाला पुढे बोलावल्यावर त्यांच्या पाया पडून आम्ही बसलो.

**पू. बाबा** : आत्ता येऊन गेलेल्या माणसांपैकी खुर्चीत बसल्या होत्या त्या सर्वांत वृद्ध बाई पूर्वी हेडमिस्ट्रेस होत्या. त्यांनी विवाह केला नाही. आता ८० वर्षांच्या आहेत. धाकटी बहीण आणि मेहुणे त्यांना सांभाळतात. ब्लड प्रेशर, हार्ट ट्रबल, अल्सर, फ्रॅक्चर हे सगळे मित्र सोबतीला आहेत. जीवनाला कंटाळल्या आहेत. भिवंडीला जयवंत होते त्यांच्याकडून त्यांनी अनुग्रह घेतला होता. अशी माणसे पाहिली की वाटते की म्हातारपण फार कठीण आहे. देहदु:ख होऊ लागले की कसले नामस्मरण नी काय! तेव्हां आत्ताच काय ते करा. मी तर म्हाताराच आहे, पण तुम्हीदेखील On the verge (काठावर) आहात. मुळात आर्किटेक्ट पण पुढे Social philosopher झालेल्या एका अमेरिकन लेखकाने Transformation of Man नांवाचे पुस्तक लिहिलेले आहे. त्यात म्हातारपणाच्या स्थितीचे फार चांगले वर्णन केलेले आहे. त्यातून मार्ग कसा काढायचा ते मात्र त्याने सांगितलेले नाही. त्याचा तो विषयही नाही. देहाचा संबंध प्रारब्धाशी आहे आणि म्हणून देहाची कशीही अवस्था असली तरीही मनाने स्वस्थ कसे राहायचे ते केवळ संतच सांगू शकतात.

**साधक प** : देहाची स्थिती प्रारब्धाने ठरते आणि आज आमचे साधन देहाला धरूनच आहे. देह स्वस्थ नसला की साधन चांगले होत नाही. अशा

स्थितीत त्यातून बाहेर कसे पडता येईल? की साधनही आमच्या प्रारब्धानुसार शक्य तेवढे होणार?

**पू. बाबा** : साधनाचा संबंध मनाशी जास्त असल्यामुळे प्रयत्नाने मनाला अंतर्मुख करता येते. साधनाने ते साधावयाचे आहे. असे करतांना नामाची गोडी लागली की पुढे साधन कर म्हणून सांगावेच लागत नाही. ती गोडी केव्हां निर्माण होईल ते कसे सांगणार? ते सर्वस्वी भगवंताच्या कृपेवर अवलंबून आहे. पण येवढे खरे की अंतर्मुख झाल्याखेरीज परमार्थ नाही. त्यासाठी विवेक आणि वैराग्य आवश्यक आहेत. प्रपंचाचे स्वरूप ओळखून त्यात न गुंतणे हा विवेक आणि साधनाच्या आड येते ते सोडणे हे वैराग्य असे श्रीमहाराज म्हणत.

गेल्या महिन्यात हेबळ्ळीला गेलो होतो तेव्हां पू. बाबांना श्रीमहाराजांचे दर्शन झाले असे ऐकले होते म्हणून साधक ब यांनी पू. बाबांना त्याबाबत विचारले.

**पू. बाबा** : तिथे मी पादुकांच्या दर्शनाला गेलो तेव्हां पादुकांच्या मागे आणि श्रीमहाराजांची पाषाणाची मूर्ती ठेवलेली आहे त्या दोहोंच्या मधे श्रीमहाराज बसलेले होते. त्यांचा छातीपर्यंतचा भाग दिसत होता. श्रीमहाराज मला म्हणाले, तुम्ही आलात आणि बरोबर लोकांना घेऊन आलात हे फार चांगले झाले. श्रीमहाराजांशी बोलणे पुष्कळदा होते. तथापि आपण काही त्यांचे दर्शन व्हावे असे त्यांच्याजवळ मागितले नव्हते. तथापि दर्शन झाले याचे कारण, मला वाटते, तिथे रोज तीनदा निरूपणे, मधल्या वेळात लोकांशी बोलणे इत्यादी चालू असल्यामुळे त्या वातावरणाचा तो परिणाम असावा.

**साधक ज** : सत्पुरुषाचा सहवास असला की त्याच्याशी संवाद होतो. अडचणींची उत्तरे मिळतात. पण नामाची तशी संगत शक्य नाही. शिवाय नामाची संगत घडणे कठीणच आहे.

**साधक ब** : अंत:करण शुद्ध झाल्याखेरीज खरे नामस्मरण होणार नाही. आमच्या अंत:करणात पूर्वसंस्कारांचा दगड बनला आहे. तो फुटला पाहिजे. त्याखेरीज श्रीमहाराजांचे अस्तित्व जाणवणार नाही. मी प्रपंचात जे काही करतो म्हणतो ते किती क्षुल्लक होते हे ते घडून गेल्यानंतर लक्षात येते. जे वास्तविक प्रारब्धाने ठरलेले आहे त्याबाबतीत मी स्वत:ला कर्ता समजतो. आणि जे आज करायला पाहिजे ते (साधन) त्याने करून घ्यावे म्हणतो.

**पू. बाबा** : आयुष्य संपत आले. आता लगबग केली पाहिजे. आतातरी तळमळ लागली पाहिजे. आतून नाम सळसळून आले पाहिजे. नामामधेच

श्रीमहाराजांचे अस्तित्व आहे. ते जाणवण्यासाठी काही प्रमाणात स्वयंसूचनेचा उपयोग होईल. प्रत्येक गोष्ट त्यांना सांगून करण्याचा अभ्यासही उपयोगी पडेल. पण मुख्य म्हणजे ध्येयनिश्चिती झाली नाही म्हणून या सगळ्या अडचणी येतात.

**|३७४|** (२४ जून १९९४)

आज S.S.C. परीक्षेचा रिझल्ट लागल्यामुळे पू. बाबांकडे पास झालेले विद्यार्थी आणि त्यांचे पालक येत होते. त्यामुळे साडेसहा वाजल्यानंतर चर्चा सुरू झाली. साधक क साधक ब ना काही विचारत होते. पू. बाबांनी ते काय म्हणत आहेत म्हणून विचारले.

**साधक ब** : ते आपल्या परीक्षेचा निकाल काय म्हणून विचारताहेत.

**पू. बाबा** : ह्या अध्यात्ममार्गातील परीक्षेत परीक्षा देणारे आपण आहोत आणि परीक्षकही आपणच आहोत. ह्या परीक्षेची किती आणि कितपत तयारी आपण करतो आहोत याचा तुम्हीच विचार करा.

माझ्या वडिलांच्या मनाविरुद्ध मी आर्टस्‌ला गेलो आणि बी.ए.ला फिलॉसफी विषय घेतला म्हणून ते नाराज होते. घरची परिस्थिती चांगली असूनही बी.ए.च्या पुढे मी तुला शिकवणार नाही असे त्यांनी सांगितले होते आणि मला तर पुढे शिकायचे होते. त्यासाठी बी.ए.ला फर्स्ट क्लास मिळाला पाहिजे म्हणून मी रोज अठरा-अठरा तास अभ्यास करत होतो. आता त्याचे आश्चर्य वाटते. तसा आपण नामस्मरणाचा अभ्यास करतो आहो का? कसली परीक्षा देता? बरं, हा परीक्षकही आतच आहे आणि तो करप्ट (भ्रष्ट) नाही. तुमच्या चुका त्याला बरोबर समजतात. उगीच वैराग्याच्या गप्पा मारण्यात काय अर्थ आहे? वास्तविक आता सगळा संसार झाला आहे. परिस्थितीदेखील चांगली आहे. तरीदेखील उरलेले आयुष्य नामाला देणे जमत नाही. खरे म्हणजे मी आता का जगतो आहे याचे उत्तर नामाकरिता असे यावयास पाहिजे, तरच परीक्षेची तयारी सुरू झाली असे म्हणता येईल.

आपले सगळे अर्धवट आहे. धड विचार करीत नाही किंवा भाऊसाहेबांसारखे सर्वस्वी त्यांच्यावर सोपवून देत नाही. महाराज भेटले, माझं काम झालं असं वाटतं का? तसं खरोखर वाटलं तर काम झालं म्हणून समजा. पण तोपर्यंत प्रयत्न केलाच पाहिजे. खुंटीवरचा पंचा काढण्यासाठी उड्या मारल्याच पाहिजेत. तुकाराम महाराज म्हणाले, "याती हीन मती हीन कर्म हीन माझें। सर्व लज्जा सांडोनियां शरण आलों तुज॥" आपण जे काही बोलतो ते

वाचलेले, ऐकलेले असते. स्वत:चे विचार नसतातच, तर भाव कुठला? कारण काही ऐकले तर ते आपण आत जाऊ देत नाही. लगेच त्यावर आपली प्रतिक्रिया व्यक्त होते. ते थांबले पाहिजे. व्याख्यानाला आल्यावर कृष्णमूर्ती म्हणत I see ripples all around (मला सभोवती-विचारांच्या-लाटा दिसत आहेत) तसे करू नका; माझे सांगणे आत जाऊ द्या.

साधन समजून केले पाहिजे, नाहीतर स्वामी रामदासांसारखे नामाला घट्ट धरले पाहिजे. त्यांनी नामाचा धोशा लावला. तीही शक्ती आपल्यात नाही. साधन करावेसे वाटते पण ते होत नाही कारण, श्रीमहाराज म्हणत, हा सगळा अविद्येचा जोर आहे. खरी शरणागती शेवटी येते पण त्यासाठी आज प्रयत्नपूर्वक शरण गेले पाहिजे.

**साधक प** : साधन करू लागलो की त्यापासून आपल्याला काहीतरी पाहिजे असते, ते थांबले पाहिजे. मला अनुभव यावा ही इच्छादेखील नसावी.

## **।३७५।** (१ जुलै १९९४)

**पू. बाबा** : परवा एक साधक भेटायला आले होते. ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायात सांगितल्याप्रमाणे ते योगसाधना करतात. सुरुवातीला त्यांच्या छातीवर, पोटावर जखमा झाल्या होत्या. आता मानेवर झाल्या आहेत. त्यातून मधेच पाणी येते. ज्ञानेश्वरीत याचे वर्णन नाही. ते जालंधर बंध करतात तेव्हां त्यांचे जगाचे भान नाहीसे होते. याचे सहाव्या अध्यायात फार चांगले वर्णन आहे.

प्रशान्तात्मा विगतभी: ब्रह्मचारिव्रते स्थित:।
मन: संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्पर: ॥६.१४॥

ह्या श्लोकावरील टीकेत ज्ञानराज म्हणतात :

कल्पना निमे। प्रवृत्ति शमे। आंग मन विरमे। सावियाचि॥२१२॥
क्षुधा काय जाहाली। निद्रा केउती गेली।
हे आठवणही हारपली। न दिसे वेगां॥२१३॥

प्रशान्तात्मा विगतभी: - तो अतिशय शांत होतो आणि त्याची भीती नाहीशी होते. योग्याची ही जी स्थिती सांगितली आहे ती नामाने साधली पाहिजे.

पहिली गोष्ट म्हणजे कल्पना नाहीशी होते. नामाला बसले की डोक्यात नाना तऱ्हेच्या कल्पना येऊ लागतात; ते थांबले पाहिजे. तो कर्मे करील पण नाइलाज

म्हणून. त्यात त्याला कोणत्याही प्रकारचा रस राहाणार नाही. कल्पना म्हटले की भविष्यकाळ आला. सगळे जीवनच त्याच्यावर सोपवले की भविष्याचा विचारच राहात नाही आणि म्हणून कल्पना येत नाहीत. तसेच, कर्तेपण त्याच्याकडे दिल्यामुळे कर्माची प्रवृत्ती राहात नाही. तथापि जीवन त्याच्यावर सोपवणे जर वासना म्हणजे हवेनकोपण नाहीसे झाले तरच शक्य आहे. तसे झाले तरच भगवंताची एकमेव वासना सतत जागी राहील. त्यासाठी मी भगवंताचा भोग्य आहे, माझ्या माध्यमातून तो भोग घेतो आहे असा भाव ठेवावा.

**साधक प** : हे सगळे 'मी' करायचे आहे. 'मी' शरण जायचे, 'मी'वासना नाहीशा करायच्या, 'मी' अहंकार सोडायचा हा पेच आहे. हे विचाराचे कामच नाही.

**साधक ब** : सर्वात शेवटी हृदय थांबते. त्या हृदयात नाम स्थिर झाले पाहिजे. मला मान्य आहे की हे विचाराचे काम नाही. वास्तविक, श्रीमहाराजच सगळे करून घेतात हे समजते, पण तरीदेखील व्हावे तसे साधन होत नाही.

**पू. बाबा** : आत्ता सांगितलेल्या चवदाव्या श्लोकाच्या आधी म्हणजे तेराव्या 'संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन् ।' ह्या श्लोकावरील टीकेत ज्ञानेश्वर महाराजांनी म्हटले आहे की "नेत्रद्वारींचीं कवाडें। लागूं पाहती॥ २०२॥ वरिचिलें पातीं ढळती। तळींची तळीं पुंजाळती। तेथ अर्धोन्मीलित स्थिति। उपजे तया॥ २०३॥ दिठी राहोनि आंतुलेकडे। बाहेर पाउल घाली कोडें। ते ठायीं ठावो पडे। नासाग्र पीठी॥ २०४॥"

नामात मन रमले की पापण्या मिटू लागतात. दृष्टी खाली झुकते आणि पाहायचेच झाले तर नाकाच्या शेंड्यापलीकडे काही दिसत नाही. नामाच्या आनंदाने पापण्या जड होतात असे श्रीमहाराज म्हणाले. तुम्हाला कधी असा अनुभव आहे का?

**साधक ब** : नेहमीप्रमाणे नाम घ्यायला बसलो की काही वेळा नामस्मरण सुरू होण्यापूर्वीच आत जायला होते मग स्थलकालाचे भान राहात नाही. आणि ते भान आल्यावरही काही काळ गुंगीत जातो. केवढे उपकार आहेत महाराजांचे! तेच सगळे करून घेतात.

**साधक ग** : बराच वेळ नामस्मरण झाले की नाम थांबले तरी तसेच बसून राहावे असे वाटते. शरीर जड झालेले नसते. तरीपण त्याच स्थितीत राहावे असे वाटते

**साधक प :** नाम चांगले झाले की मन हलके होते. पण रोजच्या व्यवहारात उतरलो की ते परत जड होऊ लागते; इतकेच नव्हे तर नामाने मिळालेली शक्ती लगेच व्यवहारात खर्च झाल्याचे लक्षात येते.

**साधक ड :** दोन दिवस मी आजारी होतो. तथापि वैखरीने आणि मध्यमेत नाम चालू होते त्यामुळे आजाराचे काही वाटले नाही. ही खरोखर त्यांची कृपा आहे. संसारातले लक्ष कमी झाले आहे. खरोखर, श्रीमहाराजांनी किती केले आहे असे वाटते.

**पू. बाबा :** (साधक ब ना) कृतज्ञतेच्या भावाबद्दल तुम्हाला काय म्हणायचे आहे ?

**साधक ब :** खरोखर, त्यांनी इतके केले आहे आणि करताहेत की मी याची फेड कशी करणार? आज जे आहे ते त्यांच्यामुळे आहे.

**पू. बाबा :** पाहाता पाहाता आपण म्हातारे झालो. संसारातले तसे आता काही करायचे राहिलेले नाही. तेव्हां आता नामाचा धोशा लावला पाहिजे. मिळेल तो रिकामा वेळ नामाला दिला पाहिजे.

## **।३७६।** (८ जुलै १९९४)

**पू. बाबा :** आज सकाळीच मराठी रंगभूमीवरचे एक श्रेष्ठ नट भेटायला आले होते. त्यावेळी तुमची सर्वांची फार आठवण झाली. एवढा मोठा नट आणि दिग्दर्शक. संस्कृत भाषेचाही चांगला अभ्यास. शंकराचार्य, रामानुज इत्यादींचा अभ्यास केलेला आहे. अलिकडेच वयाच्या सत्तराव्या वर्षी त्यांना नाट्यशास्त्रावर डॉक्टरेट मिळाली आहे. पण इतके सगळे असूनही ते अतिशय अस्वस्थ आहेत. म्हणाले, घरात असून मी एकटा आहे. मी का जगतो आहे तेच कळत नाही. वास्तविक ते अक्कलकोटच्या स्वामी महाराजांचे भक्त आहेत. जप करतो म्हणाले पण म्हणाले की त्यांना एकही मित्र नाही सगळे निरर्थक वाटते. कशातही रस वाटत नाही. बसले होते तेव्हांही सारखी चुळबूळ चालू होती; स्वस्थपणा नव्हता. मला तेव्हां अस्तित्ववाद्यांचे (Existentialists) म्हणणे आठवले. आलबेअर काम्यूने त्याच्या लिखाणात मानवी जीवनातील एकाकीपणा, शून्यता आणि मृत्यूचा अटळपणा यांवर चिंतन केले आहे. तो म्हणतो You should end your life by committing suicide (माणसाने आत्महत्या करून आपल्या जीवनाचा शेवट करावा.) त्याने Philosophy of suicide (आत्महत्येचे तत्त्वज्ञान) अशी शब्दयोजना केली आहे. (एक पुस्तक

दाखवून) मला हे Great Intellectuals नांवाचे पुस्तक एकांनी वाचायला दिले आहे. यामधे रसेल, इब्सेन, शेली यांच्यासारख्या थोर विचारवंतांची चरित्रे आहेत. विचारवंत खरे, पण माणूस म्हणून ते किती क्षुद्र दिसतात. रसेल स्त्रैण होता तर इब्सेनला प्रसिद्धीची हाव होती. त्याच्यासंबंधी वर्तमानपत्रात आलेली लहानसहान कात्रणेदेखील तो जपून ठेवीत असे. ऑस्कर वाइल्डदेखील चंगीभंगी होता आणि त्याच्या जीवनाचा शेवट तुरुंगात काहीतरीच झाला. जी.डी. बिर्लांनी सांगितले की महात्मा गांधींनादेखील त्यांचे नांव रोज वर्तमानपत्रांच्या हेडलाइन्समधे यावे असे वाटत असे! याच्याउलट सत्पुरुषांचे जीवन असते. जवळ काहीही नसून ते समाधानात असतात. गीतेतील अमानित्व या गुणाबद्दल सांगतांना तेराव्या अध्यायात ज्ञानेश्वर महाराज म्हणतात :

"पूज्यता डोळां न देखावी। स्वकीर्ती कानीं नायकावी। हा अमुका ऐसी नोहावी। सेचि लोकां॥१८८॥ तेथ सत्काराची गोठी। कें आदरा देईल भेटी। मरणेंसीं साटी। नमस्कारितां॥१८९॥ वाचस्पतीचेनि पाडें। सर्वज्ञता तरी जोडे। परि वेडिवेमाजीं दडे। महिमेभेणें॥१९०॥"

**साधक प** : ह्या लोकांची जगात मोठे म्हणून कीर्ती झालेली असते. स्तुती ऐकायची त्यांना सवय झालेली असते. त्यांच्याभोवती जमलेले सगळे स्वार्थीच असतात आणि स्वार्थ साधेनासा झाला की ते दूर होतात. आणि मग उपेक्षेमुळे त्यांना जीवन भयाण वाटू लागते.

**साधक ब** : माझ्या नात्यातले एक डॉक्टर होते. स्तुतीसाठी ते अगदी हपापलेले असत.

**पू. बाबा** : खरोखर शुद्ध परमार्थ फार कठीण आहे. नागपूरचे एक डॉक्टर इथल्या सरकारी हॉस्पिटलमधे युरॉलॉजिस्ट आहेत. नुकतेच ते त्यांच्या वडिलांना घेऊन भेटायला आले होते. वडील सुमारे पाऊणशे वर्षांचे आहेत. त्यांनी गोंदवल्याला जाऊन अनुग्रह घेतला. अनुग्रहानंतर सभामंडपात जप करत बसले होते तेव्हां त्यांच्या मनात विचार आला की आपण जप करतो तेव्हां श्रीमहाराजांनी आपल्याजवळ असावे. नंतर जप करतांना मी जवळच आहे असा आवाज त्यांच्या कानी आला. जवळ कोणीच नव्हते. हा अनुभव खरा की केवळ भास, आपल्या मनाचा खेळ आहे अशा विचारातच त्या रात्री ते झोपले. झोपेत त्यांना श्रीमहाराजांची प्रसन्न मूर्ती दिसली. तोही भास होता की खरोखरच श्रीमहाराजांनी मला दर्शन दिले असे त्यांनी मला विचारले. मी त्यांना

म्हणालो की मी जरी तो भास नव्हता असे तुम्हाला सांगितले तरी जोपर्यंत तुमची श्रद्धा नाही तोपर्यंत संशय राहाणारच. तो जाणार नाही. कारण माणसाची दृश्यावर म्हणजेच स्थूलावर जशी श्रद्धा बसते तशी सूक्ष्मावर नाही.

**साधक क :** मागे मी पू. तात्यासाहेबांच्या डायरीत दिलेली एक हकिगत सांगितली होती. श्री. वामनराव आपटे आजारी असतांना त्यांची पत्नी श्रीमहाराजांना भेटायला आली होती. रामाच्या कृपेने वामनरावांना बरे वाटेल म्हणून श्रीमहाराजांनी सांगूनही ती उठेना म्हणून मग श्रीमहाराजांनी तिच्या कपाळाला कुंकू लावले तेव्हां ती उठली. (पहा : अध्यात्म संवाद भाग २ संवाद क्र. १५५) कृतीपेक्षा शब्द सूक्ष्म आहे. त्यावर श्रद्धा बसणे जास्त अवघड आहे.

**पू. बाबा :** त्या डॉक्टरांची एक गंमत सांगतो. त्यांनी सांगितले की दर सोमवारी पैसे न घेता ते लोकांना भविष्य सांगतात आणि ते खरे ठरते. मी त्यांना हे कशासाठी करता म्हणून विचारले. इतकेच नव्हे तर समर्थांनी अशा माणसांची पढतमूर्खात गणना केलेली आहे म्हणून सांगितले. पण ते जाऊ द्या. आपले साधन चांगले का होत नाही ते सांगा; की आपणही पढतमूर्ख आहो.

**साधक प :** माझी अडचण मी तुम्हाला सांगितली. एकसारखी सावधानता ठेवण्यास आणि नाम धरून ठेवण्यास लागणारी मनाची शक्ती कमी पडते. शिवाय नामस्मरणामुळे जी काही थोडी शक्ती साठते ती व्यवहार चांगला होण्यात खर्च होते.

**साधक ज :** खरे म्हणजे आम्ही आळशी विद्यार्थी आहोत. अभ्यास न करता फर्स्ट क्लास मिळावा असे आम्हाला वाटते.

**साधक प :** सर्व काही श्रीमहाराज करतात ही जाणीव सर्वकाळ राहात नाही. दिवस फुकट चालले आहेत याची जाणीव नाही.

**साधक ब :** मनासारखे साधन होत नाही आणि प्रयत्न करून ते होणारही नाही. अशा स्थितीत त्यांची करुणाच काम करेल.

**पू. बाबा :** त्यांची करुणा आणि कृपा आहेच. त्यामुळेच आज साधन होत आहे. त्यांची कृपा आजही आहे. ती समजायला आपले मन पुरेसे सूक्ष्म आणि संवेदनशील झाले पाहिजे. सगळेच अनुभव काही शब्दांनी सांगता येत नाहीत. तथापि नामस्मरण करतांना देहाचा विसर पडणे हा मोठा अनुभव आहे. तुकाराम महाराजांनी म्हटलेली ती प्रेमखूण आहे.

**साधक क :** श्रीमहाराज सांगत, साधन असे पाहिजे की डोळे मिटले की जग नाहीसे झाले पाहिजे.

**।३७७।** (१५ जुलै १९९४)

काल संध्याकाळी टी.व्ही.वर 'ज्ञानदीप' मधे श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराजांवर कार्यक्रम झाला. या कार्यक्रमात श्रीमहाराजांचे तत्त्वज्ञान आणि त्यांची वैशिष्ट्ये यासंबंधी पू. बाबांनी सांगितले होते. कदाचित त्यामुळे असेल, पण आज पू. बाबांकडे बरीच माणसे आलेली होती. त्यामुळे साडेसहानंतर आम्ही पू. बाबांच्या पाया पडून बोलण्यास बसलो.

आधी भेटलेल्या मंडळींपैकी कांहींच्या प्रापंचिक दु:खांच्या संदर्भात पू. बाबा म्हणाले की आपली दु:खं नि:संकोचपणे दुसऱ्याला सांगावीत असं वाटायला ऐकणारा नि:स्वार्थी पाहिजे. असा सत्पुरुष मिळणे विरळा. श्रीमहाराजांना माणसं आपली दु:खं मोकळेपणानं सांगत आणि श्रीमहाराजांच्या शब्दांनी त्यांना धीर येत असे. त्या लोकांना जशी श्रद्धा होती, तशी श्रद्धा पाहिजे. त्याबाबतीत आपण कमी पडतो म्हणून श्रद्धा वाढवली पाहिजे.

**साधक प :** सध्याच्या काळात मेंदूला फार महत्त्व आले आहे. त्या मानाने भावनेचे पोषण होत नाही. पण यावर देखील जास्त चिंतन करण्यात अर्थ नाही.

सध्या ज्ञानेश्वरीचा पाचवा अध्याय चालू आहे. त्यातल्या 'ज्ञानियाच्या हन ठायीं। याची मातुही कीर नाही। देहीं देहभावो जिहीं। स्ववश केले॥५.२३.१२९॥' या ओवीतील 'देहीं देहभावो जिहीं। स्ववश केले॥' याचा पुन्हा अर्थ सांगतांना पू. बाबा म्हणाले, देहीं ही सप्तमी आहे. म्हणजे देहात असतांनाच हे 'प्राक्शरीर विमोक्षणात्' साठी आहे. स्ववश केले म्हणजे ताब्यात ठेवले. त्यांनी देहवृत्तींवर ताबा मिळविला.

**साधक ब :** आधी देहभाव स्ववश होतात आणि मग आत्मज्ञान होते की याच्या उलट होते. तसेच एखाद्या वृत्तीवर तात्पुरता ताबा मिळवला, आनंद झाला, पण पुन्हा पहिल्यासारखी स्थिती झाली असे काही काळ तरी होत असले पाहिजे. आणि असा अभ्यास होता होता वृत्तींवर पूर्ण ताबा येत असावा. तसेच 'जिहीं स्ववश केले' म्हणतांना त्यांच्या कर्तृत्वावर भर आहे. तेव्हां हे प्रयत्नसाध्य आहे की हे त्याच्या कृपेशिवाय घडणार नाही?

**पू. बाबा :** माणसाला जेवढे स्वातंत्र्य आहे तेवढ्या स्वातंत्र्याच्या मर्यादेत प्रयत्न हवाच; पण त्याचबरोबर हे केवळ माझ्या प्रयत्नाने साध्य होणार नाही याचीही जाणीव हवी.

नंतर ज्ञानेश्वर महाराज, एकनाथ महाराज इत्यादी महाराष्ट्रीय संतांच्या गुरुभक्तीबद्दल बोलणे निघाले. या संतांच्या ग्रंथांतील गुरुभक्तीची वर्णने काढून टाकली तर त्या ग्रंथांचा आत्माच नाहीसा होईल असे पू. बाबा म्हणाले.

गुरुभक्तीप्रमाणे संतांनी सत्संगतीलाही महत्त्व दिले आहे. एकदा श्री. काकासाहेब (ग.वि) तुळपुळ्यांनी पू. बाबांना विचारले की सर्व संत सत्संगतीची महती सांगतात पण तुकाराम महाराजांना कोठे सत्संग मिळाला होता? पू. बाबांना उत्तर सुचले नाही म्हणून नंतर त्यांनी श्रीमहाराजांना (पेटीवर) तो प्रश्न विचारला. श्रीमहाराज म्हणाले, असे का म्हणता? त्यांना नामाचा संग नाही का घडला? त्यापेक्षा श्रेष्ठ सत्संग कोणता? नंतर पू. बाबांनी हे श्री. काकासाहेबांना सांगितले तेव्हां त्यांचेही समाधान झाले. (पहा : अध्यात्म संवाद भाग १ संवाद क्र. ८३) ही हकिगत सांगून पू. बाबा म्हणाले, आपल्याला नामाची संगत वाटते का? ती वाटली पाहिजे.

## |३७८| (२२ जुलै १९९४)

आज सकाळच्या निरूपणात पू. बाबांनी "विठ्ठल सोयरा सज्जन सांगाती।" हा तुकाराम महाराजांचा अभंग घेतला होता. हा त्यांचा आवडता अभंग आहे. पूर्ण अभंग असा :

विठ्ठल सोयरा सज्जन सांगाती। विठ्ठल या चित्तीं बैसलासे॥ १॥
विठ्ठलें हें अंग व्यापिली ते काया। विठ्ठल हे छाया माझी मज॥ २॥
बैसला विठ्ठल जिव्हेचिया माथां। न वदे अन्यथा आन दुजें॥ ३॥
सकळां इंद्रियां मन हें प्रधान। तेहीं करीं ध्यान विठोबाचें॥ ४॥
तुका म्हणे या विठ्ठलासी आतां। न ये विसंबता माझें मज॥ ५॥

निरूपणानंतर बोलतांना पू. बाबा म्हणाले, तुकाराम महाराजांचा जसा विठ्ठल सांगाती झाला तशी श्रीमहाराजांची संगत म्हणजे Companionship झाली पाहिजे. 'विठ्ठल हे छाया माझी मज' विठ्ठल सावलीसारखा माझ्याबरोबर राहातो.

**साधक ग :** त्यापेक्षा इकडे पहावे तर मी तुकाराम आहे पण सावली पहावी तर ती तुकारामाची नसून विठ्ठलाची आहे असा अर्थ घ्यावा का?

**पू. बाबा :** हा अर्थ जास्त चांगला आहे कारण आधीच्या चरणात 'विठ्ठलें हें अंग व्यापिली ते काया' असे म्हटले आहे.

संध्याकाळी साडेचार वाजता परत पू. बाबांकडे गेलो तेव्हां ते म्हणाले, आज एका बाईंनी विचारले की नाम घेतांना भगवंताच्या अस्तित्वाची जाणीव

कशी ठेवावी? मला एकदम उत्तर सुचले. तो आहे (किंवा श्रीमहाराज आहेत) म्हणूनच तुम्ही त्याचे नांव घेता. पंचाईत अशी की आता तो नाही (किंवा श्रीमहाराज नाहीत) ही आपली कल्पना इतकी घट्ट झाली आहे की त्यातून आपण बाहेर पडत नाही. देहात असतांनाही लोकांनी मला ओळखले नाही असे श्रीमहाराजांनी म्हटले आहे. म्हणजे दृश्याच्या पलीकडे आपल्याला पाहाताच येत नाही. पण तेही खरे नाही. गणितासारख्या विषयात आपल्याला abstraction ची (अमूर्ताची) सवय आहे.

**साधक क** : श्रीमहाराजांनी त्यांच्या एका प्रवचनात म्हटले आहे की तुम्ही जेव्हां रामाचे नांव घेता तेव्हां तुमचा राम म्हणजे दशरथपुत्र रामच असतो. राम नांवाच्या दुसऱ्या कोणाचे ते स्मरण नसते.

**पू. बाबा** : तुकाराम महाराजांसारखा अभ्यासच केला पाहिजे. आजचा दिवस महत्त्वाचा आहे. आज तशी कमिटमेंट करावी.

## | ३७९ | (२९ जुलै १९९४)

**पू. बाबा** : ब्रदर लॉरेन्सच्या The Practice of the Presence of God मधे त्याने म्हटले आहे की तुम्ही देवाशी संभाषण करा. Conversation ला महत्त्व आहे. Thomas E. Powers नांवाच्या लेखकाने त्याच्या Invitation to a Great Experiment : Exploring the Possibility That God can be known (Garden city, Newyork : Doubleday 1979) मधेही ह्या मुद्दयावर भर दिला आहे. त्यामधील १९८३ मधे पुनर्मुद्रित केलेला लेख मला मिळाला आहे. त्यातला काही भाग तुम्हाला वाचून दाखवतो.

"The Practice of the Presence of God can be done anywhere by anyone who is not dead, crazy or asleep. It is direct; it is simple; it involves no theological intelletual difficulties; it produces genuine spiritual power; it really works."...

"What is the practice? How do you do it? You can find out by reading the book. But do not be deceived by its simplicity. Do not read it and be charmed by it and put it aside as so many do. Read it slowly, a little bit at a time, daily for six months. And practice it daily. Only by doing it can you begin to know WHAT the method is and How to do it."

"You will notice that the Practice of the Presence of God consists of three stages. The first stage is RECOLLECTION. Brother Lawrence teaches us simply to remember - not as philosophy but as living realization in the midst of our ordinary occupations - what is the true state of affairs: God is everywhere. We are continally in His presence. We know this, and yet we do not know it. We alternate between very brief periods of faintly remembering it and very long periods of utterly forgetting it. The practice of the Presence begins with rembering more often and more vividly and forgetting for shorter periods and less completely."

*"Acquire a habit of conversing often with God, and forget Him the least you can."*

*"Let it be your business to keep your mind in the Presence of the Lord. If it sometime wanders... the will must bring it back in tranquility."*

*"Let us thus think often that our only business in this life is to please God, and that all besides is perhaps but folly and vanity... let us begin in earnest; let us repair the lost time.."*

*"One way to recall the mind easily in time of prayer...is not to let it wander too far at other times...being accustomed to think of Him often, you will find it easy to keep your mind calm..."*

*"That useless thoughts spoil all : that the mischief began there, but that we ought to reject them as soon as we perceive their impertinence to the matter in hand or to our salvation, and return to our communion with God."*

"The second stage in Brother Lawrence's way to God is CONVERSATION. The first and second stages overlap; they are given in sequence here only for convenience. Recollection

of the Presence and conversation with God are mutually supporting acts."

*"That we should establish in ourselves a sense of God's Presence by continually conversing with Him. That it was a shameful thing to quit His conversation to think of trifles and fooleries."*

*"That in order to form a habit of conversing with God continually, and referring all we do to Him, we must at first apply to him with some diligence..."*

"Conversation, like recollection, seems simplicity itself - when you are merely reading about it. When you actually practice it, you discover that the simplicity is real all right but that it is a surface beneath which lie a great depth and a great power."

"Recollection of the Presence and Conversation with God together represent a critical turning point in the inner life of man. Nearly anyone can remember God and converse with Him, now and then. But when you are able to do it more often, and then still more often, a tremendous event is taking place in the soul. This is still a beginner's stage, but it is the beginning of the true life in God."...

"(1) Recollection of God and (2) Conversation with God, as taught in the simple, uncomplicated, authoritative terms of Brother Lawrence, represent an outlook and a technique which lead to the third and culminating stage of the practice of the Presence, the condition of (3) Sustained awareness."

"When you reach this point, your own efforts become so blended with the grace of God that you who once had to swim so hard now find yourself drifting with the current of God's love and you who tried with such difficulty to walk toward God now find yourself upheld and carried, constantly,

steadily, by an ever-present power. Knowledge of God and communion with God in the stage of sustained awareness are spontaneous, effortless, and rarely interrupted. The Presence is known and communed with under all kinds of circumstances."

("मेलेला, वेडा किंवा झोपलेला माणूस सोडून अन्य कोणालाही ईश्वराच्या सान्निध्याचा अभ्यास करणे शक्य आहे. तो सरळ सोपा अभ्यास आहे. त्यामध्ये कोणत्याही धर्मशास्त्रविषयक किंवा बौद्धिक अडचणी नाहीत. हा अभ्यास खरीखुरी आध्यात्मिक शक्ती निर्माण करतो. हा अभ्यास खरोखर परिणामकारक आहे."

"हा अभ्यास काय आहे? तो कसा करावयाचा? The Practice of the Presence of God हे पुस्तक वाचून ते तुम्हाला कळू शकते. पण ह्या पुस्तकाच्या सोपेपणामुळे फसू नका. पुष्कळजण करतात तसे मोहित होऊन केवळ मनोरंजनासाठी वाचून ते बाजूला ठेवू नका. दररोज थोडे असे सावकाश सहा महिन्यात ते वाचा आणि जे वाचले त्याचा दररोज अभ्यास करा. हे साधन काय आहे आणि ते कसे आचरणात आणावयाचे हे केवळ कृतीनेच समजू शकेल."

"तुमच्या लक्षात येईल की ईश्वराच्या सान्निध्याच्या अभ्यासाचे तीन टप्पे आहेत. स्मरण हा पहिला टप्पा आहे. ब्रदर लॉरेन्स आपल्याला केवळ स्मरण करावयाला सांगतो - तत्त्वज्ञान म्हणून नव्हे, तर आपल्या दैनंदिन कर्मातला जिवंत अनुभव म्हणून - कारण ती आपली खरी स्थिती आहे. ईश्वर सर्व ठिकाणी आहे. आपण निरंतर त्याच्या सान्निध्यात आहोत. हे आपल्याला माहीत आहे आणि तरी माहीत नाहीही. थोडा वेळ त्याचे मंद स्मरण होते आणि बराच काळ आपण त्याला पूर्णपणे विसरून जातो. वरचेवर आणि दीर्घ काळ त्याचे तीव्रतेने स्मरण करणे आणि अल्प काळ काही प्रमाणात (पण पूर्ण नव्हे) त्याचा विसर पडणे येथून ह्या सान्निध्याच्या अभ्यासाची सुरुवात होते."

*"वरचेवर भगवंताशी संभाषण करण्याची सवय लावून घ्या आणि शक्यतो त्याला विसरू नका.*

*आपले मन भगवंताच्या सान्निध्यात गुंतवण्याचा प्रयत्न असू द्या. काही वेळा मन भरकटले तर त्याला दृढ निश्चयाने पुन्हा शांत करा.*

*आपण पुन्हा पुन्हा असा विचार करावा की ईश्वराला प्रसन्न करणे हे आपले खरे कर्तव्य असून बाकीच्या सर्व गोष्टी म्हणजे वेडेपणा आणि पोकळ दिमाख आहे...*

*आपण पुन्हा मोठ्या उत्सुकतेने सुरुवात करू आणि वाया गेलेल्या काळाची भरपाई करू... प्रार्थनेच्या समयी मन सहज एकाग्र करण्याचा मार्ग म्हणजे... अन्य वेळी मनाला इकडे तिकडे फार भरकटू देऊ नये... वरचेवर भगवंताचा विचार मनात बाळगण्याची सवय झाली की तुम्हाला मन शांत ठेवणे सोपे जाऊ लागेल...*

*बाष्कळ विचार सगळे नासून टाकतात. आपल्या स्मरणाच्या अथवा मुक्तीच्या कार्यात उद्धटपणे शिरून खोड्या काढण्याचा विचारांचा प्रयत्न लक्षात येताच त्यांना दूर सारून आपण ईश्वराशी सख्य जोडण्यासाठी पुन्हा वळले पाहिजे."*

"ईश्वराकडे जाण्याच्या ब्रदर लॉरेन्सच्या मार्गातील दुसरा टप्पा ईश्वराशी संभाषण किंवा संवाद हा आहे. वास्तविक पहिला आणि दुसरा टप्पा एकमेकात मिसळलेले आहेत; केवळ सोयीसाठी येथे ते विशिष्ट क्रमाने दिलेले आहेत. भगवंताच्या सान्निध्याचे स्मरण आणि त्याच्याशी संभाषण हे परस्परांना मदत करणारे आहेत."

*"ईश्वराशी एकसारखे संभाषण करून आपण त्याच्या सान्निध्याचा भाव हृदयात स्थिर करावा. क्षुल्लक आणि मूर्खपणाच्या गोष्टीत गुंतून त्याच्याशी चाललेले संभाषण थांबवणे ही लाजिरवाणी गोष्ट आहे. ईश्वराशी सतत संभाषण करण्याची सवय करण्यासाठी आणि प्रत्येक गोष्टीचे त्याला निवेदन करण्यासाठी आपण परिश्रमपूर्वक अभ्यास केला पाहिजे."*

"केवळ वाचन करत असतांना स्मरण आणि संभाषण दोन्ही सोपे आहे असे वाटते. पण जेव्हां तुम्ही प्रत्यक्ष अभ्यास करू लागता तेव्हां लक्षात येते की ह्या वरवर दिसणाऱ्या सोपेपणाखाली फार गूढ शक्ती दडलेली आहे."

"ईश्वराच्या सान्निध्याचे स्मरण आणि त्याच्याशी संभाषण हा माणसाच्या आंतरिक जीवनात बदल घडवून आणणारा महत्त्वाचा बिंदु आहे. भगवंताचे अधून मधून स्मरण करणे आणि क्वचित त्याच्याशी बोलणे हे कोणीही करू शकतो. पण तुम्ही ते वरचेवर आणि वारंवार करू लागलात की हृदयामध्ये प्रचंड परिवर्तन होऊ लागते. अजूनही ही केवळ नवशिक्याचीच अवस्था असते. तथापि ईश्वराला समर्पित केलेल्या खऱ्या जीवनाची ही सुरुवात होय."

"१) ईश्वराचे स्मरण आणि २) ईश्वराशी संभाषण ह्या सोप्या, गुंतागुंत नसलेल्या आणि ब्रदर लॉरेन्सने अधिकारवाणीने सांगितलेल्या दृष्टिकोनातून आणि तंत्राने ईश्वराच्या सान्निध्याच्या अभ्यासाचा तिसरा कळसाचा ३) अखंड अनुसंधानाचा टप्पा येतो.

जेव्हां तुम्ही या टप्प्यावर पोचता तेव्हां तुमचे प्रयत्न भगवंताच्या कृपेमध्ये एकरूप होऊन जातात आणि जे तुम्ही एके काळी मोठ्या कष्टाने पोहत होता ते आता भगवत्प्रेमाच्या ओघात मजेने तरंगता आहात असे तुम्हाला आढळून येते. त्याचप्रमाणे जे तुम्ही मोठ्या कष्टाने भगवंताकडे चालत होता त्या तुम्हाला सर्व काळ सन्निध असणाऱ्या सत्तेने उचलून घेतले आहे असे अनुभवास येते. अखंड अनुसंधानाच्या ह्या टप्प्यामध्ये ईश्वराचे ज्ञान आणि त्याच्याशी होणारे संभाषण विनाकष्ट आणि उत्स्फूर्त असते आणि त्यामध्ये क्वचितच खंड पडतो. कोणत्याही परिस्थितीत त्याच्या सान्निध्याची जाणीव आणि त्याच्याशी संपर्क टिकून राहातो.")

**पू. बाबा** : (उतारा वाचून झाल्यावर) मी ह्यावर जास्त विचार करू लागलो तेव्हां नाना, माझी ट्यूब लागली. तुकाराम महाराजांच्या कितीतरी अभंगांत त्यांचे पांडुरंगाशी संभाषण आहे. त्यांतले काही निवडक अभंग सांगतो. पहिला अभंग असा :

कामक्रोध माझे लावियेले पाठीं। बहुत हिंपुटी झालों देवा॥ १॥
आवरिता तुझे तुज नावरती। थोर वाटे चित्तीं आश्चर्य हें॥ २॥
तुझिया विनोदें आम्हां प्राणसाटी। भयाभीत पोटीं सदा दु:खी॥ ३॥
तुका म्हणे माझ्या कपाळाचा गुण। तुला हांसे कोण समर्थासी॥ ४॥

काय गंमत आहे बघा! तुकाराम महाराज पांडुरंगाला म्हणताहेत की कामक्रोधादि विकार तू आमच्या मागे लावलेस. त्यांना आम्ही आवरू शकत नाही म्हणून तुझ्या पायाशी आलो; पण तुलाही ते आता आवरता येत नाहीत हे केवढे आश्चर्य आहे. देवा, तुमचा खेळ चालला आहे. विकार आवरता येत नसल्याचे तुम्ही नाटक करत आहात पण मधे आमचा जीव जातो आहे. तुम्हाला कोण नावे ठेवणार? पण माझे दुर्दैव ओढवले आहे. केवढी आळवणी आहे!

**साधक प** : विठ्ठलाशी भांडण करण्याइतकी जवळीक तुकाराम महाराजांनी साधली. त्यांनी सर्व काही त्याच्यावर सोपवले. विकार तू दिलेस ना? आता तूच ते काढ. एकदा तुझा म्हटल्यावर दोष नाहीसे करणे न करणे तुझ्या हातात!

**साधक ग** : 'तुका म्हणे जैसा तैसा तुझा दास।'

**साधक प** : माझ्या मनासारखे तुम्ही करा असे आपण श्रीमहाराजांना म्हणतो. प्रत्यक्ष म्हटले नाही तरी ते मनात असते. त्याच्या उलट ह्या अभंगात संपूर्ण शरणागती आहे.

**पू. बाबा** : आता हा दुसरा अभंग पहा :

तुम्हां आम्हां तुटी होईल यावरी। ऐसें मज हरी दिसतसे॥ १॥
वचनाचा कांहीं न देखों आधार। करावा हा धीर कोठवरी॥ २॥
सारिलें संचित होतें गांठी कांहीं। पुढें ऋण तेंहीं नेदी कोणी॥ ३॥
जावेंचि न लगे कोणाचिया घरा। उडाला पातेरा तुझ्या संगें॥ ४॥
तुका म्हणे आम्हां हाचि लाभ जाला। मनुष्यधर्म गेला पांडुरंगा॥ ५॥

तुझ्या नादाला लागून प्रपंचाचे वाटोळे झाले आणि लोकांमधली पत जाऊन माणुसकीही गेली! आता तुझी संगत कशासाठी ठेवायची?

**साधक क** : तुलसीदासांच्या विनयपत्रिकेत अशाच प्रकारची गोड पदे आहेत.

**पू. बाबा** : ह्या अभंगातली तळमळ पहा.

**साधक क** : श्रीरामकृष्णांचीही साधन काळात अशी अवस्था झाली होती.

शेवटी मान कापून घ्यावी म्हणून कोयता घेऊन ते आईसमोर (कालीमातेसमोर) उभे राहिले आणि तत्क्षणी आईने त्यांना दर्शन दिले!

**पू. बाबा** : हा आणखी एक अभंग पाहा :

मोक्षाचे आम्हांसी नाहीं अवघड। तो असे उघड गांठोळीस॥ १॥
भक्तीचे सोहळे होतील जीवासी। नवल तेविशीं पुरवितो॥ २॥
ज्याचें त्यासी देणें कोण तें उचित। मानूनिया हित घेतो सुखें॥ ३॥
तुका म्हणे सुखें देईं संवसार। आवडीसी थार करी माझे॥ ४॥

तुकाराम महाराज म्हणतात की मोक्षाचे आम्हाला विशेष नाही; तो तर आमच्या पदरात आहेच. तथापि आम्हाला तुझ्या भक्तिप्रेमाचे सुख पाहिजे. ही ज्ञानी पुरुषाची भक्ती आहे.

**साधक ग** : म्हणूनच ज्ञानेश्वर महाराजांनी भक्तीला मोक्षाच्याही वरचा पंचम पुरुषार्थ म्हटले आहे.

**पू. बाबा** : अशा प्रकारे आपण भगवंताशी किंवा आपल्या गुरूंशी संबंध जोडला, प्रत्येक गोष्टीत त्यांचे अनुसंधान ठेवता आले तर प्रथम ध्येयाची निश्चिती होईल. संशय राहाणार नाहीत आणि आपले जीवन त्यांच्या सत्तेने

चाललेले आहे याचा पदोपदी अनुभव येईल. यासाठी लॉरेन्सने सांगितल्याप्रमाणे आपल्या गुरूंच्या सान्निध्याचा अभ्यास केला पाहिजे. त्या दृष्टीने त्याने सांगितलेल्या स्मरण, संभाषण आणि अखंड अनुसंधान या तीन पायऱ्या महत्त्वाच्या आहेत.

## |३८०| (५ ऑगस्ट १९९४)

**पू. बाबा :** शिव हा आदिगुरु आहे. रामही त्याचेच चिंतन करतो. नाथपंथात तो आदिनाथ आहे. ज्ञानेश्वर महाराजांनी ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायात म्हटले आहे-

तरि श्रद्धावस्तूसि आदरु। करिता जाणिजे प्रकारु।
जरी होय श्रीगुरु। सदाशिवु॥ १२.२१६॥

म्हणजे जर भगवान शंकर सद्गुरु प्राप्त झाले तरच श्रद्धावस्तूचा म्हणजे माझ्यावरील परमप्रेमवस्तूचा आदर कशा प्रकारे केला पाहिजे हे जाणता येते. श्रीकृष्ण सांगत आहे की शंकराने त्याच्या परमप्रेमाचा विषय जो विष्णु त्याच्या चरणाचे तीर्थ म्हणजे गंगा आपल्या शिरावर धारण करून विष्णूविषयीचे आपले प्रेम व्यक्त केले आहे. पण ते राहू दे.

पॉंडीचरीच्या मदरचे एक पुस्तक आहे. नुकतेच त्याच्या मराठी भाषांतराचे हस्तलिखित एका गृहस्थांनी पहायला आणून दिले. मी मूळ पुस्तकही पूर्वी पाहिलेले नव्हते. ह्या पुस्तकात मदरने म्हटले आहे की अतिमानव (Supraman) होण्याच्या मार्गातील मुख्य अडचण disharmony म्हणजे विरोध किंवा सुसंवादाचा अभाव हे आहे. वास्तविक जीवनात विरोध नाही; पण माणसाने तो निर्माण केला आहे. हा विरोध नाहीसा होऊन अविरोध किंवा सुसंवाद कसा निर्माण करता येईल?

**साधक प :** खरोखरच निसर्गात विरोध नाही. झाडे, प्राणी, नद्या, डोंगर इत्यादींमध्ये विरोध नाही. भूक लागली की वाघ हरिणाची शिकार करतो पण त्याच्या मनात हरिणाबद्दल द्वेष नसतो. निसर्गातले बायॉलॉजिकल (जैविक) नियम, केमिकल (रासायनिक) नियम ठरलेले आहेत तसेच घडते. माणसाचीही गोष्ट तशीच आहे. शरीराला होणारे आजारदेखील शरीराच्या नियमानुसार होतात. पण आपल्या काहीतरी अपेक्षा असतात, स्वार्थ असतो आणि त्यानुसार अमुक घडावे, तमुक घडू नये असे वाटते आणि त्यामधून मग विरोध निर्माण होतो. म्हणजे संघर्षाचे मूळ माझ्या आत आहे. वास्तविक ह्या जगातून

जातांना आपल्याला काहीही नेता येत नाही हे प्रत्येकाला माहीत असूनही आणखी आणखी मिळवण्याचा हव्यास जात नाही. म्हणजे जे माहीत आहे त्यापासून आपण काहीही शिकत नाही.

**साधक ब** : आपले सगळे ज्ञानच भेदाने होते आणि भेदातून विरोध निर्माण होतो.

**साधक क** : ज्ञान भेदाने होते हे खरे आहे पण त्यामुळे विरोध निर्माण होईलच असे नाही. उदाहरणार्थ, दगड आणि पुस्तक यांचे ज्ञान त्यांच्यामधील भेदामुळेच होणार पण त्यामुळे विरोध येणार नाही.

**पू. बाबा** : भेदाने होणारे ज्ञान म्हणजे केवळ वस्तूंमधील भेद नव्हे. मुख्यत: मी आणि जग हा भेद निर्माण झाला की मीदेखील या जगाचाच भाग आहे हे माणूस विसरतो. दृश्यातले सगळे ज्ञान भेदावर आधारलेले असते. आपण विरोध म्हणतो तेव्हां माणसांमाणसांमधला, वस्तूंवस्तूंमधला विरोध येतो. जगात केवळ घटना घडत असतात. त्यांना चांगल्या वाईटाचा अर्थ आपण देतो. आत्मज्ञानाची गोष्ट वेगळी. ते तादात्म्याने होणारे ज्ञान असते.

**साधक ब** : शर्ली मॅक्लीनने म्हटल्याप्रमाणे **The world is mathematically perfect** हे जर मान्य झालं तर विरोध राहणार नाही.

**साधक ग** : आपण गोंदवल्याला तुकाराम महाराजांचा एक अभंग सांगितला होता. ''निर्वैर व्हावें सर्व भूतांसवें। साधन तें बरवें हेंचि एक॥' आपण बोलतांना महाराजांची इच्छा म्हणतो पण तसे म्हणतांनादेखील आपण काहीतरी मागत असतो. बोलून दाखवलं नाही तरी अमुक व्हावं अशी इच्छा असतेच.

**साधक ज** : विवेक आणि वैराग्य यांच्याखेरीज मागणे थांबणार नाही. जेथे आवश्यकता नाही तिथले लक्ष काढून घेतले पाहिजे.

**पू. बाबा** : आहे त्यात समाधान ठेवणे हा वैराग्याचा मुकुटमणि आहे असे श्रीमहाराजांनी म्हटले आहे. आपले काय होते की आपण नको तितके लक्ष संसारात देतो. ते कमी झाले पाहिजे. त्यासाठी आज जो आपला प्रपंचाचा पॅटर्न - घाट - झाला आहे तो बदलला पाहिजे. मी लक्ष दिले नाही तर कसे होईल असे आपल्याला उगीचच वाटते. त्यासाठी १) एक म्हणजे विचारपूर्वक अनावश्यक गोष्टी बाजूला सारून साधनावर लक्ष केंद्रित केले पाहिजे. नाहीतर २) एकसारखे म्हणजे अखंड नामस्मरण केले पाहिजे. एकसारखे म्हणजे किती ? प्रपंचात कर्म करावे लागणारच. पण ते करतांना केव्हां एकदा नामाला बसतो असे झाले पाहिजे. मला आठवते, नामदार गोखल्यांना Budget

speech (अंदाजपत्रकाचे भाषण) तयार करायचे होते. त्यांचे भाषण इतके उत्कृष्ट असे की ते ऐकायला व्हाइसरॉय येऊन बसत असे. तेव्हां ते भाषण तयार करत असतांना त्यांना कोणीतरी दुसरे महत्त्वाचे काम घेऊन भेटायला आला. नाइलाज म्हणून ते भेटले पण काय ही कटकट म्हणून परत आपल्या कामाला लागले. तसे केव्हां नामस्मरणाला बसतो असे झाले पाहिजे.

ह्या दोन मार्गांपैकी दुसरा मला सोपा वाटतो. अर्थात तसा तो सोपा नाहीच. असे वाटले पाहिजे की हा जन्म नामाला दिला.

आणखी असे पहा की आपण नाम घेतो ते आपल्यासाठी घेतो. मला महाराज भेटावे, मला ज्ञान व्हावे असा त्यात 'मी' असतो. त्यापेक्षा भाऊसाहेबांचे पहा! नाम का घेता? तर स्वारींना आवडते म्हणून! म्हणजे खऱ्या अर्थाने माझी अशी कोणतीही इच्छा राहिलेली नाही. हा खरा अविरोध. ही स्थिती फार चांगली आहे.

## |३८१| (१२ ऑगस्ट १९९४)

**पू. बाबा :** काल कुर्ल्याहून एक बाई त्यांच्या मुलीसह भेटायला आल्या होत्या. ह्या बाईंचे इंदूरला भक्तराज नांवाचे गुरु आहेत. त्यांनी तिला नाम दिले. नामस्मरण करतांना देवाच्या अस्तित्वाची जाणीव कशी ठेवावयाची ही त्यांची अडचण होती. आपल्या गुरूंना त्यांनी ही अडचण विचारल्यावर ते म्हणाले की देवाचे अस्तित्व राहू दे तू नामाच्या अस्तित्वाचा अभ्यास कर. त्यासाठी नामाला तू आपल्या मुलाच्या जागी मान आणि लहान मुलाचे जसे लालनपालन करतात तसे नामाचे कर. गुरूंनी सांगितले त्यावेळी बाईंना मूलबाळ नव्हते. गुरूंचे हे सांगणे त्यांच्या मनात रुजले आणि लहान मुलाचे सकाळी उठल्यापासून ते रात्री निजेपर्यंत जसे संगोपन करावे तसे त्या नामाचे संगोपन करू लागल्या. काही दिवसांनी आपल्याला दिवस गेले आहेत आणि आपण नामाला जन्म देणार आहोत असे वाटत होते असे त्या म्हणाल्या. मी त्यांना विचारले की नामाच्या प्रेमामुळे स्तनातून दूध येईल असे कधी वाटले का? असे कधी वाटले नाही असे त्या म्हणाल्या. मी तुम्हाला विचारतो की त्या बाईंनी जसे नामाला मुलाचे रूप दिले तसे आपल्याला नामाला श्रीमहाराजांचे रूप देऊन नामात श्रीमहाराज का पाहाता येऊ नयेत? आता श्रीमहाराज नाहीत अशी आपली भावना घट्ट झाली आहे त्यामुळे असे होत असावे का? श्रीमहाराजांचे अस्तित्व आपल्याला कसे जाणवते?

**साधक** : मध्यंतरी एका रविवारी सकाळी निरूपण सुरू करण्यापूर्वी आपण श्रोत्यांना म्हणालात की येथे निरूपणाला येतांना तुम्ही श्रीमहाराजांना म्हणजे आपल्या गुरूंना घेऊन येत जा; मी येथे त्यांना घेऊन येतो. ते लक्षात ठेवून नंतरच्या रविवारी घरून श्रीमहाराजांना नमस्कार करून निघतांना मी त्यांना म्हणालो की महाराज, मी निरूपण ऐकायला चाललो आहे, तुम्ही माझ्याबरोबर या. तेव्हां आतून मला श्रीमहाराजांचे उत्तर आले की 'नाम घे म्हणजे मी तुझ्याबरोबरच आहे.'

**पू. बाबा** : ही त्यांच्या अस्तित्वाचीच खूण आहे. मला नामात पहा असे त्यांनी सांगितले आहे.

**साधक ग** : नामाचे मूल म्हणून संगोपन करण्यात ब्रदर लॉरेन्सने भगवंताच्या सान्निध्याचा अभ्यास करण्यासाठी सांगितलेल्या १) स्मरण २) संभाषण आणि ३) अखंड अनुसंधान या तीन्ही गोष्टींचा समावेश आहे.

हे बोलणे चालू असतांना पनवेलचे एक जैन सराफ व त्यांची काही मंडळी आली आणि विषय अर्धाच राहिला. हे सराफ पार्श्वनाथ, गणपती आणि श्रीमहाराज यांचे भक्त आहेत. या तीन्हींची ते रोज पूजा करतात. त्यांनी त्यांच्या उपासनेबद्दल पू. बाबांना बरेच सांगितले. त्यांनी सांगितलेली एक हकिगत येथे देत आहे.

ह्या गृहस्थांच्या तीन-साडेतीन वर्षांच्या नातवाचे हर्नियाचे ऑपरेशन करावयाचे ठरले. इतक्या लहान मुलाचे ऑपरेशन म्हणून त्यांना काळजी वाटत होती. हॉस्पिटलमध्ये गेल्यावर मनोमन श्रीमहाराजांना नमस्कार करून त्यांनी सांगितले की आता नातू तुमच्या ताब्यात आहे. पुढे मुलगा बरा झाल्यावर घरी ते आरती करत असतांना तो मुलगा येऊन त्यांच्या मांडीवर बसला. तेथे श्रीमहाराजांचा फोटो होता तो पाहून हा फोटो कोणाचा म्हणून त्याने विचारले. हा श्रीमहाराजांचा, माझ्या गुरूंचा फोटो आहे म्हणून सांगितल्यावर तो म्हणाला की हॉस्पिटलमधे हेच माझ्या डोक्याजवळ बसलेले होते!

## | ३८२ | (१९ ऑगस्ट १९९४)

आम्ही पू. बाबांच्या घराचा जिना चढत होतो तेव्हां त्यांच्या घरातून काही बायका बाहेर पडल्या आणि जिना उतरून गेल्या. नंतर या गोष्टीचा उल्लेख करून पू. बाबांनी त्यांच्यापैकी एका स्त्रीची हकिगत सांगितली. ते म्हणाले :

ही बाई मूळची राजस्थानातली. लग्नानंतर बेळगावला राहायला गेली. लहानपणापासून जगदंबेची उपासना करते. बेळगावला दीपक नांवाच्या कोणी माणसाने तिला तू गोंदवलेकर महाराजांना गुरु कर म्हणून सांगितले. त्याच्या सांगण्यावरून श्रीमहाराजांना ती गुरुस्थानी मानू लागली. त्यांचा उल्लेख ती महाराज असा न करता गुरुदेव असा करते. जप मात्र जगदंबेचाच करते. तिची हृदयाची काही तक्रार होती म्हणून तिला मुंबईला आणले आणि तिचे हिंदूजा हॉस्पिटलमधे ऑपरेशन करायचे ठरले. दीड एक वर्षापूर्वीची ही गोष्ट. ऑपरेशनच्या वेळी भूल देण्यापूर्वी तिने श्रीमहाराजांची - तिच्या शब्दात गुरुदेवांची - प्रार्थना केली की तुम्ही माझ्याबरोबर रहा. ऑपरेशन झाले आणि शुद्धीवर आल्यावर तिच्या ध्यानात आले की ती शुद्धीवर नव्हती तेव्हांही गुरुदेव तिच्याजवळ होते. शुद्धीवर आल्यावर तर होतेच. तिने त्यांची प्रार्थना केली की तुम्ही माझ्याजवळ आहात याची खूण द्या. तेव्हां तिच्या डोक्याजवळ बाजूला कोणीतरी अंथरुणावर बसलेले असावे अशासारखी गादी दबली आणि चंदनाचा सुगंध येऊ लागला! ती म्हणाली की अजूनही तिने गुरुदेवांचे स्मरण केले की तो सुगंध येतो

पुढे काही दिवसांनी तिला इच्छा झाली की गुरुदेवांचे गुरु आणि शिष्य कसे होते ते आपल्याला पाहायला मिळावे. आणि म्हणून तिने श्रीमहाराजांची तशी प्रार्थना करायला सुरुवात केली. एक दिवस दुपारी तिची झोप झाल्यावर साक्षात् ब्रह्मानंद महाराज तिच्यासमोर आले. ते ब्रह्मानंद महाराज हे तिने त्यांची कफनी, पायावरचे कोड या खुणांवरून ओळखले. त्यांनी तिला जवळ ठेवण्यासाठी अंगाऱ्याची एक पुडी दिली ती आजही तिच्याजवळ आहे. असेच एका दुपारी स्वप्नात श्रीतुकामाईनी येऊन दर्शन दिले. त्यांच्या काखेत कुत्र्याचे पिल्लू होते. त्यांनी फक्त काय ग, कशाला बोलावले होतेस म्हणून विचारले.

आता तिला हिंदूजामधे चेकअपसाठी आणले आहे. कालच ती तिकडे जाऊन आली. तिच्याबरोबर आलेल्या दुसऱ्या बाईने सांगितले की डॉक्टर म्हणतात की हृदय आकुंचित झाले आहे. हेमोग्लोबिन कमी झाले आहे. टॉनिक, इंजेक्शने घेऊनही ते वाढत नाही आणि शक्ती येत नाही. डॉक्टरांच्या म्हणण्याप्रमाणे आता ती काही महिनेच जगण्याची शक्यता आहे. पण असे असूनही ती स्वस्थ आहे. मुलेबाळे आहेत, पण प्रारब्धानुसार त्यांचे होईल असे म्हणाली. ती म्हणाली की आता तिची एकच इच्छा आहे की एका डोळ्याने जगदंबा आणि दुसऱ्या डोळ्याने गुरुदेव पहात मरण यावे!

पू. बाबा ही हकिगत सांगितल्यावर म्हणाले, अस्तित्व भाव यावा तर असा. आपण उगीचच पुस्तके वाचतो आणि चर्चा करीत बसतो.

नंतर कृष्णमूर्तींबद्दल बोलणे निघाले.

**पू. बाबा** : कृष्णमूर्ती म्हणतात की जग हे संबंधपूर्ण आहे. It is a network of relations (जग हे संबंधांचे जाळे आहे) आपला जेव्हां दुसऱ्या वस्तूशी अगर व्यक्तीशी संबंध येतो तेव्हां आपल्या मनाने त्यांची एक प्रतिमा तयार केलेली असते आणि त्या प्रतिमेशी आपला संबंध येतो. आपणही आपली स्वत:ची एक प्रतिमा तयार केलेली असते. अर्थात दुसऱ्यांच्या मनात असणाऱ्या आपल्या विविध प्रतिमा आणि आपण केलेली आपली प्रतिमा ह्या क्वचितच सारख्या असतात! म्हणजे जीवनात प्रतिमेचा प्रतिमेशी संबंध येतो. An image meets another image. श्रीमहाराजांशी संबंध जोडायचा म्हणजे त्यांच्याबद्दल आपल्या मनात असलेल्या प्रतिमेशी संबंध जोडायचा. त्या प्रतिमेत त्यांच्या अस्तित्याचा भाव पाहिजे. आणि आपली अडचण अशी आहे की त्या प्रतिमेत महाराज 'होते' हे इतके घट्ट बसले आहे की ते निघता निघत नाही. ते काढून त्यांच्या अस्तित्वाचा भाव कसा दृढ करावयाचा हा प्रश्न आहे. श्रीमहाराजांप्रमाणे नामही Personify करुन म्हणजे नामाला मानवी रूप देऊन त्याची प्रतिमा निर्माण केली पाहिजे.

**साधक ग** : ज्या वस्तु, व्यक्ती आणि घटना आपल्याला खऱ्या वाटतात त्यांची प्रतिमा सहज निर्माण होते. नाम किंवा श्रीमहाराज यांच्याबद्दल तसे खरेपण वाटत नाही. उदाहरणार्थ, खिशातल्या पाकिटाचा खरेपणा आणि नामाचा खरेपणा यांच्या भिन्न पातळ्या आहेत. पहिल्याला दृश्यातले खरेपण आहे. सूक्ष्मातील खऱ्याची प्रतिमा निर्माण करतांना अडचण येते.

**साधक प** : प्रतिमा नेहमी खोटीच असते. त्यात पुन्हां खरी प्रतिमा खोटी प्रतिमा किंवा खऱ्याची प्रतिमा असला गोंधळ नको. आत्ता ह्या क्षणी माझी प्रतिमा तुमच्या प्रतिमेशी संवाद करते आहे. मी खरा कसा आहे कोणास ठाऊक! तुमच्यासमोर आहे ती तुमच्या मनातील माझी प्रतिमा आहे.

नामाच्या आणि श्रीमहाराजांच्या प्रतिमा निर्माण होऊन त्या दृढ होण्यासाठी बाकीच्या ज्या प्रतिमांत आपण गुंतलेले आहोत ते सगळे नाहीसे करून अंत:करण साफ झाले पाहिजे. इतर कसलाही आणि कोणाचाही आधार वाटता कामा नये. आज पैशाचा केवढा मोठा आधार वाटतो. वास्तविक पैसा हीदेखील

प्रतिमाच आहे. श्रीमहाराजांच्या प्रतिमेशी संबंध येण्यासाठी आपली प्रतिमा त्या सूक्ष्म पातळीवर जाणे आवश्यक आहे.

**पू. बाबा :** लहानसहान गोष्टीत आपण गुंतून राहिलेले असतो. समर्थांनी म्हटले आहे ''आहे तितुके देवाचे। ऐसे वर्तणें निश्चयाचे। मूळ तुटे उद्वेगाचे। येणें रीती॥'' सर्व काही त्याचे आहे म्हटल्यावर उद्वेगाला, निराशेला जागाच नाही. मी आणि माझे हे सगळ्या सुखदु:खाचे मूळ आहे. सुख मागितले की त्यातून दु:ख येणारच. म्हणून सर्व काही त्याचे आहे असा दृढ भाव झाला पाहिजे.

साधक म्हणून तुकाराम महाराजांचे स्थान श्रेष्ठ आहे. साधकावस्थेत असतांनाचे वेगवेगळ्या अवस्थांचे वर्णन त्यांनी फार चांगले केले आहे. पू. बाबा म्हणाले की त्यांचे असे अभंग निवडून काढून त्यावर चिंतन करावे.

**साधक ग :** असे काही अभंग मी एकत्र केले होते. 'अवघ्या पातकांची मीचि एक राशी' याची तुकाराम महाराजांना प्रथम जाणीव झाली. 'माझे मज कळो येती अवगुण। काय करूं मन अनावर॥' हे लक्षात आले आणि मग रात्रंदिवस युद्ध सुरू झाले. 'माझिये मनींचा जाणा हा निर्धार। जिवासी उदार झालों आतां॥' अशी त्यांची स्थिती झाली. त्यातून स्वत:ची 'सकळा इंद्रियां हे माझी विनंती। नका होऊं परतीं पांडुरंगा॥' अशी आणि 'देवा आतां ऐसा करी उपकार। देहाचा विसर पाडी मज॥' अशी पांडुरंगाची विनवणी सुरू झाली आणि मग 'बोलावा विठ्ठल पाहावा विठ्ठल।' ही अवस्था येऊन 'विषयीं विसर पडिला नि:शेष। अंगीं ब्रह्मरस ठसावला॥' अशी त्यांची स्थिती झाली, खरोखर त्यांच्याइतके परमार्थाच्या मार्गावरील वाटचालीचे उत्तम वर्णन दुसऱ्या कोणत्याही संताच्या ग्रंथात आढळत नाही.

## ।३८३। (२६ ऑगस्ट १९९४)

आज पू. बाबा खूप प्रसन्न दिसत होते. ते म्हणाले की हल्ली वरचेवर कोणी ना कोणी भेटायला येतं आणि तुम्हाला सांगण्यासारखं काहीतरी मिळतं.

गेल्या रविवारी एक पतिपत्नी पुण्याहून मुद्दाम भेटायला आले होते. गृहस्थ तिथल्या कॉलेजात प्रोफेसर आहेत. त्यांना दोन मुलं आहेत. बाई खूप नामस्मरण करतात. स्वभावाने फार साध्या, सरळ, थोड्या भोळसट वाटाव्या अशा आहेत. त्यांनी जे सांगितले ते तुम्हाला सांगतो. गोंदवल्यास जातांना एकदा नेहमीप्रमाणे मी पुण्यात उतरलो होतो. तेव्हां माधवनाथांचे एक शिष्य

भेटायला आले होते. त्याचवेळेला ह्या बाईही भेटायला आल्या होत्या. ज्ञानेश्वरीतील एक दोन ओव्यांसंबंधी आमची चर्चा चालली होती. बाई म्हणाल्या की ते ऐकतांना असे वाटले की हे काही आपल्या आवाक्यातले नाही. पुढे 'संतांचे आत्मचरित्र' हे पुस्तक वाचतांना त्यांना ब्रदर लॉरेन्सचे चरित्र फार आवडले. त्याने सांगितले आहे त्याप्रमाणे ह्या बाईंनी घरातली कामे करतांना ती श्रीमहाराजांना सांगून करायला सुरुवात केली; इतकेच नव्हे तर त्या श्रीमहाराजांशी संभाषण करू लागल्या. त्यानंतर त्यांना आलेल्या अनुभवांपैकी तीन अनुभव त्यांनी सांगितले.

१) त्या रोज मानसपूजा करतात. एकदा त्या श्रीमहाराजांना म्हणाल्या की तुम्ही नामात आहात म्हणजे काय ते मला समजू दे. त्यानंतर एक दिवस त्या मानसपूजा करीत असतांना त्यांना एकाएकी सुगंध येऊ लागला आणि मग डोळे मिटलेले असतांनाच समोर पांढरा धूर दिसू लागला. त्या धुरात श्रीमहाराज दिसू लागले आणि नंतर ते विरळ होऊन नाहीसे झाले आणि तेथे तेरा अक्षरी मंत्र दिसला.

पू. बाबा म्हणाले की हे श्रीमहाराजांचे रूप आहे. कारण सांगतो; भगवान रमणांचे एक शिष्य एकदा ध्यान करीत बसलेले असतांना त्यांना अग्नीच्या ज्वाळा दिसू लागल्या आणि त्यातच रमण महर्षी दिसले. नंतर त्यांनी ते भगवानांना सांगितल्यावर ते म्हणाले, 'तेच माझे रूप आहे'. त्यांचा ज्ञानमार्ग होता आणि ज्ञान हे अग्नीसारखे आहे. ते सर्व कर्मांचे आणि अज्ञानाचे जाळून भस्म करते. भक्तीचा रंग पांढरा आहे. पांढऱ्या रंगात बाकीचे सगळे रंग येतात तसा भक्तीत इतर सर्व मार्गांचा समावेश होतो असे श्रीमहाराजांनी एकदा सांगितले होते.

२) त्या बाईंचा दुसरा अनुभव म्हणजे आता त्यांना नाम स्थिर झाले आहे असे वाटते. म्हणजे श्वासोच्छ्वास करता येईनासा झाला तर जसा जीव गुदमरतो तसे नामस्मरण थांबले तर होते.

३) तिसरा अनुभव म्हणजे गोंदवल्याला शिबिराला ह्या बाई आल्या होत्या तेव्हां मला भेटल्या होत्या. तेव्हां त्या म्हणाल्या होत्या की कमरेच्यावर पाठीमागे विशेषत: कण्यामधे गुदगुल्या झाल्यासारखे वाटते. मी त्यांना सांगितले होते की कुंडलिनी जागृत होऊ लागली की असे होते. पुढे पुण्यात घरी त्या ध्यान करीत असत. त्याचा परिणाम असा झाला की एकाएकी त्यांची कामवासना वाढली. त्यांना भीती वाटू लागली की आता चाळिशीनंतर हे काय विचित्र! (कुंडलिनी जागी होऊन ती खाली वळली तर असे होते.) त्यांना

अतिशय वाईट वाटले. त्यांनी श्रीमहाराजांची प्रार्थना केली. त्यांना रडू आले आणि मग तो प्रकार थांबून त्या शांत झाल्या. त्यांनी मला विचारले की पुन्हा असे होणार नाही ना? मी त्यांना म्हणालो की तुम्ही अगदी काळजी करू नका; महाराज तुम्हाला सांभाळताहेत.

कशी माणसे असतात पहा! त्यांच्या मनात संशय नसतात. उगीच वाचन वगैरे करण्याच्यामागे ती लागत नाहीत. ब्रदर लॉरेन्सदेखील साधा सरळमार्गी माणूस होता. पहा कोण कसे शिकते ते!

दुसरे एक गृहस्थ नुकतेच भेटायला आले होते. त्यांचा पार्टनरशिपमधे कारखाना आहे. त्यांना मी सज्जनगडावर जाऊन अनुग्रह घ्यायला सांगितले होते. त्याप्रमाणे त्यांनी तेथे जाऊन अनुग्रह घेतला. ते सांगत होते की कारखान्यात कामगारांकडे काम सोपवून दिले की ते नामस्मरण करत बसत आणि त्यात त्यांची तंद्री लागे. कामगारांना वाटायचे की ते झोपले आहेत आणि त्याचा कामावर परिणाम व्हावयाचा. म्हणून त्यांनी ते बंद केले. पुढे ते आठ दिवस गडावर जाऊन राहिले होते. गुरूची सेवा म्हणून समाधीपुढे झाडणे वगैरे काम त्यांनी सुरू केले. पहिले तीन दिवस काही विशेष वाटले नाही पण मग त्यात आनंद वाटू लागला आणि आपली सेवा समर्थांना पोचते याची काही प्रचीति यावी असे वाटू लागले. तिथले पुजारी त्यांना सहज म्हणाले होते की सेवा केल्याने पोट भरावे. म्हणून त्यांच्या मनात विचार आला की ही सेवा समर्थांना पोचत असेल तर आज न जेवतादेखील तृप्तीची ढेकर यावी. त्या दिवशी ते जेवले नाहीत तरीदेखील त्यांना तीनचार ढेकरा आल्या आणि पोट भरले आहे असे वाटले.

पू. बाबा म्हणाले, सदगुरूंच्या अस्तित्वाची जाणीव देणारी अशी कितीतरी उदाहरणे आहेत. दत्ताण्णा नाही का? रोज तेरा हजार जप करतो. इतका व्याप आहे पण त्यात गुंतलेला नाही. महाराज आहेत असा भाव येतो म्हणाला. तेव्हां आता महाराजांकडे ते मागा. वाचन आणि चर्चा पुष्कळ झाली.

नंतर झालेल्या चर्चेतील काही महत्त्वाचे मुद्दे :

१) मनाला Physical existence (भौतिक अस्तित्व) आहे का? असा प्रश्न साधक ज यांनी विचारला. मन हे शक्तिरूप आहे. त्यामुळे ज्या अर्थाने पुस्तकाला भौतिक अस्तित्व आहे त्या अर्थाने मनाला ते नाही. आज बहिर्मुख असलेली ती शक्ती अंतर्मुख केली पाहिजे. आज आपल्यावर विकारांचे स्वामित्व आहे; त्याऐवजी आपले विकारांवर स्वामित्व झाले पाहिजे.

२) साधक ब म्हणाले की गेल्या आठवड्यात त्यांचे नामस्मरण चांगले झाले आणि काही वेळा त्यांना जी उद्विग्नता येते ती का याचा त्यांना स्वच्छ उलगडा झाला. ते म्हणाले, त्यांच्या लक्षात आले की आता त्यांचे शरीर म्हातारे होते आहे; तथापि मनातील काम, लोभ, लौकिक इत्यादी वासना शमलेल्या नाहीत. तुकाराम महाराजांनी त्यांच्या बाबतीत 'काम क्रोध हें तों निमालें ठाईंची।' म्हटलेले आहे तसे झालेले नाही. मनाला आता कळलेले आहे की वासना पुऱ्या करायला आता हे शरीर साथ देत नाही. त्यामुळे मन आता हे शरीर संपवून त्याच्या वासना पुऱ्या करू शकेल अशा दुसऱ्या शरीराचा विचार करु लागले आहे. आता हे शरीर मृत्यूकडे ढकलू लागले आहे आणि त्याचबरोबर अस्तित्व टिकवावयाचीही धडपड चालू आहे आणि या ओढाताणीतून मधून मधून उद्विग्नता येते.

३) वासना कशा बळकट असतात आणि संधी मिळताच वर उफाळून येतात यासंबंधी पू. बाबांनी एक हकिगत सांगितली. ते म्हणाले, सध्या आपला ज्ञानेश्वरीचा सहावा अध्याय चालू आहे. त्यात ज्ञानराजांनी कर्मयोग्याला योगीश्वर म्हटले आहे. योगमार्ग फार अवघड आहे. हरद्वारला एक योगी होते. पंचेचाळीस वर्षात त्यांनी दुधाला स्पर्शही केला नव्हता पण एका भक्त स्त्रीने मी तुम्हाला काय देऊ म्हणून विचारल्यावर ते म्हणाले की मला बासुंदी दे. दुसरे दिवशी त्या स्त्रीने बरोबर पुष्कळ बासुंदी नेली. बासुंदीने भरलेली ती भांडी पाहूनच त्या योग्याला आपण कसे मोहवश झालो याची जाणीव झाली आणि तो ते स्थान सोडून दुसरीकडे निघून गेला! पंचेचाळीस वर्षे संयम करूनही वासनेचे बीज आत राहिले होते. म्हणूनच प्रत्याहाराच्या तुटलेल्या कड्यावरून ह्या मार्गातले साधक खाली पडतात असे ज्ञानेश्वर महाराजांनी म्हटले आहे.

## |३८४| (२ सप्टेंबर १९९४)

**पू. बाबा :** शीवला एक डॉक्टर आहेत. बालरोग तज्ञ आहेत. त्यांना अध्यात्माची आवड आहे. त्यांच्या वडिलांकडे एक संन्यासी येत असत. ते नामस्मरण करीत. श्रीमहाराजांची आणि त्यांची प्रथम हिमालयात भेट झाली होती त्यावेळी श्रीमहाराजांनी त्यांना नामस्मरण करायला सांगितले होते. आपले नांव काय म्हणून त्यांनी श्रीमहाराजांना विचारले तेव्हां मी जंगम (नेहमी फिरणारा) आहे असे श्रीमहाराजांनी त्यांना सांगितले होते. हे संन्यासी एकदा तराईच्या जंगलात बसलेले असतांना त्यांच्यासमोर एक लांडगा आला. त्यांनी

त्याच्याकडे रोखून पहायला सुरुवात केली तेव्हां तो एकदोन मिनिटे गुरगुरत उभा राहिला आणि झाडीत निघून गेला. पुढे त्यांची आणि श्रीमहाराजांची हर्द्याला भेट झाली तेव्हां त्यांना श्रीमहाराजांचे नाव कळले. महाराजांनीही त्यांना जंगम नांवाची आठवण करून दिली.

हे संन्यासी आजारी होते. प्लूरसी झाली होती. डॉक्टर त्यांना तपासत होते तेव्हां त्यांनी हृदय तपासू नका म्हणून सांगितले. ते म्हणाले की हृदयात नाम स्थिर झाले आहे, त्याला धक्का लागेल. पू. बाबा म्हणाले की हे अगदी खरे आहे. मला श्रीमहाराज म्हणाले होते की डोक्यात चालणारे नाम हृदयात उतरले की ह्या जन्मीचे काम झाले! असो. ह्या संन्याशानी शीवच्या ह्या डॉक्टरांच्या वडिलांना ज्ञानेश्वर महाराजांचा एक अभंग सांगितला होता. डॉक्टरांनी त्यांच्या ओळखीच्या एका बाईबरोबर हा अभंग त्याचा अर्थ स्पष्ट व्हावा म्हणून पाठविला आहे. हे डॉक्टर दोनतीन रविवारी निरूपणाला आले होते. अभंग असा आहे :

समाधीचें साधन। तें रामनाम चिंतन।
चित्ता सुखसंपन्न। हर्ष जीवनीं केला॥ १ ॥
कोटी तपाचिया राशी। जोडती रामनामापाशीं।
नाम जपता अहर्निशीं। वैकुंठ पद पाविजे॥ २ ॥
हेंचि धुरुसी आठवलें। उपमन्यें हेंचि घोकिलें।
अंबऋषीनें साधिलें। रामकृष्ण उच्चारणीं॥ ३ ॥
पांडवांसि सदा काळीं। कृष्ण राहिला जवळीं।
ज्ञानदेव हृदयकमळीं। तैसांचि स्थिरावला॥ ४ ॥

नामाचे महत्त्व सांगणारा हा अभंग आहे. रामनामाचे चिंतन हे समाधीचे साधन आहे. चिंतनाची हातोटी साधली की काय होते ते ज्ञानेश्वर महाराज सांगत आहेत. पांडवांना भक्तीमुळे - नामस्मरणामुळे केवढा लाभ झाला. कृष्ण जसा त्यांच्याजवळ राहिला तसा तो आता नामाच्या चिंतनामुळे माझ्याही हृदयात स्थिर झाला आहे असे ते म्हणतात. ज्ञानेश्वरीत म्हटल्याप्रमाणे "जीवु परमात्मा दोनी। बैसवोनी ऐक्यासनीं। जयाचां हृदयभुवनीं। विराजती॥ १२.१५३ ॥" जीव व परमात्मा आता शेजारी एका आसनावर बसले आहेत.

**साधक प :** वास्तविक तो आतच आहे. नामस्मरण करतांना त्याच्यावर चित्त केंद्रित केले पाहिजे.

**साधक ज :** आपले मन जेथे असते तेथे आपण असतो.

**साधक प** : आत्ता तुमचे मन कोठे आहे? तेथे तुम्ही आहात असे तुम्हाला वाटते का? मला वाटते की मन असते तेथे आपण असतोच असे नाही आणि मन स्थिर असे नसतेच; ते सारखे विषय बदलत असते. या मनाच्या आत अंतर्मन (Subconscious) आणि त्याहूनही खोल अबोध मन (Unconscious) असते आणि त्यांचा तर आपल्याला पत्ताच लागत नाही. आपले मन अगदी वरवर असते. याउलट खरा मी आत कोठेतरी खोल आहे. अगदी हृदयात तो आहे असे म्हटले तरी ते शब्दांनी सांगावे लागते म्हणून तसे म्हणायचे. जो नाहीसा होणार आहे तो खरा मी नव्हेच.

**साधक ज** : तुमचे हे म्हणणे ठीक आहे, पण आज कोठून तरी सुरुवात करायला हवी आणि ती बाहेरच्या दृश्यातल्या कोणत्या तरी आलंबनाने करण्यापेक्षा मीचे आलंबन घेऊन करावी.

**साधक क** : सामान्यत: आपल्याला मी ची जाणीव दु:खात - विशेषत: शरीराच्या दु:खात होते. पोट दुखायला लागले की पोटाची जाणीव होते.

**पू. बाबा** : आपण नामस्मरण करतो तेव्हां नाम जिवंत यायला हवे. आपण करतो त्याला नामस्मरण म्हणायचे इतकेच!

**साधक क** : स्वामी रामदासांनी म्हटले आहे की नामानेच मला हळू हळू जाणीव होऊ लागली की ईश्वरी सत्ता माझ्यावर स्वामित्व गाजवीत आहे. ज्या ईश्वराला मी शरण गेलो होतो तो माझ्या हालचालींवर गूढपणे सत्ता चालवीत होता आणि माझ्या जीवाची सर्वप्रकारे काळजी वहात होता. (पू. बाबांना) श्रीमहाराजांनी एका ठिकाणी म्हटले आहे की 'माझ्याकडून येणाऱ्या नामात भगवंताचे अस्तित्व आहे.' या वचनाचा अर्थ काय?

**पू. बाबा** : सद्गुरु जेव्हां नाम देतात तेव्हां ते आपली शक्ती त्यात घालून देतात, म्हणून त्यात भगवंताचे अस्तित्व सतेज असते. याला थोडी वेदान्ताची पार्श्वभूमी आहे. शंकराचार्यांनी म्हटले आहे की ब्रह्माला जेव्हां आपण अनेक व्हावे असे वाटले तेव्हां त्यातून चैतन्य आणि विश्वशक्ती निर्माण झाली. शक्तीतून विश्व निर्माण झाले तेव्हां ब्रह्माचा जो हुंकार आला तोच ॐकार म्हणजे नाम होय. म्हणून नामस्मरण हे भगवंताच्या अस्तित्वाचेच स्मरण आहे.

## |३८५| (१६ सप्टेंबर १९९४)

पू. बाबांनी एका बाईंचे आध्यात्मिक अनुभवासंबधी पत्र आले होते त्यातील त्या बाईंचे एक दोन अनुभव सांगितले आणि आध्यात्मिक अनुभव म्हणजे

काय आणि ते आपल्याला कसे येतील यासंबंधी चर्चा सुरू केली. ते म्हणाले की बाहेरील म्हणजे दृश्यातले अनुभव आणि आतले - आंतरिक अनुभव अशी अनुभवांची विभागणी करता येईल. बाहेरील अनुभव दोन प्रकारचे असतात. १) माझ्या जीवनात घडणारे सर्व भगवंताच्या किंवा सद्गुरूंच्या इच्छेने होते किंवा ते सर्व तेच घडवून आणतात आणि २) जे सर्व होते आहे ते माझ्या हिताचेच आहे म्हणून गुरु तसे करतात. म्हणजे आपल्या अपेक्षेच्या विरुद्ध घडले तरी ते माझ्या हिताचेच आहे असे वाटते.

आतील अनुभवांमधे शरणागती महत्त्वाची आहे. आपल्या दोषांची जाणीव झाली, आपण आपल्या प्रयत्नांनी ते काढू शकत नाही हे समजले की त्या दोषांची आपल्यालाच किळस येते. आपण आपल्या प्रयत्नांनी आपल्या दोषांना जाळू शकत नाही म्हणून मग भगवंता अथवा सद्गुरो तुझी इच्छा असे मनात येते पण तरीदेखील चैन पडत नाही; तळमळ वाढू लागते आणि शरणागतीचा उदय होतो. हे दोष तुम्ही काढा अशी प्रार्थना सुरू होते आणि साधक खऱ्या अर्थाने शरण जातो. "माझे मज कळों येती अवगुण। काय करूं मन अनावर॥१॥ आतां आड उभा राहें नारायणा। दयासिंधुपणा साच करी॥२॥" अशी तुकाराम महाराजांसारखी आळवणी सुरू होते. तथापि भाऊसाहेब, पू. तात्यासाहेब आणि श्री. आण्णासाहेब घाणेकर ही तीन माणसे अशी पाहिली की जी श्रीमहाराजांची भेट होतांच त्यांना सर्वभावे शरण गेली आणि त्यांचीच होऊन राहिली.

चर्चेच्या ओघात पू. बाबांनी एका पाश्चिमात्य तत्त्वज्ञाचा विचार सांगितला. त्याचे म्हणणे असे की आपले सर्व अनुभव म्हणजे घटनांचा क्रम असतो. घटना स्थळ आणि काळ यांच्या आधाराने होतात. आपले बरेचसे आध्यात्मिक अनुभवही घटनांवर अवलंबून असतात. म्हणजे ते खरे आत्म्याचे किंवा ज्ञानाचे अनुभव नसतात; कारण आत्मज्ञान हे स्थळ आणि काळ यांच्या मर्यादेपलीकडे आहे.

उठता उठता पू. बाबांनी एक विचार सांगितला. ते म्हणाले, आपण कौटुंबिक जीवनात घरातल्या सर्वांशी जमवून घेत असतो. ही adjustment किंवा तडजोड करतांना भगवंताची आणि सद्गुरूंची आठवण या तडजोडीनंतर येते. म्हणजे माझ्या गुरूंना काय आवडते याला lowest priority - नीचतम प्राधान्य असते. खरे म्हणजे याच्या उलट झाले पाहिजे. माझ्या गुरूंना हे आवडेल का हा विचार सर्वप्रथम आला पाहिजे.

## |३८६| (२३ सप्टेंबर १९९४)

**पू. बाबा** : डॉ. धराधर नांवाचे माझे एक मित्र आहेत. त्यांचे पत्र आले आहे. त्यांनी लिहिले आहे की साठ वर्षांनी त्यांचे उद्देश्य साध्य झाले आहे. म्हणजे काय याचे त्यांनी विवेचन केलेले नाही, पण माण्डूक्योपनिषदावरील गौडपादकारिकेतला एक श्लोक दिला आहे. श्लोक असा आहे :

अलातेस्पन्दमाने वै नाभासा अन्यतोभुवः।
न ततोऽन्यत्र निस्पन्दान्नालातं प्रविशन्ति ते॥

एखादा पलिता किंवा पेटलेले लाकूड गोल फिरवले तर अग्नीचे चक्र दिसते. वास्तविक तो चक्राचा भास असतो. पलिता फिरवणे थांबवले की चक्र नाहीसे होते. ते काही तेथून दुसरीकडे कोठे जात नाही किंवा त्या अग्नीत प्रवेश करीत नाही. केवळ दृष्टिभ्रम नाहीसा होतो. त्याप्रमाणे संसाराबद्दलचा भ्रम गेला (त्याच्या वास्तविक स्वरूपाचे ज्ञान झाले) म्हणजे प्रपंच नाहीसा होतो. त्यांनी दिलेल्या श्लोकावरून मला वाटते की त्यांना हा अनुभव आला असावा. कर्म किंवा दृश्य हे स्थलकालाने मर्यादित असते. त्यापलीकडे सर्व भ्रमाचा निरास होऊन खरी शांती होते. अग्नि शांत झाला म्हणजे अलातचक्र नाहीसे होते तसे चित्त रिकामे झाले तरच परमार्थ साधतो.

बरी आठवण झाली! डॉ. धराधरांची आई रविवारी निरूपणाला येत असे. तिला वेदान्ताची चांगली माहिती होती. एकदा तिने डॉक्टरांना सांगितले की आईसारखा गुरु नाही, मोहासारखा शत्रू नाही आणि स्तुतीसारखे विष नाही. पुढे त्या आजारी होत्या तेव्हां मृत्यूच्या आधी थोडा वेळ डॉ. धराधरांना म्हणाल्या की काही वेळातच ह्या शरीराची राख होणार आहे तेव्हां आता त्याला उपचार कशाला?

**साधक प** : संसार भ्रामक आहे असे काही वेळा वाटते पण ते टिकून राहात नाही.

**पू. बाबा** : जळजळीत वैराग्य असल्याशिवाय अनुभव स्थिर होणार नाही. आपले ममत्व परमार्थाच्या आड येते. आपल्याप्रमाणे आपल्या नातेवाइकांचेही सर्व काही त्यांच्या प्रारब्धानुसार होणार आहे अशी खात्री होऊन त्यानुसार त्यांच्याशी आपले वागणे झाले पाहिजे. त्यांच्यामधे गुंतून जाता कामा नये.

श्रीमहाराज एकदा म्हणाले की सर्व संत कर्म भगवंताला अर्पण करायला सांगतात कारण त्यात खरे धाडस आहे. आज आपल्याला नामाच्या सामर्थ्याची

खरी कल्पनाच नाही. आपल्या विचारांना भावनेची पुरेशी साथ नाही. ती निर्माण होण्यासाठी १) प्रार्थना आणि २) सत्संगती हे उपाय आहेत.

वैष्णोदेवी येथे स्वामी विवेकानंदांना समाधीमग्न झालेले पाहून तुम्ही मला ती अवस्था द्याल का असे भगिनी निवेदिता यांनी नंतर त्यांना विचारले तेव्हां विवेकानंदांच्या डोळ्यांना पाणी आले. ते म्हणाले, तो अधिकार ठाकुरांना (श्रीरामकृष्णांना) होता. मला तो अधिकार नाही. श्रीमहाराजांना हे सांगितले तेव्हां ते म्हणाले की नामाने तो अधिकार येतो.

पू. बाबांनी नंतर एक जुनी हकिगत सांगितली. ते म्हणाले श्री. भाऊसाहेब (केतकर) नोकरीत असताना त्यांना व त्यांच्या हाताखाली काम करणाऱ्या काहीजणांना नोकरीतून सस्पेंड केले होते. सहा महिन्यांनी त्यांना पुन्हा कामावर परत बोलावले. कामावर पुन्हा रुजू झाल्यानंतर त्यांचे साहेब त्यांना म्हणाले की सस्पेंड केल्यावर सर्व लोक मला भेटून गेले पण आपण काहीच सांगायला आला नाहीत. यावर श्री. भाऊसाहेब म्हणाले की मी काही वावगे केलेच नव्हते मग कशाला यायचे? खरोखर ते मन काही वेगळेच होते! श्रीमहाराजांच्या सामर्थ्याची त्यांना यथायोग्य कल्पना आलेली होती. त्यामुळे श्रीमहाराज वाटेल ते करू शकतील असे ते म्हणत. ईश्वराचे सर्वज्ञ आणि सर्वशक्तिसमन्वित हे दोन्ही गुण श्रीमहाराजांमधे पाहाता आले तर काळजीचे कारणच राहाणार नाही.

पू. बाबा म्हणाले 'मी कोण आहे' या विचारापेक्षा 'मी कुठे आहे' हे पहावे म्हणजे आत जाता येते.

**साधक ज** : मला वाटते की त्यापेक्षा नाम कोठून येते हे पहावे; ते कळत नाही.

**पू. बाबा** : रमण महर्षींनी हा मार्ग सांगितला आहे. आपल्या मनाकडे नुसते पाहिले, विशेषत: वेगळेपणाने पाहिले तर ते हळूहळू रिकामे होते.

**साधक प** : हा साक्षीभाव आहे. माझे मनाशी तादात्म्य होऊ दिले नाही म्हणजे मी मनाहून म्हणजेच सध्याच्या मी पेक्षा वेगळा आहे हे कळते.

**पू. बाबा** : मी राखून करायचे असल्यास भक्ती करावी. मी तुझा आहे असे म्हणावे. विश्वात घटना घडतात तशाच त्या माझ्या जीवनातही घडतात अशी मनाची खात्री असावी आणि त्यावर उगीच विचार करत बसू नये. घटना आणि कर्म या दृश्यातून बाहेर पडण्यासाठी एकाच ठिकाणी मनाने घट्ट धरले पाहिजे. असे ठिकाण म्हणजे नाम होय. म्हणून दुसरे काही करू नये, फक्त नाम घ्यावे. आपल्या अडचणी नामाला सांगून नामच घेत बसावे. नाम सर्वज्ञ आणि

सर्वशक्तिसमन्वित असल्यामुळे आपण तशी भावना ठेवून नाम घेतले की थोडे तरी पुढे जाऊ.

## |३८७| (३० सप्टेंबर १९९४)

पू. बाबांकडे आलेल्या काही मंडळींनी श्रीमहाराजांच्या दोन वचनांचा अर्थ विचारला होता म्हणून तीच वचने त्यांनी चर्चेसाठी घेतली.

पहिले वचन - 'भगवंताचे स्मरण ही कृती आहे; भगवंताचे विस्मरण ही वृत्ती आहे.'

पू. बाबांनी साधक क यांना या वचनाचा अर्थ विचारला.

**साधक क :** वृत्ती म्हणजे पसरते ती; आपली प्रतिक्रिया.

**पू. बाबा :** वृत्ती प्रतिक्रियेपेक्षा सूक्ष्म आहे. काही Stimulus (उद्दीपन) नसले तरी आणि स्वस्थ बसले तरी वृत्ती येते.

**साधक क :** वृत्तीला व्याप्ती व खोली असते.

**पू. बाबा :** पण मुळात वृत्ती म्हणजे काय? वृत्ती निर्माण होण्यासाठी दोन गोष्टी लागतात. एक चित्त आणि दुसरे चैतन्य.

**साधक प :** वृत्ती म्हणजे शक्ती बाहेर व्यक्त होण्यासाठी होणारी धडपड.

**पू. बाबा :** सामान्यत: वृत्ती वासनेतून निर्माण होते. वासना म्हणजे आत काहीतरी आहे आणि त्याचे स्फुरण म्हणजे वृत्ती. ती वृत्ती भगवंताची नसणे म्हणजेच भगवंताचे विस्मरण. आजच्या आपल्या वृत्ती अज्ञानातून येतात. अज्ञान म्हणजे वेदान्ताच्या भाषेत आवरण आणि विक्षेप. मायेच्या आवरणामुळे दृश्य खरे वाटते आणि त्या दृश्यातून मला सुख मिळेल असा विक्षेप निर्माण होऊन त्या वृत्तीमधून ऊर्मि येते आणि त्यातून पुढे प्रत्यक्ष कृती होते. अज्ञान आहे तोपर्यंत हे असेच चालू राहाणार. आज आपण कर्मामधे म्हणजे कृतीमधे जगतो; म्हणून वृत्ती बदलण्यासाठी म्हणजे ती भगवंताची होण्यासाठी कृतीपासून सुरुवात करणे आवश्यक आहे. अशी कृती म्हणजे भगवंताचे नामस्मरण. कृती देहाला धरून आहे म्हणून ती भगवंताकडे वळविणारी झाली तर ऊर्मी बदलेल, नंतर वृत्तीत बदल होईल आणि शेवटी वासनाच भगवंताची होईल. दृश्याचा भ्रम जाण्यासाठी जगाचा सारखा बदलणारा म्हणजे अस्थिर स्वभाव कळला पाहिजे आणि नामच सत्य ही धारणा झाली पाहिजे.

नामाला राम कर्ता ही जोड देणे जरूर आहे. असे करणे म्हणजेच समर्पण होय. सर्वस्व अर्पण करणे म्हणजे सर्वाबरोबर स्व म्हणजे 'मी'सुद्धा अर्पण करणे

हेच समर्पण. राम कर्ता ही भावना झाली पाहिजे; आणि ते कठीण आहे. पण नामाशिवाय दुसरा मार्ग नाही. खऱ्या अर्थाने राम कर्ता हा भाव राहिला तरच म्हणजे 'मी' शून्य झाला तरच इतरांच्या बाबतीतही रामच सर्व काही करवून घेतो असे वाटू लागेल.

श्रीमहाराजांचे दुसरे वचन असे की 'साधकाने आपल्या घरी पाहुण्यासारखे राहावे आणि त्याची पुढची पायरी म्हणजे मेल्यासारखे राहावे'. पाहुण्यासारखे स्वत:च्या घरात राहायचे म्हणजे हे घर माझे नाही, माझे घर दुसरीकडे आहे हे कळले पाहिजे. गोंदवल्याला किंवा हेबळ्ळीला आपण जातो तेव्हां तिथे जे जे घडते ते ते सर्व श्रीमहाराजांच्या सत्तेने घडते अशी आपली खात्री असते. तसे आपल्या घरी वाटू लागले की राम हे घर चालवतो असे वाटून आपले कर्तेपण लोपेल आणि आपला दृष्टिकोन पाहुण्यासारखा होऊ लागेल आणि मग माणूस निश्चिंत होईल. आपले खरे घर भगवंतापाशी आहे ही भावना त्यासाठी वाढवली पाहिजे. ती भावना आपल्या जीवनात उतरली पाहिजे. आपली अडचण ही आहे की आपले खरे घर भगवंताजवळ आहे हे विसरल्यामुळे इथे आपल्या सध्याच्या घरातून दुसरीकडे गेल्यावर जसे अस्वस्थ वाटते तसे घरात असतानाही काही प्रमाणात अस्वस्थ वाटते. ह्या जगात तसे आपल्याला अस्वस्थच वाटते. गीतेत भगवंतांनी 'तत् धाम परमं मम' यावर सुरेख सांगितले आहे. जेथे गेल्यावर पुन्हा परत येणे नाही ते खरे अविनाशी प्राप्तव्य स्वरूप आहे. म्हणूनच रामकृष्णादि अवतार त्यांचे अवतारकार्य संपल्यावर 'निजधामाला' गेले. म्हणजे अवतारकार्य करतांना येथे ते पाहुण्यासारखे होते. आपल्यालाही खऱ्या अर्थाने इथे at home वाटता कामा नये. साधनात जसजशी प्रगती होईल तसतशी साधकाची अलिप्ततेची भावना वाढू लागते. म्हणूनच हे जग सोडून जाणे हे खरे विश्रांतीस जाणे असे समर्थांनी म्हटले आहे.

या संदर्भात पूर्वी सांगितलेल्या एका झेन साधूच्या गोष्टीची उजळणी झाली. एक झेन साधू आपल्या शिष्यांबरोबर बसलेला असतांना भूकंप झाला तेव्हां सगळे शिष्य घराबाहेर पळाले. साधू मात्र तेथेच बसला होता. थोड्या वेळाने सगळे स्थिरस्थावर झाल्यावर शिष्य परत आले आणि त्यांनी गुरूला विचारले की आपण का पळाला नाहीत? तेव्हां तो साधू म्हणाला की मीही पळालो होतो. तुम्ही बाहेर पळालात; मी आत पळालो. हे खरे आपल्या घरी जाणे. ज्याला आपले घर भगवंताजवळ आहे ही जाणीव होईल तो खरा भाग्यवान. अशा माणसालाच इथे आपल्या घरी पाहुण्यासारखे राहाता येईल.

मेल्यासारखे राहाणे ही फारच मोठी अवस्था आहे. मेल्यासारखे राहाणारा माणूस भगवंताशी पूर्णपणे एकरूप झालेला म्हणजे अद्वैतात राहाणारा असतो. तो स्वत:ला म्हणजे 'मी' ला एक अपघात (accident) समजतो. त्याचे वागणे पूर्णपणे त्याच्यामधील भगवंताच्या स्फुरणातून चालते. तो देहाने वावरतांना दिसला तरी तो सध्याच्या 'मी' पणाने म्हणजे कर्तेपणाने मेलेलाच असतो. त्याचा अहंकार नांवालादेखील राहात नाही.

साधन करतांना वरच्या अवस्था येण्यासाठी आपल्याला सध्याच्या जीवनाचा उद्वेग आला पाहिजे. असे झाले तरच नामाचे प्रेम येऊन त्यात माणूस रमेल आणि माणसाला केवळ भगवंताशी at home (स्वस्थ) वाटून तो निश्चिंत होईल.

**| ३८८ |** (१४ ऑक्टोबर १९९४)

**पू. बाबा :** स्वामी अमलानंदांचे दोन शिष्य नुकतेच पुण्याला स्वामी माधवनाथांकडे गेले होते आणि तेथून पुन्हा मुंबईला माझ्याकडे येणार होते. माधवनाथांनी माझ्याकडून नामाचे महत्त्व सांगणारे अभंग आणा असे त्यांना सांगितले होते. त्यांना दिलेल्या अभंगांपैकी दोन अभंग सांगतो.

आम्हां हेंचि काम। वाचे गाऊं तुझे नाम॥ १॥
आयुष्य मोलाची हे घडी। धरूं पायांची आवडी॥ २॥
अमृताची खाणी। याचे ठायीं वेचूं वाणी॥ ३॥
तुका म्हणे पांडुरंगा। माझ्या जिवाच्या जिवलगा॥ ४॥

दुसरा अभंग :

जिव्हे झाला चळ। नेघे अवसान ते पळ॥ १॥
हेंचि वोसनावोनी उठी। देव सांठविला पोटीं॥ २॥
नाहीं ओढा वारा। पडिला प्रसंग तो बरा॥ ३॥
तुका म्हणे झाली। मज हे अनावर बोली॥ ४॥

तुकाराम महाराजांनी नामाचा चळ लागला असे म्हटले आहे. जिव्हा हे कर्मेंद्रिय आणि ज्ञानेंद्रिय दोन्ही आहे. सतत नामस्मरण केले तर ते नामच पुढे ढकलेल. आज आपण दृश्यात जगत असल्यामुळे आणि तेच सत्य वाटत असल्यामुळे आपल्या इंद्रियांनी कर्मे करून त्यात रमतो. चळाचा अर्थ एखादी गोष्ट एकसारखी करत राहाणे - खूळ असा दिला आहे. खरोखरच नामाचे वेड लागले पाहिजे. 'नेघे अवसान ते पळ' जीभ पळभरही विश्रांती न घेता एकसारखे नाम घेते आहे. श्रीमहाराजांचे असे सांगणे आहे की नामातच सत्संग आहे. नाम हाच सत्कर्माचा

पाया आहे आणि कळस आहे. जे कर्म भगवंताकडे नेते तेच सत्कर्म. कृतीने पाया रचला जातो आणि त्यावर शेवटी ज्ञानाचा कळस चढविला जातो. नाम घेता घेता नाम घेणारा काळाच्या पलीकडे जातो. आज आपल्याला दृश्य आणि नाम यांमध्ये निवड करायची आहे. नाम घ्यायचे असे एकदा ठरले म्हणजे मग दृश्याची - लोकांची पर्वा न करता ते घेतले पाहिजे. जोपर्यंत दृश्याचा कंटाळा येत नाही तोपर्यंत सुखदु:ख, हवेनको हे द्वैत राहाणारच. म्हणून आजच नामाचा चळ लावून घेतला पाहिजे. असे केले तरच शक्ती साठेल आणि तिचे आपल्याला साहाय्य होईल. The world is mathematically perfect हे बरोबरच आहे. पण याच्या आड आपला कर्तेपणा येतो. मी परिस्थिती बदलू शकतो आणि कदाचित ते मला शक्य नसले तरी दुसऱ्या कोणी ते करावे असे वाटते. नाम सतत घेतले तर भगवंताच्या - श्रीमहाराजांच्या अस्तित्वाची जाणीव तीव्र होत जाईल आणि नामाचा नादच पुढच्या अवस्था आणील. आणखी एका अभंगात तुकाराम महाराजांनी म्हटले आहे की नाम घेतल्यावर आता काही करणे, तरणे उरलेलेच नाही.

चर्चेत आणखी एक मुद्दा आला की योगातसुद्धा कृतीवर भर आहे. नाम घेण्याची कृती हा एका दृष्टीने योगच आहे. मात्र या कृतीचा विशेष असा आहे की नाम घेणारा योगाची मधली अंगे वगळून थेट धारणेशी पोचेल आणि पुढे देह नामाने भरून जाईल. योगाची धारणेच्या आधीची अंगे त्यासाठी वेगळे कष्ट करावे न लागता आपोआप साध्य होतील. यानंतर व्यवहार होईल; करावा लागणार नाही.

श्रीशांताश्रम स्वामींनी इतके अखंड नाम घेतले की त्यांना नामाखेरीज दुसरे काही बोलताच येईनासे झाले! स्वामी रामदासांनीही जिभेला चळ लागल्यासारखेच नाम घेतले. त्यांनी श्रीमहाराजांचे वर्णन नामावतार असे केले आहे. तुकाराम महाराजांजवळ असलेली श्रद्धेची संपत्ती आपल्याजवळ नाही. सर्व संतांनी आग्रहाने नाम घ्यायला सांगितले आहे. आपण ते घेऊया, त्यानेच आपले काम होईल.

## | ३८९ | (२१ ऑक्टोबर १९९४)

**पू. बाबा :** अध्यात्मामधे पूजेला फार महत्त्व आहे. पूजा करतांना जे जे पवित्र ते आपण देवाला देतो. त्यात त्याग आणि पावित्र्य (Sacrement) आहे. मागच्या शुक्रवारी नामाचा जिभेला चळ लागला पाहिजे असे आपण पाहिले. याचा तुम्हाला अनुभव आहे का ?

**साधक** : चळ असा नाही पण गेल्या महिन्यात डोळ्याचे ऑपरेशन झाल्यामुळे वाचन बंद होते. त्या काळात नामस्मरण चांगले झाले, पण ते मुख्यत: वैखरीने झाले. बराच वेळ नाम घेतले की थकवा येई. त्यानंतर थोडी विश्रांती घेऊन पुन्हा नाम घेत असे.

त्यानंतर मुख्यत: वैखरीच्या नामासंबंधीच चर्चा झाली. तुलसीदास, स्वामी रामदास, शांताश्रम स्वामी यांनी अखंड नामस्मरण केले. वैखरीने नाम घेतांना जीभ कर्मेंद्रिय आणि ज्ञानेंद्रिय अशा दोन्ही प्रकारांनी गुंतून राहाते. श्रीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे नाम घेतांना ते आपल्याच कानांनी ऐकले तर नामात लवकर लय उत्पन्न होतो व नाम घेतांना आनंद होतो असे साधक क म्हणाले.

**साधक प** : तोंडाने नाम घेणे चांगले कारण मग आपण काहीतरी करतो आहोत असे वाटते आणि आपल्याला तर कर्माशिवाय स्वस्थ बसवत नाही. पण हा मार्ग मुख्यत: आश्रमवासीयांसाठी असावा कारण त्यांच्या जीवनात नियमितपणा असतो. आज आपल्या देहव्यापारात आणि कर्मामधे इतकी विविधता आहे की ती कर्मे करतांना नाम थांबते. म्हणून आपण मन नामात गुंतवण्याचा म्हणजेच अनुसंधानात राहाण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

**साधक क** : आपण शक्य तितके नाम घेत राहावे आणि पुढच्या मनाच्या प्रक्रिया नामावरच सोपवाव्या.

**पू. बाबा** : मन काय करते ? श्रीमहाराज म्हणत मन एक तर काहीतरी कर्म करायला लावते नाहीतर दमले की झोपून जाते. म्हणून आपण जागे असतो तेव्हां त्याला नामात गुंतवले तर इतर धडपडी करायला त्याला सवडच मिळणार नाही. तेव्हां आता आपण हा प्रयत्न करुन पाहू. प्रयत्न करावा, प्रार्थना करावी. शेवटी सगळे काम त्याची कृपा झाल्यावरच होणार आहे. त्याची कृपा केव्हां होईल ते कसे सांगणार ? आपण नाम घेत राहावे.

## |३९०| (२८ ऑक्टोबर १९९४)

**पू. बाबा** : सोमवारी एक गृहस्थ आणि त्यांची बायको भेटायला आले होते. दोघेही रविवारी निरूपणाला येतात. त्या गृहस्थांनी पुण्याच्या श्रीमाधवनाथांकडून अनुग्रह घेतलेला आहे. माधवनाथांनी त्यांना ध्यान लावण्यास आणि सोऽहम्‌चा जप करण्यास सांगितलेले आहे. ह्यापूर्वीही हे गृहस्थ मला भेटायला आले होते. त्यावेळी त्यांनी त्यांची अडचण सांगितली होती. तेव्हां ते म्हणाले होते की सोऽहम्‌चा जप करतांना मनात विचार येतो की मी 'तो' असणे कसे शक्य आहे ?

त्यामुळे ध्यान लावता येत नाही. त्यावेळी मी त्यांना सांगितले होते की तुम्ही तेरा अक्षरी मंत्राचा जप करा; मात्र हे माधवनाथांना सांगून करा. त्याप्रमाणे त्यांनी माधवनाथांना सांगितल्यावर त्यांनी काही हरकत नाही म्हणून सांगितले आणि तेव्हांपासून ते तेरा अक्षरी मंत्राचा जप करू लागले. तथापि हे बरोबर आहे ना असे त्यांना वाटत असे. एक दिवस ते जपाला बसलेले असतांना श्रीमहाराजांची (लंगोटी लावून श्रीमहाराज उभे आहेत ती) मूर्ती दिसली. श्रीमहाराज त्यांना म्हणाले की संशय न घेता नामस्मरण चालू ठेवावे. पण खरी गंमत पुढेच आहे. परवा सोमवारी हे गृहस्थ आले तेव्हां माधवनाथांचा निरोप घेऊन आले की माधवनाथांच्या स्वप्नात स्वामी स्वरूपानंद आले आणि त्यांनी सांगितले की बेलसऱ्यांना सांगा की ते सांगतात ते बरोबर आहे. त्यांचा हा निरोप ऐकल्यावर मला आठवले की चिन्मय मिशनचे सध्या येथे असलेले प्रमुख मला भेटायला आले होते तेव्हां त्यांनी सांगितले की चिन्मयानंदांच्या गुरूंनी त्यांना सांगितले होते की कोणत्याही मंत्रात ॐकार अंतर्भूत असतोच.

हे सर्व सांगून पू. बाबांनी विचारले की आपले साधन चांगले चालण्यासाठी काय करावे? आपला संशय काही जात नाही; बरे, त्याचबरोबर विचाराने हे साधणार नाही हेही समजते.

चर्चेतले मुख्य मुद्दे असे : अद्यापि दृश्य खरे वाटते त्यामुळे त्यातच आपण जास्त रमतो. काही अडचण असली की ती श्रीमहाराजांनी दूर करावी असे वाटते आणि अडचण दूर झाली म्हणजे हे त्यांनीच केले असेही वाटते. म्हणजे आपण प्रामाणिक आहोत. पण म्हणजे श्रीमहाराजांचा उपयोग आपण साधनासाठी न करता संसारासाठी करतो. आणि असे करतानाही करतील तर तेच करतील आणि जे करतील ते माझ्या हिताचेच असेल अशी दृढ श्रद्धा नसते. जोपर्यंत वासना आहेत तोपर्यंत भीती, काळजी राहाणारच. श्रीमहाराजांच्या अस्तित्वासंबंधी अभाव आणि संशय आहेत तोपर्यंत समर्थांनी म्हटल्याप्रमाणे खरे साधन होणार नाही. म्हणून मनाचे वैराग्य आवश्यक आहे. एका म्यानात दोन तलवारी ठेवता येत नाहीत त्याप्रमाणे संसार व परमार्थ दोन्हीही आवडीने करेन म्हटले तर परमार्थ होणार नाही. संसाराला मनाने बाजूला सारलेच पाहिजे. कल्पना नाहीशी करावी लागेल आणि जोपर्यंत मनात संसाराचे विचार आहेत तोपर्यंत ते शक्य नाही. "मना कल्पना कल्पिता कल्पकोटी। नव्हे रे नव्हे सर्वथा रामभेटी॥"

पू. बाबांनी त्यांच्या "भगवंताच्या नामाचे दिव्य संगीत" ह्या जुलै १९९४ मध्ये प्रकाशित झालेल्या पुस्तकाच्या प्रस्तावनेत पुढील अनुभव दिला आहे :

''आम्ही पांचसहाजणांनी असें ठरवलें की उत्सवाच्या दहा दिवसांत जागेपणीं - सकाळी उठल्यापासून रात्रीं झोपी जाईपर्यंत - शक्यतो अखंड नामस्मरण करावें. त्याप्रमाणे २९ तारखेपासून माझें नामस्मरण मनापासून उत्कटतेनें चालूं झालें. भेटायला येणाऱ्या स्त्रीपुरुषांशीं बोलतांना आणि निरूपणाचा एक तास सोडून ४ जानेवारीपर्यंत माझें नाम सुरेख चाललें. ५ तारखेला नित्याप्रमाणें शुचिर्भूत होऊन पहाटे ४ वाजतां मी जपास आरंभ केला. उत्सवाच्या दहा दिवसांतील निरूपणासाठी ज्ञानेश्वरी बारावा अध्याय ओव्या ९७ ते १२४ घेतल्या होत्या. त्या दिवशीच्या निरूपणासाठी पुढील ओवी होती.

माळियें जेउतें नेलें। तेउतें निवांतचि गेलें। तया पाणिया ऐसें केलें। होआवें गा॥ १२.१२०॥

ही ओवी मला अतिशय आवडते. तिच्यामधें मला माझ्या जीवनाचे साधनध्येय सांपडलें.

मी नाम घेतो तेव्हां माझ्या मनांत विचार येतात. पण श्रीमहाराजांचें सांगणें असें की जपाचे वेळी येणारे विचार दाबू नयेत. त्यांना भगवंताकडे वळवावें. म्हणून जपाचे वेळीं भगवंताविषयी किंवा श्रीसद्गुरूंविषयीं किंवा नामाविषयींच विचार चालू ठेवण्याची संवय मनाला मी लावून घेतली आहे. त्याचा फायदा असा आहे की जपाच्या वेळीं फार मनोहर विचार सुचतात. त्या दिवशीं एकीकडे माझा जप शांतपणें चालूं होता. त्याचबरोबर दुसरीकडे माळी शब्दाच्या अर्थसौंदर्यानें मन मोहून गेले होतें. एकाएकी विश्वाचे प्रचंड उद्यान सांभाळणारा माळी जो भगवंत त्याच्या दिव्य संकल्पनेनें माझें अंतर्याम भरलें. श्रीज्ञानराजांच्या मनांत जो भाव होता तो माझ्या अंतरीं प्रगटला. त्याबरोबर माझें मन नकळत एका अतींद्रिय अवकाशांत गेलें. तेथें मला जिकडेतिकडे जीवन म्हणजे जिवंतपण दिसू लागलें. माझा देह जसा डोक्यापासून पायापर्यंत जीवनानें भरलेला आहे अगदी तसें संबंध विश्व जिवंतपणानें भरलेलें प्रत्यक्ष दिसूं लागले. मी चांगला शुद्धीवर होतो. मी गोंदवल्यास आहे आणि मी नित्याचा जप करीत आहे याचे भान मला होतें....

....असा एक दहा मिनिटें काळ गेला असेल आणि मी स्वत:ला विसरलों. त्या अवस्थेत आपण गोंदवल्यास आहोत व आपला जप चालू आहे याचें भान मला उरलें नाही. पण श्रीराम जयराम जयजयराम हा मंत्र एकीकडे माझ्या आंत निनादत होता आणि त्याचबरोबर दुसरीकडे सर्व दिशांमधून तो स्पष्टपणें स्पंदन करीत होता. पावणे सहाच्या सुमारास मी भानावर येऊन जपातून उठलो.

श्रीसद्गुरूंकडून आलेल्या व मी अनेक वर्षे जोपासलेल्या नामाचें तें विशाल, दिव्य आणि अतींद्रिय स्वरूप माझ्या मनावर मोठा परिणाम करून गेले, कारण नामाचा तो अतींद्रिय ध्वनि कांहीं केल्या क्षीण होईना. माणसें भेटायला येत होती पण त्यांच्या भेटण्याचें खरेपण मनावर ठसत नव्हतें. आठ वाजतां मी निरूपणासाठीं गेलो खरा, पण थोडी विमनस्क स्थिति होती. निरूपण खरोखरच रंगलें. पण आपण काय बोललों याची पुसट स्मृति उरली. तारीख ६ व ७ सकाळपर्यंत नामाचा तो अनाहत नाद स्वच्छपणे टिकला. नंतर तो आपोआप क्षीण होत गेला....मी न मागता अचानक आलेल्या या अनुभवाचा खोल परिणाम मात्र कायम राहिला. तो असा की - (एक) भगवंताचें नाम हेंच भगवंताचें व्यक्त रूप आहे ही खात्री झाली. (दोन) नाम विश्व व्यापून आहे व तीच विश्व चालवणारी शक्ती आहे हें पटलें. (तीन) मनोमय कोष नामानें भरला की अतींद्रिय अनुभव येतात. (चार) आपण घेतलेलें नाम कधी वाया जात नाही. (पांच) पुस्तकी विद्या, नांवलौकिक, प्रापंचिक स्थिति, वय व शारीरिक रोग यांचा नामस्मरणाशीं कांही संबंध नाही. आणि (सहा) नाम घेणाऱ्यावर नामच कृपा करतें यात संशय नाही.''- (भगवंताच्या नामाचे दिव्य संगीत - के. वि. बेलसरे. त्रिदल प्रकाशन. प्रथमावृत्ती १९९४ पृष्ठे ६ ते ९).

पू. बाबांच्या या अनुभवाचा उल्लेख करून साधक क यांनी त्यांना विचारले की सगळीकडे नाम भरले आहे आणि विश्व सजीव आहे असे वाटले म्हणजे काय?

**पू. बाबा** : सजीव म्हणजे सारखे स्फुरते आहे - throbbing आहे असे वाटले आणि सर्व दिशांतून तेरा अक्षरी मंत्र ऐकू येऊ लागला. केवळ नामच खरे आहे, बाकीचे सगळे स्वप्नासारखे आहे असे वाटू लागले. जगात सगळीकडे भगवंत भरलेला आहे हे इतक्या उत्कटतेने जाणवत होते की राघवेंद्रस्वामी रोज सकाळी मला गुलाबाची फुले आणून देत असे त्याप्रमाणे त्या दिवशी गुलाबाची दोन टपोरी फुले त्यांनी आणून दिली तेव्हां ती फुले पाहून मला इतका आनंद झाला की त्या आनंदाच्या भरात मी त्या फुलांचे चुंबन घेतले!

**साधक क** : स्वामी रामदासांनीही त्यांचा असाच अनुभव लिहून ठेवला आहे. जेव्हां त्यांना नामाचे खरेपण जाणवून उत्कट आनंद झाला तेव्हां त्या आनंदाच्या भरात त्यांनी झाडांनाही मिठ्या मारल्या.

श्रीमहाराजांचे अस्तित्व जाणवण्याच्या बाबतीत पू. बाबांनी त्यांनी पाहिलेल्या तीन पातळ्या सांगितल्या.

१) पहिली पातळी श्री. भाऊसाहेब केतकर यांची. आपला संसार श्रीमहाराजांवर सोपवल्यानंतर त्यांनी श्रीमहाराजांनी देह ठेवल्यानंतरही संसाराची चिंता केली नाही. तसबिरीसमोर सांगितलेले मला ऐकू येते असे श्रीमहाराजांनी सांगितल्यानंतर त्याबद्दल त्यांच्या मनात कधी विकल्प आला नाही. काहीही प्रसंग असो, श्रीमहाराजांच्या कानावर घालून ते खरे खरे स्वस्थ होत. श्रीमहाराजांनी देह ठेवल्यानंतर त्यांची स्थिती वेड्यासारखी झाली होती. नुसतेच कुठेतरी पहात उभे राहात किंवा शून्यात दृष्टी लावून बसत. तहान, भूक, झोप नाहीशी होऊन त्यांना जीवन निरर्थक वाटू लागले होते. पण एका रात्री त्यांचा किंचित डोळा लागला तेव्हां श्रीमहाराज त्यांच्यापुढे आले आणि म्हणाले, 'भाऊसाहेब, मी इथेंच आहें, मी कुठें गेलों नाहीं! मी तुम्हांला केव्हांहि भेटूं शकेन.' यामुळे भाऊसाहेबांचे मोठे समाधान झाले. श्रीमहाराजांच्या सांगण्याबद्दल त्यांना यत्किंचितही शंका आली नाही.

२) दुसरी पातळी पू. तात्यासाहेब केतकरांची. त्यांची निष्ठा आणि श्रीमहाराजांसंबधी अस्तित्वभावना सुरुवातीला श्री. भाऊसाहेबांइतकी बळकट नव्हती. पण त्यांच्या मुखातून वाणीच्या रूपाने श्रीमहाराज प्रकट झाल्यानंतर मात्र आपले सारे जीवनच त्यांनी श्रीमहाराजांना दिले. हा जन्म त्यांना दिला अशी त्यांची वृत्ती होती.

३) तिसरी पातळी सामान्य माणसांची. सामान्य माणूस काही अडचण आली की तसबिरीसमोर उभा राहून ती अडचण श्रीमहाराजांना सांगतो; म्हणजे ते आहेत, ते ऐकतात अशी त्याची भावना असते. अनेकदा आलेल्या वेगवेगळ्या संकटांतून सहीसलामत सुटल्यावर श्रीमहाराजांनीच हे केले असे त्याला वाटते. पण तरीदेखील काळजी व भीती नाहीशी होत नाही.

पू. बाबा म्हणाले, नामाचा खरेपणा जाणवणे कठीण आहे. त्यापेक्षा श्रीमहाराज आपल्याला जवळचे वाटतात. त्यामुळे सगुणातून निर्गुणात जाणे शक्य होते.

**साधक क** : ॐ नमो भगवते वासुदेवाय आणि श्रीराम जयराम जयजयराम ह्या दोन मंत्रांचे वैशिष्ट्य असे आहे की सगुणाचे प्रेम आणि निर्गुणाचे ज्ञान ही दोन्ही त्यामुळे होतात. श्रीमहाराजांनाही म्हटले आहे की सगुणाचे प्रेम, निर्गुणाचे ज्ञान आणि अखंड नामस्मरण ह्या तीन्ही गोष्टी मला तुकामाईजवळ मिळाल्या आणि माझे समाधान झाले.

**पू. बाबा** : होय. साधनात सगुणाला महत्त्व आहेच. त्यातूनच पुढे साधक निर्गुणात जातो.

**|३९१|** (४ नोव्हेंबर १९९४)

**पू. बाबा :** नुकतेच एक शास्त्री भेटायला आले होते. रविवारच्या निरूपणाला ते येतात. वाईच्या केवलानंद सरस्वतींचे ते शिष्य. त्यांच्याजवळ त्यांनी प्रस्थानत्रयीचा अभ्यास केला. नामस्मरण करतात, पण त्रयोदशाक्षरी मंत्राचा जप करतांना त्यांच्या मनात येते की ह्या मंत्रापेक्षा ॐकार श्रेष्ठ आहे. रामनामात हा ॐकार येतो का? त्यांचा हा विकल्प काही केल्या जात नाही. मी त्यांना म्हणालो की तुमचा हा विकल्प तुम्हीच काढला पाहिजे. त्यासाठी गुरूंची प्रार्थना करा. त्यांनी आणखी एक प्रश्न विचारला. ते म्हणाले की बोलण्याने जर शक्तिपात होतो तर नामस्मरणाने, विशेषत: वैखरीने नाम घेतल्यामुळे शक्तिपात होतो की नाही?

**साधक ग :** नाम हे स्थूल आणि सूक्ष्म या दोहोंना जोडणारे आहे. वैखरीने बराच वेळ नामस्मरण केले तर देह थकेल पण नामाच्या सूक्ष्मतेमुळे मनाची शक्ती वाढेल; ती कमी होणार नाही.

**साधक प :** नाम घेतांना आपण काही हेतू ठेवला तर त्यासाठी नाम वापरले जाते आणि गोळा केलेली शक्ती खर्च होते.

**साधक ब :** नामाचे अस्तित्व जाणवणे कठीण आहे. त्यामुळे या साधनात सुरुवातीला रुक्षपणा आहे.

**पू. बाबा :** तुम्ही म्हणता ते बरोबर आहे. मिस्टिसिझमच्या बाबतीत सेंट टेरेसाने सांगितलेले आहे ते बरोबर आहे. गुरुदेव रानड्यांना ते फार आवडत असे. ती म्हणते की अध्यात्माच्या या मार्गात सुरुवातीला रस्ता खडकाळ आणि रुक्ष आहे. जवळपास कोठे पाण्याचा थेंबही नाही. पण एक खोल विहीर आहे. तिच्या तळाशी थोडे पाणी आहे (पाणी हे नामाच्या प्रेमाचे प्रतीक) पण ज्या पोहोऱ्याने ते वर काढायचे तो पोहोरा गळका आहे. त्यातूनही धीर करून प्रवासी (साधक) पुढे गेला की एक ओढा आहे. त्या ओढ्याला कधी पाणी येते तर कधी तो एकदम कोरडा होतो. (कधी साधन जमते कधी जमत नाही.) त्याच्याही पुढे धीराने गेल्यावर मात्र भगवत्कृपेचा पाऊस पडतो आणि सगळीकडे हिरवेगार होते! अहंकाराने केलेले साधन अडथळे निर्माण करते. म्हणून साधकाच्या ठिकाणी लीनता पाहिजे. प्रयत्न करून लीनता येत नाही पण तरीदेखील साधकाने प्रयत्न केला पाहिजे असे समर्थांनी जुन्या दासबोधात सांगितले आहे. कारण प्रयत्न करून लीनता येत नाही हे साधकाला जाणवले की त्यातून शरणागती येते.

('रामपूर्वतापनीयोपनिषद्' नावाचे एक अथर्ववेदीय उपनिषद आहे त्यात सुरुवातीसच म्हटले आहे -

ॐ चिन्मयेऽस्मिन्महाविष्णौ जाते दशरथे हरौ।
रघोः कुलेऽखिलं राति राजते यो महीस्थितः॥ १॥
स राम इति लोकेषु विद्वद्भिः प्रकटीकृतः।

ॐ ह्या चिन्मय महाविष्णूंनी जेव्हा रघुकुलामध्ये दशरथाकडे जन्म ग्रहण केला तेव्हा त्यांचं नाव 'राम' झालं. या नावाची व्युत्पत्ती अशी आहे - 'जो महीतलावर अर्थात पृथ्वीवर स्थित होऊन भक्तजनांचे संपूर्ण मनोरथ पूर्ण करतो आणि राजाच्या रूपामध्ये सुशोभित आहे, तो राम होय - असा अर्थ विद्वानांनी लोकांमध्ये व्यक्त केला आहे. 'राति राजते यो महीस्थितः सन् इति रामः' - या विग्रहानुसार 'राति' वा 'राजते' याचं पहिलं अक्षर 'रा' शब्द बनतो. आणि हाच राम हा शब्द ब्रह्म ॐ आहे तसेच तो 'चित्-मय' देखील आहे. आणि परब्रह्माचं वर्णन सत्-चित्-आनंद असं करीत असल्याने त्यातील जे 'चित्स्वरूप' हे या रामाचं असल्यामुळे हा राम म्हणजेच ते परब्रह्म होय. अर्थात् श्रीरामचंद्रांच्या रूपामध्ये तेच परब्रह्म या महीतलावर विराजमान आहे.

रामचरितमानसामध्ये देखील हीच गोष्ट तुलसीदास वर्णन करतात -

व्यापक ब्रह्म निरंजन निर्गुण बिगत बिनोद।
सो अज प्रेम-भगति-बस कौसल्या के गोद॥

परब्रह्म व्यापक आहे, निरंजन निर्गुण आहे परंतु ते आज प्रेम व भक्ती यांना वशीभूत होऊन कौसल्येच्या मांडीवर विराजित झाले आहे.''- जीवन-विकास जानेवारी २००० या अंकातील औपनिषद ब्रह्म आणि श्रीरामकृष्ण या संपादकीय लेखामधून-)

## |३९२| (११ नोव्हेंबर १९९४)

आम्ही मालाडला पू. बाबांकडे गेलो तेव्हां डॉ. शं. रां. तळघट्टी व सौ. तळघट्टी पू. बाबांशी बोलत बसलेले होते. डॉ. तळघट्टी पुणे विद्यापीठात तत्त्वज्ञानाचे प्रपाठक आहेत. त्यांनी स्वामी विवेकानंदांच्या सामाजिक कार्यावर पेपर लिहिला असून कलकत्त्याला रामकृष्ण मठाच्या सभेत तो वाचण्यासाठी ते जाणार आहेत. पू. बाबांनी सुचविल्यावरून त्यांनी त्यांच्या निबंधाचा सारांश सांगितला. Religion is the manifestation of the Divine in Man

(धर्म म्हणजे मानवाच्या दिव्यत्वाचे प्रकटीकरण) अशी स्वामी विवेकानंदांनी धर्माची व्याख्या केली आहे.

पू. बाबा त्यांना म्हणाले, अध्यात्म करणारे लोक बरेचदा समाजकार्याकडे वळलेले दिसतात. तथापि त्यांच्याही समाजकार्यात एक दोष येतो तो असा की सेवा निष्काम राहात नाही. अहंकार वाढतो आणि ज्यासाठी संन्यास घेतला तो आध्यात्मिक हेतूच नाहीसा होतो. शिवभावाने जीवाची सेवा करावी असे ते सांगतात. पण जीवाच्या ठिकाणी शिवभाव ठेवणे सोपे नाही. त्यासाठी प्रथम मी शिव आहे हा बोध झाला पाहिजे. रामदास स्वामींप्रमाणे मठ विवेकानंदांनी स्थापिले हे खरे पण समाजकार्यासाठी जेव्हां पैशाची गरज निर्माण होते तेव्हां अशा संस्थांमधील महंत पैसे देणाऱ्या धनिकांचे मिंधे होण्याची भीती असते. गोंदवल्याला नवीन हॉस्पिटलच्या इमारतीचे उद्‌घाटन करतांना मी हे आवर्जून सांगितले.

श्रीमहाराज स्वतःला दीनदास म्हणवून घेत. प्रापंचिक माणूस दीन असतो; त्याची त्यांनी सेवा केली आणि आज ऐंशी वर्षांनंतरही किती लोकांना त्यांचा आधार वाटतो. तसा नामाचा आधार वाटला पाहिजे. आज दृश्य खरे वाटते, त्याच्या पलीकडे गेले पाहिजे. तळमळ निर्माण होणे हेदेखील त्यांच्या कृपेनेच होते. काही अपवाद वगळता, सत्पुरुषांना तळमळीतूनच जावे लागले आहे. यालाच युरोपिअन तत्त्वज्ञानात Dark night of the soul म्हटले आहे. प्रपंच सुटला आहे आणि परमार्थ पदरी पडला नाही अशी ती अवस्था आहे.

आता दिवस फार थोडे राहिले आहेत हे लक्षात घेऊन, अन्य कसलाही विचार न करता आणि दुसऱ्या कशात न रमता, शक्य तितके जास्त नामस्मरण केले पाहिजे. त्यासाठी प्रार्थना करावी की तुम्ही मला शक्ती द्या; नामस्मरण करवून घ्या.

## |३९३| (१८ नोव्हेंबर १९९४)

आज गुरुनानक जयंतीची सुट्टी होती त्यामुळे पू. बाबांना बरीच मंडळी भेटायला आली होती.

**पू. बाबा :** काल दुपारपासून असेच चालू आहे. सकाळी जेवायला बसणार होतो तेव्हां एक बाई भेटायला आल्या. मूल नाही म्हणून त्या नेहमी येत. त्यांना एका वैद्यांकडे औषधोपचार घेण्यास पाठविले. पहिल्या वेळी तीन महिन्यांनंतर गर्भपात झाला. दुसऱ्या वेळी दिवस पूर्ण गेले पण मेलेले मूल जन्मास आले.

तिसरेही कमी दिवसांचे गेले! त्यामुळे नवरा नाराज आहे; त्याही कष्टी आहेत. त्यांना काय सांगायचे? कालपासून अशीच प्रापंचिक दु:खे घेऊन लोक भेटायला येत आहेत. अशा परिस्थितीत नामाचे अनुसंधान ठेवायचे म्हणजे काय ते थोडे कळू लागले आहे. श्रीमहाराजांकडे सतत लोक येत, नव्हे अशा लोकांना ते ठेवून घेत. कसे नाम टिकवले असेल त्यांनी! खरोखर ते नामावतारच होते.

आणखी एक गोष्ट लक्षात आली आहे. दुसऱ्यांचे दु:ख ऐकून मनावर आघात होतो. तरी पण हे 'दुसऱ्याचे' आहे ही जाणीव राहून ते फार खोल शिरत नाही. तरीदेखील त्याचा अनुसंधानावर परिणाम होतोच.

**साधक ग :** आपण मागे गुरुदेव रानड्यांचे अनुसंधान कसे खोल होते याबद्दल सांगितले होते. 'न कळे दिवसराती। अखंड लागलीसे ज्योती॥' अशी त्यांची अवस्था होती. (पाहा : अध्यात्म संवाद भाग ४ संवाद क्रमांक ३६१)

**पू. बाबा :** श्रीमहाराजांनी मला एकदा विचारले की तुम्ही गीता वाचली आहे ना? मी हो म्हणालो. म्हटले, ती शिकवावी लागते. तेव्हां श्रीमहाराजांनी विचारले, गीतेत काय सांगितले आहे असे ज्ञानेश्वर महाराज सांगतात? मी उत्तर न देता गप्प बसलो, तेव्हां म्हणाले गीतेत ध्यानयोग सांगितला आहे आणि तो भक्तीचा ध्यानयोग आहे. भक्ती नामस्मरणाने होते. मला हे ऐकून फार आनंद झाला आणि सत्पुरुषांच्या ज्ञानाबद्दल अचंबाही वाटला. किती छान सांगितले आहे! नामाने भक्ती, भक्तीने ध्यान आणि ज्ञान. किती थोड्या शब्दांत ज्ञानेश्वरीचे मर्म सांगितले आहे!

आज कार्तिक महिन्याची पौर्णिमा आहे. आज सकाळी काकडआरतीची समाप्ती झाली. सकाळी निरूपणासाठी पू. बाबांनी तुकाराम महाराजांचा एक अभंग घेतलेला होता त्यावरच त्यांनी पुन्हा विस्ताराने सांगितले. अभंग असा आहे :

होईल तो भोग भोगीन आपुला। न घालीं विठ्ठला भार तुज॥ १॥
तुम्हांपासाव हें इच्छीतसे दान। अंतरीचें ध्यान मुखीं नाम॥ २॥
नये काकुलती गर्भवासासाठीं। न धरीं हें पोटीं भय कांहीं॥ ३॥
तुका म्हणे मज उदंड एवढें। नाचेन मी पुढें मायबापा॥ ४॥

प्रारब्धाने जो भोग माझ्या नशिबी आला आहे तो मी आनंदाने भोगेन. पांडुरंगा, तो नाहीसा कर असे तुला म्हणणार नाही. ते ओझे तुझ्यावर टाकणार नाही. मला तू माझे भोग नाहीसे करण्यासाठी नको आहेस. ब्रदर लॉरेन्सनेही

असेच म्हटले आहे. इतकेच नव्हे तर एका कुशीवर तो झोपला की त्याच्या छातीत टोचून खूप दु:ख होत असे. पण तो त्याच कुशीवर मुद्दाम झोपत असे. तो म्हणे की ते दु:ख झाले की भगवंता, मला तुझी आठवण होते. खरोखर, काय मागायचे ते कळले पाहिजे. तुकाराम महाराजांनी बरोबर मागितले आहे. मुखात तुझे नाम आणि अंतरात तुझे ध्यान हे दान तू मला दे. त्याखेरीज मला दुसरे काहीही नको. अंतरंगात देव भरला की भक्ताला दुसरे कशाचे भान राहाणार? मग पुन्हा पुन्हा जन्मावे लागले तर बिघडले कुठे? कारण मुखीं नाम आणि अंतरीं ध्यान हे उदंड देणे आहे. ते मिळाले की मी तुझ्यापुढे आनंदाने नाचेन.

## **।३९४।** (२५ नोव्हेंबर १९९४)

आमच्यापैकी एका साधकांना सध्या बारीक ताप येतो. त्या संदर्भात पू. बाबा म्हणाले, बारीक ताप असेल, कफ असेल तर श्रीमहाराजांनी एक औषध सांगितले आहे ते घ्यावे. तुळशीच्या दोन डिकशा, बेलाचे एक त्रिदल यांचा काढा करावा. काळी तुळस जास्त गुणकारी असते. काढा करतांना थोडी सुंठ घालावी. तथापि शरीरात उष्णता जास्त असेल तर सुंठ घालू नये; किंवा सुंठ घातली तर काढा घेतांना त्यात थोडे तूप घालावे आणि दिवसातून तीनदा अर्धा अर्धा कप घ्यावे. इन्फ्लुएंझा झाला असेल तर हा काढा करतांना त्यात थोडा गवती चहा आणि ओवा घालावा. मागे १९५७मधे इन्फ्लुएंझाची साथ आली होती तेव्हां गोरेगावच्या डॉ. वैद्यांनी पेशटंस्ना काय औषध द्यावे असे श्रीमहाराजांना विचारले होते. तेव्हां श्रीमहाराज त्यांना म्हणाले की तुम्ही जे औषध देता त्यात तुळशीच्या अर्काचा एक थेंब टाकत जा. त्यांनी तसे केले आणि त्यांचे पेशंटस् लवकर बरे झाले. तुळस अतिशय गुणकारी आहे म्हणून आपल्या धर्मात ती पवित्र मानली आहे. चिकित्साप्रभाकर या पुस्तकाचे लेखक श्री. ओगले यांनी तर तुलसीमाहात्म्य नांवाचे एक छोटे पुस्तक लिहिले आहे. (पहा: अध्यात्म संवाद भाग १ संवाद क्र. ८०, भाग ३ संवाद क्र. ३१८)

खरोखर, श्रीमहाराजांच्या ज्ञानाने मी दिपून गेलो. रत्ने भरलेल्या पेटीची किल्ली जवळ असावी असे त्यांचे ज्ञान होते, आणि त्याचे मला आश्चर्य वाटत असे. तथापि ह्या असल्या दृश्याच्या ज्ञानाची खरी किंमत काय आहे ते श्रीरामकृष्णांना आईने (काली मातेने) कचऱ्याच्या ढिगाऱ्याकडे बोट दाखवून सांगितले. अनुभवाने सांगतो, अखंड नामस्मरण फार अवघड आहे. बाहेरचे

जाऊ दे, घरची माणसेही वेड्यात काढतील. संसारच खरा मानणाऱ्यांच्या दृष्टीने नाम घेणे हा वेडेपणाच नाही का?

**साधक ब :** निसर्गदत्त महाराजांनी याबद्दल चांगले सांगितले आहे. त्यांना कोणीतरी म्हणाले की नाम घेणे हा वेडेपणा नाही का? तेव्हां ते म्हणाले की ते जाणीवपूर्वक लावून घेतलेले वेड आहे.

**पू. बाबा :** नामस्मरण करणे हा तमोगुणयुक्त सत्त्वगुण आहे. माणूस जसजसे नामस्मरण करतो तसतसा सत्त्वगुणाचा उत्कर्ष होतो, तमोगुण विरून जातो आणि चित्त शुद्ध होते. नाम ही परमात्म्याला मारलेली हाक आहे. त्या हाकेला तो ओ देतो. नामस्मरणाला राम कर्ता ही जोड दिली की भगवंताचे प्रेम निर्माण होते.

पू. बाबा पुढे म्हणाले, येथे दर रविवारी येणाऱ्या एका सद्गृहस्थानी नुकतेच पाँडीचरीच्या मदर संबंधी लिहिलेले एक इंग्रजी पुस्तक वाचायला दिले. ते सत्प्रेम यांनी लिहिले आहे. ह्या पुस्तकात दोन तीन गोष्टी महत्त्वाच्या वाटल्या. वयाच्या नव्वदीनंतरही आश्रमात मदर अगदी एकाकी होत्या कारण त्यांच्याकडे येणारांना त्यांची योग्यता समजलीच नाही. नवी मोटार घेऊ का? व्यवसाय कोणता करू? असलेच प्रश्न लोक त्यांना विचारत. कारण अध्यात्म पाहिजे कोणाला? श्रीमहाराजही 'सगळं हिंगजिऱ्याचं गिऱ्हाईक आहे' म्हणत ते यासाठीच. माताजींची अरविंदांवर प्रगाढ श्रद्धा होती. त्यांनी दिलेल्या ॐ नमो भगवते ह्या मंत्राचा त्यांनी रात्रंदिवस जप केला; इतका की तो त्यांच्या शरीराच्या पेशींमध्ये मुरला!

खरोखर, नाम घेण्याच्या आड आपणच येतो. 'हा जन्म त्यांना दिला' असे पू. तात्यासाहेब म्हणाले आणि तसे वागले. त्यांच्या पत्नीला, सौ.ताईंना त्यांच्या मोठेपणाची जाणीव होती. 'यांच्या तोंडातून दोन शब्द येणे मुष्किल, ते प्रवचन करतात ही महाराजांची कृपा' असे त्या म्हणत. सत्पुरुषाचे बाहेरचे वागणे सामान्य माणसासारखे असते, त्यामुळे फसगत होते. लोकांना आणि घरच्यांनाही त्यांची योग्यता कळत नाही. तुकाराम महाराजांची बायको तर 'उठिते ते कुटिते टाळ। अवघा मांडिला कोल्हाळ॥' असे म्हणते. कित्येकदा साधनकालात लोकांचा उपद्रव होऊ नये म्हणून ते विक्षिप्तपणे वागतात आणि मग त्याचा अवशेष राहातो असे अक्कलकोट स्वामी महाराजांच्या शिव्या देण्याच्या बाबतीत श्रीमहाराज म्हणत असत. (पहा : अध्यात्म संवाद भाग-३ संवाद क्र. ३१४)

गुरुदेव रानडे फार कमी खात. त्यांच्याबद्दल श्रीमहाराज एकदा म्हणाले की ते (गु. रानडे) काही खात नाहीत. पण त्यांच्या गुरूंना नैवेद्य दाखवून चतकोरभर भाकरी त्यांनी खायला हरकत नाही.

## ।३९५। (२ डिसेंबर १९९४)

**पू. बाबा :** ह्या आठवड्यात श्री. टेमकर यांच्याबरोबर हिमालयातले एक साधू आले होते. ते रामानुज पंथी आहेत. श्रीविष्णूची उपासना आणि 'ॐ नमो भगवते वासुदेवाय' ह्या मंत्राचा जप करतात. त्यांचे गुरु केशवानंद आता ९४ वर्षांचे आहेत. तिकडे हिमालयात असतात. नाशिकला कुंभमेळा झाला तेव्हां तिकडे आले होते. कुंभमेळ्यात त्यांचे दर्शन घेतल्याचे श्री. टेमकर यांनी नंतर सांगितले. ते येईल त्याला चहा, कपडे वगैरे देतात. रोज तीनचारशे लोक चहा पितात.

एकदा काही उत्सवाच्या निमित्ताने केशवानंदांनी शेकडो लोकांना जेवायला बोलावले होते. साधू म्हणाले सगळी तयारी झाली होती पण आचारी मिळाला नव्हता. केशवानंदांना हे सांगितल्यावर ते म्हणाले, पाहू काय होते ते! उत्सवाच्या आदल्या दिवशी संध्याकाळी एक भिकारीण कटोरा घेऊन भीक मागायला आली. तिला केशवनंदांनी सैपाक करता येतो का म्हणून विचारले. ती होय म्हणाली. जात विचारल्यावर मी ब्राह्मणी आहे म्हणाली. केशवानंदांनी तिचा कटोरा मागून घेतला आणि दुसरे दिवशी तिला सैपाक करायला सांगितले. तिने चोख व्यवस्था केली. दुसरे दिवशी सर्वांची जेवणे झाल्यावर ती केशवानंदांकडे आली. तिचा कटोरा तिला देऊन स्वामींनी तिला जायला सांगितले व नंतर शिष्यांना म्हणाले की ती सिद्धी होती.

माझ्याकडे आलेले साधू म्हणाले की त्यांच्या गुरूंनी त्यांना दररोज एक मूठभर कोणतेही धान्य भिजवून खावयाला सांगितले आहे. ते म्हणाले की आता त्यांना तेवढे पुरते आणि प्रकृतीही चांगली राहाते. तसेच गुरूंनी त्यांना फक्त तुलसीरामायण वाचत जा म्हणून सांगितले आहे. ते फक्त तेवढेच वाचतात आणि स्वतःला रामायणी म्हणवतात.

श्री. टेमकर त्यांना प्रथम वरती श्रीमहाराजांच्या मंदिरात घेऊन गेले होते. त्यांना मंदिरात एकसारखी रामधून ऐकू येत होती आणि त्यांच्याबरोबरच ती तेथून पू. बाबांच्याही घरी आली. पू. बाबांच्या घरात त्यांना मोगऱ्याचा सुगंध आला. पू. बाबा म्हणाले की ज्ञानेश्वर महाराजांना मोगऱ्याचे प्रेम आणि मला त्यांचे प्रेम, त्यामुळे असे झाले असावे. रामधून पू. बाबांच्या घरापर्यंत आली

असे ते म्हणाले त्याबद्दल साधक ग नी विचारले तेव्हां पू. बाबा म्हणाले, पूर्वी जुन्या घरात राहात होतो तेव्हां एक गृहस्थ मला म्हणाले की तुमच्याकडे तुळस नाही. मी होय बुवा, म्हणालो. संध्याकाळी श्रीमहाराजांना हे सांगितल्यावर ते म्हणाले, त्यांना सांगायचे की खाली आहे ती तुळस माझीच! (तसेच श्रीमहाराजांचे रामनाम आता पू. बाबांचे झाले आहे.)

**पू. बाबा** : आलेल्या ह्या स्वामींना मी साधनासंबंधी विचारले तेव्हां ते म्हणाले की तो (म्हणजे भगवंत किंवा सद्गुरु) बाहेरून आपल्याकडे पाहातो आहे असे तर वाटावेच पण आत आपल्या अंतरंगातही तो पाहतो आहे अशी सर्व काळ आणि विशेषत: नाम घेतांना जाणीव पाहिजे. त्यांनी हे सांगितले ते बरोबर आहे; तथापि यासाठी स्वत:कडे काहीसे साक्षित्वाने पाहाता आले पाहिजे. आत बाहेर भगवंत भरलेला आहे ही जाणीव झाली की काय होते याचे वर्णन असणारे जनाबाईचा आणि तुकाराम महाराजांचा असे दोन अभंग पू. बाबांनी वाचून दाखवले. ते अभंग असे :

(१) वामसव्य दोहींकडे। देखें कृष्णाचें रूपडें॥ १ ॥
आतां खालें पाहूं जरी। चहुंकडे दिसे हरी॥ २ ॥
चराचरीं जें जें दिसे। ते ते अविद्याची नासे॥ ३ ॥
माझें नाठवे मीपण। तेथें कैचें दुजेपण॥ ४ ॥
सर्वाठायीं पूर्ण कळा। दासी जनी पाहे डोळां॥ ५॥
(२) जेथें जेथें जासी। तेथें मजचि तूं पाहसी॥ १ ॥
ऐसा पसरीन भाव। रिता नाहीं कोणी ठाव॥ २ ॥
चित्त जडलें पायीं। पाळती हें ठायीं ठायीं॥ ३ ॥
तुका म्हणे पोटीं। देवा घालूनि सांगे गोष्टी॥ ४ ॥

'ऐसा पसरीन भाव'मधे थोडे कर्तेपण आहे. पण ते कर्तेपण तुकाराम महाराजांचे आहे. खरोखर अशी जाणीव निर्माण झाली पाहिजे.

**साधक प** : आतून प्रेरणाही तोच देतो अशी खात्री झाली तर साधन होत नाही याचेही दु:ख वाटणार नाही. आज साधन करतांना मी करतो हा भाव आहे. सर्व काही त्याच्यावर सोपवता आले तर मजा आहे.

**साधक ग** : तुम्ही म्हणता ती शरणागतीची अवस्था आहे

**साधक ब** : नामाचा अर्थ तू मला हवा आहेस हा आहे. दुसरे असे की व्यक्ती नाहीशी झाली तरी व्यक्तिमत्त्व राहाते. श्रीमहाराज आता देहाने नाहीत पण त्यांचे व्यक्तिमत्त्व आहे आणि त्या अर्थाने ते आजही आहेत.

**पू. बाबा :** तुम्ही म्हणता ते बरोबर आहे. ब्रह्म किंवा परमेश्वर आणि परमेश्वराचे अवतार यात हा फरक आहे. ब्रह्म नुसते कोरे आहे पण अवताराच्या लीला आहेत आणि त्यामुळे त्यांचे चिंतन करता येते. अवतार हे त्या दृष्टीने approachable - जवळ जाता येईल असे आहेत. भगवंताच्या लीलांच्या चिंतनात गौरांग महाप्रभु कसे मस्त असत. श्रीमहाराजांच्या वचनांचे किंवा त्यांच्या चरित्राचे आपण जर चिंतन केले तर त्यांचे अस्तित्व जाणवण्यास मदत होते असा माझा अनुभव आहे.

**| ३९६ |** (९ डिसेंबर १९९४)

**पू. बाबा :** येथे दर रविवारी प्रवचनाला येणारे एक गृहस्थ आहेत. ते कोकणातले आहेत. लहानपणापासून त्यांना गूढाची जाण आहे (occult power). एकदा ते स्वामी स्वरूपानंदांकडे गेले होते तेव्हां भुतेखेते यांच्यामागे लागण्याऐवजी सोऽहम् साधना करा असे स्वामींनी त्यांना सांगितले आणि अनुग्रह दिला. पण ही साधना त्यांना जमेना म्हणून ते स्वामींकडे गेले तेव्हां स्वामींनी त्यांच्या डोक्यावरून पाठीवर हात फिरवून शक्तिपात केला आणि तेव्हांपासून त्यांना जप जमू लागला. सुरुवातीला साधना न जमण्याचे कारणही त्यांनी मोठे मजेशीर सांगितले. ते म्हणाले, आम्ही कोकणातले लोक स्वभावाने भांडखोर आणि दुसऱ्याचे भले न पहावणारे, मत्सरी असतो. त्याचा जपावर परिणाम होत असे. स्वामींनी शक्तिपात केल्यावर साधना जमू लागली आणि काही अनुभवही येऊ लागले. त्यांनी विचारले की हे अनुभव टिकवायचे कसे आणि ते कसे वाढतील? मी त्यांना म्हणालो की तुम्ही अनुभवांच्या मागे लागू नका म्हणजे मग अनुभवच तुमच्या मागे लागतील. अनुभवांच्या बाबतीत निळोबांचा एक आणि तुकाराम महाराजांचा एक असे दोन अभंग फार छान आहेत; ते तुम्हाला वाचून दाखवतो.

नीत नवा प्रेमा कृपेचिया बळें। अंतरीं हा वोळे आनंदघन॥ १॥
नाचती मयूरें रोमांचीत दाटी। अमृताची वृष्टी जीवनकळा॥ २॥
आकाशें दुमदुमी गर्जे अनुहत। सुनीळ तळपत विद्युल्लता॥ ३॥
पिकली भूमिका बीज आलें फळा। अद्वय निजकळा सवंगिलें॥ ४॥
भाग्यवंत निळा सांठवी निराळी। आत्मयाजवळी निकटवासें॥ ५॥

नाचती मयूरे म्हटले आहे ना त्याबद्दल सांगतो. श्री. भाऊराव आठवले एकदा रमण महर्षींकडे गेले होते तेव्हां तेथे असलेल्या मोराला रमण महर्षींनी सांगितले

की हे पुण्याचे पाहुणे आले आहेत त्यांना नाचून दाखव. तेव्हा तो मोर पिसारा फुलवून थोडा वेळ नाचला. ही तादात्म्याची शक्ती असते. श्रीधरस्वामींनीही एका गायीला असेच दुसऱ्या गायीच्या वासराला पाजायला सांगितले होते.

दुसरा अभंग असा आहे :

मागतियाचे दोनीच कर। अमित भांडार दातियाचें॥ १ ॥
काय करूं आतां कासयात भरूं। हा मज विचारु पडियेला॥ २ ॥
एक सांठवण प्रेमें वोसंडलीं। जिव्हा हे भागली करितां माप॥ ३ ॥
तुका म्हणे आतां आहे तेथें असो। अंकुनियां बसों पायापाशीं॥ ४ ॥

'अमित भांडार दातियाचें' तो अनुभव देऊ लागला की किती घेणार? यानंतर आपल्या मनासारखे साधन होत नाही याबद्दल चर्चा झाली.

**साधक प :** सर्व काही त्याच्यावर सोपवावे.

**पू. बाबा :** पण मग त्याच्याआड काय येते?

**साधक ग :** नाम घेऊ लागलो की इतर विचार मनात येतात आणि प्रामुख्याने ते कोणते आहेत याकडे लक्ष दिले तर प्रत्येकाला आपण कशात गुंतलो आहोत ते कळते.

**साधक ज :** किंवा कोणते विचार करतांना आपण जास्त रमतो ते पाहिले तरी आपल्या आड काय येते ते समजेल आणि ती अडचण नाहीशी करण्याचा उपाय नाम घेणे हाच आहे.

**साधक प :** म्हणूनच यावर जास्त विचार करू नये. आपल्या कल्पना नाहीशा झाल्याखेरीज खरी निराशा येणार नाही. नाम घेऊन काय होईल, काय व्हावे याबद्दलदेखील आपण कल्पनाच करत असतो.

**साधक ज :** अशा कल्पना करण्यापेक्षा मला त्यांच्यामधे विरघळून जायचे आहे असा भाव ठेवावा. नाम घेतांना श्रीमहाराजांचे अस्तित्व जाणवले पाहिजे.

**साधक ब :** या सगळ्याच्या आड आपले मनच येते.

**पू. बाबा :** नामात मी आहे; नामात माझा प्राण आहे असे श्रीमहाराजांनी सांगितले आहे. त्याच्यावर भाऊसाहेबांसारखी श्रद्धा ठेवून नाम घेतले पाहिजे कारण त्यांचे अस्तित्व जाणवणे त्यांच्या कृपेवरच अवलंबून आहे.

**साधक प :** मागे तुम्ही सचिवालयातल्या एका अधिकाऱ्यावर शिपायाने केलेल्या हल्ल्याची हकिगत सांगितली होती. हॉस्पिटलमधे नेताना बेशुद्ध होण्यापूर्वी तो नाम घेत होता. श्रीमहाराज म्हणाले, म्हणजे त्यावेळी मी तेथेच होतो. (पहा : अध्यात्म संवाद भाग ३ संवाद क्र. ३३७) याचा अर्थ असा की

जेथे नाम तेथे ते आहेतच. त्यांना त्याचे भानही नसेल. म्हणजे विचारपूर्वक ठरवून त्यांनी तेथे यावयास पाहिजे असे नाही कारण ते सर्व ठिकाणी आहेतच. नाम घेतले की ते प्रकट होतात म्हणून ह्या मनाचा उपयोग करूनच मन जिंकावे लागेल; आणि ही गोष्ट विवेकाने आणि नामस्मरणाने होईल.

**साधक क** : कांटने म्हटल्याप्रमाणे बुद्धीच्या मर्यादा ओळखणे हेच बुद्धीचे कार्य आहे. 'यो बुद्धेः परतस्तु सः' बुद्धी भगवंतापर्यंत पोचू शकत नाही. (पू. बाबांना) श्रीमहाराजांचे अस्तित्व जाणवण्याचा अभ्यास कसा करावा ते सांगा. गेला महिनाभर मी हा प्रयत्न करतो आहे आणि मला असे आढळले की 'महाराज' म्हणून हाका मारल्या तर काही प्रमाणात त्यांचे अस्तित्व भासते. पण मग तो भाव टिकवावा कसा?

**पू. बाबा** : ते आपण पुढच्या शुक्रवारी नाहीतर नंतर पाहू. तथापि अखंड नामस्मरण, काहीही परिणाम मनात न आणता किंवा त्यासंबंधी विचार न करता नामस्मरण हा त्यावर उपाय आहे. असे करता करता आपली हद्द झाली असे जाणवले की शरणागती येईल व मग त्यांची कृपा होईल. त्यांच्या कृपेशिवाय अस्तित्वभाव बळकट होणार नाही. एखादे घर भुताने झपाटले आहे असे कुणी सांगितले तर त्यावर विश्वास बसतो. काही आवाज आला तरी भूत आहे असे वाटते. तशी चांगल्या अर्थाने आपल्या गुरूंची बाधा झाली पाहिजे.

**साधक ग** : चांगल्या अर्थाने बाधा म्हणजे काय?

**पू. बाबा** : सामान्यतः बाधा (Obsession) होते तेव्हां विचार आणि विवेक राहात नाही. नामस्मरणात ते सतेज राहातात. नामस्मरणाने अन्य विचारांची मनात होणारी गर्दी नाहीशी होते. नामस्मरणात साधक साक्षात्काराच्या वाटेवर असतो आणि त्यामुळे त्याला शारीरिक, मानसिक आणि बौद्धिक आरोग्याचा सहज लाभ होतो.

**साधक ग** : गुरुदेव रानड्यांचे गुरु भाऊसाहेब उमदीकर म्हणत की "नाम हे जीवनाच्या मुळाला, आत्म्याला जाऊन पोहोंचतें, त्याला जागृत करतें. म्हणून, मुळाला पाणी घातल्यावर सर्व झाड बहरते, तसें नामस्मरणानें सर्व जीवन बहरते." अहंकार नष्ट झाला आणि राम कर्ता हे जाणवायला लागलें की ते आहेतच.

## |३९७| (१५ डिसेंबर १९९४)

गुरुवार असल्यामुळे असावे, आज पू. बाबांच्याकडे बरीच मंडळी आलेली होती. ती गेल्यानंतर पू. बाबा म्हणाले आज सकाळी (गुरुवार असूनही) तुम्ही

यावे असे मला वाटत होते. कारण सांगतो. आज सकाळी मध्यप्रदेशातले एक साधक आले होते. त्यांची व तुमची भेट व्हावीसे वाटले पण त्यांना आजच परत जायचे होते. त्यांनी सांगितलेली हकिगत सांगतो.

हे गृहस्थ बनारस हिंदू युनिव्हर्सिटीतून संस्कृत विषय घेऊन एम्. ए. झालेले आहेत. बनारसला द्रविडशास्त्र्यांकडे त्यांनी वेदान्ताचा अभ्यास केला. उडियाबाबांनी त्यांना नाम दिले आणि सांगितले की आता वाचन-बिचन काही करू नको; श्रद्धा ठेव आणि नाम घे. अद्वैत हा अनुभव आहे. ती वाचायची गोष्ट नव्हे. उडियाबाबांनी सांगितल्यानुसार ते नाम घेत असत. पुढे एकदा त्यांच्या सुनेचे बाळंतपण होते. बाळपणाच्या वेळी मूल आडवे आले. त्यामुळे डॉक्टरनी ऑपरेशन केले पाहिजे म्हणून सांगितले. ह्या गृहस्थांची बायको हॉस्पिटलमधे सुनेबरोबर होती. ह्या गृहस्थांनी उडियाबाबांची आता तुम्ही पहा म्हणून प्रार्थना केली आणि स्वत: जप करत बसले. ऑपरेशनची तयारी करून डॉक्टरनी सुनेला पुन्हा तपासले तेव्हां पोटात मूल फिरले होते आणि ऑपरेशनची गरज राहिली नव्हती. पुढे त्या मुलाला आणि सुनेला घेऊन ते उडियाबाबांच्या दर्शनाला गेले तेव्हां त्या मुलाला मांडीवर घेऊन त्याला उद्देशून उडियाबाबा म्हणाले, तू टेढा था तो सीधा कैसा हो गया? आणि मग त्या गृहस्थांना उद्देशून म्हणाले, देखा नाम का प्रभाव? नामसे हर टेढी बात सीधी हो जाती है! तुम्हारी श्रद्धा इतनीसी छोटी है, उसे विशाल करो! ह्या घटनेनंतर त्यांनी आता नामाला वाहून घेतले आहे म्हणून मला त्यांची आणि तुमची भेट व्हावी असे वाटले होते. पण ते असो. मी पाहिले आहे की आपण (म्हणजे आम्ही) श्रद्धेत कमी पडतो. ती वाढवली पाहिजे. स्वत:ला झोकून दिले पाहिजे. आता सगळा संसार झाला आहे. मग अडचण का यावी?

नंतर Teachings of ShriSharada Devi - The Holy Mother ह्या पुस्तकातील काही वचने पू. बाबांनी वाचून दाखवली. Meditation and Japa ह्या चवथ्या प्रकरणातील ही वचने आहेत.

(1) "A devotee took a tiny banyan seed and said to Mother, "Look, Mother, it is tinier even than a tiniest seed we know. From this will spring a giant tree ! How strange!" "Indeed, it will, Mother replied. "see what a tiny seed is the Name of God. From it, in time, come divine moods, devotion love and spiritual consummation." (IV-7, C 133 and G 406 page 40)

(भक्ताने वटवृक्षाचे एक बारीकसे बी आपल्या हातात घेतले आणि तो (शारदा) माताजींना म्हणाला, "माताजी, पहा, आपल्याला माहीत असलेल्या लहान बीजांपेक्षाही हे बी किती लहान आहे. ह्या (एवढ्याशा) बीजापासून प्रचंड वृक्ष आकाराला येईल! किती विस्मयकारक आहे हे!" माताजी म्हणाल्या, "खरेच मोठा वृक्ष होईल. भगवंताचे नाम हे किती छोटे बीज आहे. पण काही काळात त्याच्यापासून दिव्य भाव, भक्ती, प्रेम आणि आध्यात्मिक परिपूर्ती येते."

(2) "Just see the power of habit. By the law of habit man attains realization by continuous practice of Japa."(IV-8 TN 355 page 40)

("सवयीची शक्ती किती असते पहा. सतत जप करण्याची सवय लावून घेतली म्हणजे माणसाला आत्मसाक्षात्कार होतो")

(3) A devotee asked her, "Mother, What is the secret ?" She pointed to a small timepiece in a niche and said, "As that timepiece is ticking, so also go on repeating God's Name. That will bring you everything. Nothing more need be done." (IV 9 G.407 page 40-41)

(एका भक्ताने माताजींना विचारले, "माताजी यातील रहस्य काय आहे?" कोनाड्यातील घड्याळाकडे बोट करून त्या म्हणाल्या, "या घड्याळाची जशी अविरत टिक् टिक् चालू आहे तसे भगवंताचे नाम घ्या. त्यातून तुम्हाला सर्व काही मिळेल, मग आणखी काही करायला नको.)

(4) A disciple had written "I cannot calm my mind and concentrate" and so on. Mother became agitated at these words and said, "It can be done if one repeats the Name fifteen or twenty thousand times each day. I have seen it actually happen. Let him do that first and talk afterwards if it fails. One must put one's mind to it. But no, no one will do that. They only complain 'why does nothing come of it ?"(IV 13 C-160-161 page 42)

(एका शिष्याने माझे मन शांत होत नाही, चित्त एकाग्र होत नाही इत्यादि बरेच काही लिहिले होते. ते ऐकून माताजी अस्वस्थ झाल्या आणि म्हणाल्या,

''दररोज पंधरा ते वीस हजार जप केला तर हे सगळे जमू लागते हे मी प्रत्यक्ष पाहिलेले आहे. त्याला प्रत्यक्ष ते करू द्या आणि मग तसे झाले नाही तर बोलू द्या. हे मनापासून केले पाहिजे. पण नाही, ते कोणी करत नाही आणि काहीच का होत नाही म्हणून तक्रार मात्र करतात.'')

**पू. बाबा :** नामाचे महत्त्व सांगतांना श्रीमहाराज सद्गदित होत असत. एकदा ते म्हणाले, एखाद्या मंदिराच्या बाहेर बसलेले भिकारी जसे येणारा जाणाराकडे हा मला काही भीक देईल का म्हणून आशाळभूतपणे पहात असतात तसा मी येणाऱ्या प्रत्येकाकडे हा नाम घेईल का म्हणून आशाळभूतपणे पहात असतो. व्यंकणय्यांना म्हणाले, ''जो नाम घेतो त्याच्या दारात मी कुत्र्यासारखा लोळत पडतो.''

ह्या आठवणी सांगतांना पू. बाबांचा गळा दाटून आला. नंतर कार्यकारणभावाचा विषय निघाला तेव्हां पू. बाबा म्हणाले की त्याला देखील मर्यादा आहेत. परमार्थात कार्यकारणभाव पुरेसा पडत नाही; इतकेच नव्हे तर केसीने म्हटल्याप्रमाणे फिजिक्समधेदेखील विशिष्ट मर्यादेनंतर तो निष्फळ किंवा वांझ ठरतो. नाम ही अशी शक्ती आहे की तिने सर्व ज्ञान होते. तुकाराम महाराजांनी म्हटल्याप्रमाणे -

'न कळे तें कळों येईल उगलें। नामें या विठ्ठलें एकाचिया॥ १ ॥

न दिसे तें दिसों येईल उगलें। नामें या विठ्ठलें एकाचिया॥ २ ॥

**| ३९८ |** (डिसेंबर १९९४)

श्रीमहाराजांचा पुण्यतिथी महोत्सव

(श्री. रत्नाभ व कु. विदुला गद्रे यांनी दिलेल्या टिपणांच्या आधाराने महोत्सवातील संवाद दिले आहेत.)

**| ३९८.१ |** (सोमवार दि. १९ डिसेंबर १९९४)

संध्याकाळी ७ वाजता. पू. बाबांची खोली.

**पू. बाबा :** साधनासाठी मौन आवश्यक आहे. मौनाचे तीन प्रकार सांगता येतील.

(१) मौनाची पहिली पायरी म्हणजे मितभाषी व्हावे. अगदी आवश्यक असेल तेव्हांच बोलावे. अभ्यास म्हणून घरात मेल्यासारखे राहावे. समजा आपण मेलो आणि आपल्या घरातील लोक आपल्याला न आवडणाऱ्या गोष्टी

करू लागले तर आपण बोलणे शक्य आहे का? तसे आपण घरात असूनही आपल्या मनाविरुद्ध गोष्टी घडल्या आणि बोलावे असे वाटले तरी संयमपूर्वक ते टाळावे.

(२) मौनाचा पुढचा प्रकार म्हणजे बोलण्याचे मनातच न येणे. एखादी गोष्ट घडली तर ती आपल्या साधनाच्या आड येते का ते पहावे. ही सावधानता येण्यासाठी प्रत्येक गोष्टीची किंमत ठरली पाहिजे. यासाठी थोडा अलिप्तपणा आला पाहिजे आणि तो येण्यासाठी माझेपणा कमी झाला पाहिजे. माझेपणा कमी व्हायला आज जे आहे ते सगळं तुझं आहे असं वाटलं पाहिजे. मनाच्या प्रतिक्रिया बदलल्या पाहिजेत. बोलण्यामधे मार्दव असावे; आग्रह नसावा. आपल्याला काय वाटते ते सांगावे पण ते सांगतांना मनात राग, द्वेष, मत्सर हे नसावे. अलिप्तपणा हा त्याच्याही पलीकडचा आहे. राग येईल तेव्हां बोलूच नये. मनुष्य रागावून बोलतो तेव्हां तो माणूस बोलत नसून त्याचा राग बोलतो असे श्रीमहाराज म्हणत. श्रीमहाराजांचा माणूस गोड बोलणारा, नाम घेणारा, दुसऱ्यांसाठी काहीतरी केल्याशिवाय चैन न पडणारा पाहिजे.

(३) बोलूनही मौन न भंगणे हे तिसरे मौन होय. एक मामलेदार खूप शिव्या द्यायचा. त्याची वरपर्यंत तक्रार गेली. वरिष्ठ अधिकाऱ्याने त्याला बोलावून त्याबद्दल विचारले तेव्हां मामलेदार म्हणाला, 'कोण भोसडीचा म्हणतो मी शिव्या देतो म्हणून?' म्हणजे आपण शिव्या देतो हे त्याच्या गावीही नव्हते. तसे हे मौन बोलूनही भंग पावत नाही. त्या बोलण्यात तो नसतोच.

आपल्याला जेथे कोणीही ओळखत नाही अशा गावी जावे आणि तेथे आपल्या प्रतिक्रिया काय होतात याकडे लक्ष द्यावे. इथे इतके लोक रोज जेवायखायला असत पण मी लोकांना खायला घालतो ही भावनाच श्रीमहाराजांच्या ठिकाणी नव्हती. ज्याचा मी पूर्ण विरघळला, नाहीसा झाला त्यालाच हे शक्य आहे.

## |३९८.२| (२० डिसेंबर १९९४) गोंदवले

**पू. बाबा :** ब्रह्मानंद महाराज गोंदवल्याच्या श्रीमहाराजांच्या पुण्यतिथीच्या उत्सवाला फक्त एकदाच आले होते. त्यावेळी दहा दिवस त्यांनी जमिनीला पाठ लावली नाही. उत्सवामधे एक दिवस पंगत बसलेली असतांना श्री. गणपतराव दामल्यांना ते म्हणाले, उत्सवामधे चोवीस तास जागे रहायचे ते कशासाठी? तर महाराजांना आवडते ते नाम घेण्यासाठी.

एकदा गोंदवल्याला कोणाचा तरी नैवेद्य होता. त्यासाठी ज्याने पैसे दिले होते ते योग्य मार्गाने मिळवलेले नव्हते. तेव्हां ब्रह्मानंद महाराज श्री. गणपतरावांना म्हणाले, 'चल, आज तुला अमृत खायला घालतो.' असे म्हणून त्यांनी गावातून माधुकरी मागून आणली आणि ती दोघांनी खाल्ली.

नवरा किंवा बायकोमधे, मुलाबाळात, पैशामधे असे कितीतरी गोष्टींमधे आपण गुंतलेले असतो. आपण मध्यम स्थितीतली माणसं. समजा, आपला सगळा पैसा एकदम गेला तर आपलं जीवन उध्वस्त होतं. आपल्याला पैशाचा आधार वाटतो; महाराजांचा नाही. आणि गोष्टी मात्र महाराजांच्या सांगतो. श्रीमहाराज म्हणत, एकदा ज्यांनी माझ्या पायावर डोकं ठेवलं, त्याला बाहेर काढल्याशिवाय मी राहत नाही. त्याला सोडविणं माझं काम आहे.

श्रीमहाराज काही वेळा भाऊसाहेबांना (केतकर) भाऊसाहेब, तब्येत कशी आहे म्हणून विचारायचे. भाऊसाहेब बरी आहे म्हणायचे आणि म्हणायचे तीन-चार दिवसात संडासला झाले नाही. श्रीमहाराज म्हणायचे, आज होईल. भाऊसाहेब म्हणायचे, स्वारीनं सांगितलं आहे ना, म्हणजे होणार; आणि खरोखरच त्या दिवशी त्यांना शौचाला व्हायचे! ही महाराजांवरची श्रद्धा. परमार्थामधे किमान श्रद्धा आवश्यक आहे. एकदा श्रीपाद (प्रा. श्रीपादराव) रात्री अकरापर्यंत घरी आला नव्हता. धाकटी मुलगी त्याच्याबरोबर होती. अकरा वाजता मी झोपून गेलो. शेजारच्यांनी दुसऱ्या दिवशी विचारले की मुलगा घरी आलेला नसतांना तुम्ही कसे झोपलात? पण एवढी तरी श्रीमहाराजांवर श्रद्धा नको का? एक श्रीमहाराजांखेरीज बाकीचे सगळे आधार सुटले पाहिजेत. सगळ्या बाजूंनी प्रपंच चांगला असला की श्रीमहाराज म्हणत की गोडातून विष जास्त बाधतं!

आपण नाम घ्यायला लागलो की प्रथम विचारांवर परिणाम होतो आणि नंतर त्याचा देहावर परिणाम होतो; कारण मनातूनच देह आलेला आहे. आपण बोलतो तेव्हां बोलतो त्या विचारांखेरीज दुसरे विचारही डोक्यात चालू असतात; तसे काहीही करतांना, बोलतांना आत नाम चालू पाहिजे. श्रीमहाराजांनी विचारले की तुम्ही ऑफिसात काम करता तेव्हां मनात साहेबाबद्दल राग असतो ना? मग काम करतांना नाम का होत नाही?

एक ओढा आहे. तो ओलांडण्यासाठी पाय उचललेला आहे पण पुढे टाकलेला नाही अशी अवस्था शून्याकडे जातांना असते असे श्रीमहाराज म्हणाले. देह हा

अस्तित्वाचा संकेत आहे. खरे अस्तित्व देहापलीकडे आहे. नाम घेता घेता नामातच राहाता आले पाहिजे. नामात राहाणे हे खरे अस्तित्व आहे.

पू. बाबा म्हणाले, मला काही शंभर वर्षे जगायचं नाही. साधन होत असेल तर ठीक आहे; ते होत नसेल तर जगून काय करायचं? शरीर साथ देतं आहे तोपर्यंत साधून घ्या. माझं घोडा मैदान जवळ आलेलं आहे; तुमचं पण केव्हांतरी येणारच. केव्हां काय होईल काही सांगता येत नाही. तुम्हां सर्वांना हे लागू आहे. हे उघडं सत्य आहे; म्हणून लगबग करा.

## |३९८.३| (२१ डिसेंबर १९९४) गोंदवले

**पू. बाबा** : सकाळी निरूपणात 'विठ्ठल हे छाया माझी मज' याचा अर्थ मुद्दाम सांगितला नाही. छाया म्हणजे seeing double. आपणच आपल्याला दुसऱ्या रूपाने दिसणे. साधनाला मनाचं रूप येतं. ते तुम्हाला दिसायला लागतं. श्रीमहाराज म्हणत, नाम आकार घेऊन त्या रूपानं दिसेल. हा अनुभव स्पष्ट करणारं श्रीराम आकारातील मारुतीचं एक चित्र बरेच वर्षांपूर्वी कल्याण मासिकात आलं होतं. 'बैसला विठ्ठल जिव्हेचिया माथा' म्हणजे जिभेला दुसरी हालचालच करता येत नाही.

प्रपंच उणे आसक्ति बरोबर परमार्थ असे समीकरण मांडता येईल. म्हणजे आसक्तीविना केलेला प्रपंच हा परमार्थच होय. हे करतांना आपल्या मुख्यत: तीन चुका होतात. (१) आपण प्रपंचात गुंततो. (२) प्रपंच असाच चालणार असे धरून चालतो आणि (३) देण्याघेण्यात फार गुंतून राहातो. प्रपंचातही नवरा, बायको, मुलंबाळं, इतर नातेवाईक हे आपले समकालीन असतात. आपण काही त्यांना मागितलेलं नसतं. प्रारब्धानं म्हणा किंवा भगवंतानं म्हणा ते आपल्याला दिलेले असतात. त्यांचे आणि आपले संबंध हे accidents असतात; ते तात्पुरते असतात. फक्त श्रीमहाराजांचा संबंध हा चिरंतन संबंध आहे. श्रीमहाराजांनी विश्वनाथला एका पत्रात लिहिले होते की तुम्हाला आई नाही, बाप नाही, बंधू नाही पण मी आहे. म्हणून शरण जाऊन श्रीमहाराजांना सांगावं की आता मला तुमच्याशिवाय कोणी नाही. प्रपंचातलं प्रेम, आसक्ती काढायला मला मदत करा असं त्यांना आवाहन करावं. बाह्यात्कारी प्रपंचात प्रेमाचं नाटक करावं लागेल पण आत गुंतलेलं नसावं. श्रीमहाराजांखेरीज माझे खरे कोणी नाही अशी आत खात्री असावी.

श्रीमहाराजांवर प्रेम बसले की नामावर प्रेम बसेल कारण नाम आणि महाराज वेगळे नाहीतच. आज सहवासाने आपल्याला प्रपंचाचे प्रेम लागले आहे, तसा श्रीमहाराजांचा सारखा सहवास केल्यास त्यांचे प्रेम येईल. मात्र त्यासाठी श्रीमहाराज हे परमोच्च मूल्य झाले पाहिजे.

जपामधे लवकर प्रगती व्हायला काही प्रमाणात आनुवंशिकता उपयोगी पडते. तथापि ती जरी नसली तरी आज आपली अस्तित्वाची कल्पना दृश्याची आहे ती दृश्यापलीकडे अतींद्रियात गेली पाहिजे. कारण (१)आपण दृश्याच्या कल्पना करतो, त्यांमधे संशयाला वाव आहे. आणि (२) दृश्यामधे कोणाकडून तरी कृती होतांना दिसते. अतींद्रियात या दोन्ही गोष्टी नाहीत. आपल्याला श्रीमहाराजांचे सर्वव्यापित्व पटले तरच आपली अस्तित्वाची भावना अतींद्रियात जाईल. आपल्या संसारात किंवा जगात काहीही होवो आपण निश्चयाने साधन करीत राहावे आणि ते करतांना श्रीमहाराजांना प्रार्थना करून, शरण जाऊन सांगावे की तुम्हीच माझे साधन करून घ्या. श्रीमहाराजांना कबीराचा एक दोहा फार आवडत असे. 'तू तो राम सुमर जग लडवा दे!'

**|३९४.४|** (२२ डिसेंबर १९९४) गोंदवले

**पू. बाबा** : विश्वास, श्रद्धा आणि निष्ठा या तीन्हींमधे फरक आहे. दृश्यावर असतो तो विश्वास आणि अदृश्यावर किंवा सूक्ष्मावर असते ती श्रद्धा. श्रद्धा स्थिर झाली की तिला निष्ठा म्हणतात. आपण औषधावर श्रद्धा आहे म्हणतो. पण ते चूक आहे. औषधावर आपला विश्वास असतो. आपली श्रद्धा बदलली पाहिजे. अदृश्याची प्रचीती येते पण ती घेण्याची पद्धत समजली पाहिजे. आपले साधन बरोबर चालणे आणि समाधान टिकणे हे प्रचीतीचे स्वरूप होय. उदाहरणार्थ, पत्नी (सौ. बाई) गेल्यानंतर श्री. भाऊसाहेबांच्या मनाची समता ढळली नाही. त्यांची सहजता बिघडली नाही. ठीक आहे. **It just happened** ! ही प्रचीती. ती ज्याला येते त्याला बरोबर समजते आणि पटते.

कोणतेही कर्म असो, ते करण्याच्या आधी आणि ते झाल्यानंतर खरोखर हे श्रीमहाराजांच्यामुळे 'घडले' अशी श्रद्धा ठेवली तर कर्मामधे त्यांचे अस्तित्व असतेच. ज्ञानेश्वर महाराजांनी बाराव्या अध्यायात हेच सांगितले आहे. ''परि मनें वाचा देहें। जैसा जो व्यापारु होये। तो मी करितु आहें। ऐसें न म्हणें॥ ११७॥ करणें कां न करणें। हें आघवें तोचि जाणे। विश्व चळतसे जेणें। परमात्मेनि॥ ११८॥'' श्रीमहाराजांवरील श्रद्धा कर्मामधें घातली की त्या कर्माला

दिव्य स्वरूप येते. घरीसुद्धा आपण जेवतो पण इथले जेवण श्रीमहाराजांच्या घरचे असल्यामुळे त्याला प्रसादाचे रूप येते. आपल्या साधनात श्रद्धा आणि पावित्र्य पाहिजे.

बायका लोकरीचे कपडे विणतात तेव्हां शेवटी एक गाठ मारतात. त्या गाठीपासून उसवायला सुरुवात केली तर सगळा स्वेटर काहीही गुंता न होता उसवतो. त्याप्रमाणे नाम घेतले तर गुंता न होता संसार होतो. (पहा : अध्यात्म संवाद भाग २ संवाद क्र. २३८) चांगला संसार, वाईट संसार असे आपण म्हणतो. पण प्रपंचाबद्दल बोलतांना 'विष्ठा कोणत्या रंगाची चांगली?' असे श्रीमहाराजांनी विचारले. प्रपंचाचे स्वरूप आणि त्याची किंमत यावरून लक्षात येते.

नाम चालू असतांना ज्या गोष्टी घडतात त्या श्रीमहाराजांच्या साक्षीने घडतात; नाम चालू असतांना ज्या गोष्टी घडतात त्यांची जबाबदारी माझी असे त्यांनीच सांगितले आहे. म्हणून सतत नाम घेतले तर संपूर्ण जबाबदारी त्यांची होईल. स्वाभाविकच त्यासाठी नामाकडे जास्त लक्ष द्यावे लागेल. नेहमीची कर्मे करतांना नाम टिकले तर नाम चांगले चालण्यासाठी वेगळे कष्ट नकोत. उदाहरणार्थ, स्नान, जेवण इत्यादी करतांना नाम टिकले पाहिजे. त्यासाठी सुरुवातीला प्रयत्नपूर्वक नाम घ्यावे लागेल. अप्रिय घटनात आणि सुखाच्या परिस्थितीत नामस्मरण करायचा अभ्यास केला पाहिजे. आज आपली श्रद्धा, खरे म्हणजे विश्वास दृश्यामधे आहे ती अदृश्यात किंवा सूक्ष्मात गेली म्हणजे मग कोणताही प्रसंग आला तरी समाधान राहील. 'त्यांची इच्छा' अशी प्रतिक्रिया आली पाहिजे - नव्हे तो स्वभाव झाला पाहिजे.

सत्याचे रूप म्हणजे नाम. श्रीमहाराजांच्या अस्तित्वाचे मला कळणारे रूप म्हणजे नाम. आपली काही अडचण असली तर चिठ्ठ्या टाकण्यापेक्षा श्रीमहाराजांना सांगावे की मी असं असं करतो आहे. ते चुकीचं असेल तर तुम्ही मधे अडचणी आणा; म्हणजे मग ते काम झालं नाही तरी तुमचं समाधान टिकेल. समजा, तुमचं हाड मोडलं तर प्रार्थना करावी की नेहमी माझं जसं नामस्मरण होतं तसं होऊ द्या; समाधान राहू द्या. देहाचं प्रारब्ध भोगतांना श्रीमहाराज समाधान टिकवतील. श्रीमहाराज गेले आणि आजही ते आहेत अशी आपली संमिश्र भावना आहे. श्री. दिनकररावांना (केतकर) श्रीमहाराज म्हणाले, मी गेलो ही भावना नाहीशी कर म्हणजे मी आहे. नामाच्या साक्षित्वाने जे कर्म घडेल ती त्यांची इच्छा आणि प्रपंचामधे समाधान टिकणे ही त्याची प्रचीती. न्यायाधीशाचा मुलगा दारू

प्यायला तेव्हां न्यायाधीशाने त्या गुन्ह्याबद्दल त्याला दंड केला आणि आपल्या खिशातून तो भरला. तसे आपल्या जीवनात शुभअशुभ प्रसंग प्रारब्धानुसार येणार. गुरु ते टाळत नाहीत, पण समाधान देतात.

नाम हेच श्रीमहाराजांचे रूप. आणखी वेगळी कल्पना कशाला पाहिजे? आजसुद्धा त्यांचे अस्तित्व दृश्यात म्हणजे नामात आहे. 'अगुन सगुन बिच नाम सुसाखी। उभय प्रबोधक चतुर दुभाषी॥' असे तुलसीदासांनी नामाचे वर्णन केले आहे. नाम घेतले की श्रीमहाराज कोठून तरी येतील ही भावना बरोबर नाही; ते आहेतच. त्यांच्या शब्दांवर श्रद्धा पाहिजे. 'जेथें नाम तेथें माझे प्राण' असे त्यांनी सांगितले आहे. म्हणून आपल्या मनातल्या त्यांच्या अस्तित्वासंबंधीच्या कल्पना बाजूला काढल्या पाहिजेत. माझ्या कल्पना तेथे पोचूच शकत नाहीत कारण ते dimension (पातळी, आयाम) वेगळे आहे.

आज आपले मन दृश्याला चिकटलेले आहे. ते देहाच्या मागे जाते. त्याच्यावर विश्वास ठेवू नये कारण ते आपल्याला नामापासून दूर न्यावयाचा प्रयत्न करते. एक सावकार होता. त्याची म्हातारी आई होती. ती घरात पडून असे आणि त्याला योग्य सल्ला देत असे. पण तो तिला विचारतच नसे. मात्र एखाद्याला पैसे द्यायचे नसले की आईला विचारून येतो म्हणे आणि आईने पैसे देऊ नको म्हणून सांगितले आहे म्हणे. त्या म्हाताऱ्या आईप्रमाणे आपली बुद्धी बरोबर सांगत असते पण त्या सावकाराप्रमाणे आपले मन तिचे ऐकत नाही. खरे म्हणजे एका मनाच्या श्लोकाचे जन्मभर आचरण केले तरी काम होईल; मनाच्या कचाट्यातून सुटता येईल. मन चुकीच्या गोष्टींचे समर्थन करते, आपल्याला लाचार बनवते. हिऱ्याने हिरा चिरावा तसे मनाने मन मारावे. ''मन करा रे प्रसन्न। सर्व सिद्धीचें कारण। मोक्ष अथवा बंधन। सुख समाधान इच्छा ते॥'' असे तुकाराम महाराजांनी सांगितले आहे. 'मन गुरु आणि शिष्य' बुद्धी सांगते पण मन ऐकत नाही म्हणून कुणाचं तरी ऐकायला शिकावे. मात्र सांगणारा निस्वार्थी पाहिजे आणि ऐकतांना आपले मन स्वच्छ पाहिजे. म्हणून नेहमी श्रीमहाराजांना काय आवडेल असा विचार करावा. आजोबा खोकल्यावर ते घरात आहेत हे लक्षात येऊन जसं त्या नवरा बायकोचं चहा कोणी करायचा हे भांडण थांबलं तसं श्रीमहाराजांच्या अस्तित्वाची जाणीव झाली तर ती जाणीव मनाला आवरील. म्हणून ती जाणीव सतत जागी पाहिजे.

नाम सर्वोच्च, सर्वश्रेष्ठ आहे हे मनाने घट्ट धरले की बाकीचे सर्व बाजूला पडेल. नाम घेतांना मी नाम घेतो आहे ही जाणीव सतत ठेवली तर विकार

ताब्यात राहातील; साक्षित्व येईल. आपण नामाला सत्यत्व देत नाही. नाम हे जीवनाचे एकमेव ध्येय - सर्वस्व झाले पाहिजे. ध्येयाची जाणीव सत्संगतीमधे जागी राहते. तेथे भावना उपयोगी पडते. ही जाणीव सतत जागी ठेवण्यासाठी (१) गुरुवचन (२) सत्संग - विशेषत: प्रत्यक्ष सांगणारा आणि (३) सद्ग्रंथांचा अभ्यास उपयोगी आहे.

**।३९८.५।** (२३ डिसेंबर १९९४) गोंदवले.

**साधक :** आत्मज्ञानी आणि ब्रह्मज्ञानी एकच की त्यात काही फरक आहे?

**पू. बाबा :** साधन करता करता साधकाला आधी मी ब्रह्म आहे असा अनुभव येतो व नंतर सगळे जग ब्रह्मरूप दिसते. ब्रह्मज्ञानापर्यंत पोचेपर्यंत साधकाला देह मिथ्या वाटतो. ज्ञानेश्वर महाराजांनी म्हटल्याप्रमाणे ब्रह्मज्ञान झाल्यावर तो साधनाचे हत्यार खाली ठेवतो. "तैसा आत्मसाक्षात्कारु। होईल देखोनि गोचरु। ऐसा साधनहतियेरु। हळूचि ठेवी॥१८.१०८३॥ म्हणौनि ब्रह्मेंसीं तया। ऐक्याचा समो धनंजया। होतसे तैं उपाया। बोहटु पडे॥ १८.१०८४॥" नंतर तो अनुभव आपोआप वाढत जातो. त्यावेळी सर्व जगच ब्रह्म दिसते. जगामधे सगळीकडे परमेश्वराचे सौंदर्य दिसते. जगात जे जे आहे ते ते मी आहे असा बोध होतो. श्रीमहाराज म्हणत, मी नाम देतो त्यात मी आहेच ना! परमेश्वराचे रूप आपल्याला माहीत नाही. ते माहीत व्हायला मनाची तयारी झाली पाहिजे. ती होण्यासाठी मनाला मारायचा अभ्यास करावा किंवा श्रीमहाराजांना शरण जावे. एक जन्म नामाला दिला! ह्यासाठी मन कसं तयार करायचं? (पहा : अध्यात्म संवाद भाग २ संवाद क्र. १८१ व १९४) त्यासाठी (१)माझ्याआड मन येत आहे हे आधी कळले पाहिजे. सत्संगाने ही जाणीव होते. पण सत्संग मिळणे कठीण म्हणून निदान साधकांची संगत मिळावी. (२) परमार्थाला सर्वोच्च मूल्य (Supreme value) आहे. त्या दृष्टीने मनाकडे दुर्लक्ष करावे. मनाला किती महत्त्व द्यायचं? तथापि जप मनानेच करायचा आहे हे लक्षात घेतलं पाहिजे. यासाठी श्रीमहाराजांनी सांगितलं आहे ते खरं मानायला हवं. बाह्यांगाने आणि अंतरंगाने त्यांना काय आवडेल हा विचार करावा. साधनाच्या आड काय येतं ते पाहिलं पाहिजे. आपलं मन काही सारखा हट्ट करीत नाही. जिथे हट्ट करतं तिथं ते खरं गुंतलेलं असतं. ते मोडून काढलं पाहिजे. तुकाराम महाराज म्हणतात :

"होऊ नको कांहीं या मनाआधीन। नाईके वचन याचे कांहीं॥ १॥
हठियाची गोष्टी मोडोनी टाकावी। सोय ती धरावी विठोबाची॥ २॥"

**डॉ. आठवले :** एकदा श्रीमहाराज मला म्हणाले की गोड खाणं बाधत नाही; त्याच्यामागची चटक बाधते.

**पू. बाबा :** होय. मनच साधन लुटून नेते. आज मन दृश्यात गुंतून आहे ते वळवून परमार्थाकडे लावावे लागते. तिथे द्वंद्व सुरू होते. ह्या द्वंद्वामुळे साधनाचे कष्ट आहेत. ते सहन करायलाच पाहिजेत. 'रात्रंदिवस आम्हां युद्धाचा प्रसंग'. हे युद्ध टाळायचा मार्ग म्हणजे आपलं सगळं गुरूंना देणं. सगळं त्यांना दिलं की द्वंद्व नाही. ते भाऊसाहेबांनी केलं. मनच अर्पण केलं. पण ही मोठी उडी आहे; कड्यावरून उडी मारण्यासारखे आहे. आज आपल्याला द्वंद्वातूनच गेले पाहिजे. त्यासाठी मनाची शक्ती लागते; म्हणून श्रीमहाराजांची प्रार्थना करावी. देह प्रारब्धाने जातो. मग हट्ट कशाला? नेहमीचे जीवन श्रीमहाराजांच्या सर्वव्यापित्वाने भरून टाकावे. प्रत्येक घटनेत त्यांचा हात पाहावा. त्यासाठी नाम पाहिजे. खरं म्हणजे आपल्याला ध्येयाची आंच लागलेली नाही. विवेक सतत जागृत पाहिजे.

**डॉ. आठवले :** भगवान रमण महर्षींना विचारले, मनाची शक्ती म्हणजे काय? तेव्हां ते म्हणाले, भगवंताच्या अनुसंधानाच्या आड जे येते त्याला बाजूला सारणे ही मनाची शक्ती. हे कशानी साधेल म्हणून विचारल्यावर म्हणाले, मनाचे न ऐकण्याने.

श्रीमहाराजांशीही एकदा यासंबंधी बोलणे झाले. ते म्हणाले की काही झाले तरी नामाचा हट्ट सोडू नये. मी म्हणालो, हे कशाने साधेल? ते म्हणाले, त्यासाठी नाम माझ्या हिताचे आहे ही जाणीव पाहिजे. मी विचारले की ही जाणीव कशी होईल? तेव्हां ते म्हणाले हट्टाने नाम घेण्याने. हे कशाने साधेल म्हणून विचारल्यावर म्हणाले, त्याचा अनुभव घेऊनच पाहावा.

## **| ३९८.६ |** (२४ डिसेंबर १९९४) गोंदवले

**पू. बाबा :** आज सकाळी प्रवचनात एक गोष्ट सांगितली नाही. तुकाराम महाराज म्हणाले, 'न दिसे तें दिसों येईल उगलें.' त्यांना ती दृष्टी असली पाहिजे. जो निस्वार्थीपणे साधन करतो त्याला ती दृष्टी येते. तुकाराम महाराजांना सत्संगती कोठे मिळाली असे श्रीमहाराजांना विचारले तेव्हां ते म्हणाले, सत्पुरुष देहातच असतात असं कुठे आहे? ते कोणत्या तरी रूपानं येऊन संगत घडते. आपलेही रक्षण करणारे जीव किंवा देवदूत म्हणा - Guardian Angel असतात. ते आपल्याबरोबर असतात.

**साधक :** साधनात सावधानता हवी असं सकाळी आपण म्हणालात. ही सावधानता कोणत्या बाबतीत असावी?

**पू. बाबा :** आपलं दृश्याचं प्रेम अजून सुटत नाही. आपण त्याच्यात मुसंडी मारतो. दृश्याची किंमत ठरली पाहिजे. प्रपंच स्वप्नवत् वाटला पाहिजे. त्यासाठी प्रपंचाचे योग्य मूल्य - proper valuation झाले पाहिजे. प्रपंच वरवरचा असावा. प्रपंच करतांना हे सगळं श्रीमहाराजांनी दिलेलं आहे असा भाव ठेवावा. म्हणजे मग वाट्याला सुख आले किंवा दु:ख आले तरी मनाचा समतोल बिघडणार नाही आणि साधन नीट चालेल.

**साधक ग :** इथे जप करतांना जी धारणा असते ती घरी टिकत नाही.

**पू. बाबा :** त्याचं कारण आपण शोधून ते दूर करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. हा अभ्यास आहे. त्याचा कंटाळा करून कसे चालेल? एकदा श्रीमहाराजांना म्हणालो, वाचल्यावर समजले असे वाटते पण ज्ञानाचा तो प्रकाश टिकत नाही. यावर श्रीमहाराज म्हणाले, असं कां म्हणता? नाम ही बॅटरी आहे, ती खिशात ठेवावी म्हणजे असं होणार नाही.

आपला दुटप्पी व्यवहार असतो. घरातल्या प्रेमाचा चटका व्यवहारात आणता पण श्रीमहाराजांच्या प्रेमाचा चटका व्यवहारात आणत नाही. आपण मुलाबाळात इंटरेस्ट घेतो पण श्रीमहाराजांच्यात कितीसे रमतो? त्यांच्या आवडी निवडी किती accept (स्वीकार) करतो? स्मरण किती वेळा करतो?

सहवासाने प्रपंचाचे प्रेम निर्माण होते म्हणता पण मग तीस पसतीस वर्षे नोकरी करता तिथलं खरं प्रेम येतं का? आज आपला स्वार्थ प्रपंचात गुंतला आहे. वास्तविक खरा स्वार्थ नामात आहे, श्रीमहाराजांच्यात आहे. लोकांतात साधणारा एकांत तो खरा. 'बाजारसे गुजरा हूँ, खरीददार नहीं हूँ।' Great is the man who loves solitude. Greater is the man who keeps solitude in crowd.

भाऊसाहेबांनी प्रपंच श्रीमहाराजांच्यावर सोपवला, पण आपण त्यात अडकलेले आहोत ना! म्हणून आज निदान मनाने प्रपंच सोडावा. त्यासाठी सावधानता पाहिजे. दृश्यातून सुटायला सत्संगती तरी हवी नाहीतर नामाला चिकटायला हवे. आज आपल्याजवळ दोन्ही नाही म्हणून वैखरीने सारखे 'महाराजांची इच्छा' म्हणावे. म्हणजे मग वाईट परिस्थितीत सुद्धा हे तुमच्या इच्छेने आलेले आहे ना, असे वाटून समाधान राहील. त्यांच्या इच्छेचा आधार घेऊन शांत राहायला शिकावे. घरात पाहुण्यासारखे राहायचा अभ्यास करावा.

बाहेरचा विरोध शक्यतो टाळावा म्हणजे साधनात विक्षेप येणार नाही. नामस्मरणाची खरी आंच लागली तर आपोआप बाकीचे अनुकूल होतात; कारण ते ध्येयच दिव्य आहे. श्रीमहाराजांना जनप्रियत्व आवडत असे म्हणून आपण शक्यतो दुसऱ्याचे अंत:करण दुखवू नये. आपण गेल्यावर आपल्याविषयी निदान कटु स्मृती राहू नयेत असं वागावं.

**|३९८.७|** (२५ डिसेंबर १९९४) गोंदवले.

**साधक :** ख्रिश्चन धर्मात पश्चात्तापाचे महत्त्व सांगितले आहे आणि वारंवार पश्चात्ताप व्हावा म्हटले आहे. पश्चात्ताप म्हणजे नेमके काय? आपल्याकडे पश्चात्तापासंबंधी विशेष सांगितलेले आढळत नाही. असे कां?

**पू. बाबा :** असे कां म्हणता? पश्चात्तापाशिवाय प्रगती नाही. वाल्या कोळ्याची परमार्थाची सुरुवातच मुळी पश्चात्तापातून झाली. आपण बोलू नये ते बोललो, करू नये ते केले असे वाटून स्वत:ची कीव येईल, रडायला येईल; पण ते तात्पुरते होता कामा नये. परिणाम टिकला पाहिजे. नाहीतर तीही सवय होऊन जाते. या देहाकडून पाप झाले नाही असे श्रीरामकृष्णांसारखे कोण सांगू शकेल? पश्चात्ताप म्हणजे घडून गेलेल्या गोष्टीबद्दल **intense dislike.** (आत्यंतिक नावड).

१) घडायला पाहिजे ते घडलं नाही.

२) संधीचा फायदा घेतला नाही. आणि

३) जे घडायला नको होतं ते घडलं, जीवनाचं नुकसान करून घेतलं.

याबाबतीत भावना जागृत होते. भावना तीव्र झाली की रडू येतं. पश्चात्तापाची तात्त्विक पार्श्वभूमी अशी की मी अपूर्ण आहे आणि मला पूर्णतेची ओढ आहे. मी नाम घेतलं नाही ही पश्चात्तापाची सुरुवात आहे. आपण सामान्य माणसं. तेव्हां गैरवर्तन झालं नाही पण नामही झालं नाही असं वाटून परिवर्तनाला सुरुवात झाली पाहिजे. श्रीमहाराजांना भिकारपण आवडलं नाही. आपलं वागणंही **dignified** धीर गंभीर असावं.

पश्चात्तापाला विचार आणि विवेकाची जोड पाहिजे. श्रीमहाराज म्हणाले, "आजपर्यंत मी विचार केल्याशिवाय एक पाऊल टाकलं नाही." आपला हिशोब काय? पश्चात्ताप तीव्र व्हायला ध्येयाची जाणीव हवी. परिवर्तन **(conversion)** दोन प्रकारचे - एकदम होणारे आणि हळूहळू होणारे **(sudden and gradual).** ब्रह्मानंद महाराजांचं परिवर्तन हे सात्त्विक परिवर्तन

होतं. पश्चात्तापाच्या आड अभिमान येतो. अभिमानाची तुच्छता कळली की जीव उच्च प्रतीला जातो.

श्रीमहाराज म्हणाले, "मला रामाने एक गोष्ट शिकवली आहे. जो मनुष्य येईल त्याचं पाप पदरात घ्यायचं आणि त्याला रामाकडे न्यायचं." आपण भाग्यवान, कारण अशा गुरूच्या पदरी पडलो आहोत. व्यसन, वाईट मार्ग आणि प्रपंचात रमणं, तीन्ही परमार्थाच्या दृष्टीने घातकच. क्षुद्र गोष्टींनी आपण आपली शक्ती वाया घालवतो. आपल्या चुका, आपलं पाप रामापुढे उभं राहून कबूल करावं आणि पुन्हा तसं वागू नये. ख्रिश्चन धर्मातही confession (पाप कबूल करणं) आहे.

**साधक ग** : चुका रामाला सांगाव्या की श्रीमहाराजांना?

**पू. बाबा** : राम आणि श्रीमहाराज एकच आहेत. चुका कबूल करून पुन्हा तसे न वागणे महत्त्वाचे. सत्पुरुषांना पापाचे आपल्यासारखे भय नाही. आपण आपल्या प्रयत्नांनी त्यातून बाहेर पडू शकत नाही. सत्पुरुष नुसत्या दृष्टीनेच त्यातून बाहेर काढतात. श्रीमहाराज कर्नाटकात गेले होते तेव्हां त्यांच्या मिरवणुकीत ब्रह्मानंद महाराजांनी दिवसा मशाली लावल्या होत्या. दिवसा मशाली का लावल्या आहेत ते पहायला लोक येतील आणि श्रीमहाराजांची दृष्टी त्यांच्यावर पडून ते सन्मार्गाला लागतील असे ते म्हणाले.

हातून पाप घडलं तरी पुन्हा करणार नाही असं श्रीमहाराजांजवळ कबूल करून तसं वागावं म्हणजे जीवन बदलेलच. जीवनाला नवे वळण लागेल. आजपर्यंत तुम्हाला विसरलो पण आता शक्य तितके तुमचेच स्मरण करीन. आता मी तुम्हाला सोडणार नाही. मी चुकलो; तुम्हाला न आवडणाऱ्या गोष्टी केल्या. त्या आता करणार नाही. तुमच्यासमोर यावयाला लाज वाटेल असे करणार नाही. हे विचाराने निर्माण करून त्याला भावनेची जोड दिली पाहिजे. किंबहुना यात भावनाच प्रदीप्त झाली पाहिजे.

**साधक आ** : आज चुका होत असूनही श्रीमहाराजांसमोर जायला लाज वाटत नाही. ते कसं करावं? सुरुवात लाज वाटण्यात आहे. त्यांना तोंड कसं दाखवावं ही भावना होत नाही. हे कोडं कसं उलगडायचं?

**पू. बाबा** : त्यासाठी शरणागतीची भावना पाहिजे. शरण जातांना ते श्रेष्ठ आहेत, ते पतितांचा उद्धार करतात ही श्रद्धा पाहिजे. आता तुम्ही केलंत तरच होईल हा भाव पाहिजे. यामधे तीव्रता जेवढी जास्त तेवढी मदत जास्त. पश्चात्तापाचा मूळ हेतू यातून मला बाहेर काढा. मी आहे हा असा आहे; आता

तुम्ही बघा काय करायचं हा आहे. मी तुमचा आहे. 'न करी उदास मायबापा।' हे प्रामाणिकपणे वाटले पाहिजे. माझे चुकते आहे हे कळून मी यातून सुटलं पाहिजे हा ताण आला पाहिजे; असहाय्यता आली पाहिजे. आपल्याला शोभेल असं वागणं झालं नाही, प्रयत्न करूनही जमलं नाही, आता तुम्ही करा अशी पश्चात्तापाची भावना पाहिजे. मी त्यांचा आहे ही सतत जाणीव राहून आता त्यांना आवडेल असे वागलो नाही तर आधार सुटेल असं भय वाटलं पाहिजे. ह्या सगळ्या गोष्टी विवेकाने केल्या पाहिजेत. त्यांच्या स्मरणात समाधान वाटू लागलं की ओळखावं की आता त्यांनी स्वीकार केलेला आहे. मग समस्या राहाणार नाहीत, दृश्याचा संबंध राहाणार नाही. स्मरण व्यापक होऊन त्यांच्या सत्तेने सर्व घडते हे पदोपदी जाणवू लागेल.

**| ३९८.८ |** (२६ डिसेंबर १९९४) गोंदवले.

**पू. बाबा :** We are living in visible. विश्व नियमानं चालतं. कार्यकारणावर म्हणजे कर्मावर आपला विश्वास आहे. त्याचं गमक म्हणजे काळजी लागते. ''देहाची गती। प्रारब्धानें जाती। ऐसें संत सांगती। परी मना न येती॥'' दृश्याची, कार्यकारणाची पकड सुटल्याशिवाय परमार्थ नाही.

**साधक घ :** प्रारब्धावर विश्वास ठेवावा की न ठेवावा? त्याचा परमार्थाला काय उपयोग करून घेता येईल?

**पू. बाबा :** माझ्या मते, प्रारब्धावर निष्ठा पाहिजे असं सांगितलं तर सामान्य माणसाची अकर्मण्याकडे प्रवृत्ती होईल. 'प्रारब्ध बदलणं हा गुन्हा आहे. मी ते सुसह्य करतो. टाळत नाही' असं श्रीमहाराज म्हणत. प्रारब्धच देहाचं रक्षण करतं, म्हणून माणसानं आत्म्याचं चिंतन करावं असं आचार्यांनी म्हटलं आहे. विशेषत: लग्नाच्या बाबतीत प्रारब्धाचा खेळ उघड उघड दिसतो. '' मना त्वांचि रे पूर्वसंचीत केलें। तयासारिखं भोगणें प्राप्त झालें॥'' प्रारब्धाची गती देहापर्यंत आहे, पण मन स्वतंत्र आहे. तथापि आज आपलं मन देहाला चिकटलेलं असल्यामुळं मनानं साधन होत नाही. प्रारब्धाची गती मनात योग्य रीतीने रुजली तर मन शांत राहून साधन सोपे जाईल. आपण प्रारब्धाला 'महाराजांची इच्छा' म्हणतो. ''मला प्रारब्धात कमीजास्त करता येतं पण त्याची शरणागती पाहिजे'' असं श्रीमहाराजांनी म्हटलं आहे. आपला मध्यम मार्ग; प्रयत्न करावा, फळ काय मिळेल ते पाहू नये. प्रारब्ध - something happens in time पुनर्जन्मावर विश्वास ठेवल्याशिवाय प्रारब्धाचा विचार करता येत नाही.

पुनर्जन्मात देह नवीन पण मन तेच. मनाला ते जोपर्यंत देहाला चिकटलेलं आहे, म्हणजे देहबुद्धी आहे तोपर्यंत स्वातंत्र्य नाही. तथापि गुरूने दिलेले साधन प्रारब्धाधीन नाही. 'नाम हें प्रारब्धानें येत नाहीं आणि कर्मानें जात नाही.' सत्पुरुषाची गाठ पडणे मात्र प्रारब्धाधीन आहे. परमेश्वर आहे ही जशी श्रद्धा आहे तशीच प्रारब्धावर श्रद्धा पाहिजे. हवेनकोपणात आणि जीवनात घडणाऱ्या गोष्टीत प्रारब्ध पाहिले तर सुखदु:खातून सुटका होईल. प्रारब्धावर श्रद्धा ठेवली की प्रयत्न राहतो पण कर्तेपणाचा अभिमान जातो. मनाचा जडाशी चिकटलेला भाग म्हणजे प्रारब्ध हे बहिर्मुख आहे. मन अंतर्मुख करून भगवंताकडे वळवले की त्याच्यावर प्रारब्धाचा अंमल राहात नाही. श्रद्धा प्रारब्धाच्या प्रांतापलीकडे आहे. म्हणून सूक्ष्मावर श्रद्धा ठेवून प्रारब्धाच्या पंजातून सुटावे. शिष्याचे प्रारब्ध गुरूवर परिणाम करीत नाही, पण गुरूचा संकल्प शिष्यावर परिणाम करतो. म्हणून गुरूवर श्रद्धा ठेवावी आणि स्वत:कडे तिऱ्हाईतपणे - साक्षीभावाने पाहावे. गुरूवर श्रद्धा ठेवली की प्रपंचातील आघात सोसण्याची शक्ती येते.

कृपेचे स्वरूप विलक्षण असते. जे होणार असतं ते तुम्हीच करणार असता. सिनेमाची रिळे उलगडावी तसे प्रारब्धानुसार सगळे घडते. म्हणून कर्तेपणा गेला की क्रियमाण नाहीसे होईल आणि संचितात भर पडणार नाही. All doubts are mental and mental is not true असे रमणमहर्षींनी म्हटले आहे.

**। ३९८.९ ।** (२७ डिसेंबर १९९४) गोंदवले.

**साधक ग** : आमच्या प्रपंचातल्या अडचणी सत्पुरुषांना सांगाव्या की नाही?

**पू. बाबा** : सत्पुरुषाकडे आपण प्रपंचाकरता जातो ते बरोबर नाही. त्याचे कार्य तुमची वासना नाहीशी करणे हे असते; पण आपण त्याच्याकडे व्यवहारदृष्टीने पाहातो. म्हणून मध्यम मार्ग धरावा. माझी ही इच्छा आहे; तथापि तुमच्या इच्छेप्रमाणे होऊ द्या, आणि एखादी इच्छा पूर्ण झाली नाही तर तेच माझ्या हिताचं आहे असे वाटले पाहिजे.

श्रीमहाराजांनी श्री. गोपाळराव मोकाशींचें लग्न काळ्या मुलीशी केलं. श्री. गोपाळराव म्हणाले, एकीकडे ते आपल्या हिताचं करतात ही जाणीव असते तर एकीकडे वाटतं की हे काय चाललंय? मन साथ देत नाही. पण महाराजांची इच्छा शेवटी हिताचीच असते. त्यामुळे संसार सुखाचा झाला. लहान असतांना मुलं खेळायची त्यातल्याच एका मुलीशी श्रीमहाराजांनी भाऊसाहेबांच्या मुलाचं

लग्न ठरवलं. एका बाईच्या गळ्यात दोन मंगळसूत्रं होती, त्यातलं एक काढून त्या मुलीच्या गळयात घातलं. मुलीच्या वडिलांना महारोग झालेला होता. पण भाऊसाहेबांची ह्या घटनेवरील प्रतिक्रिया 'महाराज अहिताचं कसं करतील' ही होती.

**साधक भ :** श्रीमहाराज हिताचं करतात ही श्रद्धा वाढवायला काय करायचं ?

**पू. बाबा :** आज आपल्याला नातेवाईक, तब्येत, पैसा यांचा आधार वाटतो. श्रीमहाराजांचं सर्वव्यापी अस्तित्व बघण्यासाठी प्रत्येक घटनेत त्यांचा हात बघायला शिकलं पाहिजे. प्रारब्धाचा खेळ विचित्र आहे. त्यामुळे जीवनातल्या काही घटनांनी दु:ख होणारच. म्हणून श्रीमहाराजांचं स्मरण ठेवून जप केला की आधार वाटतो. आज माणुसकी कमी झाली आहे. सोसणे - tolerance कमी झाल्यामुळे कुटुंबातली माणसेदेखील समजुतीने घेत नाहीत म्हणून त्रास होतो. अशा स्थितीत मन स्थिर राहायला त्यांच्यावर सोपवून द्यायला शिकलं पाहिजे. हे एक साहस - adventure आहे. जीवन अतिशय विचित्र आहे. पहा ना! शिवाजी महाराजांचा मुलगा शत्रूला जाऊन मिळाला!

श्रीमहाराज म्हणाले, 'व्यवहारदृष्ट्या माझ्यामधे एकच दोष आहे; मला कुणाचं दु:ख पाहवत नाही.' म्हणजे मी पूर्णपुरुष आहे. त्यावर श्रद्धा ठेवायला काय हरकत आहे ? श्रद्धा वाढली पाहिजे. ते सत्संगतीने होते. पण ती मिळाली पाहिजे ना!

श्री. गणपतराव दामल्यांच्या पत्नीला मूळव्याधीचा त्रास होता. ती दोघे काशीयात्रेला जायला निघाली तेव्हां श्रीमहाराज त्यांना पोचवायला बाहेर आले आणि तिथल्याच एका झाडाचा पाला घेऊन श्री. गणपतरावांच्या बायकोला दिला आणि म्हणाले, 'नुसता हा पदराच्या टोकाला बांधून ठेवा.' बाईंना सबंध प्रवासात मूळव्याधीचा त्रास झाला नाही; परत आल्यावर पुन्हा मूळव्याध सुरू झाली. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, 'भोग हा भोगलाच पाहिजे; फार तर तो लांबणीवर टाकता येतो इतकेच!'' (पहा : श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज. चरित्र आणि वाङ्मय लेखक : के. वि. बेलसरे. प्रकरण १५ परंपरा व शिष्यमंडळ) पुढे एकदा मी श्रीमहाराजांना विचारले की त्यांना प्रवासात मूळव्याधीचा त्रास झाला नाही हे खरे का ? तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, ''सूर्याचं पिलू झाकलं तरी किती झाकणार!''

आपण श्रीमहाराजांना शोभेल असं वागलं पाहिजे तरच इथे येण्यात अर्थ आहे. श्रद्धा वाढली पाहिजे. आपल्या जीवनातल्या घटना मामुली असल्यामुळे

अभ्यास करायला सोपा आहे. पण अडचण अशी की हित म्हणजे आपण देहाचं हित समजतो. श्रीमहाराज म्हणत, "माझा मनुष्य कसा पाहिजे? घूस असते तिला मारलं तर ती फुगत जाते. तसे दुःखाचे प्रसंग आले तर फुगत गेलं पाहिजे." म्हणजे श्रद्धा आणखी बळकट झाली पाहिजे.

मग आज मी काय करायला हवं?

१) Accept करायला म्हणजे घडेल त्याचा तक्रार न करता मनापासून स्वीकार करायला शिकावं.

२) श्रीमहाराजांकडं कशाकरता आलो, काय मिळवायचं आहे याचं सदैव भान ठेवावं.

३) व्यवहारानं आपल्याला शिकवलं आहे की सगळ्या गोष्टी मनासारख्या होत नाहीत.

४) श्रीमहाराज प्रपंचाकरिता नाहीत. म्हणून तुम्हाला मी शोभेन असं वागता येईल अशी सद्बुद्धी द्या असं त्यांच्याजवळ मागावं. असं वागणं हेच आदर्श आहे असं वाटलं पाहिजे. त्यासाठी श्रद्धा बळकट झाली पाहिजे. त्यांच्याजवळ शांती मागावी.

५) प्रपंचात भय आहे, काळजी आहे. त्यामुळे आपण आधार शोधत असतो. बाहेरचे आधार शोधण्यापेक्षा श्रीमहाराजांसमोर एकदा सगळं सांगावं, काय काय हवंय, कशाकरता हवंय ते, आणि म्हणावं की हे सगळं मनातून काढून तरी टाका नाहीतर पूर्ण तरी करा. तुम्ही ज्या भगवंताच्या आनंदाच्या गोष्टी सांगता त्या द्या. बाकी सगळं काढून टाका. आता थोडा तरी त्या आनंदाचा अनुभव द्या.

पू. बाबा पुढे म्हणाले, खरं सांगू का? राजाची राणी जरी झाली तरी दोन महिने गेल्यावर माझं मूल दाखवा असं तिनं म्हटलं तर दाखवता येत नाही; नऊ महिनेच जावे लागतात. तसंच परमार्थातील अनुभवाचं आहे.

मला खरं काय पाहिजे याची मला कल्पनाच नाही. श्रीमहाराजांकडे सुंदर जीवनाचं प्रत्यंतर मागावं. मुख्य म्हणजे त्यांची सतत आठवण पाहिजे. ज्यात त्यांचं विस्मरण होईल ती परिस्थिती नको. त्यांची आठवण हेच आश्वासन. यासाठी अभ्यासच पाहिजे. श्रीमहाराजांना सोडून मन दुसऱ्या आधाराकडं जात नाही ना ते पहावं. हा पतिव्रता धर्मच आहे. महाराज भोग भोगायला लावून समाधान देतात; शक्ती देतात. नाम हे त्यांचं स्वरूप आहे. नाम इतकं घ्यावं की दुसरं कशाचं स्मरण होता कामा नये.

**डॉ. आठवले** : एकदा मी श्रीमहाराजांना म्हणालो की माझ्या घरात तुमचं अस्तित्व राहू दे. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, मी आहेच. जितकं नाम घ्याल तितकी प्रचीति येईल.

**|३९८.१०|** (२९ डिसेंबर १९९४) गोंदवले. सकाळी ९ वाजता.

**साधक** : आपल्या चर्चेमधून दोन गोष्टी माझ्या लक्षात आल्या आहेत. एक म्हणजे इच्छा असूनही मनासारखे साधन होत नाही आणि दुसरे श्रीमहाराजांचे अस्तित्व समजत नाही. काही वेळा ते समजले असे वाटते पण मग तो भाव टिकत नाही.

**पू. बाबा** : मी यावर बराच विचार केला आहे. साधन करावे असे वाटत असले तरी अद्यापि ते सर्वोच्च, सर्वोपरी आहे असे वाटत नाही; म्हणजे त्याबाबतीत आपण कमी पडतो. श्रीमहाराजांच्या अस्तित्वासंबंधी सांगायचे तर दृश्याच्या विश्लेषणामध्ये आपले घोडे पेंड खाते. दृश्य ही शक्ती आहे. अदृश्यातून दृश्य आले ते शक्तिरूपाने आले. परमात्मा परिपूर्ण म्हणजे Absolute आहे आणि ईश्वर हे त्याचे कार्यरत अंग आहे. God is the active side of the Absolute. देह अवयव इत्यादी सर्व शक्तीची किंवा ऊर्जेची निर्मिती - Product of Energy आहेत. अस्तित्वामधे दृश्याचे dimension (आयाम) शक्तिरूप आहे.

माझ्या जीवनात ज्या घटना घडतात त्या शक्तीनेच घडतात. ती शक्ती मला सारखी जाणवणे म्हणजेच अस्तित्व. माझे जगणे, माझी हालचाल शक्तिरूप आहे. आचार्यांनी ईश्वराची दोन लक्षणे सांगितली आहेत. सर्वज्ञः आणि सर्वशक्तिसमन्वितः। सर्वज्ञ म्हणजे तो सर्व जाणतो. हे विश्व नामरूपात्मक आहे. रूप Particular म्हणजे विशेष आहे तर नाम Universal म्हणजे सामान्य आहे. शक्तीने घेतलेले रूप म्हणजे दृश्य. एकाच शक्तीची अनेक रूपे होतात. माणसाचे माणूसपण, प्राण्याचे प्राणीपण, वृक्षाचे वृक्षपण यांमधे सामान्याची प्रचीती आली पाहिजे. माणूस कल्पना करू शकतो पण प्रचीती येणे हा परमार्थ आहे.

शक्तीच्या दोन दिशा आहेत. विद्या आणि अविद्या किंवा शारदा आणि वासना. पहिली ऊर्ध्वगामी म्हणजे माणसाचे जीवन उन्नत करणारी तर दुसरी अधोगामी म्हणजे माणसाला खाली पशुत्वाकडे खेचणारी आहे. श्रीमहाराजांनी दोष सांगतांना काम हा दोष सांगितला नाही; मुख्यतः पैशाचा लोभ आणि क्रोध यांवर भर दिला. वय होईल तशी सामान्यतः कामवासना कमी होते.

**साधक** : माझ्या जीवनात श्रीमहाराजांचं अस्तित्व कसं जाणवेल?

**पू. बाबा** : आपल्या जीवनात श्रीमहाराजांचे अस्तित्व पहायचे म्हणजे प्रत्येक घटनेत त्यांची शक्ती आहे हे संपूर्णपणे खरे वाटले पाहिजे. समाधीचे दर्शन घेतांना हे महाराजच आहेत असे जाणवले पाहिजे.

अस्तित्वाची दोन dimensions (आयामे) आहेत : दृश्य आणि अदृश्य. दृश्याचे अस्तित्व खरे मानणे म्हणजे प्रत्येक घटनेत ती शक्ती काम करीत आहे हे जाणवणे. म्हणजे माझ्या सगळ्या गोष्टी, माझा श्वासोच्छ्वासदेखील त्या शक्तीने चालतो आहे याची जाणीव होणे. ती शक्ती सर्वव्यापी आहे पण तिचे केंद्र गोंदवले आहे. त्या शक्तीला नियम आहेत; तेच प्रारब्ध. श्रीमहाराजांचे खरे universal म्हणजे सामान्य रूप सर्वव्यापक आहे. त्याची active side त्यांच्या शक्तीत प्रकट होते - सर्वशक्तिसमन्वित: - म्हणून श्री. भाऊसाहेब (केतकर) म्हणाले, 'त्यांना काय अशक्य आहे? ते भिंतीतून बोलतील.' ही जिवंत जाणीव ठेवून राहाणे म्हणजेच श्रीमहाराजांना स्थूलात पाहाणे होय. माझे कर्तेपण, माझी शक्ती मर्यादित आहे ही आपल्याला जाणीव आहे पण ही मर्यादा ओळखून राहाणे म्हणजे मीपणा कमी करणे.

श्रीमहाराज किंवा ईश्वर सर्वशक्तिसमन्वित आहे म्हणून माझी शक्तीदेखील तिकडूनच आलेली आहे. पण मीपणाची शक्ती चैन पडू देत नाही. म्हणून जोपर्यंत मीपणा आहे तोपर्यंत प्रयत्न आहे. आज नामस्मरण मी करतो आहे. जेव्हां ते त्या शक्तीमुळे होते आहे असे जाणवू लागेल तेव्हां ओळखावे की मीपणा क्षीण होऊ लागला. हे घडत नाही तोपर्यंत प्रयत्नावर भर पाहिजे. या प्रयत्नातूनच शक्ती तिकडून येत आहे ही जाणीव निर्माण होईल. शक्तीच्या दोन अवस्था १) शांत आणि २) कार्यरत. शक्ती शांत अवस्थेत असतांनादेखील ती तिकडून आलेली आहे ही जाणीव राहाणे ही थोर स्थिती आहे. तथापि ती जाणीव सुप्त असतांनाही तिचे भान राहू लागले तर समजावे की साधक तयार होऊ लागला.

आज माझ्यामधे जी शक्ती काम करते आहे ती माझ्या ताब्यात नाही ही जाणीव सतत जागी पाहिजे. आपल्याला कशातही भाग न घेणारा, केवळ साक्षी असणारा देव नको आहे. त्याने आपल्यामधे इंटरेस्ट घेतले पाहिजे. तसे कोणी असेल तर ते श्रीमहाराज आहेत. आपल्या प्रार्थनेला response - प्रतिसाद आला म्हणजे potential सुप्त होता तो Active - कार्यरत झाला. आपल्या शक्तीचे मूळ रूप जाणीव हे आहे. ते पुढे प्रेम किंवा नाम यातून व्यक्त होते.

सर्व परिस्थितीत जाणीव जागी ठेवणे शक्य आहे; आणि त्याचे दृश्य रूप म्हणजे नाम. सर्व काळ आणि सर्व परिस्थितीत ते टिकवता आले तर परिवर्तन - Transformation होईल. यासाठी माझ्या जाणिवेत सारखी त्यांच्या शक्तीची जाणीव पाहिजे. अभ्यास म्हणून आपल्या सगळ्या कृती, उठणं बसणं, महाराज आपण बघा असं म्हणावं. ती शक्ती आपल्या लौकिक जीवनाला व्यापून आहे याची जाणीव सतत राहू लागली की साम्यावस्था येईल. मग शुभ अशुभ ही जाणीवच राहाणार नाही.

**साधक ब** : मी नामामधे आहे असे श्रीमहाराजांनी सांगितले आहे. नाम घेतांना ही जाणीव कशी ठेवावी ?

**पू. बाबा** : नामामधे मी आहे म्हणजे त्याच्यामध्ये त्यांची शक्तिरूप जाणीव आहे. नाम ही खूण - Symbol आहे. या खुणेमधे मी महाराज घातले पाहिजेत. परमात्मा अत्यंत खोल आहे तसं नामही अत्यंत खोल आहे. भगवंताचे सर्व गुण नामात आहेत. "नाम म्हणजे माझा प्राण" याचा अर्थ जीवनात घडणारी जी जी घटना आहे तिच्यामागची शक्ती मी आहे. आपल्याला ती जाणीव पाहिजे. त्यांनी दिलेल्या नामात त्यांची सगळी शक्ती आहे. घरात पंखे, दिवे, यांमधून जशी वीज व्यक्त होते तसे माझ्या जीवनातील घटनांमधून श्रीमहाराज व्यक्त होतात. नामातले त्यांचे अस्तित्व सत्तारूपाने आहे. म्हणून आपली अडचण त्यांना सांगावी. त्यांना सांगावं की मला शक्ती नाही पण मी शक्य तितका तुमच्याच स्मरणात राहीन. माझं मन मला आवरत नाही. माझी शक्ती कमी पडते म्हणून तुम्ही मला सहाय्य करा. मनाला शक्ती पुरविणारे तुम्हीच आहात. माझे दोष आपण काढा. श्रीमहाराजांना अशी विनंती केली तर ती प्रार्थनाच होईल.

**डॉ. आठवले** : महाराजांना एकदा नामाबद्दल विचारलं होतं; तेव्हां ते म्हणाले, "स्वस्थ बसत जावं आणि चाललेलं नाम ऐकावं."

**पू. बाबा** : होय हो, ते आहेतच. ते नामरूपानं आहेत. मी फक्त चिकटणे किंवा tune होणे आवश्यक आहे. नामाबरोबर नामाची जाणीव म्हणजे awareness पाहिजे. स्वस्थ बसणं म्हणजे मी बाजूला ठेवणं. नाम त्यांच्या शक्तीनं चालतं, माझ्या बुद्धीनं नव्हे ही जाणीव होणं हीच त्यांच्या अस्तित्वाची जाणीव. पण आपली खात्री नसते. नाम कोठून येतं हे आपल्याला समजत नाही आणि वाटतं की Source is not known. लहान मुलाला जशी आजोबांच्या शक्तीची कल्पना नसते तशी आम्हाला महाराजांची कल्पना नाही. गोंदवल्यात

हे एवढं अवाढव्य चाललेलं पहात असूनसुद्धा माझ्या घरात ते पहाता येत नाही. दृश्यात न रमता त्याच्या पलीकडे गेलं पाहिजे, नाहीतर त्याच्यातच अडकायला होतं. म्हणून आपल्या प्रत्येक कृतीत श्रीमहाराज पाहिजेत. मी नाम घेतो म्हणजे ते आहेतच. आज हे अनुमान असलं तरी त्यातूनच श्रद्धा बळकट होईल. मग 'चित्त जैसे गंगाजळ' होऊन येईल ती प्रेरणा त्यांचीच असेल.

**।३९८.११।** (२९ डिसेंबर १९९४) गोंदवले. रात्री ८ वाजता.

**साधक घ :** ध्यान आणि समाधी यात फरक कोणता? धारणा संपून ध्यानाची अवस्था सुरू झाली हे कसे ओळखायचे?

**पू. बाबा :** ध्यानामधे आनंदाची सुरुवात होते. आपल्याला दृश्यामधे भोग भोगण्याची सवय आहे. त्यात आनंदाचा कण आहे. त्या आनंदाची परिसीमा म्हणजे rapture - अत्यानंद हा सर्वस्वी परावलंबी आहे. गुरुकृपेने तो प्राप्त होतो.

समाधीमधे तो आनंद जीवाला स्पर्श करतो. तथापि सुरुवातीला तो one way traffic असतो. अनंत सांतात सामावू शकत नाही. अनंताचा impact - आघात आला तर माणूस बेहोश होईल. यालाच श्रीमहाराज उन्मनी अवस्था म्हणत. ही अवस्था उतरण्याचं जीवाच्या हातात नसतं. अशा अवस्थेत असतांना त्याने दुसऱ्या कोणाला स्पर्श केला तर त्याला ती अवस्था येईल. तथापि कोणाला हात लावायचा आणि कोणाला नाही याचं त्याला भान असतं. पुढे ती अवस्था पचल्यानंतर तो साध्या माणसासारखा दिसला तरी ते परमात्मस्वरूपच असतं.

ध्यानावस्थेत सांत अनंतात विलीन होतो. ध्यानाला बसला की त्यात जातो, नंतर खाली येतो. नंतर ही अवस्था केव्हाही येऊ लागते. रस्त्यात, घरात, कोठेही थोड्याशा उद्दीपनाने हे घडतं; त्याच्या हातात काहीच नसतं. मी जगात, देहात आहे याचं भानच नसतं. श्रीमहाराजांनी एक गोष्ट सांगितली. कोकणात एका मंदिरात असाच एकजण तयार झाला. एक लहान मुलगी त्या मंदिरातील देवाला रोज पाणी घालून जायची. एक दिवस त्याने त्या मुलीला आई, आई म्हणून धरले आणि ती एकाएकी आनंदाच्या स्थितीत गेली आणि त्या आघाताने पुढे चार दिवस बेशुद्धीत होती. ही स्थिती म्हणजे देहाच्या विसराची परमावधी असते. मृत्यूसारखा शरीराशी असलेला संबंध सुटतो. श्रीरामकृष्णांची भावसमाधी खरी आहे की ते सोंग आहे हे पाहण्यासाठी कोणीतरी त्यांच्या डोळ्यात बोट घातले होते!

एकदा बोलण्याच्या ओघात श्रीमहाराज म्हणाले, मी माझ्या गुरूची आज्ञा कधी मोडली नाही. जे आहे ते त्यांच्या कृपेचं फळ आहे. त्यांनी एक वर दिला, रत्नाच्या पेटीची किल्ली दिली. ती किल्ली म्हणजे भगवंताचे नाम. ज्याला ध्यानी, मनी, स्वप्नी नामाशिवाय दुसरी आठवण नाही असा पुरुष (श्रीमहाराज) पाहिला. त्यांना एकदा म्हणालो की शंकराचार्यांनी ज्याला ईश्वर म्हटलं आहे तेच आपण आहात. यावर महाराज काही बोलले नाहीत; गप्प बसले. नाहीतर सहसा ते गप्प बसत नसत. पण ह्या सगळ्याचा आज आपल्याला काय उपयोग? आपण अखंड बेशुद्धीत आहोत. प्रपंचात मन लागणं हीच बेशुद्धी. कागदावर सही करण्यापूर्वी माणूस मेला तर लगेच त्याला हेमगर्भ मात्रा देतात आणि काम साधतात. प्रपंचातली बेशुद्धी जाण्यासाठी नामासारखा दुसरा उपाय नाही.

**साधक ग :** श्रीमहाराजांच्या काही आठवणी सांगा ना!

**पू. बाबा :** किती आठवणी सांगू? त्याच त्या परत सांगाव्या लागतात. पण काही म्हणा, त्यात जीव रमतो. एकदा काशीचे एक पंडित श्रीमहाराजांना भेटायला आले होते. त्यांच्याशी हिंदी भाषेत बोलायला श्रीमहाराजांनी मला बोलावले. आलेली सगळी मंडळी गेल्यानंतर मी श्रीमहाराजांना म्हणालो की प्रयाग क्षेत्री नाव बुडतांना आपण थांबवलीत तेव्हां त्या नावाड्यांशी हिंदीमधे बोललात. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, हिंदी येत होतं पण तुमच्याइतकं ग्रामर (व्याकरणशुद्ध) येत नव्हतं.

श्रीमहाराजांनी सांगितलेली वचनं ह्या (ती. सौ. आई) लिहून ठेवायच्या. श्रीमहाराजांचे शब्द त्यांनी जसेच्या तसे लिहिले आहेत. श्रीमहाराजांच्या शब्दात आपला शब्द घालणं म्हणजे गंगेत गटार घालण्यासारखं आहे. आपण सगळं सोडून नाम घ्यावं. एक ग्रंथ, एक देव, एक गुरु, एक मंत्र! एको देवो केशव:। केवळ एक नाम घ्यावं अशी निष्ठा पाहिजे. मला काय कळतंय असं खरं वाटलं पाहिजे. खरं सांगू का! तुम्ही महाराजांच्याकडं त्यांच्या सत्तेशिवाय येणारच नाही. त्यांच्या ठिकाणी मन लागणं फार भाग्याची गोष्ट आहे. नामामधे श्रीमहाराजांचं आपलेपण आहे. त्यामुळे प्रपंचातल्या गोष्टी सोसता येतात.

जो प्रभु कीन्हो सो भल मानो।<br>
यह सुमती साधुसंगसे पायी॥

अनुभव येतात; पाहण्याची तयारी पाहिजे. पू. तात्यासाहेबांची बोटं टोकदार होती. एकदा पाचही बोटांना कात्रे पडले. पेटीवर बसले की बोटात धरून पैसा

फिरवता येईना. श्रीमहाराजांना (पेटीवर) हे सांगितलं तेव्हां बरं होईल म्हणाले. दुसरे दिवशी कात्रे गायब! हे कसं झालं म्हणून पुन्हा (पेटीवर) विचारलं तेव्हां म्हणाले यात काय? या लहान मुलांच्या गोष्टी आहेत (child's play). केवढं विलक्षण असेल शक्ती असून न दाखवणं!

आपल्याला देणं साधलं पाहिजे. निष्ठा हा परमार्थाचा प्राण आहे. आण्णासाहेब पटवर्धनांकडे एक क्षय झालेला गृहस्थ आला. त्याला त्यांनी जलोदरावरचा काढा दिला. ते औषध घेऊन तो गृहस्थ बरा झाला. तेव्हां काढ्याचा पाठ लिहून घेणाऱ्या आण्णासाहेबांच्या जवळच्या पाटील नांवाच्या गृहस्थाने त्यांना विचारले की हे कसे झाले? तेव्हां ते म्हणाले, महाराज (नृसिंह सरस्वती) बरं करतात. औषध काय करतं?

पू. बाबा म्हणाले, श्रीमहाराजांचं चरित्र लिहीत होतो तेव्हां दोन-अडीच वर्षे या जगातच नव्हतो. दुपारी दोन वाजता बसायचो ते रात्री दहापर्यंत. अंतकाळाचा प्रसंग लिहितांना तीन दिवस रडत होतो. सगळं डोळ्यासमोर दिसत होतं. राम गेल्यावर अयोध्या झाली तसं गोंदवलं झालं होतं. दशमीला (काल पहाटे पुण्यतिथीच्या वेळी) तो जनसमुदाय पाहून वाटलं, काय ही शक्ती! इतके लोक शांत बसतात. माझ्या घरात ती शक्ती काम करते असं वाटलं पाहिजे.

श्रीमहाराजांच्या वेळेला रोज तीन-चारशे लोक जेवायचे आणि कोठीत काही शिल्लक नसायचं. हे कसं व्हायचं म्हणून विचारलं तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, एक माणूस निजला होता. त्याच्या डोक्याशी पाण्याचा पाट वाहात होता. झोपून उठल्यावर त्यानं त्यातलं ओंजळभर पाणी इकडचं तिकडं टाकलं; त्या पाटाच्या पाण्यात काही फरक आहे का? (भावार्थ असा की जगात रोज कोट्यवधि माणसे त्यांच्याच सत्तेने जेवत आहेत. त्यातली दोन-चारशे इथे जेवली तर त्यात काय विशेष?)

श्रीमहाराजांची शिकवायची पद्धत म्हणजेही गंमत होती. त्याकाळी आजच्यासारखी करमणुकीची साधनं नव्हती त्यामुळे श्रीमहाराजच याचं त्याच्याशी, त्याचं याच्याशी अशी भांडणं लावायचे. मात्र हे करतांना त्यातून सर्वांना शिकविण्याचा हेतू असे. भाऊसाहेब फॉरेस्ट माझं मन विशाल झालं आहे. आत्ता आणलेली ही रवा आणि साखर मी कोणालाही देऊन टाकीन असं श्रीमहाराजांना म्हणाले. पुढे म्हणाले, मी विकार जिंकले आहेत. अलीकडे मी राग सर्वस्वी सोडला आहे. तेव्हां श्रीमहाराज बरं म्हणाले आणि रूपलखला

सांगून त्यांनी भाऊसाहेबांना संताप आणला आणि मग समजावले की राग जिंकणे ही सोपी गोष्ट नाही. स्वार्थ सुटण्यास आणि विकार ताब्यात येण्यास उपासनेचे बळ लागते आणि सावधानता लागते. किती नाट्य आहे या प्रसंगात! (पहा : श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज चरित्र आणि वाङ्मय. लेखक के. वि. बेलसरे प्रकरण ९ वे 'महाराज, मी राग जिंकला आहे') तसंच श्रीमहाराज पटाईत मावशीला एरव्ही वर्षभर शिव्या द्यायचे आणि त्यांची मुलं तिथं आली की मात्र 'आईसाहेब, आईसाहेब' करायचे!

स्त्री-पुरुष भेदासंबंधी बोलतांना श्रीमहाराज म्हणाले, शिकारी जेव्हां बरोबर कुत्री घेऊन शिकारीला जातो तेव्हां तो कुत्रा-कुत्री असा भेद करीत नाही पण कुत्री लवकर विणार आहे हे त्याला कळते. पू. तात्यासाहेब म्हणत, तुम्ही काही करू नका; नुसतं महाराजांच्यावर प्रेम करा. तुम्हाला काही कमी पडायचं नाही.

एकदा श्रीमहाराजांना म्हटलं, रामाचं प्रेम थंड आहे, कृष्णाचं तसं नाही. तेव्हां म्हणाले, प्रेम तर खरंच ना! तो मर्यादापुरुष होता. त्याला कर्तव्य दाखवायचं होतं म्हणून त्याचं प्रेम थंड आहे. श्रीमहाराजांना मारुतीचं प्रेम फार होतं. मालकाच्या मनात काय आहे हे कळणं ही गुरुसेवा, म्हणाले.

आईसाहेबांना तुकामाईंच्या पुष्कळ गोष्टी माहीत होत्या. श्रीमहाराज म्हणाले की तुकामाईंचा अधिकार फार थोर होता. त्यांनी फार मोठं काम केलं. ज्यांचा अंतकाळ त्यांनी साधला अशी तीन-चारशे कुटुंबं तरी असावी.

**साधक :** बाबा, तुमची श्रीमहाराजांशी पहिली भेट झाली तेव्हांची हकिगत पुन्हा सांगा ना!

**पू. बाबा :** तेच ते पुन्हा काय सांगायचे? पण ते आठवले की आनंद होतो हे मात्र खरे! त्यावेळी मी एल्फिन्स्टन कॉलेजमधे शिकत होतो. अगदी पहिल्यांदा श्रीमहाराजांकडे गेलो तेव्हां रविवारची दुपारची वेळ होती. श्रीमहाराजांनी विचारले, तुमच्याकडे कोणी सत्पुरुष नाही का? मी म्हणालो, भटजीबापू होते; पण त्यांना अंतकाळी फार कष्ट झाले. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, 'सत्पुरुषांना देहाचे कष्ट नाहीत. खुंटीला सदरा टांगलेला आहे, त्याला काठीनं मारलं तर लागेल का?' ऐकून हे निराळं आहे असं वाटलं. दुसरी भेट - इंटरव्हयू - झाली तेव्हां श्रीमहाराज 'येत जावं' म्हणाले. मी म्हणालो, मला दुसऱ्याच्या घरी जायला आवडत नाही.' अहो, मी घरातून निघून गेलो होतो - बिजवाड्याला. कोणाच्या घरी गेलो की त्या मुलाचे आईवडील त्याला ह्याच्या संगतीत राहू नको म्हणून सांगायचे. तेव्हांपासून मी कोणाच्या घरी जात नाही.

ती सवय आजपर्यंत तशीच आहे. माझं ऐकून श्रीमहाराज म्हणाले, 'तरीपण यावं. तुम्ही काय वाचता?' मी म्हणालो, ज्ञानेश्वरी. 'मग वाचा' म्हणाले. तेव्हांपासून ज्ञानेश्वरी सुरू झाली ती आजपर्यंत चालू आहे.

श्रीमहाराज म्हणाले, भात, वरण, लिंबू, तूप हे मिश्रण चांगलं असतं. डाव्या बाजूला एक पदार्थ आणि उजव्या बाजूला कालवण किंवा आमटी. गोड फार खाऊ नये. सकाळी उठून जप करता येईल एवढं रात्री खावं. स्नान करतांना एकदम डोक्यावर पाणी घेऊ नये. फार ऊन पाणी घेऊ नये, कोमट घ्यावं. सगळा पैसा खर्च करू नये. थोडा तरी शिल्लक ठेवावा. स्वैपाकाचं यंत्र (स्टोव्ह) वापरावा. किती बारीक सारीक बाबतीत शिकवलं. त्याचबरोबर हेही सांगितलं की जो नाम घेतो तो कोणत्या धर्माचा, जातीचा असो, तो मला आपलासा वाटतो. एकदा म्हणाले, रामतीर्थ मला माहीत आहेत. तुम्हाला असते तशी भेट झाली नाही.

एकदा सांगली संस्थानच्या राणीसाहेब श्रीमहाराजांना भेटायला आल्या तेव्हां श्रीमहाराजांनी त्यांना बसायला पाट दिला. त्या नको म्हणाल्या तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, 'देवानीच तुम्हाला मोठेपण दिलंय, कशाला नाकारता? - त्यांनी राज्यासंबंधी विचारलं असतां (तेव्हां संस्थानांच्या विलीनीकरणांची सुरुवात झालेली होती) श्रीमहाराज म्हणाले, बाई, प्रपंचात आसक्तिरहित राहावं. मिळेल; पण नाही मिळालं तरी दुःख करू नये. श्रीमहाराजांनी राज्याचा विषयच टाळला; पण नाम घ्यावं म्हणून सांगितलं. श्रीमहाराजांनी आपली नम्रता आणि स्वच्छ सांगणं कधी सोडलं नाही. त्यांचा प्रत्येकाला योग्य मार्गावर आणण्याचा प्रयत्न असे. पू. तात्यासाहेबही नम्र असत. महाराजांना अतिशय मानायचे. फार संकोची स्वभाव होता त्यांचा. एकदा त्यांना ताप आला. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, मी माझ्या देहाला सांभाळलं नाही इतकं याला सांभाळलं. आतां याचं वय झालं तेव्हां लोकांनी नको का काही विचार करायला?

श्रीमहाराज म्हणाले, घरातली बाई समाधानी, प्रेमळ, देणारी (उदार) पाहिजे. एकदा पुण्याला श्रीमहाराजांच्या तसबिरीजवळ मोठा गॅसलाइट लावला होता तेव्हां ते (पेटीवर) म्हणाले, मला उकडतंय, एवढा दिवा नको. भाऊसाहेब म्हणत, महाराज नाहीत कसे? आहेतच. सगुणाची उपासना करतांना आपले सगळे भाव तेथे आरोपित होतात. खरी निष्ठा असली तर आपलं दुःख ते घेतील. आपल्याला खऱ्या प्रेमाची कल्पना नाही. त्यांची आठवण झाली की आतमधे कांटा हलला पाहिजे. आपल्या वासना त्यांच्या कानावर घालाव्या

आणि सांगावं की आपल्याला पाहिजे ते करा. त्यांचं ऐकलं ना, तर त्यातल्या त्यात सुखाचं होतं.

एकदा श्रीमहाराज मला म्हणाले, बघू तुम्ही काय सांगता? मी पाच मिनिटं बोललो. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, ही ओकारी आहे (म्हणजे जे सांगता ते पचलेलं नाही) सांगतांना नाइलाज म्हणून तळमळीनं सांगायला पाहिजे. आणि म्हणाले. नामच सांगावं, ठासून सांगावं. कोणी विचारलं तर माझ्याकडे बोट दाखवावं!

पू. तात्यासाहेब म्हणाले, महाराज इतकं बोलतात, लक्षात राहात नाही. तेव्हां ब्रह्मानंद महाराज त्यांचा हात हातात घेऊन म्हणाले, "तू वेद ऐकतोस ना? हे मराठी वेद आहेत." म्हणून तुम्हाला सांगतो आपल्या आजच्या परिस्थितीत जेवढं शक्य आहे तेवढं नामच घ्यावं. समोरापादाखल पू. बाबांनी श्रीमहाराजांचं एक वचन सांगितलं. "जो नामात स्वत:ला विसरला तो माझ्या दर्शनांत बसला."

**| ३९९ |** (६ जानेवारी १९९५) मालाड.

आज आमच्यापैकी एका साधकांबरोबर पुण्याचे प्रा. भाऊसाहेब परांजपे आले होते.

**पू. बाबा :** गोंदवल्याला सर्व वातावरण नामाचे होते. येथे परत आल्यावर सुरुवातीला काही दिवस सर्वांचे नामस्मरण चांगले झाले असेल. पण आता ती स्थिती आहे का? हळूहळू गाडी पूर्वपदावर आली ना? म्हणजे नामाच्या शक्तीची आज आपल्याला कल्पनाच नाही. नामाने शक्ती साठते पण व्यवहारात ती खर्च होऊन जाते. शक्ती कशी खर्च होते याचे उत्तम उदाहरण स्वामी रामतीर्थांचे गुरु धन्नाराम यांचे आहे. त्यांना संकल्पसिद्धी प्राप्त झाली होती. मनात जो संकल्प करावा त्याप्रमाणे घडत असे. उदाहरणार्थ, एखादा माणूस आज भेटायला यावा असे वाटले तर तो त्या दिवशी येत असे. ह्या शक्तीचे त्यांनी प्रयोग सुरू केले आणि ती शक्ती नाहीशी झाली आणि ते सामान्य झाले. शिष्य त्यांच्यापुढे गेला! आपल्याला माहीत असलेल्या एका साधकांचीही अशी स्थिती झाली आहे. पूर्वी त्यांनी चांगले साधन केले, पण गोंदवल्याहून कोल्हापूरला पायी चाललेले असतांना कोणी लिफ्ट द्यावा, तहान लागली तेव्हां उसाचा रस मिळावा, अंबाबाईच्या मंदिरात गेले तेव्हां दहीभात खायला मिळावा अशासारखे क्षुद्र संकल्प त्यांनी केले. ते संकल्प पुरे झाले. पण

आध्यात्मिक दृष्ट्या त्यांची स्थिती सामान्य झाली. लक्षात ठेवा की अशी होणारी शक्तीची गळती थांबल्याशिवाय साधनात पाऊल पुढे पडणार नाही.

**प्रा. परांजपे** : आपण म्हणता ते खरे आहे. श्री. आप्पासाहेब मराठ्यांनी त्यांचा एक अनुभव मला सांगितला. पुण्याला एकदा ते बसस्टॉपवर बससाठी उभे होते. बराच वेळ बस आली नाही तेव्हां त्यांना वाटले की कोणीतरी लिफ्ट द्यावा. हा विचार मनात येतो तोंच तेथून स्कूटरवरून पुढे गेलेला एक अनोळखी माणूस पुन्हा मागे आला आणि त्याने त्यांना लिफ्ट दिला. झाले! काही जप यामधे फुकट गेला.

**पू. बाबा** : आपले असेच होते. क्षणोक्षणी आपण संकल्प करीत असतो आणि त्यात केलेला जप फुकट जातो. म्हणून पहिली गोष्ट म्हणजे कल्पना थांबली पाहिजे. यासाठी सत्संगाची फार गरज आहे. पण हा सत्संग कोठून मिळणार? म्हणून नामाचीच संगत वाढवली पाहिजे. नाम हे सूक्ष्म आहे पण आपण ते तोंडाने घेतो म्हणून स्थूलही आहे. आपण सगळे चांगले शिकलेले आहोत. त्यामुळे आपल्याला विचारांच्या संगतीची सवय आहे. तेव्हां नामाची संगत वाटायला काय हरकत आहे?

**साधक प** : आपल्याला नामासंबंधीच्या विचारांची संगत जमते, पण नामाची संगत कठीण आहे. विचारांचे जितके खरेपण वाटते तितके नामाचे खरेपण वाटत नाही. मला एखाद्या गोष्टीचे जे खरेपण वाटते ते कोठे वाटते? ते तसे वाटण्याची प्रक्रिया काय आहे हे माहीत झाले तर दृश्याप्रमाणेच नामालाही खरेपण देणे कदाचित शक्य होईल. जे खरे आहे त्याच्या अस्तित्वासंबंधी आपल्याला संशय नसतो. म्हणजे खरेपण हे बुद्धीच्याही पलीकडे आहे. पूर्वी शास्त्रज्ञ Subjective reality (व्यक्तिसापेक्ष सत्य) खोटी मानत असत. आता ते ती खरी मानू लागले आहेत.

**साधक ब** : खरे काय आहे ते पाहाण्यापेक्षा खोटे काय आहे ते ओळखून त्याचा त्याग करीत गेलो की खरे तेवढेच राहील; कारण ते आहेच.

**साधक क** : त्यासाठीच विवेक आणि वैराग्य सांगितलेले आहे. त्यांचा उपयोग करून जीव, जग आणि ईश्वर यांचे संबंध आणि खरेपण ठरवता आले पाहिजे.

**साधक ब** : आज तरी शिस्त म्हणून अगदी वैखरीने मी नाम घेतले पाहिजे. ते नामच पुढच्या वाटा मोकळ्या करीत जाईल अशी श्रद्धा पाहिजे.

**पू. बाबा** : श्रीमहाराजांनी सांगितले आहे ना, मग मी नाम घेणार, कसलाही विचार करणार नाही; हा राजमार्ग आहे. पण तो जमला पाहिजे. ब्रह्मानंद

महाराज मी माझी जिव्हा नामाला विकली आहे म्हणाले. श्रीमहाराजांनी सांगितले म्हणून मी नाम घेतो याचा हा अर्थ आहे. हे जमले तर दुसरे काहीच करायला नको.

**|४००|** (१३ जानेवारी १९९५)

पू. बाबांनी नुकतेच कोणीतरी दिलेले मॉडर्न एक्झिक्यूटिव्हज्‌साठी लिहिलेले पुस्तक वाचले. त्या पुस्तकात लेखकाने जीवनातल्या सेंटरिंगची (मध्यवर्ती स्थान देण्याची) कल्पना मांडली आहे. Spouse, (सहचर/सहचारिणी) Security (सुरक्षितता) Money (धन) Fame (मान) अशी वेगवेगळी सेंटर्स (केंद्रे) असतात. पण तो म्हणतो की खरे म्हणजे timeless unchanging centre (कालातीत शाश्वत केंद्र) शोधता आला तर त्यामधे बाकीच्या सर्व सेंटर्सचा समावेश होईल. आपल्या दृष्टीने नाम अथवा श्रीमहाराज हे असे कालातीत शाश्वत केंद्र आहे हे लक्षात घेतले तर बाकीचे काही प्रश्न राहाणार नाहीत.

ह्या पुस्तकात व्हिक्टर फ्रँकेल नांवाच्या जर्मन ज्यूची हकिगत दिली आहे. व्यवसायाने हा डॉक्टर होता. इतर जर्मन ज्यूंबरोबर याला पण हिटलरच्या कॉन्सेंट्रेशन कँपमधे (छळ छावणी) टाकले होते. थंडी खूप, पायात धड बूट नाहीत. अशा स्थितीत बर्फात जखमा झाल्यामुळे (Frost bite) त्याच्या एका पायाची बोटे कापावी लागली. पण अशा परिस्थितीतदेखील त्याने मानवसमाजाचा अभ्यास करायला सुरुवात केली. तो म्हणतो की त्या छळ छावणीत ज्यांना असे जगण्याचे काहीतरी ध्येय सापडले तेच छावणीतून जिवंत बाहेर आले. म्हणजे जगण्यासाठी जशी अन्न, पाणी, हवा, निवारा यांची गरज असते तसे काही ध्येयही पाहिजे. पू. बाबा म्हणाले, आपलेही आता लौकिक जीवन संपत आले आहे, तेव्हां आतातरी मी नामासाठी जगतो आहे असे व्हायला काय हरकत आहे ? तुकाराम महाराजांना कोणी सांगणारा भेटला नाही. तरीदेखील त्यांनी मनाचा सखोल अभ्यास केला आणि सर्व जीवन सामावू शकणारे केंद्र (all inclusive centre) शोधले. एका अभंगात ते सांगतात.

जाणावें तें काय नेणावें तें काय। ध्यावे तुझे पाय हेंचि सार॥ १ ॥
करावें तें काय न करावें तें काय। ध्यावे तुझे पाय हेंचि सार॥ २ ॥
बोलावें तें काय न बोलावें तें काय। ध्यावे तुझे पाय हेंचि सार॥ ३ ॥
जावें तें कोठें न जावें तें आतां। बरवें आठवितां नाम तुझें॥ ४ ॥
तुका म्हणे तूं करिसी तें सोपें। पुण्यें होती पापें आमुच्या मतें॥ ५ ॥

पहिल्या चरणात ज्ञान अज्ञान सोडून तुझे नाम घेणे हेच खरे असे ते सांगतात. नंतर कर्म अकर्माऐवजी ते नाम घ्यायला सांगतात. ज्ञान झाले की निवेदन येते म्हणून त्या निवेदनात न गुंतता नाम घ्यायला सांगतात. जाणे येणे सोडून नाम घ्यावे म्हणतात आणि शेवटी सांगतात की तू मनात घेतलेस तर अवघड असे काही नाहीच. खरोखर ही एक प्रकारची कमिटमेंट - बांधिलकी आहे. अशी कमिटमेंट आपण केली पाहिजे. माझी नामाशी कमिटमेंट आहे; दुसरे तिसरे मला काही माहीत नाही. हे इतके सरळ असतांना अडचण काय आहे ?

**साधक ब** : मी सारखा बदलणारा आहे. त्यामुळे शाश्वत असलेले नाम मला धरता येत नाही.

**साधक क** : तथापि माझ्यामध्ये काहीतरी शाश्वत असल्यामुळेच मला शाश्वताची ओढ आहे. साधन चांगले होण्यासाठी देहशुद्धीची अतिशय गरज आहे. नामापासून काय मिळवायचे ते आज आपल्याला माहीत नाही; म्हणून ते श्रीमहाराजांवरच सोपवावे.

**साधक ज** : आकाश सगळ्यात सूक्ष्म आणि व्यापक आहे. मी त्या आकाशातच आहे. नाम घेतांना मी संसाराचा नाही; मला आकाशात मिसळून जायचे आहे असा भाव ठेवावा.

**पू. बाबा** : नाम आहे तेथे श्रीमहाराज आहेत हा दृढ भाव ठेवून नाम घ्यावे. नाम घेतांना काय मागावे ? काय अपेक्षा ठेवावी ? आज आपल्याला काय पाहिजे ते माहीत नाही. समाधान म्हणजे काय याची कल्पना नाही. म्हणून माझ्या कल्याणाचे असेल ते आपण करा असे मागावे. खरे म्हणजे माझे मागणे बंद कर असे गोंदवल्याच्या रामाजवळ मागावे असे श्रीमहाराज म्हणत.

## |४०१| (२० जानेवारी १९९५)

आज मांडवे येथील श्री. हरीभाऊ देशपांडे आणि श्री. पाठक आले होते. आम्ही जाण्यापूर्वी श्री. देशपांडे यांनी पू. बाबांना तुकाराम महाराजांच्या एका अभंगाचा अर्थ विचारला होता म्हणून पू. बाबांनी तो अभंग सांगितला.

बळियाचे अंकित। आम्ही जालों बळिवंत॥ १॥
लाथाळिला संसार। केला षड्र्मींचा मार॥ २॥
जन धन तन। केलें तृणाही समान॥ ३॥
तुका म्हणे आतां। आम्ही मुक्तिचिया माथां॥ ४॥

प्रथम अंकितच्या अर्थाबद्दल चर्चा झाली. अंक = खूण, शिक्का, मांडी. आम्ही बळियाचे म्हणजे भगवंताचे अंकित झालो. त्याला शरण गेलो. त्यामुळे त्याची शक्ती आम्हाला आली. आम्ही संसार तुच्छ करून बाजूला सारला आणि षड्विकारांच्या ऊर्मीवर स्वामित्व मिळवले. लौकिक, संपत्ती आणि स्वत:चे शरीर कस्पटासमान करून आता आम्ही मुक्तीच्याही माथ्यावर (मुक्तीवरील भक्ती) विराजमान झालो आहोत.

**साधक क** : लौकिक, संपत्ती आणि आपले शरीर कस्पटासारखे वाटायला त्यांच्यापेक्षा खूप श्रेष्ठ असे काहीतरी हाती आले पाहिजे, तरच ते शक्य होईल. प्रथम बळवंताच्या बळाची कल्पना आली पाहिजे. ही गोष्ट काही प्रमाणात विचाराने होईल. पण मुख्यत: सत्संग आणि आप्तवाक्यावर श्रद्धा यांनीच ते घडेल. त्यासाठी भावनेचे पोषण होणे आवश्यक आहे. भाऊसाहेबांच्या धाकट्या मुलीला सासरी जाच होता तरी महाराजांनी केले ते योग्यच अशी त्यांची धारणा होती. तसेच पू. तात्यासाहेब गेले तेव्हां महाराजांची इच्छा एवढेच ताई म्हणाल्या.

सत्याला सत्यपण कशामुळे आहे ते बुद्धीने कधीच कळणार नाही; कारण सत् हे बुद्धीच्या पलीकडे आहे. माणूस सत्स्वरूप असल्यामुळे त्याला सत्याची ओढ आहे. मी हा देह नाही. जन्मोजन्मी देह बदलण्याची मला सवय झाली आहे हे समजले तर मृत्यूची भीती वाटणार नाही. मी आत्मा आहे, अमर आहे हे सत्य समजेल.

श्री. देशपांडे म्हणाले की जे खरे आहे ते हृदयाला पटले पाहिजे. मन जेव्हां एखादी गोष्ट विचारांनी पटवावयाचा प्रयत्न करते तेव्हां ते हृदयापासून दूर गेलेले असते. म्हणून विचारांपेक्षा भाव महत्त्वाचा आहे. पश्चात्ताप व अनुताप ह्या शब्दांच्या अर्थाची चर्चा झाली. करू नये ते करणे, बोलू नये ते बोलणे याचा पश्चात्ताप होतो. पण तरीही त्याच चुका आपण पुन्हा करतो. श्रीमहाराज म्हणायचे की तुमच्या हातून आजपर्यंत झालेले पाप मी घेतो पण पुन्हा ते करणार नाही अशी रामाची शपथ घ्या. अनुताप हा एकसारखा वाढत जातो. ती तळमळ आहे. 'अनुदिनि अनुतापें तापलो.' त्या तापण्यातून पुढची सुधारणा आहे.

## **|४०२|** (२७ जानेवारी १९९५)

**पू. बाबा** : जपामुळे मनाला सूक्ष्मता येऊ लागली की काही जुन्या गोष्टींचा नव्याने अर्थ स्पष्ट होतो. जप चांगला होण्यासाठी पोट हलके असणे आवश्यक

आहे. पण हल्ली एक नसतेच लचांड सुरू झाले आहे. जप करतांना एखाद्या माणसाची आठवण होते आणि एक दोन दिवसात त्याचे पत्र येते नाहीतर तोच येऊन भेटतो आणि ज्याच्याशी आपला काही संबंध नाही त्या गोष्टीत लक्ष घालावे लागते.

हे सगळे आठवायचे कारण असे की आज जप करतांना एक जुनी घटना आठवली. पू. तात्यासाहेब असतांना एकदा गुरुपौर्णिमेची प्रवचने चालू होती. रविवारी नेहमीप्रमाणे ज्ञानेश्वरीवर निरूपण झाले. दुसऱ्या अध्यायातील सत्तरावा श्लोक चालू होता. तो श्लोक आणि त्यावर ज्ञानेश्वर महाराजांनी दिलेले दृष्टांत मग सांगतो. त्या दिवशी निरूपण करतांना तुकाराम महाराजांच्या एका अभंगातील 'तुका म्हणे तोची संत। सोशी जगाचे आघात॥' ह्या वचनाचा उल्लेख करून मी म्हणालो की जगातल्या चांगल्या वाईट घटनांचे आघात होऊनही संत ते आघात शांतपणे सहन करतात. जीवनातल्या चांगल्या वाईट घटनांमुळे ते हलत नाहीत. रात्री पेटीवर श्रीमहाराज म्हणाले, सकाळी तुम्ही अर्थ सांगितलात पण त्याचा अर्थ संतानाही दृश्य खरे वाटते असा होतो. वास्तविक संत जे आघात सोसतात ते बाहेरच्या जगातले नसून मनातले - मनाने निर्माण केलेल्या जगातले म्हणजे सूक्ष्मातले असतात.

**साधक ब** : ह्या सोसण्यामध्ये साक्षीभाव असतो का?

**साधक प** : साक्षीभाव असला तर सोसण्याचा प्रश्नच येत नाही. संत ते आघात सोसतात याचा अर्थ ते त्यामध्येच असतात.

**पू. बाबा** : हे म्हणणे बरोबर दिसते. आता गीतेतला श्लोक पहा :

आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं समुद्रमाप: प्रविशन्ति यद्वत्।
तद्वत्कामा यं प्रविशन्ति सर्वे स शान्तिमाप्नोति न कामकामी॥ २.७० ॥

अर्थ असा : ज्याप्रमाणें सर्व बाजूंनी परिपूर्ण व अचल असलेल्या समुद्रामध्ये अनेक नद्यांचे पाणी (त्याला चंचल न करता) प्रवेश करते त्याप्रमाणेच ज्या स्थिरबुद्धी पुरुषाचे ठिकाणी सर्व भोग (कसल्याच प्रकारचा विकार उत्पन्न न करता) प्रवेश करतात तोच पुरुष परम शांती पावतो. भोगांची इच्छा करणारा शांती पावत नाही.

पावसाळ्यात नद्या भरभरून समुद्रात येतात तरी तो आपली मर्यादा सोडत नाही आणि उन्हाळ्यात नद्या आटल्या तरी तो आटून लहान होत नाही. त्याप्रमाणे कोणत्याही सुखदु:खाच्या घटनांनी स्थितप्रज्ञाची शांती भंग पावत नाही. दृष्टान्त देऊन ज्ञानेश्वर महाराज स्थितप्रज्ञाचे लक्षण सांगत आहेत.

''पार्था आणीकही परी। तो जाणों येईल अवधारीं। जैसी अक्षोभता सागरीं। अखंडित॥ २.३५७॥ जर्‍ही सरितावोघ समस्त। परिपूर्ण होवोनि मिळत। तर्‍ही अधिक नोहे ईषत। मर्यादा न संडी॥ ३५८॥ नातरी ग्रीष्मकाळीं सरिता। शोषूनि जाती समस्ता। परी न्यून नव्हे पार्था। समुद्र जैसा॥ ३५९॥ तैसा प्राप्तीं ऋद्धि सिद्धि। तयासि क्षोभु नाहीं बुद्धी। आणि न पवतां न बाधी। अधृति तयातें॥ ३६०॥ सांगें सूर्याच्या घरीं। प्रकाशु काय वातीवेरी। कीं न लविजेचि तरी अंधारीं। कोंडेल तो॥ ३६१॥ देखें ऋद्धि सिद्धि तयापरी। आली गेली से न करी। तो विगुंतला असे अंतरीं। महासुखीं॥ ३६२॥ जो आपुलेनि नागरपणें। इंद्रभुवनातें पाबळे म्हणे। तो केवीं रंजे पालिवणें। भिल्लांचेनि॥ ३६३॥ जो अमृतासा ठिं ठेवी। तो जैसा कांजी न सेवी। तैसा स्वसुखानुभवी। न भोगी ऋद्धि॥ ३६४॥ पार्था नवल हें पाहीं। जेथ स्वर्गसुख लेखनीय नाहीं। तेथ ऋद्धि सिद्धि कायी। प्राकृता होती॥ २.३६५॥''

ओव्या वाचून झाल्यावर पू. बाबांनी विचारले की हे आपल्याला कसे साधेल ?

**साधक क** : हे स्थितप्रज्ञाचे वर्णन आहे. मला वाटते की दृश्यापलीकडच्या त्या सुखाची थोडी तरी चव मिळाल्याखेरीज हे होणार नाही.

**साधक ब** : 'नामाकरिता नाम' घेतल्याखेरीज हे होणार नाही.

**पू. बाबा** : 'महाराज भेटले; आता काय मिळवायचं राहिलं आहे' असं भाऊसाहेबांना वाटलं तसं महाराजांनी नाम दिलेलं आहे, ते मी घेणार; माझी बुद्धी चालवणार नाही असं आपल्याला का वाटत नाही ?

**साधक क** : आपण दृश्यात अडकलेले आहोत हेच खरे!

**पू. बाबा** : नाम घेतांना दुसरे कुठले विचार मनात येतात याकडे स्वस्थपणाने पाहावे म्हणजे आपण कशात गुंतलेले आहोत ते लक्षात येईल आणि मग विचार आणि विवेक यांच्या मदतीने ते दूर करता येईल. दृश्यात कर्तेपणा मिरविता येतो; तसा अनुभव असतो. पण सूक्ष्मात जायला मी बाजूला ठेवायचा आहे.

**साधक ग** : साधक तितिक्षेचा अभ्यास करतो तर स्थितप्रज्ञाची ती सहज स्थिती असते. कारण त्याला परमसुखाचा अनुभव आलेला असतो.

**साधक ज** : Auto suggestion (स्वयंसूचन) म्हणून मी असं ठरवतो की नामात महाराज आहेत मी नाम घेतो म्हणजे त्यांच्यामध्ये विरघळून जातो आहे. मला या भावाचा खूप उपयोग होतो.

**पू. बाबा :** (साधक ब ना) तुम्ही नामाकरिता नाम म्हणता ते बरोबरच आहे. पण त्यासाठी मी कशाकरिता जगतो आहे याचे उत्तर प्रथम शोधावे लागेल. त्या शोधात मी नाम घेण्यासाठी जगतो आहे असे उत्तर मिळाले तर जगण्याचे प्रयोजन निश्चित ठरले असे होईल आणि मग हे नाम मी कशासाठी घेतो आहे याचा शोध घ्यावा लागेल. आज आपली स्थिती अशी आहे की आपण अनेक ठिकाणी वाटले गेलो आहोत. लग्न म्हणजे जसे चार तास मी तुमची बायको असे होत नाही तसे दिवसातला ठराविक वेळ साधन केले की मग त्याचा माझा संबंध संपला असे होत नाही. नामस्मरण हे व्रत आहे; आणि हे व्रत निष्ठेने सांभाळले पाहिजे.

**।४०३।** (३ फेब्रुवारी १९९५)

आम्ही पू. बाबांकडे गेलो तेव्हां निरूपणाला येणाऱ्या एका गृहस्थांची नुकतेच लग्न झालेली मुलगी आणि जावई तेथे आले होते. पू. बाबांनी त्यांची चौकशी केली. त्यांचे काय बोलणे झाले माहीत नाही पण ते गेल्यानंतर पू. बाबा म्हणाले की वास्तविक मी संसारी माणूस आहे. तरीदेखील लोक भेटायला आले की तो साधनावर आघातच होतो. मग जे संसारात नाहीत त्या सत्पुरुषांना काय होत असेल? आणि जन्मभर महाराजांनी ते केले! तुकाराम महाराजांनी या आतल्या आघातांबद्दल सांगितले आहे.

आता श्रीमहाराजांच्या चरित्राची नवी आवृत्ती छापायची आहे. त्यात आता आठवलेल्या श्रीमहाराजांच्या काही गोष्टी आणि त्यांनी सांगितलेली काही औषधे देणार आहे. परवा मला आठवले की स्पॉंडिलायटीसला श्रीमहाराजांनी मोहरीचे तेल लावून चोळायला सांगितले होते. नुकतेच डॉ. फणसळकरांनी एका गृहस्थांना हेच औषध सांगितले! म्हणजे सत्पुरुषांचे ज्ञान कसे असते पहा! त्यांना अज्ञात असे काही नसतेच.

श्रीमहाराजांना विचारून मी डॉ. कूर्तकोटींना प्रथम भेटायला गेलो तेव्हां ते सरदारगृहात उतरलेले होते. पू. तात्यासाहेबांचे मोठे बंधू श्री. आप्पा बरोबर होते. ते डॉ. कूर्तकोटींच्या बरोबरीचे. त्यामुळे त्यांचे खूप बोलणे झाले. डॉ. कूर्तकोटी बोलतांना म्हणाले की शंकराचार्य जगाला मिथ्या म्हणतात. मिथ्या म्हणजे अज्ञान. पण श्रीमहाराजांनी मात्र जगतात-दृश्यातदेखील परमात्मा पाहिला. त्यामुळे त्यांनी कधी कोणाला तुच्छ केले नाही. त्यांच्याजवळ जी माणसे होती त्यांच्यापैकी काही माणसांबद्दल बोलतांना ते एकदा म्हणाले होते

की ही माणसे बाहेर गेली तर खून पाडतील. तथापि मनुष्य म्हणून जो जन्माला आला तो परमार्थाचा अधिकारी आहे असे ते म्हणत, सर्व ठिकाणी परमात्मा भरलेला आहे ह्या भावाने ते राहिले.

**साधक क** : ज्याला आधी स्वत:मधला परमात्मा दिसला त्यालाच नंतर तो सर्व जगात भरला आहे हे जाणवत असावे. श्री. भाऊसाहेबांना श्रीमहाराजांचे सर्वव्यापित्व जाणवले होते.

**पू. बाबा** : श्रीमहाराजांच्या ह्या भावाला पुष्टी देणारी गोष्ट सत्प्रेम यांनी पॉंडीचरीच्या मदरसंबंधी लिहिलेल्या हकिगतीत सापडते. मदरना एकाएकी काही आजार होई आणि बहुधा त्यांनी तो कोणाचा तरी घेतलेला असे! हे जीवावर होणारे आणि मुद्दाम घेतलेले आघात!

**साधक ब** : मागच्या शुक्रवारी नामाकरिता नाम घेतले पाहिजे असे मी म्हणालो होतो. पण परवा २९ जानेवारीचे प्रवचन वाचतांना मला आढळले की नामाचा सहवास झाला पाहिजे. आज आम्हाला नामाचे प्रेम नाही; पण श्रीमहाराजांनी त्या प्रवचनात सांगितले आहे की "परमात्म्याच्या ठिकाणी आपलेपणा उत्पन्न व्हावयाला त्याच्या नामाशी पुष्कळ सहवास पाहिजे." आज माझे मन मला कोणत्याही गोष्टीशी बांधू देत नाही. मी एकसारखा बदलतो आहे आणि माझे मनही एकसारखे विषय बदलते आहे. ते मला नामाचा सहवास कधीच घडू देणार नाही. म्हणून जो खरा मी आहे तो मी अढळ अशा नामाशी जोडायला पाहिजे, आणि त्यासाठी होईल तितके एकसारखे नाम घेतले पाहिजे. ते नामस्मरण मोठ्याने होवो, मनातल्या मनात होवो, माळ घेऊन होवो, कसे का होईना, नामाचा धोशा लावला पाहिजे. एकसारखे नाम घेतल्यानेच नामाचे प्रेम येईल.

**साधक ग** : श्रीमहाराजांनी म्हटलेच आहे, "नामाचे प्रेम का येत नाही? नाम घेत नाही म्हणून." मागे आपली वृत्तीच्या तोंडी नाम द्यावयाचे म्हणजे काय यासंबंधी चर्चा झाली होती. त्यावेळी साधक प म्हणाले होते की आपल्या मनात एकसारख्या वृत्ती उठत असतात. वृत्ती वासनांमधून येतात आणि तृप्ती व्हावी म्हणून त्यांचे तोंड सतत उघडलेले असते. त्या काहीही मागत असल्या तरी त्यांच्या तोंडी सारखे नाम टाकावे म्हणजे काही काळाने नामाखेरीज काही मिळत नाही हे लक्षात येऊन त्यांची तोंडे बंद होतील आणि मग वृत्ती उठणे बंद होईल. अशा प्रकारे वृत्ती शांत झाल्यानंतरच नामाचा खरा अनुभव येऊ लागेल. श्रीमहाराजांनी सांगितले आहे की "शंका गेल्याशिवाय नाम 'स्थिरच' होत नाहीं हें लक्षात ठेवावें."

**साधक क** : सगळा प्रयत्न आहे तो नाम स्थिर व्हावे यासाठीच आहे. नाम एकदा स्थिर झाले आणि त्याची गोडी लागली की मग नाम घ्या म्हणून सांगावे लागणार नाही. स्वामी रामदासांनी सांगितले आहे की एका नामापुढे बाकीचे सगळे त्यांना तुच्छ वाटू लागले. सुरुवातीला ते रात्रभर नाम घेत. पुढे पुढे नामाने त्यांच्या दिवसावरही आक्रमण केले!

**पू. बाबा** : वास्तविक आता तुमचे सगळ्यांचे संसार झाले आहेत. अगदी ज्याला कर्तव्य म्हणतात ते देखील राहिलेले नाही. तेव्हां आता नसत्या सबबी सांगू नयेत. आता केवळ नामच घेईन या निष्ठेने नाम घेत राहावे. यासाठी सत्संगती आणि आज्ञापालन यांचे महत्त्व अनन्यसाधारण आहे.

भगवंत त्याच्या नामाच्या तीन संधी देतो. या संधिकालात घेतलेले नाम फार प्रभावी असते. पहिली संधी जन्माच्या वेळी, दुसरी लग्नाच्या वेळी आणि तिसरी मरतांना. यातली पहिली संधी आपल्या हातात नाही, दुसरी हुकली आहे. आता तिसरी तरी चुकता कामा नये म्हणून अखंड नाम टिकवण्याचा अभ्यास केला पाहिजे. नाहीतर जन्म मृत्यूचे चक्र चालूच आहे.

## |४०४| (८ फेब्रुवारी १९९५)

संध्याकाळी सव्वाचार वाजता मालाडला पू. बाबांकडे गेलो. पू. बाबांना आज ८६ वर्षे पूर्ण झाली. आज खूप माणसे सकाळपासूनच येत होती. त्यामुळे पू. बाबांना थोडा थकवा वाटत होता. त्यामुळे नमस्कार केल्यानंतर पू. बाबांनी आम्हाला निरोप दिला.

## |४०५| (१० फेब्रुवारी १९९५)

आज संध्याकाळी पू. बाबांकडे बरीच माणसे आलेली होती. ती गेल्यावर सात वाजता पू. बाबांना नमस्कार करून आम्ही बसलो.

**पू. बाबा** : डॉ. कूर्तकोटींची सरदारगृहात भेट झाली तेव्हां मी त्यांना विचारले की समाधान, शांती आणि आनंद यांच्यामधे काय फरक आहे? महाराज काय सांगत? तेव्हां ते म्हणाले की महाराजांच्या म्हणण्याप्रमाणे तीन्हीमधे फरक नाही. समाधान सागरासारखे आहे. सागर शांत असतो किंवा उसळतो. तसा परमात्मा समाधानरूप आहे. त्यावर जे तरंग येतात ती शांती. पण काही वेळा सागर उसळतो. ते स्फुरणच असते. समाधानातून उसळणारे स्फुरण म्हणजे आनंद. समाधान हीच शांती आणि शांती हाच आनंद.

डॉ. कूर्तकोटी एकदा भागवत सांगत होते, तेव्हां काही श्लोकांचा अर्थ त्यांना स्पष्ट झालेला नव्हता. तथापि त्यांना तो जसा समजला होता तसा त्यांनी सांगितला. त्यांचे प्रवचन झाल्यावर श्रीमहाराज त्यांना म्हणाले की तुम्ही मधे जे श्लोक सांगितले त्याचा अर्थ असा होतो का पहा. आणि त्यांनी जो अर्थ सांगितला त्याने डॉ. कूर्तकोटींचे समाधान झाले.

पू. बाबा म्हणाले, आपण जे काही करतो ते आतून श्रीमहाराज करवीत आहेत. आपण जे खातो त्याचा त्यांना भोग देत आहोत असा भाव वाढवावा. ह्या देहातून श्रीमहाराज वावरत आहेत असे वाटावे. हा भाव वाढवला तर हातून पाप होणारच नाही. खाण्यापिण्यात, बोलण्यावागण्यात आपोआप संयम येईल आणि श्रीमहाराजांचा सहवास होऊ लागेल. अखंड नामस्मरणानेही हे साध्य होईल. "जो नामात राहिला तो माझ्या सहवासात बसला" असे त्यांनी सांगितले आहे. घरात असून नसल्यासारखे राहावे. आपले मत सांगावे पण त्याचा आग्रह नसावा.

## |४०६| (१७ फेब्रुवारी १९९५)

**पू. बाबा** : जेव्हां ज्ञान होते तेव्हां observer आणि observed यांमध्ये भेद राहात नाही असे कृष्णमूर्ती सांगतात. तथापि त्यांच्याही मागे कोण आहे याचा शोध घ्यावा असे रजनीश म्हणत. आत्मज्ञान होते तेव्हां द्रष्टा आणि दृश्य एक होतात असे शंकराचार्य सांगतात. याचाच अर्थ असा की जोपर्यंत मनामधील द्वंद्व नाहीसे होत नाही तोपर्यंत मनासारखे साधन होणार नाही. हेच श्रीमहाराज फार सोपे करून सांगत. ते म्हणत की आपण भगवंताला विसरलो आहोत म्हणून त्याची आठवण ठेवावी; आणि ती आठवण ठेवतांना दुसऱ्या कशाचीही आठवण नसावी. हे साधायचे असेल तर नामस्मरण हे एकमात्र साधन आहे.

माणूस हा समाजात राहाणारा प्राणी आहे. त्याला इतरांची गरज लागणारच. ही गरज कोणीही पूर्ण केली तरी आपल्याला चालले पाहिजे; आणि अशी वृत्ती ठेवली तर भगवंत आपल्या गरजा पुऱ्या करील. परंतु आपण ममत्वामुळे - मनाने गुंतल्यामुळे आपल्या प्रिय माणसांकडून त्या गरजा पूर्ण होतील किंवा व्हाव्या अशी अपेक्षा ठेवतो आणि त्यामुळे द्वंद्व कायम राहाते. खरे म्हणजे आपण पूर्ण नि:स्वार्थी प्रेम करू शकत नाही; आज आपल्या मनाची ती अवस्थाच नाही. जेव्हां आपण खरे नि:स्वार्थी प्रेम करायला लागू तेव्हांच भक्तीची सुरुवात होईल. मग श्रद्धा दृढ होऊ लागेल.

श्रीमहाराज काशीला गेलेले असतांना त्यांनी विश्वेश्वराला नैवेद्य दाखवावयाचे ठरवले आणि त्या निमित्ताने गावजेवण केले. गंगूबाई दिवसभर जिलब्या तळत होत्या. जिलब्या तळून झाल्या की त्या साखरेच्या पाकात टाकत होत्या. ते पाहून श्रीमहाराज गंगूबाईंना म्हणाले, मनुष्यजन्माला येऊन सद्गुरूच्या पदरात पडणे आणि त्याची कृपा होणे म्हणजे जिलबी पाकात पडून जिलबीत पाक शिरणे आहे.

पू. बाबा म्हणाले, गुरूंचा सत्संग मिळाला की त्यांचे सान्निध्य होते आणि मग खरा सहवास घडतो. असा सहवास घडण्यासाठी सद्गुरु ज्या अवस्थेत असतात तिथे आपण पोचलो तरच खरा सहवास लाभेल.

## |४०७| (२४ फेब्रुवारी १९९५)

पू. बाबांनी पेणच्या एका गृहस्थांच्या त्यांना आलेल्या पत्राचा काही भाग वाचून दाखवला. या गृहस्थांनी कुंडलिनीच्या जागृतीमुळे त्यांना आलेल्या अनुभवांसंबंधी लिहिले आहे. ते लिहितात की त्यांना एकदम आज्ञाचक्राचे अनुभव आले. निळसर प्रकाश दिसला आणि त्यांचा सूक्ष्म देह जड देहातून बाहेर पडून चार-पाच फुटांवर राहिल्याचा त्यांना अनुभव आला. पत्रात त्यांनी पू. बाबांना काही प्रश्न विचारले आहेत व पू. बाबांनी कुंडलिनी योगावर पुस्तक लिहावे असे सुचविले आहे. त्यांनी विचारले आहे की एकदम आज्ञाचक्रातील अनुभव येतात का? या नंतर कुंडलिनी ब्रह्मरंध्रात जाऊन समाधीचा अनुभव येईल का?

पू. बाबा म्हणाले की श्रीमहाराजांनी कुंडलिनीबद्दल विशेष सांगितलेले नाही. तथापि या बाबतीत डॉ. कूर्तकोटींकडून श्रीमहाराजांचे काही सांगणे समजले. जेव्हां साधक सद्गुरूकडून प्रत्यक्ष किंवा त्याच्या समाधीवर नाम घेतो तेव्हांच त्याची अधोमुख असलेली कुंडलिनी ऊर्ध्वमुख होते. नंतर साधन वाढेल तसतशी आध्यात्मिक प्रगती होत जाते. कुंडलिनी नागासारखी असून ती शक्तिरूप आहे. आध्यात्मिक प्रगतीत गुरूला आलेले अनुभव शिष्याला येऊ लागतात. श्रीमहाराजांच्या संप्रदायातला मोठा अनुभव म्हणजे समाधान. ते त्यांच्या शिष्यांजवळ आढळते. शिवाय नामामुळे नादाचे अनुभव येतात. सूक्ष्म देह बाहेर जाणे हा अनुभव येणे तसे कठीण नाही. या गृहस्थांनी त्यांना निळसर प्रकाश दिसला असे म्हटले आहे. पण कुंडलिनी आज्ञाचक्रात पोहोचली की भगवंताचे सगुण दर्शन होते असे श्रीमहाराजांनी सांगितले आहे.

**साधक प** : साधन करतांना मला येणारी अडचण सांगतो. दैनंदिन जीवनात कर्तव्य-कर्म करावेच लागते. त्यात गुंतू नये म्हणून ते टाळायचा प्रयत्न केला तरी अहंकार जपला जातो; आणि अहंकार गेल्याखेरीज खरी आध्यात्मिक प्रगती होणार नाही. तेव्हां यासाठी काय करावे?

**साधक क** : आपल्याला कर्म तर करावेच लागणार. टाळतो म्हणून ते टळत नाही. तथापि आपण त्यात जितका रस घेऊ तितका अहंकार वाढतो. नामातला रस वाढवून कर्मातला रस कमी करणे हाच त्यासाठी उपाय आहे. त्यासाठी आपल्या गुरूंना जास्त चिकटले पाहिजे आणि त्यांना आवडणारे नामस्मरण केले पाहिजे. असे केले की कर्माची किंमत कमी होईल व मग आपल्या प्रकृतिस्वभावधर्माप्रमाणे जे घडेल ते बरोबरच असेल. म्हणजे एकाच परिस्थितीत दोन साधकांच्या प्रतिक्रिया विरुद्ध दिसल्या तरी ते बरोबरच असेल.

## |४०८| (३ मार्च १९९५)

**पू. बाबा** : पॉंडीचरीच्या मदर सुमारे ९२-९३ वर्षांच्या झाल्यानंतर लोकांना फार कमी भेटत असत. एक दिवस कोणालाही न कळवता त्या श्रीअरविंदांच्या समाधीपाशी गेल्या आणि समाधीला साष्टांग नमस्कार करून तेथेच बसल्या. आश्रमातल्या एक बाईही त्यांच्या शेजारी बसल्या. अर्ध्या एक तासाने मदर उठून त्यांच्या खोलीत परत गेल्या. नंतर श्री. पंडित यांनी त्या बाईंना मदरच्या शेजारी बसला होतात तेव्हां कसे वाटले म्हणून विचारले. त्या म्हणाल्या की मदरच्या शेजारी बसल्यावर आपोआप त्यांचे नामस्मरण सुरू झाले. उडिया बाबांच्या सांगण्याशी हे जुळते. ज्याचे नाम स्थिर झाले आहे त्याच्या शेजारी बसल्यास नाम आपोआप सुरू होते. नामाची संगत ही जरी दूरची गोष्ट असली तरी नाम घेतांना आपल्याला श्रीमहाराजांचे अस्तित्व कसे जाणवेल? उत्तरादाखल ते म्हणाले, त्यासाठी तू मला हवास ही तळमळ लागली पाहिजे.

**साधक प** : आपण जसा भाव ठेवू तशी त्यांच्या अस्तित्वाची प्रचीती येईल.

**साधक क** : त्यांच्या अस्तित्वाची खूण मिळावी. पण अडचण अशी आहे की प्रचीती आली तरी ती दृश्यातलीच असल्यामुळे नाहीशी होते आणि आपण जवळ जवळ मूळ पदावर येतो. म्हणून आतली प्रचीती यावी.

**पू. बाबा** : म्हणजे प्रचीती टिकणारी हवी.

**साधक प** : यासाठी ती आतून येऊन व्यापक होत गेली पाहिजे. नाम घेतांना श्रीमहाराजांचे स्मरण हवे. किंबहुना ते स्मरणरूपच आहेत.

**पू. बाबा** : हे अगदी बरोबर आहे. श्रीमहाराज सदा सर्वदा आहेतच. त्यांचे आपल्याकडे लक्ष आहे. त्यांचे अस्तित्व स्मरणरूप आहे.

**साधक क** : श्रीमहाराजांचे अस्तित्व समजणे हेच त्यांचे दर्शन होय. जिथे ते आहेत तिथे आनंद आहे. श्रीमहाराजांचा असा आधार वाटला की मग काळजी नाही.

**पू. बाबा** : त्याची खूण म्हणजे निर्भयता येईल. श्रीमहाराजांच्या सामर्थ्याची यथार्थ कल्पना आली तर मग श्री. भाऊसाहेबांसारखे त्यांना काय अशक्य आहे असे वाटू लागेल.

**|४०९|** (१० मार्च १९९५)

**पू. बाबा** : आज एक गृहस्थ त्यांच्या पत्नीसह भेटायला आले होते. दोघेही रविवारी निरूपणाला येतात. या गृहस्थांचे मोठे बंधू पोटाचा कॅन्सर होऊन नुकतेच वारले. ते नेहमी नामस्मरण करीत असत. त्यांचे खाणे पिणेही मोजून असे. हॉस्पिटलात सुद्धा ते अत्यंत समाधानात होते. आजार वाढलेला असतानाही त्यांनी त्यांच्या पत्नीला रविवारी प्रवचनाला जायला परवानगी दिली आणि लोणावळ्याच्या एका स्वामींनाही भेटून ये असे सांगितले. कॅन्सर इतका वाढला होता की ऑपरेशन करणाऱ्या डॉक्टरनी ऑपरेशनसाठी उघडलेले पोट काहीही न करता पुन्हा शिवून टाकले. त्यांनी माझ्याकडे आलेल्या गृहस्थांना हॉस्पिटलमधील खोलीत बोलावून सांगितले की जसा मी तुला वेगळा पाहात आहे तसाच स्वत:ला वेगळेपणाने पाहातो आहे. मी अत्यंत शांत आहे.

त्या गृहस्थांनी हे सांगितल्यावर मला श्रीमहाराजांनी लिहिलेल्या दोन पत्रांची आठवण झाली. एक डॉ. पाथरकरांना व दुसरे डॉ. भोसेकरांना लिहिलेले होते. दोन्ही पत्रे महत्त्वाची असून पुन:पुन्हा वाचण्यासारखी आहेत.

डॉ. पाथरकरांना लिहिलेले पत्र :

"श्री. रा. भ. प. डाक्टर यांस आ. तुमचें मागील पत्र आले. आज केशवरावांचे पत्रावरून मजकूर समजला. प्रकृति बरी नसलेमुळे तुम्हांस त्रास होतो हें बरें नाहीं वाटत. सावली जशी देहाला। तसा रोग आहे शरिराला।। सावली घाणी मातीत पडली। तिला धुवून नाहीं घेतली।। तसेंच खरें आहे देहाचे। पण तें संतानांच साधे।। आपण देहधारी। देहदु:ख न सोसवे क्षणभरी।। ह्याला उपाय एकच जाण। मनीं चिंतावा रघुनंदन।। आजवर ज्यांनीं सांभाळ केला। तो आजही नाहीं

निजलेला।। त्याची जागृती। आहे आमचे हाती।। राम सांभाळतो हें जाणावें निश्चित। परमात्मा उभा राहील खचित।। मनीं न सोडावा धीर। आहे म्हणावा माझा रघुवीर।। सर्व कर्ता राम हा ठेवावा विश्वास। त्याचे इच्छेनें वागणें आहे खास।। आजवर देह दुसऱ्यासाठी कष्टविला। परमात्मा देईल त्याचा मोबदला।। तो ठेवावा रामावर। जन्माचे कल्याण करील थोर।। न द्यावा भीति काळजीला थारा। रामकृपेनें दूर सारा।। मनानें असावें बळकट। तेथें नाही कोणाचा धाक।। राम माझा हें जाणून चित्तीं। अखंड राखावी समाधान वृत्ति। तुम्ही माझे म्हणविता। दु:खी कष्टी का होता।। देहाचा भोग न चुके कोणाला। नामस्मरणें त्याची न राहील जाणीव त्याला। कळकळीनें सांगणे तुम्हांस। काळजी दु:ख न करावी खास।। सौ. मामीस माझे आ.।। भगवंताला होता अर्पण। तेथें देहाचें सुखदु:खाचें नाहीं कारण।। व्यवहाराप्रमाणें औषध पथ्यपाणी सांभाळावें। पण अनुसंधान न चुकवावें।। चि. राजा यास आ. सांगावे. रा. केशवराव, त्यांचे मंडळीस व मुलास आशीर्वाद. सर्वांनी धरावा धीर। हे साधतें न विसरता रघुवीर।। देहाच्या दु:खाची मला जाणीव आहे त्यामुळेंच मलाही बरें नाहीं वाटलें. वर सांगितलेले आहे सत्य। त्याचा राग न मानावा किंचित।। मी लवकरच तिकडे येत आहे. कोणी काळजी करू नये. आनंदात असावें हा आशीर्वाद.''

*(डॉ. भोसेकरांना लिहिलेले पत्र मिळाले नाही - संपादक)*

## |४१०| (१७ मार्च १९९५)

पू. बाबांनी श्रीमहाराजांनी परचुरे शास्त्र्यांना लिहिलेले पत्र व श्री. विश्वनाथ यांस लिहिलेले पत्र अशी दोन पत्रे वाचून दाखविली. त्यांपैकी श्री. परचुरे शास्त्री यांना लिहिलेले पत्र श्रीमहाराजांच्या पू. बाबांनी लिहिलेल्या चरित्रात दिलेले आहे. त्यातील महत्त्वाच्या गोष्टी अशा :

१) देहाचे अस्तित्व भगवंतासाठीं। याहून नाहीं दुजी उच्च प्राप्ती।।

२) आतां जगणें रामासाठीं। हा निश्चय मानावा चित्तीं।।

३) जग त्यागी आपणांस। आपण न त्यागावे जगास। हीच देहबुद्धी खास।।

श्री. विश्वनाथ यांना लिहिलेल्या पत्रातील महत्त्वाच्या गोष्टी अशा :

१) रामभक्तीवांचून दुसरा विचार चित्तीं आणूं न द्यावा.

२) मुखानें रामाचें नांव घ्यावे, देहाने रामाची सेवा करावी, मन रामार्पण करावें, याहून दुसरे साधन नाहीं.

३) मन घट्ट करावें जसें कांहीं पाषाण. बाहेरील सृष्टीचे आघात हेंच दगडावरील टांके जाणावें. मनांत हें जाणावें आणि देह प्रारब्धावर टाकावा. आपण मात्र समाधानापासून दूर होऊं नये

४) राम ज्या स्थितीत ठेवील त्यांत समाधान मानावें - हेंच वैराग्याचें लक्षण आहे.

५) आपलें कर्तेपण टाकावें, म्हणजे रामाला शरण जाता येते.

६) आप्त गोत, सखे सज्जन यांचा त्याग जरी झाला तरी अभिमान सुटत नाही.

७) अभिमानरहित राहणें हेंच खरें शिष्याचें लक्षण आहे.

(श्री. विश्वनाथ हे एका मामलेदारांचे आचारी होते. मामलेदारांबरोबर ते एकदा गोंदवल्यास गेले व श्रीमहाराजांमुळे इतके प्रभावित झाले की मामलेदारांबरोबर परत न जाता पडेल ते काम करत पुढे तेथेच श्रीमहाराजांजवळ राहिले.)

दोन्ही पत्रांवर चर्चा झाल्यानंतर वित्तेषणा, दारेषणा आणि लोकेषणा यांसंबंधी चर्चा झाली. पू. बाबा म्हणाले, श्रीमहाराज म्हणत की लोकेषणा सुटणे फार कठीण आहे. गीतेत तर ज्ञानाची लक्षणे सांगतांना पहिले अमानित्व सांगितले आहे आणि त्यावर 'हा अमुक ऐसी नोहावी। सेचि लोकां॥' असे ज्ञानेश्वर महाराजांनी म्हटले आहे.

**साधक प** : श्रीमहाराजांनी ज्यांना पत्रे लिहिली आहेत त्यांना त्यांची पारमार्थिक अवस्था जाणून जे शक्य आहे तेच सांगितले आहे. आज आपल्याला ते शक्य होईलच असे नाही.

**पू. बाबा** : तथापि काय केले पाहिजे आणि काय टाळले पाहिजे याचे मार्गदर्शन सर्व साधकांना त्यांपासून होईल.

## |४११| (२४ मार्च १९९५)

**पू. बाबा** : सध्या श्री. परीकर यांनी दिलेली चंद्रकांत खोत यांची 'बिंब प्रतिबिंब' ही कादंबरी वाचतो आहे. श्रीरामकृष्णांचे जीवन स्वामी विवेकानंद सांगत आहेत अशी भूमिका ठेवून ही कादंबरी लिहिलेली आहे. एकदा मी श्रीमहाराजांना गुरु आणि ब्रह्मज्ञानी शिष्य यांचा संबंध कसा असतो असा प्रश्न विचारला होता. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, तुम्हाला बिंब-प्रतिबिंब माहीत आहे ना? मी होय म्हणालो आणि म्हणालो, पण तेथे बिंबाचे सर्व गुणधर्म

प्रतिबिंबाला जसेच्या तसे लागू होत नाहीत. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, तेवढाच फरक या गुरु-शिष्य संबंधात असतो.

पुढे असेच एकदा श्रीमहाराजांना विचारले की श्रीरामकृष्ण मारुतीची उपासना करत होते तेव्हां त्यांच्या माकडहाडाची लांबी सुमारे चार इंच वाढली आणि पुढे ती उपासना थांबवल्यानंतर काही दिवसांनी ती पूर्ववत झाली म्हणतात, हे कसे शक्य आहे? तेव्हां श्रीमहाराज म्हणाले की जर सूक्ष्मातून स्थूल येते तर हे अशक्य का वाटावे? पुढे म्हणाले की खऱ्या (सच्च्या) शिष्याची अंगलट गुरूसारखी होते.

## |४१२| (३१ मार्च १९९५)

श्रीअरविंद आणि मदर यांच्या नामजप साधनेवर श्रीरामकृष्ण नांवाच्या एका माणसाने एक इंग्रजी भाषेत पुस्तक लिहिले आहे. त्या पुस्तकाच्या प्रस्तावनेतील काही भाग पू. बाबांनी वाचून दाखवला. त्यात म्हटले आहे की या दोघांचा योग हा Integral yoga (समग्र योग) आहे. नामसाधनेला त्यांनी योगाची जोड दिली. हठयोग आणि पातंजल योगात शरीर, प्राण व मन (मनाचा केवळ sense mind हा भाग असे श्रीअरविंद म्हणतात) ही जड आहेत. त्यांच्यावर ताबा मिळवून त्यांना सूक्ष्म बनवतात. नामसाधनेत नामाच्या सूक्ष्मतेमुळे ही तीन्ही सूक्ष्म बनत जातात. यांपैकी कोणत्याही मार्गाने गेले तरी शेवटी जगात सगळीकडे नाम भरलेले आहे असा साधकाला अनुभव येतो. श्रीअरविंद नामाच्या प्रक्रियेवर भर देतात तर श्रीमहाराज, तुम्ही अखंड नाम घ्या, बाकीचे मी पाहातो असे आश्वासन देतात.

पू. बाबांनी विचारले की सगळीकडे नाम भरलेले आहे हा अनुभव काय असावा? उत्तरादाखल तेच पुढे म्हणाले, नाम सूक्ष्म आहे, कंपनयुक्त आहे. नामाने देह शुद्ध होऊन सूक्ष्म झाला की जगात सगळीकडे नाम भरलेले आहे असे साधकाला जाणवते. अशा स्थितीत गुरुदेव रानड्यांनी म्हटल्याप्रमाणे नामाला नामे होतात. सर्व विश्व ॐ कारातून आलेले आहे आणि त्यातूनच अनेक नामे निर्माण झाली आहेत. 'नाम नांदते आकाशीं पाताळीं' हा नामाच्या सर्वव्यापित्वाचा अनुभव आहे. नामाच्या शक्तीने सर्व काही चाललेले आहे हे जाणवले की माणसाचे कर्तेपण नाहीसे होते.

**साधक प** : जगात एकसारखे विघटन चालू असतांना हे जग काही विशिष्ट नियमांनी बांधून चालवणारी शक्ती प्रचंड आहे. हे विष्णूचे कार्य आहे.

(पू. बाबांना) तुम्हाला गोंदवल्याला सगळीकडे नाम भरल्याचा जो अनुभव आला त्याचे स्वरूप काय होते?

**पू. बाबा :** तसा शब्दात तो अनुभव सांगणे कठीण आहे. पण सगळीकडे भरलेले नाम एकसारखे ऐकू येत होते. त्या अनुभवाला नादाचे अंग होते. भेटायला येणाऱ्या माणसांमधूनही नाम ऐकू येत होते.

जालन्याला आलेला अनुभव जरा वेगळा होता. श्रीमहाराजांबरोबर रामनवमीसाठी तेथे गेलो होतो. रात्री एका खोलीत मी नेहमीप्रमाणे जप केला आणि आडवा झालो. उन्हाळा असल्यामुळे सर्व मंडळी बाहेर उघड्यावर झोपली होती. मला बाहेर झोपणे सोसत नाही त्यामुळे मी एकटाच आत खोलीत झोपलो होतो. आडवा झाल्यावर मला खोलीत नामस्मरण ऐकू येऊ लागले. खोलीत तर दुसरे कोणी नव्हते. पाहिले तर जवळपासही कोणी नव्हते. झोप येईना म्हणून मग नामस्मरण करीत बसलो. रात्री दोन-अडीच वाजता केव्हांतरी झोप लागली. पण तोपर्यंत सर्व काळ जप ऐकू येत होता. दुसऱ्या दिवशी श्रीमहाराजांना त्याबद्दल विचारले तेव्हां ते म्हणाले की आनंदसागरांनी तेथे खूप जप केला होता, तो तेथे भरलेला आहे! कोणीही यावे आणि वाटेल तेवढे लुटून न्यावे. ही खोली अशीच ठेवा असे श्रीमहाराज त्यावेळी म्हणाले. तथापि आता ती पाडली आहे.

जालन्याहून आम्ही गोंदवल्याला गेलो. तेथे झोपलो त्या आमच्या खोलीत जप ऐकू आला नाही; पण मन एकदम शांत झाले. याबद्दल श्रीमहाराजांना विचारले तेव्हां ते म्हणाले की हे बरोबर आहे. ते तळमळ लागलेल्या साधकाचे स्थान होते, हे सिद्धाचे आहे.

येथे मालाडला माझा असा अनुभव होता की पू. तात्यासाहेब घरातून बाहेर गेले की तसबिरीतले श्रीमहाराज थोडे म्लान दिसत. पू. तात्यासाहेबांना मी हे सांगितले तेव्हां ते म्हणाले की आपण महाराजांना विचारू. श्रीमहाराजांना (पेटीवर) विचारले तेव्हां ते म्हणाले, 'तसे काहीसे आहे खरे!' यावरून आठवले! एका गुरुपौर्णिमेला रात्री पू. तात्यासाहेब श्रीमहाराजांच्या तसबिरीकडे पाहून म्हणाले, 'किती प्रसन्न दिसताहेत महाराज!' पुढे म्हणाले, 'त्यांना आवडते ते (अन्नदान) झाले की त्यांना स्फुरण येणारच.' तुम्हाला सांगतो, बुद्धीने नामाचे गूढ उकलणे शक्य नाही. त्यापेक्षा श्री. भाऊसाहेबांसारखे, काय ते मला माहीत नाही; महाराजांनी सांगितले म्हणून मी सतत नाम घेणार ही भूमिका ठेवावी आणि अखंड नामस्मरण करावे.

नंतर क्षमेसंबंधी बोलणे निघाले तेव्हां पू. बाबा म्हणाले, श्रीमहाराजांनी मला सांगितले होते की कोणी ओळखत नाही अशा ठिकाणी जावे आणि लोक अपमान करतील असे मुद्दाम वागून अपमान झाला की मग आत काय होते याचा शोध घ्यावा. माझा स्वभाव फार तापट होता. त्यामुळे त्यांनी सांगितलेले करायचे मला धाडस झाले नाही. 'माळिये जेउतें नेलें। तेउतें निवांतचि गेलें।' असे राहाता आले तर मरणानंतर मोक्षाची खात्री आहे. गीतेत 'बहूनां जन्मनां अंते ज्ञानवान् माम् प्रपद्यते।' म्हटले आहे ते खरे आहे. अजून किती जन्म आहेत कोणास ठाऊक, पण आपण पुन्हा भेटणार! ज्ञानवान् मां प्रपद्यते याबद्दल श्रीमहाराजांना विचारले तेव्हां श्रीमहाराज म्हणाले की तो शरण जातो आणि मग ज्ञानी होतो. मग त्याला ज्ञानवान् का म्हटले आहे म्हणून विचारल्यावर म्हणाले, काशीला जायला निघालेला माणूस अद्याप स्टेशनवर असतो; पण त्याच्या घरी कोणी त्याची चौकशी करायला गेले तर घरचे लोक तो काशीला गेला म्हणून सांगतात, तसे हे आहे. अद्यापि त्याला ज्ञान व्हायचे असते; पण तो भगवंताच्या मार्गाला लागला की त्याला ज्ञानवान् म्हणतात.

## **।४१३।** (७ एप्रिल १९९५)

**पू. बाबा :** इथे येणारे एक डॉक्टर आहेत. नुकतीच त्यांची ॲन्जिओग्राफी केली. त्यांचा फोन आला होता की तसा काही दोष आढळला नाही. ते म्हणाले की गुरूंवर त्यांचा विश्वास आहे. नामस्मरण करतात. तरीदेखील आपण योग्य मार्गावर आहोतच अशी खात्री वाटत नाही. बहुतेकांची अशीच स्थिती असते. तथापि ह्या डॉक्टरांसारख्या गुरूंवर निष्ठा असलेल्या माणसालाही तसे वाटते हे विशेष. असे का होते ?

**साधक ग :** कदाचित ते डॉक्टर असल्यामुळे आजारासंबंधी त्यांची कल्पना जास्त धावत असावी आणि म्हणून असे होत असावे.

**साधक क :** गुरूंवर निष्ठा असली तरी काही वेळा ध्येय निश्चित झालेले नसते.

**पू. बाबा :** तसे होणे शक्य आहे. पण आपल्या गुरूंनी सांगितल्यानंतरही मार्गाबद्दल शंका का वाटावी ? मी यावर विचार केला. मला वाटते की आपले मन अद्यापि दृश्यात गुंतलेले आहे. दृश्याचा प्रवाह एकसारखा वाहातो आहे. त्या प्रवाहात एखाद्या लाकडाच्या ओंडक्याप्रमाणे आपणही वाहात आहोत,

आपले मनही वाहाते आहे. तथापि हे सगळे स्थिर आहे असे समजून खरोखर स्थिर असलेले नाम धरण्याचा प्रयत्न आपण करत आहोत; आणि आपल्याला खरी स्थिरता नसल्यामुळे ते एकसारखे निसटते आहे. वास्तविक नाम निरुपाधिक आहे आणि आपण त्याला उपाधी चिकटवायला पाहातो आहोत. यातली प्रमुख उपाधी काळाची आहे.

**साधक प** : नाम मनाच्या पलीकडे आहे. ते मनाने धरता येणार नाही. म्हणून मन धावायचे थांबल्याखेरीज खरे नामस्मरण होणार नाही. तसे पाहिले तर काळालाही प्रवाहीपणा आपणच दिलेला आहे.

**पू. बाबा** : नाम स्थिर आहे आणि आपण वाहात आहोत. अशा स्थितीत आज तरी नामाचा अभ्यासच केला पाहिजे आणि या अभ्यासाला वैराग्याची जोड पाहिजे. वैराग्यासाठी श्रीएकनाथ महाराजांच्या स्फुट प्रकरणांपैकी चिरंजीवपदातील ओव्यांचे चिंतन व आचरण करावे.

पू. बाबांनी चिरंजीवपदातील काही ओव्या वाचून त्यांचे विवेचन केले. ओव्या अशा :

''जेणें धरिला शुद्ध परमार्थ। त्यासि जनमान हा करी अनर्थ। तेणें वाढे विषयस्वार्थ। ऐक नेमस्त विचार हा॥ १२॥ वैराग्य पुरुष देखोनी। त्याची स्तुती करिती जनीं। एक सन्माने करूनी। पूजेलागोनी पैं नेती॥ १३॥ त्याचे वैराग्य कोमल कंटक। नेट न धरीच निष्टंक। देखोनि मानस्तुति अलोकिक। भुलला देख पैं तेथें॥ १४॥ ...म्हणाल विवेकी जो आहे। त्यासी जनमान करील काये। हें बोलणें मूर्खाचें आहे। जया चाड आहे मानाची॥ २३॥ ज्ञात्यासी प्रारब्धगति। मान झाला तरी नेघो म्हणती। परि तेथेंची गुंतोनि न राहाती। उदास होती तात्काल॥ २४॥ या परी साधकाच्या चित्ता। मान गोडी न संडे सर्वथा। जरी कृपा उपजेल भगवंता। तरी होय मागुता विरक्त॥ २५॥ तो विरक्त कैसा म्हणाल। जो मानलें सांडी स्थळ। सत्संगीं राहे निश्चळ। न करी तळमळ मानाची॥ २६॥ मांडीना स्वतंत्र फड। आंगा येईल अहंता वाड। न धरी जीविकेची चाड। न बोले गोड मनधरणी॥ २७॥ नावडे प्रपंचीं बैसणें। नावडे कोणाशी बोलणें। नावडे योग्यता मिरवणें। बरवें खाणें नावडे॥ २८॥ नावडे लौकिक परवडी। नावडती लेणी लुगडी। नावडे परान्न गोडी। द्रव्यजोडी नावडे॥ २९॥ नावडे स्त्रियांत बैसणें। नावडे स्त्रियांचें रगडणें। नावडे स्त्रियांतें पाहणें। त्यांचें बोलणें नावडे॥ ३०॥ नको नको स्त्रियांचा सांगात। नको नको

स्त्रियांचा एकांत। नको नको स्त्रियांचा परमार्थ। करिती आघात पुरुषासी॥ ३१॥ म्हणाल गृहस्थ साधकें। स्त्रिया सोडून जावें कें। येच अर्थी उत्तर निकें। ऐक आतां सांगेन॥ ३२॥ तरी स्वस्त्रीवांचोनी। नातळावी अन्य कामिनी। कोणे स्त्रियांसन्निध वाणी। आश्रयो झणीं न द्यावा॥ ३३॥ स्वस्त्रीसहि कार्यापुरतें। पाचारावें स्पर्शावें निरुतें। परि आसक्त होऊनिया तेथें। सर्वथा चित्तें नसावें॥ ३४॥ नरनारी शुश्रूषा करिती। भक्ति ममता उपजविती। परी शुद्ध जो परमार्थी। तो स्त्रियांचे संगती न बैसे॥ ३५॥ अखंड एकांतीं बैसणें। प्रमदासंगे न राहणें। जो नि:संग निराभिमानें। त्याचे बैसणे सर्वदा॥ ३६॥ कुटुंब आहाराकारणें। अकल्पित न मिळे तरी कोरान्न करणें। ऐसें स्थिति जे वर्तणें। तें जाणणें शुद्ध वैराग्य॥ ३७॥ ऐसी स्थिती नाहीं ज्यासी। तंव कृष्णप्राप्ति कैची त्यासी। यालागीं कृष्णभक्तिसी। ऐसी स्थिती असावी॥ ३८॥"

ओव्या वाचून झाल्यावर पू. बाबा म्हणाले, पुरुष साधकांना नाथांनी जे सांगितले आहे तेच स्त्री साधकांना पुरुषांच्या बाबतीत लागू आहे. कामवासना माणसाला लाचार करते म्हणून त्याबाबतीत साधकाने जागरुक असले पाहिजे. तथापि कामवासनेपेक्षाही पैसा आणि लौकिकाची इच्छा साधकाचा घात करतात म्हणून त्याबाबतीत अतिशय सावध राहिले पाहिजे.

निर्गुणापेक्षा सगुण कसे महत्त्वाचे आहे याबद्दलची चर्चा झाली. पू. बाबा म्हणाले, "हा जन्म नामाला दिला. महाराज भेटले; आता काय पाहिजे?" अशी स्थिती आदर्श मानून साधन केले पाहिजे. म्हणजे मग नाम पूर्ण कसे आहे ते समजेल आणि त्यानंतर साध्य आणि साधन हा भेद न राहाता त्यामधे एकरूपता येईल. साधनच साध्य होईल.

## |४१४| (१४ एप्रिल १९९५)

**पू. बाबा :** आपले सगळे जगणे संबंधांवर आधारलेले आहे. हे संबंध आणि संबंधी नाहीसे झाले तर माणूस वेडा होईल. दुसऱ्या महायुद्धात असे झाले. बॉम्ब वर्षावात कित्येकांच्या घरची सगळी माणसे मेली, एखादा राहिला. एका साठ वर्षांच्या बाईची अशी स्थिती झाली, तेव्हां तिने त्या वयात पुन्हा लग्न केले आणि लहान मुलांसाठी शाळा काढली. आपण जोपर्यंत या संबंधात गुंतलेले आहोत - मग ते संबंध व्यक्तींचे असोत अथवा वस्तूंचे असोत - जोपर्यंत दृश्याशी संबंध आहे तोपर्यंत खरा परमार्थ शक्य नाही. गौडपादांनी

अस्पर्शता किंवा अस्पर्शयोग आणि अमनस्कता यांचे वर्णन केले आहे. अस्पर्शता म्हणजे कशाशीही संबंध नसणे. ही स्थिती इतकी अवघड आहे की तिचे योग्यांनादेखील भय वाटते. मांडूक्योपनिषदाच्या गौडपाद कारिकेत म्हटले आहे :

अस्पर्शयोगो वै नाम दुर्दर्शः सर्वयोगिभिः।
योगिनो बिभ्यति ह्यस्मादभये भयदर्शिनः॥ ३.३९॥

सर्व योगात पारंगत असणाऱ्या योग्यांना अभय प्राप्त झाले तरी ह्या योगाची भीती वाटते. कारण संबंध संपले तर त्यात मीपणाचा लोप (Loss of Identity) आहे. व्यवहारात राहायचे म्हणजे संबंध राहाणारच. पण आज त्यांमधून जी सुखदुःखे निर्माण होतात ती घातक आहेत. गीतेत म्हटले आहे 'मात्रास्पर्शास्तु कौंतेय शीतोष्णसुखदुःखदाः।' इंद्रियांच्या संयोगाने शीत उष्ण इत्यादी सुखदुःखे होतात. तथापि शरीराला सुख वा दुःख झाले तरी मन हलता कामा नये. यासाठी हे संबंध टिकाऊ नाहीत, तात्पुरते आहेत हे मनात ठसले पाहिजे. श्री. भाऊसाहेब (केतकर) असे वागले. हे साधण्यासाठी सत्संग हवा. तो मला छत्तीस वर्षे लाभला. वास्तविक तुम्हालाही आता साधन करायला कोणतीच अडचण नाही. म्हणून आत्ताच केले पाहिजे.

चर्चा चालू असतांना मधेच एक गृहस्थ आले. रविवारी प्रवचनाला येतात. त्यांनी त्यांच्या आजाराची हकिगत सांगितली. ते म्हणाले की डिसेंबर १९९४ मध्ये म्हणजे सुमारे चार महिन्यांपूर्वी त्यांची हृदयाची बायपास सर्जरी झाली. स्थूल आहेत. हाय ब्लडप्रेशर आणि डायबिटीसचाही त्रास आहे. ऑपरेशनच्या आधी त्यांच्या हृदयाचे केवळ पस्तीस टक्के काम चाललेले होते. एकूण सात बायापास घेतले आणि तरीदेखील एरवी जे ऑपरेशन करतांना पाच-सहा बाटल्या रक्त द्यावे लागते ते त्यांचे ऑपरेशन एकही बाटली रक्त न देता पार पडले! हिंदूजा हॉस्पिटलमधे ऑपरेशन झाले. भूल देण्यापूर्वी त्यांनी नामस्मरणास सुरुवात केली आणि दोन दिवसांनी शुद्धीवर आले तेव्हां नामस्मरण चाललेले होते! ते म्हणाले की त्यांच्या घरात दत्तोपासना आहे पण पुण्याच्या माधवनाथांनी त्रयोदशाक्षरी मंत्र श्वासावर कसा घ्यावा ते दाखवले आणि तेव्हांपासून गेली बारा वर्षे ते नियमित नामस्मरण करतात. तथापि अजून नामस्मरणाची आवड वाटत नाही म्हणाले. ते म्हणाले की उद्या हनुमानजयंती आहे. या शुभ दिवशी एक कोटी जपाचा संकल्प सोडायची इच्छा आहे तेव्हां काय करू ते सांगा.

पू. बाबा त्यांना म्हणाले की संकल्प करा पण त्याला इतक्या दिवसातच पूर्ण करीन असे काळाचे बंधन घालू नका. फार ताण देऊ नका. संकल्पाच्या म्हणून रोजच्या पाच-सहा हजार जपाने सुरुवात करा आणि मग झेपेल तितका हळूहळू वाढवा. तसेच रोजची संकल्पाची संख्या झाल्यावरही शक्य तितके नामस्मरण करा.

## ।४१५। (२१ एप्रिल १९९५)

पू. बाबांनी आज पूर्वजन्मातील संबंधाचा विषय काढला. ते म्हणाले, काही व्यक्ती आणि स्थळे आपल्याला एकदम आपलीशी वाटतात किंवा त्यांच्याबद्दल विरोधी भावही येतात कारण त्यांचा आणि आपला पूर्वजन्मात संबंध आलेला असतो. ऋणानुबंध हा शब्दही त्या अर्थीच आहे. अनुबंध - पूर्वीपासूनचे बंधन. पूर्वजन्मांतून काहीतरी देणे घेणे येते. 'भावस्थिराणि जननान्तर सौहृदानि।' असे कालिदासाने म्हटले आहे. तथापि हे सारे अनुमान आहे.

साधनाच्या दृष्टीने या गोष्टीचे महत्त्व असे की आपला आणि श्रीमहाराजांचा पूर्वीपासून संबंध आहे; तो आपण वाढवला पाहिजे. तो वाढवण्याचा उत्तम उपाय शरणागती. म्हणून ममत्व आड येते त्याचा प्रथम त्याग केला पाहिजे. ते जमले तरच शरणागतीला आवश्यक असलेल्या दुसऱ्या गोष्टीचा - अहंकाराचा त्याग शक्य होईल. मी शरण जाईन असे म्हणण्यातदेखील अहंकार आहेच. आपल्याला खूप नामस्मरण करावे असे वाटते पण त्याच्या आड आपणच येतो. मीच आत उतरून मला पहायचे आहे. त्यात दुसऱ्या कोणाचा संबंधच येत नाही. ''आत्मैव आत्मनो बंधु: आत्मैव रिपुरात्मन:।' असे गीता सांगते.

गुरुदेव रानड्यांनी 'ईश्वरप्रणिधानात् वा।' ह्या पतंजलीच्या सूत्रात 'ईश्वरप्रणिधानात् एव।' अशी सुधारणा केली. विनोबांनी तर विचारपोथीत फार छान सांगितले आहे. ते म्हणतात, ''ज्ञानदेव योगी खरे, पण त्यांच्या योगाचा भक्तीला 'साष्टांग' प्रणाम आहे.'' (२६५).

साधक ब म्हणाले की काही दिवसांपूर्वी त्यांना स्वप्नात असा अनुभव आला की त्यांची सर्व बाजूंनी कोंडी झाली आहे. ते म्हणाले की सर्व बाजूंच्या भिंतींच्या स्पर्शाची त्यांना अजूनही चांगली आठवण आहे.

साधक ग म्हणाले की मनासारखे साधन होत नाही ही खरी कोंडी आहे. ती जाणवली की माणूस जास्त साधन करील. साधक ब म्हणतात तशी खरी कोंडी

फार अवघड आहे. आम्ही कोंडी वाटू लागली की सुटकेचे मार्ग (Escape routes) काढत असतो.

एकंदर चर्चेचा सूर पाहून पू. बाबा म्हणाले की साधन करत राहा; निराश होऊ नका.

आज पू. बाबांची पाठ आणि कंबर दुखत होती म्हणून आम्ही लवकर उठलो.

## |४१६| (२८ एप्रिल १९९५)

**पू. बाबा :** नुकतेच श्री. परीकर यांनी एका अमेरिकन मासिकातले एक कात्रण झेरॉक्स करून दिले आहे. त्या कात्रणात ध्यानासंबंधी माहिती आहे. एक ख्रिश्चन पाद्री आठवड्यातला एक दिवस एका तुरुंगातील कैद्यांना सन्मार्गावर आणण्याच्या हेतूने ध्यान कसे करावे ते शिकवीत असे. त्याचा परिणाम असा झाला की कैद्यांचे मनोबल वाढले. त्यातले जे निर्ढावलेले कैदी होते ते तुरुंगातून कसे सुटून (पळून) जाता येईल याचा जास्त विचार आणि प्रयत्न करू लागले; पण ज्यांच्या हातून भावनेच्या भरात गुन्हे झाले होते त्यांना त्यांच्या कृत्यांची जास्त खंत वाटू लागली. दुसऱ्या एका प्रयोगात, ध्यानाला बसतांना तो पाद्री कैद्यांच्या डोक्यावरून मागे मानेवरून आणि पाठीवरून हात फिरवीत असे. त्यामुळे त्यांचे मन शांत होऊन मनाच्या शक्तीत वाढ होत असे. त्यांच्यापैकी एकाची तर कुंडलिनी जागृत झाली.

ही माहिती सांगून पू. बाबा म्हणाले, नामस्मरणानेही आपल्या मनाची शक्ती निश्चित वाढते. पण आपण दृश्याला चिकटलेले आहोत त्यामुळे ती साठण्यापूर्वीच खर्च होऊन जाते. माझाच दहा बारा दिवसांपूर्वीचा अनुभव सांगतो. त्या दिवशी सकाळी तास सव्वा तास छान जप झाला. मन प्रसन्न होते. त्यानंतर सगळी पुस्तके आवरत होतो. त्यातली ग्रीक तत्त्वज्ञानावरची पुस्तके पाहून मनात विचार आला की ह्या पुस्तकांचे काय करावे? कोणाला द्यावी म्हटले तर ह्यात कोणाला गोडी असणार! मग रद्दीत घालावी का? उगीच मुलाला कशाला त्रास! त्यापेक्षा आपणच काय ते करावे इत्यादी. ते तेवढेच राहिले आणि मग रविवारी ज्ञानेश्वरीवर काय सांगावे याचे चिंतन करीत बसलो पण काही सुचेना. कारण उघड दिसत होते. जपाने आलेली प्रसन्नता आणि मनाची वाढलेली शक्ती पुस्तकांच्या विचारात वाहून गेली होती. मग उठून हात पाय धुतले, परत थोडा वेळ जप केला आणि त्यानंतर चिंतन करतांना नवे

विचार सुचू लागले. यावरून एक स्पष्ट झाले की नाम शक्तिरूप आहे. पण नामाने मिळणारी शक्ती आपण संसारात वापरतो. म्हणूनच श्रीरामकृष्णांनी नरेंद्राला 'साल्या, मिळायला लागले नाही तोंच खर्च करतोस?' म्हणून दटावले होते.

**साधक ब** : आपण नेहमी व्यवहारातच असतो त्यामुळे कायमच खाली खेचले जातो.

**साधक प** : होय, हे खरे आहे. आपण वर जायचा प्रयत्नच करत नाही कारण आपल्याला वर जायची तशी तीव्र इच्छाच नाही. आपल्याला दृश्याच्या पलीकडे जाताच येत नाही. दृश्यातल्या गोष्टी मनासारख्या होण्यासाठी आपले नाम खर्च होऊन जाते. मला वाटते, त्यामुळेच आपण अर्थापेक्षा दृष्टान्तात जास्त गुरफटत जातो.

**साधक ब** : यापेक्षा मला वाटते की आपण आपले कर्तृत्व काही नाही हे ओळखून सर्व काही श्रीमहाराजांवर सोपवावे. त्यांच्यावर सोपवू लागलो की आपण खरोखरच व्यवहारात निरुपयोगी होऊ लागतो. मी श्रीमहाराजांकडे नामाचे प्रेमच मागेन.

**साधक प** : तुमच्या प्रेम शब्दाची व्याख्या करा.

**साधक ग** : वेगळी व्याख्या कशाला पाहिजे? तुलसीदासांनी रामचरितमानसमध्ये ते चांगले सांगितले आहे. ते म्हणतात -

"कामिहिं नारि पिआरि जिमि लोभिहिं प्रिय जिमि दाम।
तिमि रघुनाथ निरंतर प्रिय लागहु मोहिं राम॥"

प्रत्येकजण वेगळा आणि त्याची स्थितीही वेगळी. तथापि रामाचे किंवा नामाचे प्रेम निर्माण होण्यासाठी आपण कोठे गुंतलो आहोत ते ओळखून ते काढायचा प्रयत्न केला पाहिजे.

**पू. बाबा** : बरी आठवण झाली! नुकतेच वेर्लेकर येऊन गेले. अलिकडेच त्यांना सातव्यांदा हार्ट ॲटॅक येऊन गेला! ते म्हणाले, मला आता मृत्यूची किंमत राहिलेली नाही. श्रीमहाराजांनी माझा देह व्यापलेला आहे. ते माझ्या हृदयात आहेत. तथापि क्वचित केव्हांतरी राग येतो. राग आला की माझ्या देहातून ते बाहेर पडतात याचा मी अनुभव घेतलेला आहे. पू. बाबा म्हणाले ज्या देहात विकार आहेत त्या देहात राहणे भगवंताला आवडत नाही. "तुका म्हणे देह भरिला विठ्ठलें। काम क्रोधें केलें घर रितें॥" असे तुकाराम महाराजांनी म्हटले आहे ते किती खरे आहे!

## |४१७| (५ मे १९९५)

**पू. बाबा** : दोन दिवसांपूर्वी सुमारे सत्तर वर्षांचे एक गृहस्थ भेटायला आले होते. साताऱ्याचे राहाणारे, गोंदवल्यास जातात. त्यांच्या वडिलांनी श्रीमहाराजांकडून अनुग्रह घेतला होता. म्हणजे पूर्वीपासून गोंदवल्याशी संबंध आहे. त्यांनी एक शंका विचारली की श्रीमहाराज रामाचे उपासक; त्यांनी मंत्र दिला आहे तोही रामाचा. म्हणून तुम्ही निरूपणात सांगता त्याप्रमाणे जप करतांना (रामाऐवजी) श्रीमहाराजांची आठवण करायची हे थोडे विचित्र वाटते. काय ते कळत नाही. मी त्यांना समजावून सांगितले पण तुम्हालाही सांगतो. आपण श्रीमहाराज म्हणतो तेव्हां एखाद्या विशिष्ट व्यक्तीची अशी ती आठवण नाही. तसेच श्रीमहाराजांचा राम हा दाशरथी राम खराच पण वास्तविक त्याच्याही पलीकडचे ते रामतत्त्व आहे. रामतत्त्व हीच विश्वजाणीव आहे. आपली जाणीव हा त्या विश्वजाणिवेचा भाग आहे. त्या भागाने संपूर्ण विश्वाच्या जाणिवेची जाणीव करून घ्यायची आहे; आणि त्यासाठी खूण म्हणून श्रीमहाराजांची आठवण आहे. देहात असतांनाही तुम्ही मला ओळखले नाहीत असे त्यांनी म्हटले आहे ते या अर्थाने.

आपल्याला साधन करावेसे वाटते पण होत नाही याचे कारण साधनाच्या आड आपणच येतो आहोत. ह्या अडचणीवर आपण विचारपूर्वक मात केली पाहिजे हे खरेच, पण मुख्य म्हणजे सत्संगतीने ते होईल. संतांच्या ग्रंथांचे वाचन देखील हा हेतू ठेवून केले पाहिजे.

पू. बाबांनी यानंतर पूर्वी न ऐकलेले किंवा वाचनातही न आलेले श्रीमहाराजांचे एक वचन सांगितले. श्रीमहाराज एकदा म्हणाले, ''मी येथें गोंदवल्याला दुकान घालून बसलो आहे. या दुकानात विशालता विकायला ठेवली आहे.'' पू. बाबा म्हणाले, परमार्थी माणूस क्षुद्र असता कामा नये. मनाने आणि कृतीने तो मोठा उदार, विशाल झाला पाहिजे तरच त्याला स्वत:मधला आणि दुसऱ्यांमधला परमेश्वर जाणवेल. स्वार्थ म्हणजे संकुचितपणा. याउलट परमार्थी माणूस विशाल म्हणजे निस्वार्थी झाला पाहिजे. समाजात खरे निस्वार्थी संतच असतात. त्यांचा सहवास करावा.

## |४१८| (१२ मे १९९५)

पू. बाबांनी आज ज्ञानेश्वर महाराजांच्या एका अभंगावर चर्चा सुरू केली. विनोबांच्या ''ज्ञानदेवांची भजने'' या पुस्तकात अध्याय १० मध्ये हा ७५ क्रमांकाचा अभंग दिला आहे.

स्व-रूपाकारणें विश्व-रूप घेतलें। सगुणें झांकिलें निर्गुण रया॥
द्रष्टेयाचे दीप्ती दृश्य चि न दिसे। सम-रसीं भासे तेज तयाचें॥
चित्-स्वरूपीं नांदे तत्-स्वरूपी भासे। ॐकार सरिसें तदाकार॥
प्रेम-कळी ओतलें सोज्वळित तेज। तेथें तूं विराज ज्ञानदेवा॥

(गाथ्यामध्ये या अभंगाची सुरुवात 'अरे स्वरूपाकारणें विश्वरूप घेतलें।' अशी असून 'तत्त्वी तत्त्व कवळी उगवे रविमंडळी। अवघीच झांकोळी आपुल्या तेजें॥' असा दुसरा चरण आहे. त्याचप्रमाणे 'चित्-स्वरूपी नांदे तत्स्वरूपीं भासे।' ऐवजी 'चित्स्वरूपी नांदे चित्स्वरूपीं भासे।' असे दिले आहे व 'ॐकार सरिसें' ऐवजी 'ॐकारासरिसें आहे)

अभंग वाचून झाल्यावर पू. बाबा म्हणाले, निर्गुणातून सगुण आले आणि त्याने निर्गुणालाच झाकून टाकले. म्हणजे सगुणालाच खरेपण आले. हे कसे झाले याचे उदाहरण ज्ञानेश्वर महाराजांनी दुसरीकडे दिले आहे. मोतीबिंदू डोळ्यातून येतो आणि दृष्टी झाकतो किंवा पाण्यातूनच शेवाळ येते आणि पाणी झाकून टाकते तसे ज्ञानातून अज्ञान येते आणि ज्ञान झाकून टाकते. येथे निर्गुणातून सगुण येते आणि ते निर्गुणाला झाकून टाकते असे म्हटले आहे. तथापि द्रष्टा आणि दृश्य एक झाले, समरस झाले की द्रष्ट्याच्या तेजामुळे दृश्य दिसेनासे होते. खरोखर हे आश्चर्यकारक नव्हे का? कारण खरे म्हणजे उजेडात वस्तू दिसू लागतात तर येथे दृश्य नाहीसे होते. तत् ह्या स्वरूपात ते निर्गुण भासमान होते पण वास्तविक त्याचे राहाण्याचे ठिकाण चित् स्वरूपातच आहे; आणि ॐकार ही त्याची खूण आहे. उज्ज्वल तेज म्हणजे ते ज्ञान प्रेमकळी म्हणजे भक्तीमधे सामावते आणि ज्ञानदेवा, तेथे म्हणजे भक्तीत तू ऐश्वर्यात रहा असे निवृत्तीनाथ ज्ञानराजांना सांगत आहेत.

अर्थ सांगितला आता या अभंगावरची विनोबांची चिंतनिका ऐका : ''वस्तुत: मुळात निर्गुण स्वरूपाच्या प्रकाशनासाठीं हें सगुण विश्व-रूप धारण केले आहे. पण परिणाम विपरीत झाला. लोक-दृष्टीत सगुणाने निर्गुण झाकूनच टाकलें. उलट विचारकांच्या विचार-दृष्टीत द्रष्ट्याची-निर्गुणाची-दीप्ति इतकी फांकते की दृश्याचा-सगुणाचा-लोप होतो.

सर्वसामान्य लोक-दृष्टि आणि विचारकांची विचार-दृष्टि यांहून वेगळी भक्तीची दृष्टि आहे. तिने व्युत्थान आणि समाधि दोहोंची कसर काढून टाकणारी समरस अवस्था लाभते. या समरसात दृश्याचा लोप न होता द्रष्ट्याचे तेज भासमान होते. त्या अवस्थेत ईश्वर चैतन्य-स्वरूपात-सगुणात-नांदतो.

तरी चैतन्यापलीकडील तत् - स्वरूप - निर्गुण - भासतच राहतें. शब्द बोलावा तर तदाकारता लोपते, आणि तदाकार व्हावें तर शब्द मावळतो, ही नेहमीची अडचण, पण समरस अवस्थेत इकडे ॐकार उच्चारावा आणि तिकडे तदाकारही व्हावें.

या अवस्थेचें थोडक्यात वर्णन 'प्रेम - कलिकेमध्ये ओतलेले प्रखर तेज' असे करता येईल.

१) सगुणानें निर्गुण प्रकट व्हावें.

२) दृश्य न लोपता द्रष्ट्याचें तेज फांकावें.

३) चैतन्याच्या खेळात - कर्म - योगात - वागत असतांना पलीकडील शांति अनुभवावी.

४) शब्द बोलत असतांना निःशब्दात लीन असावें.

५) प्रेमाची कोमलता आणि ज्ञानाची प्रखरता यांचा योग साधावा. असें या अवस्थेचें विवरण होईल. या अवस्थेत तू नित्य विराजमान हो, असें ज्ञानदेवाचे गुरु ज्ञानदेवाला सांगत आहेत.''

चिंतनिका वाचून झाल्यावर पू. बाबांनी विचारले की आता गोंदवल्याला शिबीर व्हावयाचे आहे तेथे निरूपणासाठी हा अभंग घ्यावा का?

**साधक प :** या अभंगात वर्णन केलेली अवस्था सिद्ध पुरुषाची आहे. सामान्य साधकाला त्यापासून विशेष फायदा होणार नाही. श्रीरामकृष्ण येवढे मोठे, पण आईने त्यांना भावमुखी रहा म्हणून सांगितले. कारण त्यामुळे जगाचे काम होणार होते.

मनासारखे साधन होत नाही या नेहमीच्या तक्रारीच्या संदर्भात पू. बाबा म्हणाले, वास्तविक आपले रोजचे जगणे आणि व्यवहार अगदी यांत्रिक असतात. पण त्यातील पदार्थ, घटना आणि संबंधात आपण इतके गुरफटून जातो की नेहमीचे नामस्मरण झाले की दिवसभर नामाची आठवणही होत नाही. खरे म्हणजे दिवसातला कितीतरी वेळ तसा फुकट जातो, तो नामाकडे का लावू नये? अगदी नामच एकसारखं घेतलं पाहिजे असं नाही, पण त्याची आठवण तरी जागी राहावी. हे होत नाही याचे खरे कारण व्यवहारातले आपले जीवन आपल्याला जितके खरे वाटते तितके महाराज खरे वाटत नाहीत. त्यांची आठवण झाली नाही तर आपले नुकसान झाले असे वाटत नाही. पैशाचे नुकसान वाटते पण नामाचे नुकसान झाले असे वाटत नाही. तेव्हां कारण उघड आहे.

(मंगळवार दि.१६ मे १९९५ ते शनिवार दि.२० मे १९९५ अखेर पाच दिवस श्रीक्षेत्र गोंदवले येथे ११वे नामसाधन अभ्यास शिबीर झाले. या काळात रोज संध्याकाळी पू. बाबांच्या खोलीत जी चर्चा होत असे त्याचा गोषवारा कु. विदुला गद्रे यांनी दिला त्यावरून पुढील भाग लिहिला आहे - संपादक.)

**|४१९.१|** (१६ मे १९९५) गोंदवले.

**साधक य** : भगवंताचे अथवा सद्गुरूंचे प्रेम वाटण्यासाठी काय करावे?

**पू. बाबा** : खरे प्रेम सख्यामधेच आहे. पण त्याच्यासाठी दास्यत्वापासून सुरूवात केली पाहिजे. माझी इच्छा, वासना बाजूला ठेवणे हे दास्याचे लक्षण. आधी थोडं प्रेम असतं आणि त्यातून दास्यभाव निर्माण होतो. तुम्ही प्रेमवस्तूच्या आधीन होता. ज्याच्या विषयी प्रेम निर्माण व्हायचं ते खरं वाटलं पाहिजे ना? नुसती Reality नव्हे, तर ते माझ्या हिताचं वाटलं पाहिजे.

प्रेमाला आदराचा आधार असतो. श्रीमहाराज उदाहरण देत; सात्त्विक नवराबायको असली आणि लग्नाला पंचवीस-तीस वर्षे झाली असली तरी बायकोला नवऱ्याबद्दल आदरयुक्त प्रेम असतं. समजा, घरात पाय पसरून ती काहीतरी निवडत बसली असली आणि नवरा तिथं आला तर ती पाय आवरून घेते. स्त्रीचं प्रेम इतकं नाजुक असतं की ती तर त्याला दुखवणार नाहीच, पण दुसरा कोणी त्याला बोलला तर तिला ते सहन होणार नाही; त्रास होईल. श्रीमहाराज म्हणाले, आपल्या दैवताला कोणी नांवे ठेवली तर ते ऐकायला तेथे उभे राहू नये.

**साधक ग** : कालिदासाने वर्णन केले आहे की जेव्हां पार्वतीची परीक्षा घेण्यासाठी ऋषी तिच्यासमोर शंकराची निंदा करू लागतात तेव्हां ती म्हणते की सज्जनांची निंदा करणारे तर पापी असतातच पण ती ऐकणारांनाही पाप लागते. 'न केवलं यो महतोपभाषते श्रृणोति तस्मादपि य: स पापभाक्।'

**पू. बाबा** : भगवंताचं प्रेम न वाटण्याचं कारण म्हणजे आपल्याला दृश्याचं प्रेम आहे; आणि त्याचं मूळ देहाच्या प्रेमात आहे. ज्याचा इंद्रियांनी अनुभव येतो ते सर्वस्वी खरं वाटतं.

नाम हे स्पंदनमय आहे. म्हणून साधूसंत तोंडाने नाम घेण्याला फार महत्त्व देतात. वैखरीने नाम घ्या. त्याचं कारण असं की त्यामधे एकीकडे प्राणाशी संबंध आहे आणि दुसरीकडे मनाशी संबंध आहे. वैखरीने पुष्कळ नामस्मरण झाले की त्याची vibrations - स्पंदने तयार होतात. समजा, तुम्हाला राग

आला आणि त्यावेळी तुम्ही नामस्मरण करायला बसलात तर एकदम नामाकडं लक्ष लागत नाही. अशा वेळी वैखरीनंच नाम घ्यावं लागतं, आणि ते घेतांना मन हळू हळू शांत होतं. मात्र चिकाटीने तेवढा अभ्यास केला पाहिजे.

श्रीमहाराज म्हणत की समजा प्रेम नसलं तरी सहवासानं ते निर्माण होतं. म्हणूनच old wife, old wine आणि old horse यांना महत्त्व आहे. यासाठीच सगुणाची उपासना करायची. मनापासून सगुणोपासना केली तर उपासकाची सौंदर्यदृष्टी आणि सौंदर्यशक्ती यांचा विकास होतो. समर्थ पंढरपूरला गेले तेव्हां पांडुरंगाला पाहून सुंदर ते ध्यान न म्हणता येथे कां रे उभा श्रीरामा म्हणाले. खरोखर, आपल्याला प्रेमाच्या सामर्थ्याची कल्पना नाही. सहवासासाठी आपल्या गुरूच्या जीवनचरित्राचं चिंतन करावं. त्यांच्या जीवनात नुसतं नि:स्वार्थीपण नाही; आपल्या भक्तांबरोबरच इतरांचंही कल्याण व्हावं ही भावना आहे.

श्रीमहाराजांच्या जीवनातले प्रेमाचे प्रसंग आठवावेत तसेच विनोदाचेही प्रसंग आठवावे. कारण त्या विनोदातही त्यांचं प्रेम आणि लोक सुधारावे ही इच्छा दडलेली आहेत. पू. तात्यासाहेब हसत हसत सांगत; ब्रह्मानंदांकडला कर्नाटकातला एक माणूस खूप आजारी होता. त्याला शेवटची घरघर लागली म्हणून त्याच्या घरून श्रीमहाराजांना आपण त्याला भेटायला या असा निरोप आला. एक निरोप आला, थोड्या वेळाने दुसरा निरोप आला. महाराज येतो म्हणाले. घरच्या लोकांची तडफड चालू होती. श्रीमहाराज यायच्या आतच तो मरेल अशी त्यांना भीती वाटत होती. घरून तिसरा निरोप आला तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, त्याला म्हणावं घाई काय करतोस? जरा थांब. शेवटी श्रीमहाराजांची भेट झाल्यानंतर तो गेला!

श्रद्धेची एक गोष्ट सांगतो. १९०७ साली हर्याला प्लेग सुरू झाला तेव्हां श्रीमहाराज गावातच होते. नंतर सर्व मंडळींना घेऊन शेतावर झोपडीत राहावयास गेले. तेथे श्रीमहाराजांनी भाऊसाहेबांच्या एका मुलाचे (श्री. बापूकाका) लग्न करायचे ठरवले. लग्नाचे दिवशीच सकाळी भाऊसाहेबांची मोठी मुलगी सौ. वेणूताई प्लेगने आजारी असल्याची बडोद्याहून तार आली. भाऊसाहेबांचं तिच्यावर फार प्रेम होतं. श्रीमहाराजांनी भाऊसाहेबांना काय करायचं म्हणून विचारल्यावर ते म्हणाले, "आपले आज्ञेप्रमाणें जसें करायचें तसें करावें." नंतर श्रीमहाराजांनी सौ. बाईंना (भाऊसाहेबांच्या पत्नी) सांगितले की "लग्नाची आजच घाई आहे असे नाही. अशा मनाचे स्थितीत कशाला करावें? पुढें पाहू.

तुमचें काय म्हणणें आहे?'' त्या म्हणाल्या, ''आपलें इच्छेप्रमाणें व्हावें हेंच मला वाटतें.'' श्रीमहाराज म्हणाले, ''तुम्ही उदास रहात नसाल व नि:शंकपणें करून घेत असाल तर करून घ्यावें,'' आणि मग सौ. बाई पुण्याहवाचनाला बसल्या आणि ते कार्य पार पडले. त्यांचा स्वभाव फार सरळ होता आणि श्रीमहाराजांवर त्यांची पूर्ण श्रद्धा होती. भाऊसाहेब म्हणत की ती माझ्यापेक्षाही महाराजांचं वचन जास्त मानत असे. (ह्या घटनेबाबत पू. तात्यासाहेबांनी त्यांच्या डायरीत लिहिले आहे, ''...कार्याला सुरुवात झाली. ती. सौ. बाई सर्वांत भाग घेत होती, व बाहेरून तरी तिला आपल्या मुलीच्या आजारपणाचा विसर पडला असावा असें दिसत होते. निष्ठा काळजी मारते हें खरें आहे. ... पुढे चारच दिवसांनीं सौ. वेणूताई गेल्याचें पत्र आलें. ती. भाऊसाहेबांची ती फार लाडकी होती. पण श्री भेटल्यावर त्यांचें प्रेम एका ठिकाणींच सांठलें, व त्यांतच त्यांचें कार्य झाले.'') प्रेमामधे विश्वास कसा पाहिजे ते सांगतो. अमका माणूस अमुक गोष्ट करणार नाही म्हणजे नाहीच. एखाद्या व्यसनाबद्दल बाईला नवऱ्याची खात्री असते की काही झालं तरी हे तें करणार नाहीत.

आपण महाराजांच्याकडं मागावं. मागण्यात auto suggestion – स्वयंसूचन आहे. माझा अंतकाळ चांगला करा. तो तुमच्या सान्निध्यात होऊ दे. आपण मागावं; दिलं नाही तर नाही! आपण मनाने लूत भरलेल्या कुत्र्यासारखे आहोत; प्रपंचात अडकलेले आहोत. त्यांना सांगावं तुम्ही काढा बाहेर. पण त्यांनी ते केलं नाही तरी त्यांचं बरोबर आहे असं वाटलं पाहिजे.

प्रेमाची वृत्ती तयार व्हावी लागते. सौंदर्याची कल्पना ठेवून जर सारखं चिंतन केलं तर जे सुंदर नाही ते सुंदर दिसायला लागतं. कांटने त्याच्या Critique of Judgement (निर्णयशक्तीची मीमांसा) ह्या ग्रंथात सौंदर्य भावात्मक असते आणि म्हणून ते पूर्ण असते असे म्हटले आहे. दृश्यामधे सौंदर्य आहे हे भावात्मक विधान झाले. सौंदर्याची दृश्यावर कल्पना करतांना तुमचं मन त्या दृश्यातून आरपार जातं आणि त्यामुळं त्या दृश्यातलं सौंदर्य प्रत्ययाला येतं. श्रीमहाराजांच्याबद्दल प्रेम निर्माण झालं की त्यांचं सगळं सुंदर दिसू लागेल. 'मधुराधिपते: अखिलं मधुरम्।'

मन बदलायला पाहिजे. त्यासाठी नाम घ्यावं. आपला अनुभव सांगतो, फार डोकं चालवू नये. कारण अवगुणांचंच चिंतन होतं. नाम मात्र सपाटून घ्यावं. बाकीचं मला माहीत नाही म्हणावं. आपोआप मन बदलत जातं. कसं बदलत जातं याची प्रक्रिया कशाला पाहिजे? दृष्टान्त घेऊन महाराजांनी सांगितलं आहे :

पाणी माती एक झालें। वेगळें नाहीं करता आलें।
निवळी घालावी पाण्यांत। पाणी स्वच्छ होतें जाण॥
तैसा विषयांत राहून जगतीं। नामाची ठेवावी संगती।
विषयाचें विष शोषून घेई। ऐसी आहे नामाची प्रचीति॥
मला लिहिलेलं पत्र आहे :
तुम्हांसी सांगावें कांहीं। ऐसें सत्य मजजवळ नाहीं।
पण एक येते मनीं। तुम्ही लागावे रामचरणीं।
धन्य धन्य त्याची जननी। ज्यानें राम आणला ध्यानींमनीं॥

महाराज एकतर वासना नाहीशीच करतील नाहीतर देऊन तृप्त करतील.

एक मुलगी होती. सर्वगुणसंपन्न, पण लग्नच होईना. तिला श्रीमहाराज एक गोष्ट सांगायचे. म्हणाले, एक मनुष्य होता. खूप पैसा पैसा करायचा, म्हणून त्याने लक्ष्मीची उपासना केली. पण लक्ष्मी काही प्रसन्न होईना. शेवटी कंटाळून त्याने संन्यास घेतला आणि लक्ष्मी प्रसन्न झाली! एकदा संन्यास घेतल्यावर करायचं काय पैसा घेऊन? हे सांगून महाराज म्हणाले, तसं मी करतो. 'तुला पाहिजे ना, तोपर्यंत देणार नाही. नको तेव्हां, घे आता.' पूर्णानंद म्हणाले ते खरं आहे. गोड बोलतील पण आंतडी बाहेर काढतील. गिरमिटच आहे ते. विषयाची आवड हीच आंतडी. ती बाहेर काढल्याखेरीज चित्तशुद्धी कशी होईल?

तुम्ही पुष्कळजण **Ph.D.** झालेले आहात. त्याचं समाधान किती आहे बघा. तसंच पैसा मिळतो त्याचं समाधान असतं, अधिकार मिळाल्याचं समाधान असतं. पण या सर्वांपेक्षा कुणीतरी आपल्यावर प्रेम करतं याचं समाधान किती असतं! तरी त्या प्रेमात स्वार्थ असतो. फक्त संतच नि:स्वार्थी प्रेम करतात. त्या प्रेमाचं समाधान किती असेल! ते समाधान मागावं. महाराजांना म्हणावं मला त्या प्रेमाचा अनुभव द्या. (पहा : अध्यात्म संवाद भाग २ संवाद १२८)

श्री. गणपतराव दामले एक गोष्ट सांगत. कुणी एका शेतकऱ्याने महाराजांना भुईमुगाच्या शेंगा आणून दिल्या. त्या उकडल्या आणि रात्री आरती झाल्यानंतर गंगूताईंनी त्या श्रीमहाराजांसमोर आणून ठेवल्या. अरे, महाराज म्हणाले, रामाला नैवेद्य दाखवून मग खायच्या. गंगूताई म्हणाल्या, आम्हाला रामबीम काही माहीत नाही; तुम्ही खा म्हणजे रामाने खाल्ल्या! महाराज काही बोलले नाहीत, गप्प बसले. मग म्हणाले, बोलवा सगळ्यांना. पाच - दहा मंडळी होती, शेंगा खाणं चालू होतं आणि महाराज आपल्या गुरूंच्या गोष्टी सांगू लागले. रात्रीचे बारा, एक, दोन, वाजून गेले! गणपतराव म्हणाले, महाराज पुन्हा असा दिवस

येईल का? हे ऐकून सगळ्यांना भरून आलं. महाराज काही बोलले नाहीत. ही हकिगत सांगून पू. बाबा म्हणाले, हा परमार्थ खरा! अशा वेळी खाण्याकडं कुठं लक्ष रहाणार? आपण नामसुद्धा घेऊ नये. एकमेकांवर नि:स्वार्थी प्रेम करावं. महाराजांना ते फार आवडेल. त्यातूनच ते तुम्हाला नाम घ्यायची बुद्धी देतील.

ग्रीक तत्त्वज्ञ डायोजिनिस फाटके कपडे घालायचा. एकदा त्याने सॉक्रेटिसला विचारले, मी कसा दिसतो? सॉक्रेटिस म्हणाला, या तुझ्या फाटक्या कपड्यांच्या भोकातून तुझा अहंकार डोकावतांना मला दिसतो.

अंतकाळी तुम्ही कुठेही असा. त्यावेळी देहाचा विसर पडून नामात गेलात तर साधलेत!

## |४१९.२| (१८ मे १९९५) गोंदवले.

**पू. बाबा** : ज्याने बुद्धीला खराबी येईल असे खाऊ नये. ज्या शरीराने साधन करायचे ते शरीर पवित्र पाहिजे. मागचं जाऊ द्या; पण इत:पर तरी शरीराकडून पाप होऊ नये. शरीराचे लाड पुरविणं हे माझं ध्येय नाही अशी जाणीव मनात एकसारखी राहिली पाहिजे. त्या ध्येयाचं स्मरण म्हणजेच नामस्मरण. इथे The end and the means are always identical. साध्य आणि साधन दोन्ही एकच. नामच साधन आणि साध्य. याचं कारण नामात भगवंत आहे. नामस्मरणानं हे सगळं आपल्या जाणिवेत येतं. हे साधलं पाहिजे. यासाठी एक उपाय आहे. नाम घेतांना इतर विचार येतील. पण आपण त्या विचारांमागे जाऊ नये; नामाला चिकटून राहावं. ते कसं करावं? संतांचं म्हणणं असं की आज चित्त जे इतर ठिकाणी चिकटलेलं आहे ते व्यवहारापुरतं तिथं ठेवावं पण चिकटू देऊ नये. तुम्ही म्हणाल हे कसं शक्य आहे? पण हे ज्याचं त्यालाच पहावं आणि करावं लागेल. त्याला एक नियम सांगता येणार नाही. हे तरी करावं नाहीतर डोळ्यांवर झापडं बांधावी. मला माहीत नाही; त्यांनी सांगितलं आहे म्हणून मी नाम घेतो.

आपल्या मनाचे व्यापार स्पंदनमय आहेत. विषयाची स्पंदनं नाहीशी करून भगवंताच्या नामाची स्पंदनं निर्माण केली पाहिजेत. भगवंताच्या नामाच्या स्पंदनांनी मन भरून गेलं पाहिजे. हे एकदा का साधलं की काही कारणांनी तुमचं मन अस्वस्थ झालं आणि तुम्ही नाम घेऊ लागलात की नामाची स्पंदनं इतर सर्व स्पंदनांवर स्वार होतील. हा एक प्रकार झाला.

दुसऱ्या प्रकारात मनाला दु:खाचा स्पर्शच होणार नाही. काही लोक असे असतात की त्यांना पैशाचं प्रेम नसतं. एकूणच त्यांना आसक्ती कमी असते.

रावसाहेब सहस्रबुद्धे असे होते. आपलं तसं नाही. पण त्या आसक्तीवर जर आपण नामाची स्पंदनं लादली तर आसक्ती हळूहळू क्षीण होऊन नाहीशी होईल. जे पैशाच्या आसक्तीचं तेच इतर विकारांच्या बाबतीत घडेल. पण हा सिद्धान्त झाला. तो आचरणात आणण्यासाठी दृढ निश्चय पाहिजे. झोपण्यापूर्वी नाम घ्यायची सवय लागली तरच मरणाच्या वेळी नाम येईल. किंवा समजा, देहाला काही दु:ख झालं तर दु:ख असेपर्यंत मुद्दाम नाम घ्यावं. ब्रदर लॉरेन्स नाही का! एका कुशीवर झोपला तर त्याच्या छातीत दुखायचं म्हणून तो मुद्दाम त्या कुशीवर नाम घेत झोपायचा. देहदु:खात नाम टिकू लागलं तर अंतकाळी देहदु:ख होतांना साहचर्याच्या नियमाने - Law of association नाम घेत माणूस जाईल. असं आपल्याला काय करता येईल ते पहा.

काल श्री. दत्ताण्णांनी एक सुंदर कल्पना सांगितली. ते म्हणाले, बायकांनी स्वयंपाक करतांना श्रीमहाराजांना आवडणारं आज काय करू असा विचार करावा. त्याचप्रमाणं इतर व्यवसाय करतांना आपण श्रीमहाराजांना काय आवडतं याचा विचार करावा आणि ते आचरणात आणायचा प्रयत्न करावा. त्यामुळं एकसारखं त्यांचं स्मरण राहील; आणि त्यांचं अस्तित्व त्यांच्या स्मरणातच आहे. (पहा : अध्यात्म संवाद भाग २ संवाद क्र. २४३)

आपल्या मनात ज्या कल्पना येतात त्या मनानेच आत साकार करता येतात, याला Psychopictography असं म्हणतात. उदाहरणार्थ श्रीमहाराजांचं चरित्र घ्या. त्यातल्या एखाद्या प्रसंगात तुम्ही आहात अशी कल्पना करून तुम्ही कल्पनेनेच तो प्रसंग जगू शकता. एका बैराग्याने वृंदावनातल्या एका साधूला वर दिला की रोज रात्री तू कृष्णाचं चरित्र, रासलीला इत्यादी पाहू शकशील. मात्र त्याला पथ्य म्हणजे तू गावात कोठेही राहायचं नाहीस. त्याप्रमाणे रोज रात्री तो कृष्णचरित्र पाही. पण एकदा तो एका गावात राहिला आणि ते दिसणं थांबलं. आपलंही असंच होतं; महाराजांचं अस्तित्व जाणवू लागतं पण आपण परत व्यवहारात, दृश्यात येतो, गावात राहू लागतो.

श्रीमहाराजांचं सांगतो; मी म्हटलं, गुरूशिवाय ज्ञान नाही. हो म्हणाले. मग म्हणालो, उद्धवाला कोठे गुरु होता? असं कसं, म्हणाले त्याचा गुरु होता. तुम्ही पुस्तकं पहा, तो सापडेल. तर तो सापडला! मग म्हणालो, ख्राइस्टला गुरु नव्हता. तर एकदम म्हणाले, पांढरं कबूतर उतरलं तो त्याचा गुरु! आणि मग म्हणाले, मनुष्यदेहातच का गुरु पाहिजे? मला अचंबा वाटला. मी म्हणालो, महाराज, हे आपल्याला कसं कळतं? ते म्हणाले, जगात आत्तापर्यंत जे घडलेलं

आहे ते सबंध जगाच्या इतिहासात आहे. पाहण्याची दृष्टी आली तर तुम्हाला काय पाहिजे ते दिसेल. म्हणून मी म्हणतो की श्रीमहाराजांचं चरित्र जे घडलेलं आहे ते आहेच. It is there in the world. तुमची कल्पना जर तेवढी तीव्र झाली किंवा प्रेमाने भरली तर ते सगळं तुम्हाला दिसेल. एकदा का त्यात तुम्ही रंगलात की नामापासून वेगळे कसे राहाल? हा एक अभ्यास आहे. याला एक नियम असा सांगता येणार नाही. पण हा एक मार्ग आहे. बाकीचे फालतू विचार मनात येण्यापेक्षा महाराजांचे विचार मनात येऊ देत ना!

श्रीमहाराजांची पॉलिसी अशी आहे : हा जीव काही आपण होऊन माझ्या नादी लागणार नाही. म्हणून याला उपकारांनी इतका भारून टाकायचा की आता काय करतोस लेका, बोल; आणि तेही प्रेमानी. इतक्या लोकांवर प्रेम करायचं आणि इतक्या लोकांनी केलेलं प्रेम सहन करायचं हे फार कठीण आहे. पू. तात्यासाहेब म्हणायचे की जो भेटला त्याचं महाराजांनी कल्याणच केलं.

आपल्याला थोडं आलं पाहिजे हो! बोलणं पुष्कळ झालं. आता महाराजांची आठवण झाल्यावर वाणी बंद झाली पाहिजे, आणि इतर वेळी नाम घ्यायला पाहिजे. तुकाराम महाराजांनी म्हटल्याप्रमाणे 'जिव्हे झाला चळ। नेघे अवसान ते पळ॥' अशी अवस्था झाली पाहिजे. त्यांना ते आवडतं. रिकामा वेळ असेल तेव्हां नाम घ्या. ते कुठं आपण घेतो? त्याचं महत्त्व वाटत नाही आपल्याला! त्याला काय करावं?

**डॉ. आठवले** : वर माडीवर बसून चार-पाच तास जप केला की खाली येऊन कोणाला तरी भेटावेसे वाटते.

**पू. बाबा** : मन दृश्याला चिकटले आहे ना!

**डॉ. आठवले** : ते आवडतं. ती आवड टाळावीशी वाटत नाही.

**पू. बाबा** : इतर वेळेला सुद्धा नाम टिकलं पाहिजे. उदाहरणार्थ, स्नान करतांना. समर्थांनी म्हटलं आहे 'नाम विसरो नये' याला फार अर्थ आहे. मनाची अवस्था कायम राहिली पाहिजे. एक आठ-पंधरा दिवस, देहाची काहीही अवस्था असली, सुख दु:ख असलं तरी जास्तीत जास्त वेळ काढून नाम घ्यावं. किंवा असं केलं तर? खायची प्यायची सोय आहे पण माणसांचा संपर्क नाही अशा एकांतात जायचं. पहिल्यांदा तोंडानी नाम घ्यावं. मग मनात नाम घ्यावं, पण नामच घ्यावं, किती झेपतं आपल्याला ते पहा तरी. शक्य तितकं कमी बोलावं, कमी मिसळावं. 'एकांत मानला ज्याला। समजे त्याला हळू हळू॥'

एक दिवस रात्रीचे दहा वाजले होते आणि पू. तात्यासाहेब 'आतां पुरें' असं एकाएकी म्हणाले; नाहीतर बोलत बसायचे. पुढं म्हणाले, 'आता जवळ येत चालली आहे घडी, तेव्हां बाकीचं शक्य तो टाळून नामच घेतलं पाहिजे.' तेव्हां हा एक उपाय आहे. आता थोडे दिवस राहिलेत, शक्य तितकं नामस्मरण भराभर करायला पाहिजे. अशी जर आठवण ठेवली तर का नाही जमणार?

आणखी एक सांगतो. ह्या सगळ्या अडचणी आहेत ना, त्यांचा विचार सोडायचा आणि नामाचा धोशा लावायचा. सारखं नामच घ्यायचं. त्याचा खात्रीनं परिणाम होईल. आपल्या मनाची आज दृश्याकडं ओढ आहे ती जर नामाने भरली तर साधेल.

**डॉ. आठवले :** आम्ही सुखामधे रमतो आणि दु:खामधे महाराजांची आठवण होते. म्हणून मला वाटते की सुखापासून withdraw झाले पाहिजे.

**पू. बाबा :** होय, सावधानता म्हणतात ती हीच. श्रीमहाराजांचं वाक्य ध्यानात ठेवा. प्रापंचिक मनुष्य ज्वालामुखीच्या तोंडावर बसलेला आहे; ही जाणीव सारखी ठेवावी.

**साधक प :** खरं आहे. रूटीन काम चालू असतं तेव्हां काम करतानाही काही प्रमाणात नाम टिकतं पण आवडीचा विषय आला की बाकीचं सगळं सुटतं - त्यात नामही आलंच. अखंड नाम घेता आले पाहिजे पण त्याला बाकीची आवड आड येते.

**डॉ. आठवले :** माझ्या बाबतीत तरी रोजच्या कामात नावडीचा भाग थोडा असतो.

**साधक प :** असे असेल तर, मला वाटते की मुद्दाम लक्ष ठेवून आवडीच्या गोष्टीतून मन काढले पाहिजे. कदाचित त्यासाठी इतरांची आणि घरातल्या लोकांची नाराजी पत्करावी लागेल. तसेच इकडचे सुटले आहे आणि तिकडचे मिळाले नाही अशा नीरस कालखंडातूनही जावे लागेल. पण ते सहन करून नाम घेत राहिलो तर सगळी जबाबदारी त्यांच्यावर राहील. आपण वरच्यावर विषयाला बळी पडतो हे लक्षात येऊनही शरणागती येत नाही. तुम्ही सांगता ते ऐकून थोडं पेटल्यासारखं होतं पण आवडीचा विषय आला की ते विझून जातं.

**पू. बाबा :** होय; म्हणून थोडी जबरदस्ती लागेलच. नामाला शक्य तितकं चिकटून राहायचं हे ठरवावं लागेल. त्याला सावधानता लागेल. मुद्दाम आवडीच्या गोष्टी करू नयेत. उदाहरणार्थ मुद्दाम उठून मित्राला भेटायला जाऊ नये आणि तो भेटायला आला तर विशेष आनंद दाखवू नये. कारण दृश्याचा

स्वभाव तात्पुरता आहे. त्यामधून मिळणारे सुखही तात्पुरतेच असते. आज आपल्याला महाराजांचं थोडंसं प्रेम आहे, त्याचं चिंतन ठेवावं. त्यांचं चरित्र वाचून म्हणा, व्यक्तिमत्त्वाचं म्हणा, नामाचं म्हणा, चिंतन करावं. आणि इकडं दृश्याकडं जे मन जातंय ना, त्याच्याकडं थोडं वेगळेपणानं पहायला शिकावं. ते अडवू नये, कारण अडवून साधत नाहीच आहे; म्हणून श्रीमहाराजांची प्रार्थना करावी की बघा बुवा, मी तर असा अडकलोय, पण थोडासा आपल्यालाही चिकटलोय तेव्हां आता तुम्हीच मला खेचून घ्या. प्रार्थनेमुळे आपल्यातलीच आत्मशक्ती मदत करील.

**साधक प** : मला वाटते की अरे मना, नामातच गोडी आहे अशी स्वत:ला सूचना द्यावी. नामाचीच प्रार्थना करावी की तुझे स्वरूपच गोड आहे, मला तुझ्यामधे गोडी हवी आहे.

**पू. बाबा** : स्वत:ला अशी सूचना द्यावी. नामालाच म्हणावं की बाबा, आता बघ तूच. हा तसा सोपा उपाय आहे पण अवघडही आहे कारण त्याला जबर निष्ठा पाहिजे. जेवढा वेळ मिळेल तेवढा वेळ देहाची कोणतीही अवस्था असली तरी नाम घेतले पाहिजे. तुम्ही नुसतं नाम घ्या, बाकीचं सगळं मी करतो असं त्यांनी सांगितले आहे. मग आत्ता साधेल, मग साधेल ही चौकशी कशाला? ते पहातील.

### **।४१९.३।** (१९ मे १९९५) गोंदवले.

**पू. बाबा** : महाराजांचा संबंध centralise (केन्द्रीभूत) कसा होईल? आपण नामसुद्धा घेऊ नये; पण श्रीमहाराजांना आत घेतलं तर नाम आपोआपच येईल कारण नामाशिवाय ते राहाणंच शक्य नाही. आज आपल्याला नामापेक्षा त्यांचं प्रेम आहे. मला वाटतं की आज आपली जी प्रापंचिक परिस्थिती आहे ती त्यांच्या कृपेमुळं आहे. ही कृतज्ञता जर राहिली तर त्यांचं अस्तित्व विसरणार नाही. पू. तात्यासाहेब एकदा घरातल्या हॉलमधे उभे होते. हॉलमधे सगळीकडं पाहून म्हणाले, या ज्या सगळ्या गोष्टी आहेत त्या महाराजांच्यामुळं आहेत. क्षुद्र न होणं हा परमार्थ आहे. ते आज आपल्याजवळ नाही. आपला क्षुद्रपणादेखील आपल्याला त्यांना देता येत नाही! त्यासाठी मन उदार झालं पाहिजे. दुसऱ्याला द्यावं असं वाटलं पाहिजे. त्यांना आवडते म्हणून मरेपर्यंत नाम घ्यायचा निश्चय केला पाहिजे. काय हरकत आहे.

डॉ. गोपाळराव जोशांना श्रीमहाराजांनी अयोध्येहून एक पत्र धाडलं. पंचवीस-तीस ओव्यांचं पत्र. रोज स्नान झालं की ते त्या ओव्या म्हणायचे.

त्यांना भगवद्गीतेची खूप आवड होती. रोज वाचत असत. पण श्रीमहाराजांचं पत्र आल्यावर ते वाचन त्यांनी बंद केलं. ते म्हणायचे माझी गीता हीच. रोज त्या ओव्या म्हणायचे. आणि चमत्कार असा की अहमदाबादला ते त्यांच्या मुलाकडं (श्री. कान्हा जोशी) वारले त्यानंतर तो सांगत होता की शेवटी म्हणाले, माझं काम झालं आहे, मी आता शेवटचं श्रीमहाराजांचं पत्र म्हणतो आणि ते म्हणून नंतर गेले. म्हणून म्हणतो की आपला आणि श्रीमहाराजांचा आतला संबंध स्थिरावला पाहिजे. आज आपले बाकीच्या गोष्टींचे जे संबंध आहेत तितकेही महाराजांचे नाहीत. तो संबंध जोडण्यासाठी असं केलं तर? श्रीमहाराज मला एकसारखं पहाताहेत असं मनाला सारखं शिकवायचं. ही शिकवण मनात रुजली की त्यांना जे आवडत नाही ते हातून होणारच नाही. हे साधलं पाहिजे; नाहीतर शिबिराला येऊन काय उपयोग? त्यांचं सान्निध्य मला कसं लाभेल याचा जास्तीतजास्त विचार आणि अभ्यास करावा.

मी आतां पन्नास वर्षं तरी येथे येतो आहे. पण वस्तुस्थिती सांगतो. तीच ती माणसं तशीच म्हणजे पहिल्यासारखी दिसतात. त्यांचा स्वभाव, वागणं, मनोरचना यात काही बदल झालेला दिसत नाही. अजूनही प्रतिक्रिया नको तशा आणि तीव्र होतात.

**डॉ. आठवले :** श्रीमहाराजांना हाच प्रश्न विचारला असतांना म्हणाले, घड्याळाला काटे असतात. आत चक्रं असतात. घड्याळाला किल्ली दिली आणि आंतली चक्रं एकमेकांना नीट जोडलेली नसली तर किल्ली देऊनही घड्याळ चालत नाही. तशी आपली वृत्ती जर नामाला चिकटलेली नसली तर कितीही नाम घेतलं तरी उपयोग नाही. वृत्ती नामाला चिकटणं म्हणजे काय?

**पू. बाबा :** ध्येयाकडे लक्ष ठेवून नाम घेतलं पाहिजे. आपण जे नाम घेतो त्याला काहीतरी ध्येय आहे ना; त्या ध्येयाची जाणीव ठेवून नाम घेतल्याशिवाय कसं होईल? घड्याळाच्या किल्लीचा दृष्टान्त मलाही एकदा सांगितला. किल्ली फिरते आहे पण आत कनेक्शनच नाही, त्यामुळं म्हणाले, घड्याळ चालत नाही. मी नाम घेतो आहे ते कशासाठी, माझं ideal काय आहे?

दुसरं काय होतं, पुष्कळ माणसं मनापासून नाम घेतात पण नामामुळं वाढलेली त्यांची शक्ती प्रपंचाकडे जाते. मुलीचं लग्न व्हायचंय, नको त्या ठिकाणी बदली झाली आहे अशा गोष्टींकडे शक्ती खर्च होते. आठ दिवस नाम चांगलं होतं; नंतर आठ दिवस चांगलं होत नाही. म्हणजे ती साठलेली शक्ती

प्रपंचाकडे जाते. एकदा श्रीमहाराजांना मी माझा अनुभव सांगितला. राग आला आणि तो शांत झाल्यावर नामाला बसलो तरी नामाची तंद्री लागत नाही. ते म्हणाले, 'शक्ती कुठं उरते तंद्री लागायला?' रागामुळे मानसिक शक्ती झपाट्याने घटते. श्रीमहाराजांनी शेतकऱ्याचा दृष्टान्त दिला. एक शेतकरी होता. तो मोटेने शेताला पाणी द्यायचा. पाटातून पाणी जायचं. पण पाटामधे उंदरांनी खूप बिळं केलेली होती त्यामुळे खूपसं पाणी बिळातच जायचं. मी तर म्हणतो की त्याशिवाय शेतात नको असलेलं गवत वाढतं. त्यामुळे कष्टाच्या मानानं पीक पदरात पडत नाही. नाम घेतांनाही अमुक नाही, तमुक नाही या विचारांचं गवत मनात वाढतच असतं आणि त्यामुळे नामाचं पीक वाढत नाही. किंवा 'मी' इतकं नाम घेतो हा अहंकार वाढतो. नाम मोठं नाजूक आहे. नाम घेतांना मनात पैशाच्या विचाराची नुसती लहर येऊन गेली तरी नामामधे बिघाड येतो.

श्रीमहाराजांचं सान्निध्य जर मी सांभाळलं तर साधनाचे कष्ट होणार नाहीत. ते सान्निध्य कसंही सांभाळावं. नाम आहे तिथं मी आहे असं त्यांनी सांगितलं आहे. म्हणजे मी नाम घेतांना ते आहेत. कसे आहेत मला माहीत नाही, पण ते आहेत. नाहीतर माझ्या घराच्या संबंधामधे ते आहेत. त्यांच्या अस्तित्वाची जाणीव ठेवावी. ही जाणीव फार महत्त्वाची आहे. अगदी कोरी जाणीव बरं का! ते पाहातात वगैरे सगळं secondary (दुय्यम) आहे. महाराज आहेत, महाराज आहेत. किती आहेत? मी जितका जिवंत आहे ना, त्या मानाने त्यांच्या असण्याची डिग्री पाहिजे. घरामधे उंदीर असतात, त्याचीसुद्धा जेवढी जाणीव असते म्हणजे ही गोष्ट जेवढी माझ्या जीवनात शिरते, तेवढेसुद्धा महाराज शिरत नाहीत. माझ्या प्रपंचातल्या पुष्कळ गोष्टी श्रीमहाराज करतात असे वाटतसुद्धा नाही. म्हणजे माझ्या जीवनातलं त्यांचं अस्तित्व किती क्षीण आहे बघा! म्हणून म्हणतो की त्यांच्या अस्तित्वाची खरी खरी जाणीव निर्माण झाली पाहिजे. आपण (म्हणजे उपस्थित साधकांनी) याचा विचारच केला नाही आजपर्यंत. त्यामुळं आपलं खरं नाम होत नाही. खरा विचार ते सांगतात. त्याला महत्त्व दिलं नाही आपण. आजपर्यंत त्यांचं म्हणणं ऐकलं नाही. श्रीमहाराज इतकं सांगून गेले; वरवर पाहता ते पटलेलंही आहे. तरी त्याला ज्या अर्थांनी आणि जितकं महत्त्व द्यायला पाहिजे तितकं ते आपण दिलं नाही. प्रवचनं तोंडपाठ केली पण त्यांचं काय म्हणणं आहे याचा विचारच केला नाही. श्रीमहाराजांची पूजा आरती करतांना, नाम घेतांना आपलं मन, माझ्या मनाप्रमाणे गोष्टी घडाव्यात इकडं असतं. ते नाहीसं होऊन तुम्हाला काय

करायचं ते करा अशी प्रार्थना केला पाहिजे. माझ्या जीवनात श्रीमहाराजांना जे सर्वोच्च स्थान द्यायला पाहिजे त्याची आज मला कल्पनाच नाही. आधी तुम्ही, मग बाकीचं सगळं, त्यात मीही आलो अशी वृत्ती झाली पाहिजे. हे कसं करायचं? त्यासाठी पहिली गोष्ट म्हणजे माझा अहंकार कमी झाला पाहिजे. माझं कर्तेपण कमी झाल्याशिवाय ते येणार नाहीत. आत्तापर्यंत माझ्या जीवनात जे झालं ते त्यांच्यामुळं, त्यांच्या इच्छेनं झालं. आत्तासुद्धा मी नामधारी आहे अशी मनाला शिकवण द्यावी.

मी जेव्हां काही कर्म करतो तेव्हां त्यापासून अमुक घडावे असे कर्माचे फळ निश्चित ठरवतो. पण ते फळ मिळेलच अशी खात्री नसते. म्हणजे करणारा मी अपूर्ण आहे याची सूक्ष्म जाणीव असते. श्रीमहाराजांचं अस्तित्व मानायचं म्हणजे मला पाहिजे ते फळ तुम्ही द्या असे न म्हणता माझ्यायोग्य जे असेल ते तुम्ही करा असं म्हटलं पाहिजे. मग कर्तेपण आपोआप त्यांच्याकडे जाते. आत्तापर्यंत जे घडलं ते तुमच्या इच्छेनं घडलं, आत्ता जे घडतंय ते तुम्ही माझ्याजवळ राहा आणि करा आणि पुढचं देखील तुम्ही ठरवा असं तीन्ही काळ त्यांच्यावर सोपवलं की ते सबंध जीवनात शिरले असं होईल. काळाच्या तीन्ही अवस्थांमधे त्यांना अंतर्भूत करावं. हे सांभाळतांना त्यांच्याशी संबंध कसा ठेवायचा - शिष्य म्हणून, दास म्हणून, मूल म्हणून - हे ज्याच्या त्याच्या मनोरचनेवर राहील.

**साधक प** : 'मी' बद्दल आपण काहीच कल्पना करू शकत नाही. ज्याला 'मी पणा' कळला तो बराच पुढे गेला म्हणावे लागेल. तथापि 'मी' न कळतासुद्धा माझी माझ्याबद्दलची काही कल्पना असू शकते. तशी श्रीमहाराजांची कल्पना केली पाहिजे. म्हणजे मग ते सतत आपल्याबरोबर असतील.

**पू. बाबा** : म्हणजे श्रीमहाराज internalize झाले पाहित. नुसते घरात, पूजेत असून उपयोगी नाही; आत्मसात झाले पाहिजेत. presence within जाणवले पाहिजे. त्यासाठी 'मी त्यांचा आहे' हे सोपे जाईल. 'ते माझे आहेत' केव्हां होईल? त्यासाठी त्यांच्याखेरीज बाकीचं सारं कमी होऊन मी फक्त त्यांना चिकटेन तेव्हां. तीन्ही काळात त्यांना जोडणारा तंतू पाहिजे. असा तंतू म्हणजे नाम.

श्री. वेर्लेकर एकदा म्हणाले, श्रीमहाराज माझ्या आतमध्ये भरून आहेत. म्हणून मी त्यांना विचारलं की आता तुम्हाला राग येतो का? ते म्हणाले,

क्वचित येतो आणि जेव्हां राग येतो तेव्हां ते आत नसतात. राग ओसरून मन शांत झालं की पुन्हा येतात. त्यांचं अस्तित्व जाणवणं महत्त्वाचं आहे.

### |४१९.४| (२० मे १९९५) गोंदवले.

**पू. बाबा :** संकुचितपणा सोडला पाहिजे. त्यासाठी आहे ते सगळं त्यांचं - श्रीमहाराजांचं आहे म्हणावं आणि ते प्रत्यक्ष कृतीत आणावयाचा प्रयत्न करावा. आपला आतमधे जो संघर्ष चालतो तो आपण seriously घेत नाही. विकारांनी आपल्याला पछाडलं आहे आणि त्यामुळे आपण अपवित्र झालो आहोत असं वाटत नाही. ''जो मनुष्य काळजी करतो त्याच्याजवळ राहायला मला कष्ट होतात'' असं श्रीमहाराजांनी म्हटलं आहे. म्हणून त्यांना आपल्याजवळ राहायला कष्ट होऊ नयेत म्हणून तरी काळजी करणं सोडलं पाहिजे.

**साधक प :** काळजी लागली की जीवालासुद्धा कष्ट होतातच.

**पू. बाबा :** काळजीच करायची तर साधनाची काळजी करावी म्हणजे काळजीचं उदात्तीकरण - sublimation होतं. तुकाराम महाराजांनी ते केलं. ''संतांचा पढियावो कैशापरि लाहो। नामाचा आठवो कैसा राहे॥ १॥ हेचि थोर चिंता लागली मानसीं। निजतां निद्रेसी नलगे डोळा॥ २॥'' असं ठरवावं सुरुवातीला की आता आठ दिवस तरी विकारांच्या आधीन होणार नाही.

**साधक ग :** पहिले दोन दिवस उत्साह असतो. पुढं तो मंदावतो.

**पू. बाबा :** यासाठीच 'चांगला मी' सशक्त केला पाहिजे. त्यासाठी ''मन गुरु आणि शिष्य'' हे आपल्याला सोपं आहे कारण आपल्याला सद्गुरु मिळालेले आहेत. त्यांना आवडतं ते केलं की मनच गुरु होईल. नाम हा त्यांचा प्राण आहे. तो जपण्यासाठी नाम घेतांना सावधानता ठेवली पाहिजे. पुन्हा विकारांच्या आधीन होऊ नये. त्यासाठी थोडी पश्चात्तापाची पार्श्वभूमी पाहिजे. असं वाटलं पाहिजे की त्यांनी माझं इतकं केलं, मग मी थोडं तरी त्यांचं ऋण फेडायला नको का? तसंच साधनात विरोध येईल अशा विचारांच्या लोकात शक्यतो मिसळू नये.

### |४२०| (२६ मे १९९५) मालाड.

**पू. बाबा :** गोंदवल्याला एक गृहस्थ भेटले. तत्त्वज्ञान घेऊन एम. ए. झालेले आहेत. त्यांनी आपण पूर्वी पाहिलेल्या ज्ञानेश्वर महाराजांच्या एका अभंगाचा थोडा वेगळा आणि चांगला अर्थ सांगितला. अभंग असा आहे :

सगुणाची सेज निर्गुणाची बाज। सांवळी विराजे कृष्णमूर्ति॥ १॥
मन गेलें ध्यानीं कृष्णचि नयनीं। नित्यता पर्वणी कृष्णसुखें॥ २॥
हृदय-परिवरीं कृष्ण मनो-मंदिरीं। आमुचां माज-घरीं कृष्ण बिंबे॥ ३॥
निवृत्ति निघोट ज्ञानदेवा वाट। नित्यता वैकुंठ कृष्ण-सुखें॥ ४॥

निघोट शब्दाचे शुद्ध आणि परिपूर्ण असे दोन अर्थ आहेत. ते गृहस्थ म्हणाले की हे दोन्ही अर्थ येथे घेता येतील. शुद्ध, परिपूर्ण निवृत्ती हीच नित्यसुख कृष्ण मिळण्याची वाट ज्ञानदेवांना मिळाली. निर्गुणाच्या पार्श्वभूमीवर सगुण आले. ते सगुण म्हणजेच सावळी कृष्णमूर्ती आहे. दृश्य जग आत्मज्ञानाच्या आड न येता ज्ञानदेवांना सर्व दृश्यात कृष्णमूर्तीच दिसू लागली. ध्यानावस्थेत गेल्यामुळे मनाचे मनपण गेले आणि जग भेदभावाने न दिसता डोळ्यांमधे कृष्णच भरला. 'बसो मोरे नैननमें नंदलाल' ही स्थितीच त्यांच्या अनुभवाला आली. कृष्णाच्या सान्निध्यासारखी दुसरी पर्वणी म्हणजे शुभकाळ कोणता असणार? हृदयाच्या आवारात मन हे मंदिर बनले. मंदिराचे पावित्र्य मनाला आले आणि त्या मंदिराच्या गाभाऱ्यात कृष्णमूर्ती शोभून राहिली. निवृत्तीची ही शुद्ध आणि परिपूर्ण वाट सापडल्याने ज्ञानदेव सर्वकाळ वैकुंठसुखात भगवंताच्या जवळ राहिलेले आहेत. (पहा : अध्यात्म संवाद भाग १ - ४८ व भाग २ - १७९)

**साधक ग :** अभंगाच्या शेवटच्या दोन चरणांचा विनोबांनी थोडा वेगळा अर्थ दिला आहे. ते म्हणतात, "अंत:करणाच्या आवारात चिंतनाचें मंदिर, त्याच्या आंत जीवनाचें गर्भागार, आणि त्याच्याही आंत ती मूर्ती - असा हा नित्यानंद आहे! निखळ वृत्ति-शून्यता ही त्या वैकुंठाकडे जाण्याची वाट ज्ञानदेव सतत चोखाळीत असल्यामुळे तो नेहमी वैकुंठातच असतो."

नंतर आपले साधन मनासारखे होत नाही या नेहमीच्या मुद्यावर चर्चा झाली.

**साधक ब :** माझे जे किरकिर करणारे मन आहे त्याच्याकडे दुर्लक्ष करून, त्याचा समाचार तुम्ही घ्या अशी श्रीमहाराजांची प्रार्थना केली पाहिजे. दृश्य जेवढे खरे वाटते तेवढे श्रीमहाराजांचे अस्तित्व खरे वाटत नसले तरी ते काळामध्ये आहेतच.

**साधक प :** मी आणि माझे या गोष्टी साधनाच्या आड येतात. व्यवहारात आपले कर्तेपण लटके आहे असा अनुभव येतो. श्रीमहाराजांनी केले म्हणून झाले असेही वाटते. पण ते तात्पुरते होते. हा अनुभव स्थिर झाला पाहिजे. म्हणजे मगच कर्तेपण कमी होऊन त्याचबरोबर चिंता, काळजी कमी होतील. एकवेळ 'माझे' जाईल पण 'मी' जाणे कठीण आहे. ज्याचे हे दोन्ही गेले त्याला

ज्ञानेश्वर महाराजांनी निरंतर संन्यासी म्हटले आहे. ''आणि मी माझें ऐसी आठवण। विसरलें जयाचें अंत:करण। पार्था तो संन्यासी जाण। निरंतर॥' ज्ञानेश्वरी ५.२०॥

**पू. बाबा** : हा अभ्यास आहे. प्रत्येक गोष्ट - अगदी लहान सहान देखील - त्यांना सांगून करावी.

**साधक ब** : 'मी तुझा आहे' हा भाव फार चांगला आहे.

**पूज्य बाबा** : परवा गोंदवल्याला पंचमंडळी भेटली तेव्हां ते म्हणाले की येथे गोंदवल्याला श्रीमहाराजांच्या सत्तेचा पदोपदी अनुभव येतो, त्यामुळे कधी काळजी वाटत नाही. श्री. बाळासाहेब पाठक म्हणाले की त्यांनी तेथे एक मेडिकल कॅम्प घेतला होता. आधी ठरवूनही आयत्या वेळी आयस्पेशालिस्ट डॉक्टर येऊ शकले नाहीत. डोळ्यांचे आजार असणाऱ्या पेशंटस्ना तर यावयाला सांगितलेले होते. तेथे आलेल्या मंडळीत एक आयस्पेशालिस्ट आहेत असे समजले पण ते त्या दिवशीच परत जाणार होते. त्यांच्या गुरूंनी त्यांना कॅम्पसाठी थांबायला सांगितले आणि अशा प्रकारे अडचण दूर झाली. ते पुढे म्हणाले की असे कितीतरी अनुभव येतात. पण तरीही आपल्या घरी देखील श्रीमहाराजच सर्व काही करतात असे वाटत नाही. उदाहरणादाखल ते म्हणाले, पुण्यात त्यांच्या पत्नीची प्रकृती ठीक नव्हती, नाकातून रक्त जात होते तेव्हां काळजी वाटू लागली. महाराज पाहातील असे वाटले नाही. पूज्य बाबा म्हणाले, श्रीमहाराजांची सत्ता सर्वकाळ सर्वत्र जाणवली पाहिजे. असे झाले तरच साधन मुरले असे म्हणता येईल.

## ।४२१। (२ जून १९९५)

**पूज्य बाबा** : श्रीमहाराजांना मी एकदा विचारले होते की आपण जे साधन करतो त्याचे पर्यवसान काय होते? तेव्हां ते म्हणाले, साधन करतांना असा एक टप्पा येतो की त्यावेळी साधकाला आत्मज्ञान होते आणि त्यावेळी तो व्यवहाराला नालायक होतो. त्याची दृष्टीच वेगळी दिसते. नंतर ते ज्ञान पचनी पडल्यावर तो सामान्य व्यवहारी माणसांसारखाच वाटतो; पण तरीही तो व्यवहारात नसतो.

गुरुदेव रानड्यांच्या मुलीनेही त्यांच्याबद्दल लिहिले आहे की प्रकृती चांगली नसतानाही जप करून गुरुदेव त्यांच्या खोलीतून बाहेर आले की त्यांच्या दृष्टीत इतके तेज असे की त्यांच्या डोळ्यांकडे पहावत नसे. हे वाचल्यानंतर माझ्या

मनात आले की साधनात प्रगती कशी होते ते ज्ञानेश्वर महाराजांनी सांगितलेले असणार; आणि म्हणून त्यांचे अभंग पाहिले. त्यात मला पाहिजे होता तसा अभंग मिळाला. तो अभंग सांगतो. एक विरहिणी गौळण म्हणते आहे :

मन मुरडुनी घातलें मनातें। थोरु मारु तेथें होत असे॥ १॥
पुरे पुरे वो आतां जिणें तें केउतें। येणें वो पंढरीनाथें वेधियेलें॥ २॥
नचले नचले कांहीं करणें कामान। याचें पहाणेंची विंदान कामानिया॥ ३॥
बाप रखुमादेविवरा विठ्ठलासी भेटी। संसारासी तुटी जाली गे माये॥ ४॥

गोपी सांगते आहे की मी निश्चयपूर्वक माझे मन मुरडून म्हणजे मागे वळवून आत नेले. म्हणजेच मी अंतर्मुख झाले. त्यामुळे मनाला खूप मार बसला म्हणजे खूप कष्ट झाले किंवा मनाचा कोंडमारा झाला. सांसारिक जीवन व्यर्थ वाटू लागले; कारण माझ्या मनाला त्या पंढरीनाथाचा वेध लागला. त्याच्याखेरीज दुसरे काहीही काम मला सुचेना. त्याला आत पाहण्यातच मी रमून गेले. त्याची भेट झाल्यावर मी संसारापासून वेगळी झाले.

कठोपनिषदात म्हटले आहे "पराञ्चि खानि व्यतृणत्स्वयंभू: तस्मात् पराङ्‌ पश्यति नान्तरात्मन्। कश्चिद्धीर: प्रत्यगात्मानम् ऐक्षदावृत्तचक्षु: अमृतत्वमिच्छन्॥" परमात्म्याने आपली इंद्रिये बहिर्मुख केली आहेत. ती अंतरात्म्याला पहात नाहीत. कोणी विरळा धैर्यवानच त्यांना आत वळवून प्रत्यगात्मा पहातो. म्हणजे अंतर्मुख होण्यात मनाला मार आहे, कष्ट आहेत. (पहा : अध्यात्म संवाद भाग २ संवाद क्रमांक १९९). आपण साधन करतो पण ते वरवर, लहान मुलांच्या अभ्यासासारखे होते. बुडी मारून आत गेले पाहिजे.

**साधक ज** : ही अंतर्यात्रा आहे आणि त्यासाठी वैराग्याची आवश्यकता आहे.

**साधक ग** : वाल्मीकि ऋषीनी 'उलटा जापु' केला असे तुलसीदासांनी म्हटले आहे. पुष्कळांनी त्याचा अर्थ 'मरा मरा' असा जप केला असे लिहिले आहे पण एका पुस्तकात (लेखक काशीनाथ व पंचानन उपाध्याय) 'उलटा जापु' म्हणजे मन आत वळवून केलेला जप असा अर्थ दिला आहे.

**साधक प** : जीव मूलत: आनंदमय आहे पण मनाने जीवाचे देहतादात्म्य झाले आणि त्यामुळे मी सुखदु:ख भोगतो. मी देह नाही हा निश्चय झाला की जीवाचे केवळ असणे आहे आणि ते आनंदमय आहे.

चर्चा चालू असतांना एक गृहस्थ पू. बाबांना भेटायला आले. बँक ऑफ बडोदामध्ये ते अधिकारी आहेत. श्री. अशोक खेर त्यांना पूर्वी पू. बाबांकडे घेऊन

आले होते. पू. बाबांनी त्यांची चौकशी केली आणि नामस्मरणाबद्दल त्यांना काही विचारा असे आम्हाला सांगितले. ते गृहस्थ म्हणाले की आता त्यांचे मन शांत आहे. काळजी, चिंता काही वाटत नाही, आणि हे केवळ नामस्मरणामुळे झाले आहे. आता रोज दहा हजार जप करतात. जप सुरू करून दहा वर्षे झाली. सुरुवातीला पू. बाबांनी सांगितले होते त्याप्रमाणे रोज पाच हजार जप करत असत. आता रोज काही थोडा जप वैखरीने करतात पण मुख्यत: आता तो हृदयात चालतो. मन एकाग्र करायला कष्ट होत नाहीत. जप चालू झाला की ते आपोआपच एकाग्र होते. जपामुळे काही वेळा मन इतके शांत व प्रसन्न होते की त्याचा परिणाम एक-दोन दिवस राहातो. काम करतांना मनात स्वत:पेक्षा दुसऱ्याचा विचार जास्त असतो. त्यांची आईही अतिशय परोपकारी आहे. ते पाच वर्षांचे असतांना त्यांचे वडील वारले पण मोठ्या धीराने आईने त्यांना वाढवले. ते म्हणाले की आता मी भगवंताला पूर्णपणे शरण गेलो आहे.

आम्ही विचारल्यावर ते म्हणाले की त्यांनी श्वासावर जप करण्याचा अभ्यास केलेला नाही. त्यामुळे श्वासाबरोबर जप चालतो असे त्यांना वाटत नाही.

पू. बाबा म्हणाले की गुरुदेव रानडे काही वेळा नामात अगदी रंगून जात आणि 'नारायण नारायण' म्हणत नाचू लागत. आलेले गृहस्थ म्हणाले की त्यांच्या घरी चैतन्य महाप्रभूंची एक तसबीर आहे. त्या तसबिराकडे पहातांना त्यांचे 'हरि बोल, हरि बोल' आठवून आपोआप नामस्मरण चालू होते. पू. बाबा त्यांना म्हणाले की एक दिवस चैतन्य महाप्रभूंसारखे तुम्हीही आनंदाने नाचू लागाल.

पू. बाबांनी नंतर डायोजीनसची गोष्ट सांगितली. अलेक्झांडर जग जिंकायला निघाला तेव्हां डायोजीनसने त्याला मरणानंतर तुझ्याबरोबर काय येणार आहे याचा विचार कर म्हणून सांगितले. तो म्हणाला की एका आत्म्याखेरीज तुझ्याबरोबर काहीही येणार नाही. पुढे मीसोपोटेमिआ अलेक्झांडर मृत्युशय्येवर होता तेव्हां त्याने सांगितले की मृत्यूनंतर माझे हात खाली मोकळे सोडून मला न्या. लोकांना कळू द्या की येथील सर्व मी येथेच सोडून जातो आहे.

**साधक ग** : महाभारतातील 'धनानि भूमौ' ह्या श्लोकातही केवळ धर्मच मृत्यूनंतर जीवाबरोबर जातो असे सांगितले आहे. (पहा : अध्यात्म संवाद भाग ३ संवाद क्रमांक २९६).

**साधक प** : श्रीमहाराजांचे अस्तित्व जीवाबरोबर जडले पाहिजे. माझी जाणीव शरीरभर पसरलेली आहे पण माझा जीव कोठे आहे ते मला माहीत नाही. अंतर्मुख होऊन नाम घेतल्याने ते माहीत होईल आणि मग श्रीमहाराज

तेथे आहेतच हे समजेल. ते आतच आहेत पण माझ्या वासना आड येत असल्यामुळे मला ते समजत नाही. ते मला पाहिजेत अशी अजून तळमळ लागलेली नाही हेच खरे!

## ।४२२। (९ जून १९९५)

पू. बाबांनी श्री. दामले यांची आठवण सांगितली. श्री. दामले यांच्या मुलाला नोकरी लागली तेव्हां त्यांनी श्रीमहाराजांना पेढे दिले. त्यांना श्रीमहाराजांनी विचारले की येथे किती वर्षे येत आहात? उत्तर दिल्यावर श्रीमहाराज म्हणाले, मुलाला नोकरी लागली चांगले झाले. पण त्याबद्दल आपल्याला बरे वाटते हे बरोबर नाही. वास्तविक हे रामाने केले असे आपल्याला वाटले पाहिजे. कोणतीही घटना घडली मग ती वाईट असो किंवा चांगली असो, की ती रामाने केली असे वाटले पाहिजे. त्याचे स्मरण झाले तर बरोबर, नाहीतर ममत्व आड येते. पू. बाबा म्हणाले की साधकाने हे शिकलेच पाहिजे. त्यांनी पूर्वी सांगितलेला नाथांचा 'पक्षी अंगणासी आले' हा अभंग पुन्हा सांगितला. (पहा : अध्यात्म संवाद भाग ३ संवाद क्र. ३१२) पू. बाबांनी पुष्कळ उदाहरणे देऊन व्यवहार न सोडता आपण आपल्या गुरूंना विसरू नये हा मुद्दा पुन:पुन्हा सांगितला. आपली दृष्टी बहिर्मुख आहे त्यामुळे आपण अध्यात्मही बाहेरचे पाहातो. आपली दृष्टी अंतर्मुख होणे जरूर आहे. यासाठी सद्गुरूंच्या सान्निध्याचा अभ्यास करावा. प्रत्येक गोष्ट त्यांना सांगून करावी.

नंतर ज्ञानेश्वर महाराजांच्या पुढील अभंगावर चर्चा झाली.

सोनयाचा दिवस आजि अमृतें पाहाला। नाम आठवीता रूपी प्रगट पैं झाला॥ १॥
गोपाळा रे तुझें ध्यान लागो मना। आनु न विसंबे हरि जगत्रजीवना॥ २॥
तनु मनु शरण विनटलो तुझ्या पायीं। बाप रखुमादेविवरावांचूनि अनु नेणें कांहीं॥ ३॥

राम कर्ता किंवा सद्गुरूंची इच्छा याचे उदाहरण देतांना पू. बाबा म्हणाले, मधे माझा गुडघा दुखत होता. डॉ. सोनार अचानक आले आणि त्यांनी तपासून गुडघ्यातील पाणी काढले. डॉ. सोनारांनी हे केले हे जसे मला शंभर टक्के वाटते तसे प्रत्येक गोष्ट श्रीमहाराजांच्या इच्छेने होते असे वाटले पाहिजे.

## ।४२३। (१६ जून १९९५)

**पू. बाबा :** प्रपंचात आपण बायको, मुले, घरदार, व्यवहार यांना जास्त महत्त्व देऊन नामाला सर्वात शेवटची बाब (Lowest priority) समजतो. खरे

म्हणजे नाम सगळ्याच्या वर पाहिजे. त्याला सर्वात जास्त महत्त्व (Highest किंवा Topmost priority) दिले पाहिजे. प्रपंच प्रारब्धावर सोडता आला पाहिजे. गुरूवरील पूर्ण श्रद्धा आणि प्रारब्धावरील विश्वास ह्या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. एक साधले की दुसरे आपोआप जमेल आणि बाकीचे उच्च अनुभव राहू देत पण मन शांत राहील. आपल्याला नामाच्या शक्तीची खरी कल्पनाच नाही. नाम हेच सर्व आहे, तेच विश्व चालवणारी शक्ती आहे हे मनोमन ठसले पाहिजे. नामच समग्र दृष्टी (holistic attitude) देऊ शकते. पॉंडीचरीच्या मदरदेखील श्रीमहाराजांसारखेच सांगतात.

आपल्याला सध्या शरीराचे बाबतीतच समग्रतेने पाहाण्याचा अनुभव आहे. तो संपूर्ण जीवनात येण्यासाठी नामस्मरण वाढले पाहिजे. नामच सर्वस्व वाटणे हा मोठा अनुभव आहे. तेथे मग शरीराची जाणीव राहात नाही. रमणमहर्षी तसे होते. त्यांना क्वचितच शरीराची जाणीव होत असे. भाऊसाहेबानी श्रीमहाराजांवरील नितांत श्रद्धेमुळे जीवन त्यांच्यावर सोपवले आणि ते शांत राहिले. श्रीमहाराजांशिवाय त्यांना जीवनात दुसरे काही राहिले नाही.

**साधक ज :** समग्र दृष्टिकोन साधला तर जीवन आपल्यापुढे उलगडत जाईल.

**साधक ब :** त्यासाठी पूर्ण शरणागती पाहिजे. आज हा दृष्टिकोन कल्पनेच्या किंवा बुद्धीच्या पातळीवर आहे.

**साधक प :** एकदम समग्र दृष्टी जरी आली नाही तरी जबाबदारी न घेण्याची सवय केली तर त्याची खूप मदत होते. हेच प्रारब्धावर सोडणे. नामाची खरी शक्ती कळेल तेव्हांच समग्र दृष्टी येईल. रमण महर्षींना त्यांचे भक्तगण तुम्ही तुमच्या आत्मिक शक्तीने आमच्यासाठी देह टिकवून ठेवा असे सांगत. शेवटी भगवान त्यांना म्हणाले, प्राण गेल्यावरही हा देह उचलून नेण्यासाठी चार माणसे लागतात. तो देह वापरण्यासाठी किती शक्ती फुकट जाते म्हणून तो आता सोडणेच श्रेयस्कर आहे.

**पू. बाबा :** दगडाच्या मूर्तीच्या बाबतीत आपणाला समग्रतेचा भाव आणता आला तर तेथे विश्वशक्ती प्रगट होऊन भगवंताचा अनुभव येईल. तुकाराम महाराजांनी पांडुरंगाच्या मूर्तीत सर्वस्व ओतले आणि त्यामुळे त्यांना त्या मूर्तीत भगवंताचा अनुभव आला असे श्रीमहाराज म्हणाले.

आम्ही बोलत असतांना एक गृहस्थ पू. बाबांना भेटायला आले. त्यांचा एक डोळा गेला आहे, एक पाय अधू झाला आहे, शरीर थकले आहे. आता मरण केव्हां येते याची वाट पहातो आहे असे ते पू. बाबांना म्हणाले. पू. बाबांनी

त्यांना धीर दिला. ते गेल्यानंतर पू. बाबा म्हणाले की हे असे पाहून तरी आता साधन तातडीने करा. शरीराचे केव्हांही काहीही होऊ शकते. शरीरदु:खातही नाम टिकेल अशी आपली अद्यापि तयारी झालेली नाही म्हणून शरीर ठीक आहे तोपर्यंतच लगबग करा.

## |४२४| (२३ जून १९९५)

**पू. बाबा** : गेल्या महिन्यात गोंदवल्याहून परत येताना पुण्यात एक गृहस्थ भेटले होते. त्यांनी गुरुदेव रानड्यांचे गुरु श्री. भाऊसाहेब उमदीकर महाराज यांच्यासंबंधी एक हकिगत सांगितली. श्री. भाऊसाहेब महाराज फार शिकलेले नव्हते. दासबोधाखेरीज इतर ग्रंथाचे वाचनही करीत नसत. पण त्यांची नामनिष्ठा जबर होती. त्यांचे अखंड नामस्मरण चालू असे. एकदा दोन-तीन तास नामस्मरण झाल्यावर ते खोलीतून बाहेर आले आणि तेथे बसलेल्या मंडळींना म्हणाले की आत्ता कोणाला काय पाहिजे असेल ते मागून घ्या. त्यांच्या ह्या अनपेक्षित व अचानक उद्गारांवर कोणी काहीच बोलले नाही. नंतर संध्याकाळी एक गृहस्थ त्यांना म्हणाले, तुम्ही सकाळी मागायला सांगितले होते तेव्हां काही बोललो नाही पण आत्ता मागू का? तेव्हां श्रीभाऊसाहेब महाराज म्हणाले, ती वेळ गेली. म्हणजे काय असे त्या गृहस्थांनी विचारल्यावर ते म्हणाले, सकाळी विचारले तेव्हां विचारणारा मी नव्हतो, 'तो'(भगवंत) होता.

एकदा त्यांना विचारले की आत्मज्ञान होते म्हणजे काय होते ते सांगा. तेव्हां ते म्हणाले की ते शब्दांनी सांगता येत नाही आणि तरीपण ते सांगायचा प्रयत्न करतात. तुम्हाला तुमच्या नांवाने हाक मारली की ती कशी आत जाणवते? त्याच नांवाच्या दुसऱ्या कोणाला तरी हाक मारली असेल असे वाटत नाही. तसा संशयही येत नाही. त्याप्रमाणे आत्मज्ञान झाले म्हणजे त्याची जाणीव आतमधे होते. तो आणि मी वेगळे नाही अशी ती जाणीव असते. पण ते राहू दे. आपली इच्छा असूनही मनासारखे साधन का होत नाही ते सांगा.

**साधक ब** : आज मला जी मन इत्यादी इक्विपमेंट (साहित्य) मिळालेली आहे ती साधनाला अनुकूल अशी नाही. त्यामुळे शिस्त लावून जेवढे साधन होते तेवढेच होते. त्याच्या पलीकडे ह्या मनाने जाता येत नाही. आजपर्यंत शरीराने भोग घेतले. आता ते साथ देत नाही आणि आतून खरी विरक्तीही आलेली नाही. देह अशाश्वत आहे, जग अशाश्वत आहे हे समजत असूनही शाश्वताची ओढ लागत नाही.

**पू. बाबा** : थोडक्यात, ध्येय निश्चित झालेले नाही.

**साधक ब** : तसे नाही. ध्येय साधण्यासाठी जी किंमत मोजायला पाहिजे ती मोजायचे धाडस होत नाही.

**साधक ग** : नामस्मरणासाठी जी धारणा लागते ती कमी पडते. व्यवहारातदेखील मी एकाच गोष्टीवर स्थिर नसतो. सारखे विषय बदलत असतो. मनाला ही सवय (**Shifting mind**) लागलेली असल्याने ते नामात स्थिर होत नाही.

**साधक प** : आपला सतत नाम घेण्याचा प्रयत्न असतो. पण संधिकालात आपण पुरेसे सावध राहात नाही, त्यामुळे नाम थांबते. आपले नव्वद टक्के जगणे रूटीन असते पण त्यातदेखील एका गोष्टीतून दुसरीकडे जाताना नाम सुटते. उदाहरणार्थ लोकलमधून घरी परत जाताना नामस्मरण चांगले होते पण घरी आल्यावर विश्रांती घ्यायच्या वेळी सावध राहिले नाही तर नाम सुटते. तथापि प्रत्येक बदलाच्या संधिकालात सावधानता दाखवली तर नाम चालू राहाते.

**साधक ग** : अजूनही नामस्मरण काम वाटते; ते करतांना आनंद वाटत नाही. त्यामुळे तासभर नामस्मरण झाले की काहीतरी करमणुकीकडे वळतो. म्हणजे नामात जी विश्रांती वाटायला पाहिजे ती वाटत नाही.

**साधक क** : तसेच अगदी नाही, पण नामाला लागणारी धारणा कमी पडते आणि ती नामानेच वाढेल. राखाल एकदा श्रीरामकृष्णांना म्हणाले की नामस्मरण करायला माझे मन एकाग्र होत नाही. तेव्हां श्रीरामकृष्ण म्हणाले, म्हणून काय झाले; हट्टाने साधन केलेच पाहिजे कारण करता करताच ते साधेल.

**पू. बाबा** : नाम घेतांना थकवा वाटला तर स्वस्थ बसावे, पण त्याला विरोधी गोष्टी, उदाहरणार्थ टी.व्ही. पहाणे करू नये.

**साधक ज** : नाम घेतांना थकवा येतो असे नाही. पण व्यवहारातल्या गोष्टी कराव्याच लागतात आणि त्या करतांना नाम टिकत नाही. तथापि नाम घेतांना श्रीमहाराज माझ्याजवळ आहेत किंवा मी त्यांच्याजवळ आहे आणि नाम थांबले की मी त्यांच्यापासून दूर गेलो आहे असे वाटते.

**पू. बाबा** : होय. नाम घेतो तोपर्यंतच आपण त्यांच्याजवळ असतो.

**साधक ब** : आम्हाला शिस्तीची सवय आहे. त्यामुळे नाम घेताना शिस्त पाहिजेच. वास्तविक आमचे वागणेही नामाच्या विरोधी नाही. तरीदेखील मन नाम घ्यायला मदत करत नाही कारण मला वाटते, ते मनाच्या प्रांतापलीकडे आहे. तेव्हां आता काय केले तर साधन वाढेल?

**पू. बाबा :** श्रद्धापूर्वक गुरुआज्ञा पाळणे हाच एक मार्ग आहे. तेवढे कोणताही विकल्प मनात न आणता करत राहावे.

**साधक प :** नामाच्या शक्तीचाच साधन वाढण्यासाठी उपयोग होईल. आपण नामाजवळ तसे मागत नाही. नामस्मरणाने मन वर जाते, सूक्ष्म होते, अशा वेळी त्याला वर जाऊ द्यावे. अहंकाराचे वजन लावून त्याला खाली खेचू नये. अहंकार सुटला तर आज नामाची जी शक्ती प्रपंचाकरिता वाया जाते ती जाणार नाही.

**पू. बाबा :** प्रत्येकाच्या मनोरचनेप्रमाणे साधन करतांना थोडा वेगळेपणा आढळेल; पण पाऊल पुढे पडते आहे ना हे सावधानतेने पाहिले पाहिजे. श्रीमहाराजांची किंवा भगवंताची सारखी आठवण राहाण्यासाठी प्रत्येक गोष्ट त्यांना सांगून करण्याची सवय लावून घ्यावी.

## |४२५| (३० जून १९९५)

**पू. बाबा :** मागच्या शुक्रवारी आपला एक मुद्दा अर्धाच राहिला, तो सांगतो. जे. कृष्णमूर्तींनी त्यांच्या The Ending of time ह्या पुस्तकात म्हटले आहे की सत्पुरुषांचे खरे कार्य त्यांच्याकडे येणाऱ्या माणसांची जाणीव अनंताइतकी व्यापक करणे हे आहे. दुसऱ्या एका ठिकाणी त्यांनी म्हटले आहे की प्रवचने, व्याख्याने देणे, पुस्तके लिहिणे या अगदी क्षुल्लक गोष्टी (petty things) आहेत. श्रीमहाजांनीही असेच म्हटले आहे; त्यांची भाषा थोडी वेगळी. ते म्हणाले की माझ्याकडे येणाऱ्या प्रत्येक माणसाला परमार्थात तो होता त्याच्यापुढे मी ढकलला. याचा अर्थ त्याचा संकुचितपणा कमी केला, आणि त्याला शक्य तितका व्यापक बनविला. ह्या व्यापकतेची शेवटची पायरी 'हें विश्वचि माझें घर। ऐसी मती जयाची स्थिर।' ही आहे.

पांडुरंग बुवा (रामानंद) आनंद सागरांना अनंतसागर म्हणत म्हणून एकदा श्रीमहाराजांना विचारले की यातले खरे कोणते? तेव्हां ते म्हणाले आनंदसागर, कारण त्यांना दु:ख माहीतच नव्हते; अर्थात साधन केल्यानंतर! हे पुढे ढकलणेच आहे. तेव्हांच श्रीमहाराजांना त्यांचे किती शिष्य तयार झाले म्हणून विचारले. त्यांनी तेरा म्हणून सांगितले पण त्यांची सर्वांची नांवे विचारायची बुद्धी त्यावेळी झाली नाही.

सत्पुरुष जीवाला पुढे कसे ढकलतात? आपले सगळे जीवन, विशेषत: २० व्या शतकात, संकेतमय आहे. आपणाला Symbol लागते. ब्रह्म अनंत आहे.

सांताच्या आवाक्यात ते येणे शक्य नाही. त्याची खूण म्हणून ॐ कार किंवा नाम दिले आहे. नाम घेणे म्हणजे त्याची आठवण आहे. म्हणून नाम घेतांना हा अर्थ मनात राहिला तर काम लवकर होईल. यासाठीच पतंजलींनी 'तदर्थभावनम्' म्हटले आहे. हे साधण्यासाठी माणसाला जीवनात तृप्ती पाहिजे. आता पुरे असे वाटले पाहिजे.

**साधक प** : तृप्ती पाहिजे हे खरे, पण तेवढ्याने होणार नाही. आपल्याला खरे काय पाहिजे ते लक्षात आले आणि त्याची तळमळ निर्माण झाली तर त्या तृप्तीचा उपयोग. म्हणजेच नामस्मरणात मन रमण्यासाठी सांसारिक गोष्टीतून ते बाजूला होणे आवश्यक आहे. त्यासाठी श्रीमहाराजांची प्रार्थना करावी.

**पू. बाबा** : पण प्रार्थना करतांना ते आहेत असे वाटते का?

**साधक प** : काय होतं, की श्रीमहाराज आहेत आणि माझी प्रार्थना त्यांना ऐकू जाते अशी मी कल्पना करतो. त्याचवेळी ही माझी कल्पना आहे अशी आपल्याला स्पष्ट जाणीव असते. त्यामुळे खरी प्रार्थना होत नाही.

**साधक ग** : कल्पनेची मदत घेऊनच पुढे जाणे आपल्याला शक्य आहे. उदाहरणार्थ, मानसपूजा करतांना कल्पनेचा भाग हळूहळू कमी होऊन त्या पूजेला सत्यत्व येऊ लागते. अर्थात याला किती काळ लागेल ते सांगता येणार नाही.

**पू. बाबा** : कल्पनेशिवाय आपण राहूच शकत नाही. औषध घेतांना या औषधाने बरे वाटेल ही कल्पनाच असते. बरी आठवण झाली! गुरुदेव रानडे यांच्या मुलीने ही हकिगत सांगितली. गुरुदेवांनी १९५७ मधे देह ठेवला. त्यापूर्वी काही वर्षे त्यांना क्षय झाला होता. त्यांचे रक्त आणि थुंकी तपासून त्यानुसार योग्य ती औषधयोजना होत असे. काही दिवसांनी त्यांना बरे वाटू लागले. रक्त आणि थुंकी तपासल्यानंतर आता रोग राहिला नाही असा रिपोर्ट आला. नंतर पाहिले तो वेळोवेळी त्यांना दिलेली औषधे कपाटात तशीच होती! आजार झाल्यापासून रोज दोन-तीन तास ते एका खड्ड्यात उन्हात बसून नामस्मरण करीत असत आणि केवळ नामाच्या बळाने त्यांचा आजार हटला होता.

साधक क यांनी अंबूराव महाराजांच्या साधेपणाच्या आणि नामनिष्ठेच्या एकदोन गोष्टी सांगितल्या. अगदी सुरुवातीला त्यांच्या गुरुंनी खाण्यासाठी तंबाखू तयार केली की अंबूराव त्यांच्याकडून थोडी मागून घेत असत. गुरु त्यांना अनुग्रह देणार होते पण ते चुकवाचुकव करत. शेवटी एक दिवस गुरूंनी

त्यांना पकडून अनुग्रह दिला! पण त्यानंतर त्यांनी अतिशय निष्ठेने व जिद्दीने साधन केले आणि पुढे ते तयारच झाले.

### |४२६| (७ जुलै १९९५)

दिनांक १२ ला बुधवारी गुरूपौर्णिमा आहे म्हणून दिनांक ५ पासून काकड आरती आणि त्यानंतर पू. बाबांचे निरूपण असा कार्यक्रम सुरू झाला आहे. ह्या वर्षी पू. बाबांनी ज्ञानेश्वरीच्या १८व्या अध्यायातील कर्म आणि कर्मसाम्यदशेवर सांगायला (गीतेतील ४७ व्या श्लोकापासून) सुरुवात केली आहे.

**पू. बाबा :** निरूपण ऐकायला येणारे एक गृहस्थ काल सकाळी भेटले. स्वामी स्वरूपानंदांकडून त्यांनी अनुग्रह घेतलेला आहे. ज्ञानेश्वर महाराजांच्या हरिपाठातील आठव्या अभंगातली एक शंका त्यांनी विचारली, "संतांचे संगती मनोमार्गे गति। आकळावा श्रीपति येणें पंथें॥" या अभंगात "नामामृत गोडी वैष्णवां लाधली। योगियां साधली जीवनकळा॥" असा एक चरण आहे. त्याबद्दल त्यांनी विचारले की भक्तीने लाभणारी नामामृताची गोडी आणि योग्यांना साधणारी जीवनकळा यात काय फरक आहे? मी म्हणालो या दोन्हींचाही मला अनुभव नाही तेव्हां फरक काय सांगणार? माझ्या उत्तराने ते थोडे नाराज झाले म्हणून मग त्यांना जे सांगितले ते सांगतो.

असे पहा की नामाच्या अमृताची गोडी लाभायला आधी नाम हे अमृत वाटले पाहिजे ना? आज आपण जे नाम घेतो ते दृश्यातच आहे. कसे ते पहा. आपण म्हणतो की आज नाम चांगले झाले. म्हणजे ते Becoming मधे आले ना! चांगले झाले म्हणजे आत्ता या क्षणी ते चांगले नाही. चांगले झाले ही केवळ स्मृती म्हणजे आठवण आहे. वास्तविक नाम हे केवळ 'आहे'; त्याला होणे नाही. म्हणून जोपर्यंत मन सूक्ष्मात जात नाही तोपर्यंत नामामृत गोडीचा अनुभव येणार नाही. हा अनुभव येऊन तो स्थिर झाला म्हणजेच ती गोडी लाभली असे म्हणता येईल. यासाठी संतांच्या देहाची संगत नव्हे तर त्यांच्या मनाची संगत झाली पाहिजे. योगमार्ग हा शक्तीचा मार्ग आहे. चित्तवृत्ती ताब्यात आणून मन प्रथम शून्यापर्यंत न्यावयाचे. सहस्रदल कमल म्हणजे मेंदूवर (cerebrum) ताबा आला की त्यातून एक स्राव येतो आणि मग योग्याला अन्नपाण्याची गरज राहात नाही. त्याला जीवनकला लाभते. नामाच्या बाबतीत श्रीमहाराज म्हणाले की जोपर्यंत वासना आहेत आणि त्यातून निर्माण

होणारे कर्म आहे तोपर्यंत नाम हेच परमात्मस्वरूप आहे हे समजणार नाही. यासाठी मन प्रथम निवृत्त झाले पाहिजे आणि त्याच्याही पुढे जाऊन निवृत्तीतून निर्वृत्ती आली पाहिजे.

मनाची निर्वृत्ती झाली की साधक कर्मे करीत असतो पण त्याला त्यांचा लेप होत नाही कारण त्याची वासना नाहीशी झालेली असते. निर्वृत्ती झाल्यानंतर सुरुवातीला काही काळ त्याला व्यवहार समजत नाही. तथापि ही स्थिती मुरली की त्याचे वागणे सामान्य माणसासारखे दिसते. यालाच कर्मसाम्यदशा म्हटलेले आहे. अशी दशा होऊन निर्वासन कर्म घडू लागले की त्याला सद्गुरु आपण होऊन येऊन भेटतात. उदाहरणार्थ दक्षिणेश्वरला येऊन ब्राह्मणीने श्रीरामकृष्णांकडून साधन करवून घेतले. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात "ऐसी कर्मसाम्यदशा। होय तेथ वीरेशा। मग श्रीगुरु आपैसा। भेटेचि गा॥ १८.९६६ ॥"

सद्गुरूंची कृपा कशी असते ते सांगतांना पू. बाबांनी एक संत कथा सांगितली. एक शिष्य त्याच्या गुरूंना म्हणाला की तुम्ही नेहमी माझ्याबरोबर असता याची मला प्रचीति पाहिजे. त्यासाठी मी जेव्हां चालतो तेव्हां माझ्या पावलांच्या ठशांबरोबर तुमच्या पावलांचेही ठसे दिसावे. गुरु ठीक आहे म्हणाले आणि रस्त्याने चालतांना त्याला गुरूच्या पावलांचे ठसेही दिसू लागले. एकदा जंगलातून जातांना त्याच्यावर काही संकट आले म्हणून तो गुरूंना हाका मारू लागला आणि त्या वेळी त्याला केवळ दोन पावलांचे ठसे दिसू लागले त्यामुळे तो आणखी घाबरला. पुढे ते संकट टळले आणि पुन्हा चार पावलांचे ठसे त्याला दिसू लागले. म्हणून तो गुरूंना म्हणाला की माझ्यावर संकट आले तेव्हां तुम्ही कोठे गेला होता? गुरु त्याच्यासमोर प्रकट झाले आणि म्हणाले मी तेथेच होतो. शिष्य म्हणाला, पण मग तुमच्या पावलांचे ठसे का दिसले नाहीत? गुरु म्हणाले, वेड्या, संकट आले तेव्हां मी तुला माझ्या खांद्यावर उचलून घेतले होते त्यामुळे फक्त माझ्याच पावलांचे ठसे तुला दिसले!

पू. बाबा म्हणाले, मला अलेक्झांडरची ती गोष्ट फार आवडते. त्याने सांगितले की मी मेल्यावर मला नेतांना माझे हात उघडे ठेवा. जगाला कळू दे की पराक्रमाने मिळवलेले सर्व ऐश्वर्य मी येथेच सोडून चाललो आहे. माझ्याबरोबर केवळ माझा आत्मा राहाणार आहे.

**साधक ग :** यावरून एक गोष्ट आठवली. एक सावकार होता. अतिशय कंजूष होता. त्याची बायको गुरु नानकाकडे जात असे. ते त्याला आवडत नसे

आणि त्यावरून तो तिला त्रास देत असे. तो फारच छळू लागला तेव्हां नाइलाजाने तिने गुरु नानकांना ही गोष्ट सांगितली. गुरु नानकांनी तिला एक सुई दिली आणि सांगितले की ही सुई तुझ्या नवऱ्याला दे आणि त्याला सांग की त्याचा आणि माझा मृत्यू झाल्यावर आमची भेट होईल तेव्हां त्याने ही सुई मला परत द्यावी. नानकांनी सांगितल्याप्रमाणे तिने केले. नानकांचा निरोप ऐकून सावकार म्हणाला, तुझा गुरु शहाणाच दिसतो! मेल्यावर येथून काही बरोबर नेता येते का? आणि हा प्रश्न विचारतानाच त्याला बोध झाला आणि तो पूर्णपणे बदलला.

**पू. बाबा :** आर्त, जिज्ञासू, अर्थार्थी आणि ज्ञानी हे भक्तांचे चार प्रकार सांगितले आहेत. त्यांपैकी जिज्ञासूचे आपण अनुकरण करावे.

**साधक क :** संतांनी नामाबद्दल इतके सांगितले आहे, ते नाम आहे तरी काय? ते जीवाला परमात्मस्वरूपाशी कसे घेऊन जाते याची प्रक्रिया काय आहे? जिज्ञासूला हे माहिती होते का?

**साधक ग :** जिज्ञासेतून श्रद्धा बळकट होते का? मला वाटते प्रपंचात येणारी संकटे श्रद्धा बळकट करतात.

**पू. बाबा :** खरे आहे. तथापि त्याकरता कायम संकटे येऊ देत असे कुंतीसारखे आपण म्हणू शकत नाही. पण संकटे आली तर ती दूर करा अशी प्रार्थना तरी करू नये. प्रारब्धाचे भोग भोगून संपवावे.

## |४२७| (१४ जुलै १९९५)

परवा बुधवारी गुरूपौर्णिमा झाली. पहाटेपासून रात्री उशीरापर्यंत लोक येत होते. त्यामुळे पू. बाबांना अजिबात विश्रांती मिळाली नव्हती. तरीदेखील आज संध्याकाळी आम्ही गेलो तेव्हां ते प्रसन्न होते आणि आमची वाट पहात होते. विश्वमनाशी आणि विश्व चालविणाऱ्या शक्तीशी ज्याचा साक्षात संबंध जुळला त्याला अनाकलनीय असे काही रहात नाही आणि तिकडून शक्तीचा प्रवाह येत असल्यामुळे त्याला सामान्य माणसासारखा थकवा येत नाही असे पू. बाबा सांगतात ते प्रत्यक्षात पहावयास मिळाले!

**पू. बाबा :** नुकतेच एका गृहस्थांनी दिलेले कृष्णमूर्तींचे एक पुस्तक वाचत होतो, त्यात त्यांनी म्हटले आहे की विचार ही माणसाला मिळालेली एक मोठी शक्ती आहे. तथापि विचारांच्या साहाय्याने माणूस फक्त दृश्य (Known) समजून घेऊ शकतो. दृश्यापलीकडचे जे क्षेत्र आहे तेथे बुद्धी पोहोचू शकत

नाही. हे वाचल्यावर माझ्या मनात आले की काही लोक जरी कृष्णमूर्तींनी नवीन सांगितले म्हणत असले तरी पूर्वी हे शंकराचार्यांनी सांगितलेले आहे. 'अतीव सूक्ष्मं परमात्मतत्त्वम्' ते विचारांनी जाणता येत नाही. तेथे भावना, श्रद्धा उपयोगी पडते आणि त्या ठिकाणी, मला वाटते, कृपा काम करते.

तुम्ही पहा, आपण जे पाहतो, ऐकतो, विचार करतो ते खरोखर तसेच असते का? वास्तविक ते सगळे आपल्या मनाने केलेले प्रोजेक्शन - प्रक्षेपण असते. अमुक माणूस चांगला आहे किंवा वाईट आहे हे माझे प्रोजेक्शनच असते. खरोखर तो कसा असतो कोणास ठाऊक. आणि श्रीमहाराज म्हणाले त्याप्रमाणे त्याच्या गुणदोषांची बीजे माझ्यातच असतात. तसेच माझे स्वत:चे माझ्याविषयी एक इमेज (प्रतिमा) असते आणि त्या इमेजचा मी बंदिवान झालेला असतो.

**साधक प** : तुम्ही प्रोजेक्शन म्हणताहात पण मला वाटते की ते काही ठरवून होत नसते. प्रोजेक्शन म्हणतांना मला हे अमुक वस्तूचे किंवा व्यक्तीचे प्रोजेक्शन आहे असे वाटते तेव्हां ती वस्तू अथवा व्यक्ती खरी कशी आहे ते माहीत असते आणि मी जाणूनबुजून त्याच्यावर दुसऱ्या कशाचा तरी आरोप करत असतो. पण इथे तसे घडत नाही. मला वास्तविकपणे ते तसेच वाटत किंवा दिसत असते.

**साधक ज** : ते कसेही असो. प्रोजेक्शन करायचे तर मी खरा नाही, सद्गुरु अथवा भगवंत खरा आहे असे वाटणे जास्त उपयोगाचे होईल. त्यामुळे अहंकार नाहीसा होईल.

गुरुपौर्णिमेच्या सप्ताहातील निरूपणात पू. बाबांनी ज्ञानेश्वरीतील अठराव्या अध्यायातील कर्मसाम्यदशेबद्दल सांगितले होते. त्याचा उल्लेख करून साधक ब म्हणाले की ही दशा सांगतांना ज्ञानेश्वर महाराजांनी आरशातील प्रतिबिंबाचे जे उदाहरण घेतलेले आहे ते मला फार आवडले "मुखाभासेंसी आरिसा। परौता नेलिया वीरेशा। पाहातेपणेंवीण जैसा। पाहाता ठाके॥९७६॥ तैसें नेणणें जें गेलें। तेणें जाणणेंही नेलें। मग निष्क्रिय उरलें। चिन्मात्रचि॥९७७॥ तेथ स्वभावें धनंजया। नाहीं कोणीचि क्रिया। म्हणौनि प्रवादु तया। नैष्कर्म्यु ऐसा॥१८.९७८॥" आरशात दिसणारे प्रतिबिंब खोटे असते पण मी ते खरे मानतो. आरसा बाजूला केला की प्रतिबिंब आणि आरसा दोन्ही नाहीसे होतात आणि फक्त पाहाणारा उरतो. खरा पाहाणारा देहापेक्षा वेगळाच आहे. तो साक्षी आहे. पण भ्रमाने तो देहालाच मी म्हणत असतो. म्हणजे मुळात देह खोटा आणि त्याचे आरशातले खोटे प्रतिबिंब!

**पू. बाबा :** देह ही आत्म्याची छाया आहे. त्या छायेचा आपण फोटो काढतो म्हणून त्याला छायाचित्र हा शब्द योग्यच वाटतो.

**साधक ड :** रमण महर्षींना कॅन्सर झाला तेव्हां ते म्हणाले, देह हाच आत्म्यावरचा रोग आहे आणि त्या रोगावरचा हा रोग आहे.

**साधक ब :** गीतेने नैष्कर्म्याला सिद्धी म्हटले आहे. जाणणे आणि नेणणे दोन्ही गिळल्यानंतर ही दशा येते.

**पू. बाबा :** आपण दृश्याच्या पलीकडे जाऊ शकत नाही तोपर्यंत विचाराच्या पलीकडे जाणे शक्य नाही. सर्व साधन त्यासाठी आहे. इथे खरे विवेकाचे काम आहे. नित्यानित्यविवेक करून अनित्य आहे ते बाजूला सारणे हे वैराग्य. म्हणजे या सर्वांचे मूळ देहबुद्धीत आहे; ती जोपर्यंत जात नाही तोपर्यंत खरा परमार्थ नाही.

आणखी एक गोष्ट. मला दुसऱ्याबद्दल द्वेष वाटतो, राग येतो. वास्तविक माझ्याप्रमाणेच तोही भगवंताचा आहे. त्याला नांवे ठेवणे म्हणजे भगवंताला नांवे ठेवण्यासारखे आहे. प्रत्येकाच्या हृदयात भगवंत आहे हे समजायला प्रथम तो माझ्या हृदयात आहे हे समजले पाहिजे. राग फार नुकसान करतो. एकदा श्रीमहाराजांना म्हटले की गाय गरीब म्हणतात पण काही गायी मारक्या असतात हे कसे ? तेव्हां ते झटकन् म्हणाले, जे जे गुणात आले त्याच्या ठिकाणी विकार असणारच. मारक्या गायीत तमोगुण जास्त असतो.

**साधक क :** दक्षिणेश्वरला एक साधू आला होता. तेथे तो आठ-दहा दिवस राहिला. तो अतिशय रागीट होता. एकदा त्याला कशासाठी तरी विस्तव पाहिजे होता म्हणून तो-श्रीरामकृष्णांच्या खोलीत गेला आणि त्याने विस्तव आहे का म्हणून विचारले. तो आलेला पहाताच श्रीरामकृष्ण उभे राहिले आणि हात जोडून त्यांनी त्याला येथे विस्तव नाही म्हणून सांगितले तेव्हां तो तेथून निघून गेला. श्रीरामकृष्णांनी उठून त्याला नमस्कार केला याचे तेथे बसलेल्या त्यांच्या शिष्यांना फार आश्चर्य वाटले होते. तो गेल्यावर शिष्यांना उद्देशून श्रीरामकृष्ण म्हणाले, बाबानो, तो तमोमुखी नारायण आहे. त्याला नमस्कार केला नाही तर आई रागावते !

**पू. बाबा :** आपण नाम घेतो आहोत तेव्हां पुढे जाणार हे निश्चित; पण जेवढ्या तळमळीने ते व्हायला पाहिजे तेवढे ते अद्यापि होत नाही. आपण विसरतो म्हणून अतिशय सावध - alert राहिले पाहिजे. सत्संगाचा फार उपयोग होतो. 'मज निरंतर जागविती' असे तुकाराम महाराजांनी म्हटले आहे.

तथापि सत्संगाला मर्यादा राहणारच. मला सत्संग लाभला असे मी श्रीमहाराजांना म्हणालो तेव्हां ते म्हणाले, हा सत्संग नव्हेच. खरा सत्संग त्याच्या पातळीवर गेलात म्हणजे घडेल. 'नाम हा माझा प्राण आहे' हे त्यांचे वचन हृदयाशी धरून आपण नामाची संगत केली पाहिजे.

## |४२८| (२१ जुलै १९९५)

सध्या रविवारी ज्ञानेश्वरीच्या सातव्या अध्यायावर निरूपणे चालू आहेत. मागच्या रविवारी १७ वा श्लोक चालू होता. ज्ञानी भक्ताचे वर्णन करतांना ज्ञानेश्वर महाराजांनी म्हटले आहे की "हां गा जीवापैलीकडिलिये खुणे। जो पावोनि वावरो जाणे। तो देहाचेनि वेगळेपणें। काय वेगळा होय॥ ७.११८॥" एका गृहस्थांनी प्रवचनानंतर दोन दिवसांनी पू. बाबांना फोन करून या ओवीचा अर्थ, विशेषत: 'जीवापैलीकडिलिये खुणे' म्हणजे काय म्हणून विचारले होते म्हणून पू. बाबांनी तीच ओवी आज चर्चेसाठी घेतली.

**साधक प** : आपल्या देहापुरता संकुचितपणा हा जीवाचा गुण किंवा त्याची खूण आहे. संकुचितपणा जाऊन जो तादात्म्याने भगवंताशी एकरूप झाला त्याला सर्व विश्वात मीच भरलो आहे, माझा देह हादेखील जगाचा भाग आहे, जगापासून वेगळा नाही ही स्पष्ट जाणीव राहाते. व्यवहारात तो इतरांसारखा वागला तरी तो देहाचा वेगळेपणा असतो. आतमधे तोच असतो. जीव म्हणतांना आपण जीवभाव म्हणतो आहोत. मी जीव आहे. मी या देहापुरताच मर्यादित आहे असे अज्ञानामुळे वाटते. पण सर्वत्र मीच आहे ही अनुभूती स्थिरावली की देहाने तो भगवंतापेक्षा वेगळा दिसला तरी तो वास्तविक मीच असतो असे भगवंत सांगत आहेत.

**पू. बाबा** : ज्ञानेश्वर महाराजांचे काही अभंग मी पाहिले. त्यातला पुढील अभंग ह्या अनुभवाशी मिळता जुळता वाटतो. अभंग असा :

अवघां डोळां तुज म्यां पाहावें। अवघां श्रवणीं तुजची ऐकावें॥ १॥
अवघी मूर्ति तुज पें ध्यावें। अवघां चरणीं तुझ्या पंथीं चालावें॥ २॥
रखुमादेविवरु अदट दाविला। माझ्या देहीं वाढला ब्रह्माकारें॥ ३॥

म्हणजे माझ्या इंद्रियांना आतां भगवंताखेरीज दुसरा विषय राहिलेला नाही. रखुमादेवीवरु अदट म्हणजे सगळीकडे घनदाट भरलेला आहे हे समजले.

नाम घेतांना आपल्याला असे कधी वाटते का? नाम पूर्ण आहे, ते घेतले की आणखी काही करायला नको असे वाटले पाहिजे. 'महाराज भेटले; झाले!, असे

वाटले पाहिजे. श्री. भाऊसाहेबांनी म्हटले की आता काय मिळवायचे आहे? त्यांना वाटले तसे आता मी नाम घेतो, आता दुसरे काही करायचे राहिले नाही असे वाटले पाहिजे. त्यासाठी सत्संगतीचा फार उपयोग होतो. दृश्याची आसक्ती पूर्णपणे नाहीशी झाल्याशिवाय खऱ्या अर्थाने नामस्मरण होणार नाही.

आपण स्मरण म्हणतो तेव्हां त्याचा अर्थ काय? जे पूर्वी होते त्याचे स्मरण होते आणि नाम तर काळाच्या पलीकडे आहे. स्मरण याचा अर्थ इतकाच घ्यायचा की नाम हे विश्वाच्या आदि आहे आणि त्यातून पूर्वी जसे विश्व निर्माण झाले आणि लयाला गेले तसेच ते पुन:पुन्हा घडत राहाते. नामातूनच ते येते आणि नामात त्याचा लय होतो.

**साधक ज** : नाम पूर्ण आहे. तेच सत्य आहे. हे सगळे समजत असूनही त्यानुरूप आचरण का होत नाही?

**पू. बाबा** : मी श्रीमहाराजांना एकदा हा प्रश्न विचारला होता. तेव्हां प्रथम श्रीमहाराज म्हणाले, तुम्हीच सांगा. मी गप्प बसलो तेव्हां श्रीमहाराज म्हणाले की हा अविद्येचा जोर आहे. त्याच्यापुढे जीवाचे चालत नाही. पण गंमत अशी आहे की ही अविद्याही नामानेच नाहीशी होईल.

## |४२९| (२८ जुलै १९९५)

**पू. बाबा** : मागच्या रविवारी दुपारी एक कानडी गृहस्थ आले होते. अमेरिकेत असतात. त्यांचे दोन्ही मोठे मुलगेही तिकडेच आहेत. ते गृहस्थ म्हणाले की दोन्ही मुलगे तिकडेच स्थिरावले आहेत, तथापि त्यांची मुलांमधली involvement - गुंतणे कमी होत नाही. बरे मुलगे आता त्यांच्या संसारात रमले आहेत. वडिलांबद्दल त्यांना प्रेम आणि आदर आहे पण त्यांचा मुलांमधे जितका जीव गुंतलेला आहे तितका मुलांचा त्यांच्यामधे नाही.

**साधक ब** : जवळ जवळ सर्वच घरांतून अशी स्थिती आहे; अमेरिका असो की हिंदुस्थान असो, तसा फरक पडत नाही.

**पू. बाबा** : त्या गृहस्थांच्या ह्या अडचणीपेक्षा त्यांनी एक प्रश्न विचारला तो महत्त्वाचा आहे. कृष्णमूर्ती Thought is Time म्हणतात. काळाच्या पलीकडे जायचे असेल तर आपण विचारांपलीकडे गेले पाहिजे. म्हणजेच निर्विचार झाले पाहिजे. हे कसे व्हायचे? आपल्याला काळाचे ज्ञान कसे होते? अमुक वाजता उठायचे. अमुक वेळी म्हणजे उठल्याबरोबर आणि झोपण्यापूर्वी जप करायचा, अमुक घटनेपूर्वी किंवा क्रियेनंतर जेवायचे, झोपायचे इत्यादी आपल्या

नित्याच्या क्रिया आपण काळाशी बांधलेल्या आहेत. म्हणजे काळाला या क्रियांचे अथवा घटनांचे आलंबन आहे. म्हणून जे कधीही बदलत नाही असे आलंबन काळाला दिले तर काळ थांबेल. आपण काळाचा विचार करतो तेव्हां एकतर त्यात स्मृति म्हणजे भूतकाळ असतो किंवा कल्पना म्हणजे भविष्यकाळ असतो. अर्थात कल्पनांनाही स्मृतीचा आधार असतो. आपल्या जगण्यात वर्तमान थोडाच राहातो. म्हणून स्मृती आणि कल्पना या दोहोंच्या पलीकडे जे वर्तमानकाळात एकरस आहे असे नाम घेतले तर काळाचा विसर पडेल. काळाचे भान देहबुद्धीशी निगडित आहे. देहबुद्धी जसजशी कमी होईल तसतसा काळ लोप पावेल.

माझे हे विवरण ऐकून ते गृहस्थ म्हणाले, **I appreciate what you say but I do not understand it.** (तुम्ही सांगत आहात ते मला आवडले पण तरी ते मला समजत नाही.) आणि लगेच त्यांनी विचारले की तुम्ही म्हणता तसे घडायला किती काळ लागेल? मी म्हणालो, काळाच्या पलीकडे जायचे असेल तर ते काळात कसे मोजाल? **Look at the paradox !** (विरोधाभास पहा!)

हा प्रसंग सांगून पू. बाबांनी विचारले की आज आपण नाम घेतो ते काळातच आहे; ते काळापलीकडे कसे जाईल? नाम घ्यायला बसला की स्वत:ला विसरला असे झाले पाहिजे. दत्ताण्णांनी सांगितले की ते जप करायला बसले की त्यांना झोप येत नाही. मला वाटते, नव्हे माझी खात्री आहे की यासाठी नामाची किंवा श्रीमहाराजांची संगत झाली पाहिजे. संगतीत एकसारखे स्मरण आहे. जे जे करतो ते ते तोच आहे असा भाव गीतेत सांगितला आहे. तू जे जे करतोस ते ते सर्व मला अर्पण कर असे भगवंतानी अर्जुनाला सांगितले आहे. श्रीशिवमानसपूजन स्तोत्रातही "यद्यत्कर्म करोमि तत्तदखिलं शम्भो तवाराधनम्" असे म्हटले आहे.

**साधक प** : संगतीमधे communication (संदेशन) हवे; ते होत नाही. जे काही सांगायचे ते त्यालाच सांगितले पाहिजे. नामाची शक्ती समजण्यासाठी पहिली पायरी म्हणून आपली अडचण, आजार नामाला सांगावे. मला बरा कर अशी नामाची प्रार्थना करावी. नाम निश्चित उपयोगी पडेल. पण ते तेवढेच असावे. कारण त्यासाठी घेतलेले नाम आणि त्यामुळे आलेली शक्ती खर्च होते. नंतर आज नामाचे स्वरूप मला माहिती नाही. नाम घेतल्यावर जी स्वस्थता वाटायला हवी ती वाटत नाही; तेव्हां तेही आता तूच कर असे नामाला सांगावे.

**पू. बाबा :** साधनामधे **auto suggestion** चा (स्वयंसूचनेचा) खूप उपयोग होतो.

**साधक ज :** माझ्या हृदयात श्रीमहाराज आहेत आणि तेथे एकसारखे नाम चालू आहे अशी कल्पना मी करतो. आता माझे लक्ष असले तर मला हृदयातून नाम ऐकू येते.

**साधक प :** अस्वस्थ असतांनाही लक्ष दिले तर ते ऐकू येते का?

**साधक ज :** तशी फार मोठी अस्वस्थता मी अलीकडे अनुभवलेली नाही. तथापि आत्ता चर्चा चालू असतांनाही मला ते ऐकू येत आहे. काही दिवसांपूर्वी तुम्ही एक महत्त्वाचा मुद्दा मांडला होता. आपण नाम कशासाठी घेतो हे स्पष्ट झाले पाहिजे असे तुम्ही म्हणालात. मी याच्यावर विचार केला आणि भगवंताच्या सत्, चित् आणि आनंद स्वरूपांपैकी आनंदासाठी मी नाम घेतो.

**साधक क :** हे फार चांगले आहे कारण नव्वद टक्के लोक दु:ख नाहीसे व्हावे किंवा आपल्या वासना पूर्ण व्हाव्या म्हणून नाम घेतात. आपण मायेच्या दडपणाखाली आहोत. वासनांचा जोर विलक्षण आहे. म्हणून खरा वासनाक्षय झाल्याखेरीज सत्‌चित्‌आनंद स्वरूपासाठी नाम होणार नाही. सामान्यत: अडचणीत असला म्हणजेच माणूस नाम घेतो.

**साधक ब :** अडचणींचा विचार केला तर सगळे जीवनच अडचणींनी भरलेले आहे. जीवन हीच महासामान्य अडचण आहे. आमच्या वासना घट्ट झालेल्या आहेत. अनेक जन्म आम्ही हेच रटाळ जीवन जगत आलेले आहोत. माझी खात्री आहे की ह्या जन्मी ज्यांच्याशी संघर्ष, स्पर्धा इत्यादी झाले त्यांच्याशी अनेक जन्म तेच संबंध आहेत. ते खरे माझ्या जीवाच्या जवळचे आहेत आणि पुढील जन्मी ते पुन्हा येणार आहेत. मरतांना शेवटची गोष्ट नाम असावे असे श्रीमहाराज म्हणतात पण ते कसे होणार? कोणत्या वासना त्यावेळी उफाळून येतील हे कोणी सांगावे?

**साधक ग :** असा नकारात्मक विचार कशाला करायचा? मी कसाही असेन पण आता त्यांचा झालो आहे. तेवढे मला पुरेसे आहे.

**पू. बाबा :** आपल्याला खरे असे काही वाटते का?

**साधक प :** 'मी' खरा वाटतो. अगदी लहानपणी जो मी होतो तोच तरूणपणी होतो आणि आजही आहे. पण तरी 'मी' जाणार आहे आणि तरीही हे जग राहाणार आहे असे वाटते. म्हणजे मी जाणारा आणि जग खरे आहे. मी जसा प्रतिक्षणी बदलतो आहे तसे जगही बदलते आहे हे समजते पण

तरीदेखील जग म्हणून जे आहे ते राहाणार आहे असे वाटते. त्या जगाचा निरास व्हावयाचा म्हणजे मुळातच काहीतरी बदल झाला पाहिजे.

**पू. बाबा** : आपण नाम घेतो त्याचा अर्थ जरी सर्वकाळ लक्षात आला नाही तरी हे काहीतरी पवित्र, महत्त्वाचे, दिव्य, सौंदर्यपूर्ण आहे हे तरी मनात एकसारखे असावे

**साधक प** : ज्यांचा वैचारिक गोंधळ असतो त्यांचे नामस्मरणही गडबडीने कसेतरी होत असते. वहीत रामनाम लिहिणारांचे मी पाहिले आहे. काहीजण इतके गिचमीड लिहितात की ते वाचताही येत नाही. त्यांचे नामस्मरणही कसे तरी करून टाकले अशा स्वरूपाचे होत असणार. (पू. बाबांना) तुम्ही गोंदवल्याला एकदा नाम कसे सावकाश, स्पष्ट घ्यावे ते सांगितले होते. तसे नाम घेतले तर आत जाणे सोपे जाईल. आणखी म्हणजे नाम घेतांना त्याच्या अर्थाची भावना पाहिजे. (पहा : अध्यात्म संवाद भाग २ संवाद क्र. १८०).

## |४३०| (४ ऑगस्ट १९९५)

पू. बाबांनी TIME मासिकातील एका लेखाचा उल्लेख केला. ते म्हणाले आयोवा युनिव्हर्सिटीतील एका प्रोफेसरानी मेंदूवरील काही प्रयोग आणि मानसशास्त्रीय प्रयोग करून असे सिद्ध केले आहे की ज्याला आपण rational thought असे म्हणतो त्याच्या मागे भावनेचे मध्यवर्ती स्थान असते. म्हणजे ज्याला आपण नि:पक्षपाती विचार म्हणतो त्यालादेखील भावना आणि दृश्याची पार्श्वभूमी असते. आपण जे साधन करतो त्याला अशी भावनेची पार्श्वभूमी आवश्यक आहे. वासना आणि भावना ही शक्ती आहे. वासनेलाही भावनेचे अंग असते. म्हणून त्या शक्तीला विचारांनी योग्य दिशा देता येते.

चर्चा चाललेली असतांना एक वृद्ध गृहस्थ आले. पू. बाबांना त्यांनी त्यांच्या काही कौटुंबिक अडचणी सांगितल्या. ते गृहस्थ गेल्यानंतर त्यांच्या अडचणींच्या संदर्भात पू. बाबा म्हणाले की प्रारब्धाचा सिद्धान्त पटणे फार कठीण आहे. "मना त्वांचि रे पूर्वसंचीत केले" असे स्वत:ला कितीही सांगितले तरी मन शांत होत नाही. सगळा हिशोब बरोबर आहे, The world is mathematically perfect हे पचणे अवघड आहे. त्यापेक्षा काही घडले तरी श्रीमहाराजांची इच्छा असे म्हणून स्वस्थ राहण्याचा प्रयत्न करणे सोपे आहे.

चर्चेत पुढील मुद्द्यांची उजळणी झाली.

१) जडाचा विचार केल्यामुळे आपले मन जड झाले आहे. वासनाक्षय झाल्याशिवाय ते सूक्ष्म होणार नाही, आणि वासनाक्षय नामस्मरणानेच होईल.

२) सत्पुरुषांना दुसऱ्याचे दु:ख पाहवत नाही. ते कमी व्हावे म्हणून त्यांचे दु:ख सत्पुरुष स्वत:वर घेतात. कोड झालेल्या माणसाच्या शरीरावर श्रीरामकृष्णांनी हात फिरविल्यावर त्या माणसाला बरे वाटले पण श्रीरामकृष्णांच्या शरीराची आग झाली. औंधच्या राजघराण्यातील स्त्रीचे पाप श्रीमहाराजांनी घेतले तेव्हां काही दिवस त्यांचे शरीर काळे पडले. (पहा श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज चरित्र आणि वाङ्मय ले. के. वि. बेलसरे प्रकरण ९ 'विषप्रयोग' हा भाग)

३) जडामागची सूक्ष्माची पार्श्वभूमी खोल आणि महत्त्वाची असते. वसिष्ठांनी "मन:कृतं कृतं राम न शरीरकृतं कृतम्" असे श्रीरामास सांगितले

## |४३१| (११ ऑगस्ट १९९५)

**पू. बाबा :** मागच्या शुक्रवारी मी तुम्हाला TIME मासिकातल्या मेंदूवरील प्रयोगांसंबंधी काही वाचून दाखवले. सामान्यत: वयाच्या ४०-४५ वर्षांनंतर मेंदूची झीज सुरू होते मेंदू थकतो आणि त्याचा माणसाच्या विचारशक्तीवर परिमाण होतो. तथापि कृष्णमूर्तींनी म्हटले आहे की तुम्ही जर निर्विचार झालात तर तुमचे मन विश्वमनाशी (Cosmic Mind) जोडले जाते आणि मेंदूची झीज न होता उलट त्याची शक्ती वाढते. म्हणून माझा तुम्हाला प्रश्न आहे की निर्विचार कसे व्हायचे? ध्यानाचा मार्ग आहे; पण तो जमला तर चांगले, नाहीतर माणूस काहीतरीच वागू लागतो. रजनीशांच्या पंथात माणसे कशीही नाचतात. दुसरी काही मंडळी ध्यानाला बसली की मधूनच हुंकार देतात. असे काहीतरीच होते. म्हणून दुसरा मार्ग म्हणजे आज या घडीला ज्या विचारांची आवश्यकता नाही ते दूर लोटायचे. कारण तसे पाहिले तर ताबडतोब ज्यासंबंधी विचार करून निर्णय घ्यायला पाहिजे अशा गोष्टी थोड्याच असतात. आपले शेकडा नव्वद विचार फालतू असतात, ते थांबवावे.

**साधक ग :** ज्यांना आपण फालतू विचार म्हणतो त्या वास्तविक मनाच्या वृत्ती असतात आणि त्या हवेनकोपणातून म्हणजे वासनेतून येतात. त्यांमधे कल्पनेचा भाग जास्त असतो.

**साधक ब :** विचार म्हणजे नेमके काय? उदाहरणार्थ, नित्यानित्यविवेकामध्ये विचार करतांना एक निश्चित हेतू ठेवलेला असतो.

**साधक प** : निर्विचार होणे अवघड आहे म्हणून मनात एकच विचार सतत ठेवण्याचा प्रयत्न करावा म्हणजे बाकीचे विचार बाजूला ढकलले जातील. त्यासाठीच पतंजलींनी जप करतांना त्याच्या अर्थाकडे लक्ष द्यावे - तदर्थभावनम् असे सांगितले आहे.

**साधक क** : आपण विचार करतो पण तो शेवटपर्यंत करण्याची आपल्यात शक्ती नसते त्यामुळे तो आपण मधेच सोडून देतो आणि दुसरा कशाचा तरी विचार करू लागतो. एखादी गोष्ट करावी की करू नये याबद्दल आपला निश्चित निर्णय झाला, कोणताही संदेह राहिला नाही, तरच तो विचार पूर्ण झाला असे म्हणता येईल. संशय न राहाणे ही विचाराची test - कसोटी आहे. ह्या अर्थाने आपला शुद्ध विचार होतच नाही.

**साधक ब** : ज्या गोष्टी आपल्याला निकडीच्या वाटतात त्यांबाबत जे करणे शक्य आहे ते लगेच करावे आणि मग त्याबद्दलचे विचार थांबवावे. कारण करणे अर्धवट राहिले तर त्याचा त्रास होतो.

**पू. बाबा** : साधनकालात साधकाच्या अंगी शक्ती येऊ लागतात. तेव्हां त्याने फार जपून राहावे लागते. तो खरा शरणागत असेल तर भगवंतच त्याचे रक्षण करतो. नाहीतर मोहवश होऊन तो घसरण्याची शक्यता असते.

आज्ञापालन ही अतिशय कठीण गोष्ट आहे. पुण्याच्या एका गृहस्थानी त्यांच्या मुलाला पुण्याच्या किंवा सांगलीच्या इंजिनिअरिंग कॉलेजमधे प्रवेश मिळाला नाही म्हणून इंग्लंडला पाठवले आणि नंतर हे सगळे श्रीमहाराजांना सांगून म्हणाले की आपण त्याला सांभाळा. श्रीमहाराज म्हणाले की मला न विचारता लोक काहीही करतात आणि मला सांभाळायला सांगतात. मी काय करणार! पुढे तो मुलगा तिकडच्या एका मुलीशी लग्न करून तिकडेच राहिला.

तथापि हेही खरे की श्रीमहाराजांच्या क्षमेला अंत नव्हता. किती जणांची पापे त्यांनी घेतली. ज्याने माझे थोडेतरी ऐकले त्याचे मी सर्व सोसतो असे ते म्हणत. खरोखर आपले भाग्य म्हणून आपल्याला असे गुरु मिळाले.

## **|४३२|** (१८ ऑगस्ट १९९५)

**पू. बाबा** : गेल्या रविवारच्या निरूपणात कृपा शब्द आला होता. निरूपणानंतर एका बाईंनी कृपा म्हणजे काय म्हणून विचारले. कृपा म्हणजे दया नव्हे. दयेपेक्षा ते काहीतरी जास्त आहे. उदाहरणार्थ, मुक्या प्राण्याची किंवा असाध्य आजार झालेल्या माणसाची दया येते. दयेतून प्रत्येक वेळी कृती

होईलच असे नाही. कृपेमधे करुणा आहे. अरे अरे! याच्यासाठी मी काय करू हा भाव आहे. आचार्यांनी अनुकम्पा शब्द वापरला आहे. अनुकम्पा म्हणजे compassion. श्रीमहाराज एकदा म्हणाले की रानात गाई म्हशी चरायला सोडल्या की त्यांना बाधतील अशा वनस्पती, गवत त्या खात नाहीत. हे ज्ञान त्यांना कोण देतं? ही भगवंताची त्यांच्यावर कृपा आहे.

**साधक प :** ही जनावरं किंवा कुत्री मांजरं यांच्यावरच्या ह्या कृपेला माणसांच्या संगतीने बाध येतो.

**पू. बाबा :** तुम्ही नाम घेता म्हणजे तुमच्यावर कृपा आहेच असे श्रीमहाराज म्हणत.

**साधक ग :** तिकडून कृपा का होते याचे कारण आपल्याला समजत नाही म्हणून अहैतुकी असे कृपेला विशेषण लावतात.

**साधक ब :** आपल्याला कारण माहीत नाही हे ठीक आहे; ही आपली बाजू झाली, पण त्याच्या बाजूने कोणावर केव्हां कृपा करायची याचा काहीतरी हिशोब असणारच. उगीचच कृपा होते किंवा होत नाही म्हटले तर त्याच्या विश्वात काही व्यवस्थाच नाही असे होईल.

**पू. बाबा :** (साधक ब ना) तुम्ही हे कोठे वाचले आहे का?

**साधक ब :** नाही. मलाच असे वाटते.

**पू. बाबा :** मग याला फार अर्थ आहे. त्याच्या व्यवस्थेबद्दल मनात विचार येणे ही कृपाच आहे आणि ती तुम्हाला नामानेच प्राप्त झाली आहे. नामाप्रमाणेच कृपा ही शक्तिरूप आहे. अखण्डानंदांनी म्हटले आले की परब्रह्म सगुण साकार झाले ही त्याची मानवावर कृपा आहे. आणि आत्ता मला आठवले, एका कृष्णाष्टमीलाच श्रीमहाराज म्हणाले की भगवंत सगुणात आले. त्यांचे हे सगुणात येणे ही त्यांची आपल्यावर कृपा आहे. आणखी एकदा श्रीमहाराज म्हणाले की संतांनी भगवंताला सगुणात आणले हे त्यांचे आपल्यावर फार मोठे उपकार आहेत. भगवंत सगुणात आले म्हणजे स्थल, काल, निमित्ताच्या मर्यादेत आले; आणि त्यामुळे त्यांचे चरित्र ही भक्तांना सुसेव्य अशा लीला झाली. श्रीमहाराजांनी यशोदेने कृष्णाला झाडाला बांधून ठेवले ती कथा सांगितली. जो गुणातीत आहे त्याला यशोदा गुणाने म्हणजे दोरीने बांधायचा प्रयत्न करू लागली तेव्हां दोरी पुरेना. शेवटी भगवंताला तिची करुणा आली आणि तो बांधला गेला! म्हणजे त्याने कृपा केली तरच आपण त्याला जाणू शकू. तो केव्हां कोणावर कृपा करतो हे कसे सांगणार? म्हणूनच

कृपा मेघवृष्टीसारखी आहे म्हणतात. तथापि आपल्यावर भगवंताची किंवा सद्गुरूंची (दोन्हीचा अर्थ एकच) कृपा व्हावी असे वाटत असेल तर शरणागती पाहिजे. आणि अहंकार समूळ गेल्याखेरीज शरणागती नाही. आपण दृश्यात म्हणजे आपल्या मनाप्रमाणे गोष्टी होण्यात त्यांची कृपा समजतो. पण खरी कृपा अंतरंग बदलण्यात आहे.

अखण्डानंद म्हणाले, प्रारब्ध ही कृपा आहे. प्रारब्धातून मुक्त होणे शक्य नाही. मात्र नवे क्रियमाण निर्माण न करणे आपल्या हातात आहे, ते आपण करावे. जोपर्यंत आपल्याला पैशाचा आधार वाटतो तोपर्यंत श्रीमहाराजांचा आधार आहे म्हणणे खरे नव्हे; आणि त्यांना शरण आहोत म्हणालो तरी ती शरणागतीही फक्त शब्दांचीच आहे. म्हणूनच श्रीमहाराज म्हणाले की तुमचा पैसा नाहीसा होणे (खोटा आधार नाहीसा होणे) ही माझी कृपा आहे. ही कृपा कोणाला पाहिजे ?

**साधक क :** निसर्गदत्त महाराज त्यांच्याकडे जाणारांना म्हणत की तुम्हाला जागं करणं हे माझं काम आहे. त्यानंतरचं पुढचं साधन तुम्हीच केलं पाहिजे. प्रापंचिक अडचणी दूर व्हाव्यात म्हणून त्यांच्याकडं जाणाऱ्या लोकांबद्दल ते म्हणत की या लोकांना पडणारी स्वप्नं मी त्यांना पाहिजे तशी सुधारून द्यावी असं वाटतं!

**पू. बाबा :** प्रपंच हे स्वप्न आहे हा वेदान्तविचार किती सोप्या आणि मोजक्या शब्दात त्यांनी सांगितला आहे.

एकदा श्रीमहाराजांना म्हणालो की ते पू. तात्यासाहेबांच्या मुखातून बोलतात याचे काही कारण असले पाहिजे. त्यावर श्रीमहाराज म्हणाले, होय, त्याने (पू. तात्यासाहेबांनी) पूर्वजन्मी सत्कर्म केलेलेच असणार, त्याशिवाय हे झालेले नाही. (पहा : अध्यात्म संवाद भाग २ संवाद क्र.१७३) ही किंवा अशा प्रकारची सिद्धी असते हे खरे आहे. पुण्यातल्या एकनाथ महाराजांच्या एका भक्ताला ही सिद्धी आहे. डॉ. सोनार त्यांना भेटले होते. डॉक्टरांनी त्यांना जनार्दन स्वामींना आणि नाथांना भेटायचे आहे म्हणून सांगितले. बरं म्हणून ते एका खोलीत गेले आणि त्यांच्यामधे जनार्दन स्वामींचा आवेश झाला. ते म्हणाले बुलाव उस हकीमको. जनार्दन स्वामी किल्लेदार होते ना! त्यामुळे त्यांच्या बोलण्यात दरारा होता. नंतर थोड्या वेळाने नाथांचा आवेश झाला तेव्हां ते 'पांडुरंग पांडुरंग' इतक्या गोड आवाजात आणि आर्ततेने म्हणत होते की ते ऐकून डॉ. सोनारांच्या डोळ्यांना पाणी आले.

नंतर श्री. भाऊसाहेबांच्या गोष्टी निघाल्या. सप्टेंबर १९३९ मधे त्यांची प्रकृती खूपच खालावली. जाण्याच्या आधी एक दिवस त्यांना भ्रम झाला की श्रीमहाराज आले आहेत. त्यांनी सुनेला सांगितले स्वारी आली आहे, त्यांना बसायला पाट द्या, रांगोळी काढा, आरतीची तयारी करा. त्यांचे अंतर्मन श्रीमहाराजांनी व्यापलेले असल्यामुळे त्यांना भ्रम झाला तो देखील श्रीमहाराजांच्या भेटीचा. खरोखर हा दिव्य भ्रमच म्हटला पाहिजे.

**साधक** : बाबा, तुम्ही भाऊसाहेबांना भ्रम झाला होता म्हणता पण मला वाटते की तो त्यांचा अनुभव म्हणजे सत्यस्थिती असावी. श्रीमहाराज खरोखरच त्यावेळी तेथे आलेले असणार कारण भाऊसाहेबांचा अंतकाळ जवळ आलेला होता. श्रीमहाराजांनी त्यांना भाऊसाहेब मी उद्या जाणार असे सांगितले त्यावेळी ते श्रीमहाराजांना म्हणाले होते की आपल्या मांडीवर मृत्यू यावा म्हणून मी गोंदवल्यास आलो. खरोखर आपल्या मांडीवर मृत्यू येणे हा उत्सव आहे. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले होते की तसा योग नाही. तथापि श्रीमहाराजांनीच त्यांना मला दुसऱ्याचा अंतकाळ साधता येतो असे सांगितले होते. तेव्हां भाऊसाहेबांची ही इच्छा त्यांनी निश्चितच पूर्ण केली असेल. भाऊसाहेबांच्या हर्नियाला पीळ पडला होता तेव्हांदेखील त्यांना बरे वाटू लागल्यावर स्वारी येऊन गेली असे ते म्हणाले. (पहा : अध्यात्म संवाद भाग १ संवाद क्र. ७८) तसेच गदगच्या शिवप्पांना भ्रम झाला आहे असे त्यांचा मुलगा म्हणाला, पण श्रीमहाराज त्यांना भेटले तेव्हां श्रीमहाराजांना त्यांनी माझे नाम शेवटपर्यंत चालेल ना म्हणून विचारले तेव्हां यांना भ्रम झाला आहे असे कोण म्हणेल असे श्रीमहाराज म्हणाले होते. (पहा : अध्यात्म संवाद भाग २ संवाद क्र. १८२)

**पू. बाबा** : तुम्ही म्हणता तसेच असले पाहिजे. हे लक्षात यायला पाहिजे होते पण आले नाही हे खरे; नाहीतर श्रीमहाराजांना विचारले असते.

## ।४३३। (२५ ऑगस्ट १९९५)

मागच्या शुक्रवारचाच कृपेचा विषय पू. बाबांनी काढला.

**पू. बाबा** : कृपा ही शक्ती आहे आणि त्या शक्तीची जाणीव होण्यातच कृपा आहे. आपण दृश्यात गुंतलेले आहोत तोपर्यंत आपल्याला दृश्याच्या पातळीवरच तिची जाणीव होते. कृपा ही विश्वाला व्यापून आहे. कृष्णमूर्ती म्हणतात ते बरोबर आहे. सर्व माणसांचे शरीर जसे जगात कोठेही सारखे तसे सर्वांचा मेंदू आणि विचारही एकच आहे. विशेषातून सामान्यात - from

Particular to Universal गेलो की तेथे कृपा आहेच. विचार हा येथून तेथून एकच आहे. त्यामुळे विचारात आणि घटनांमधे चांगले वाईट असे काही नसते. सामान्यातून आपण विशेषात येतो, माझे विचार म्हणतो तेव्हां संकुचित होतो आणि तेथे चांगले वाईट इत्यादी भेद निर्माण होतात. दोन उदाहरणे देतो म्हणजे लक्षात येईल. येथे नेहमी येणाऱ्या एका साधकांचे वडीलही श्रीमहाराजांकडे येत असत. त्यांच्या धाकट्या मुलाला लग्नानंतर अंठरा वर्षांनी मुलगा झाला. त्यांनी श्रीमहाराजांना हे सांगितल्यावर श्रीमहाराज म्हणाले चांगले झाले. तेव्हां त्या गृहस्थांनी पुढे सगळे चांगले होईल ना म्हणून विचारले. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, भगवंत जे करतो ती सगळी कृपा आहे म्हटल्यावर त्यात चांगले वाईट कसले? म्हणजे आपण आपल्या मनासारखे झाले की त्यांची कृपा झाली म्हणतो आणि मनाविरुद्ध झाले की कृपा नाही म्हणतो ते चुकीचे आहे. आपल्याला वाटते तसे न होण्यातही त्यांची कृपाच आहे. झोपल्यावर रोज सकाळी आपण जागे होतो ही त्यांची कृपाच नाही का?

दुसरी हकिगत पुण्याच्या एका गृहस्थांची. त्यांच्या मुलीचे लग्न पू. तात्यासाहेबांनी ठरवले. श्रीमहाराजांना विचारून ठरवले होते का ते तेव्हां विचारायचे राहून गेले. लग्नानंतर पाच सहा महिनेच संसार झाला आणि त्या मुलीचा नवरा विषमज्वर होऊन वारला. मुलीला पुण्याला नेण्यासाठी ते गृहस्थ मुंबईला आले. दोन दिवस पू. तात्यासाहेबांकडेच राहिले. काही बोलले नाहीत. तोंडावर पांघरूण घेऊन झोपून राहात. तिसरे दिवशी श्रीमहाराज त्यांना म्हणाले, तुमचा प्रारब्धावर विश्वास आहे ना? जे झाले ते झाले. त्याला वाईट कसे म्हणायचे? जे झाले ते तिच्या हिताचेच झाले असे का म्हणू नये? त्यानंतर पुढे तिचे शिक्षण झाले. पुन्हा लग्न झाले आणि सुखाचा संसार झाला. मागचे प्रारब्ध भोगून संपवणे हेच योग्य असे श्रीमहाराजांना सुचवावयाचे होते.

**साधक क** : दृश्यातला बदल हा तात्पुरता असतो. त्यापेक्षा अंतरंगात बदल होणे ही खरी कृपा आहे.

**पू. बाबा** : जगात आणि आपल्या जीवनात जे जे घडते ते ते त्याच्या सत्तेने घडते. म्हणून माझ्या जीवनात जे जे घडते ती त्याची कृपा आहे. आपण त्याला चांगले वाईट म्हणतो ते बरोबर नाही. भाऊसाहेब म्हणत की महाराजांना एक गोष्ट अशक्य आहे; ते कोणाचे अकल्याण करणार नाहीत. हे लक्षात ठेवावे.

**साधक ग** : याचा अर्थ मी कर्ता हा भाव पूर्णपणे गेल्याखेरीज त्यांच्या कृपेची जाणीव स्थिर होणार नाही.

**पू. बाबा :** श्रीमहाराजांच्या अस्तित्वाची जाणीव एकसारखी राहिली पाहिजे. नामस्मरणाचा तो अर्थ आहे. मन जसजसे सूक्ष्म होत जाते तसतशी ही जाणीव सतेज होते. कबीराच्या नांवावर एक दोहा सांगितला जातो. त्यात 'वो नाम कुछ और' असे म्हटले आहे श्रीमहाराजांना हे सांगितले तेव्हां ते म्हणाले की नाम तेच राहाते. त्यात बदल होत नाही; घेणारा कुछ और होतो. (पूर्ण दोहा असा : रामनाम सब कहत है ठग ठाकुर और चोर।

जिस नामसे ध्रुव प्रल्हाद तरे वो नाम कुछ और॥)

सद्‌गुरूंचे अस्तित्व कसे असते ह्या संदर्भात पू. बाबांनी एक हकिगत सांगितली. अलिकडेच एक वैद्य पू. बाबांना भेटायला आले होते. श्री. सीतारामपंत वालावलकर हे त्यांचे गुरु. ते अलिकडेच वारले. त्यांचा मुलगा डॉक्टर आहे आणि सूनही नोकरी करते. हे वैद्य त्यांच्या स्वतःच्या प्रत्येक वाढदिवसाला गुरूंना भेटायला जात असत. यंदा गुरु देहात नसले तरी त्यांच्या घरी जाऊन यावे असे त्यांना वाटले पण मनात विचार आला की मुलगा आणि सून कामावर गेलेले असणार. त्यामुळे घर बंद असेल म्हणून ते गेले नाहीत. पुढे दोनचार दिवसांनी त्यांचे एक गुरुबंधू त्यांना भेटले तेव्हां त्यांना म्हणाले की नुकतेच त्यांना एक स्वप्न पडले. स्वप्नात त्यांचे गुरु आले आणि ह्या वैद्यांचे नांव घेऊन म्हणाले की वाढदिवसादिवशी ते आले नाहीत. मी त्यांची वाट पाहिली! खरोखर देहापलीकडच्या अस्तित्वाची आपल्याला कल्पनाच नाही.

**साधक ग :** म्हणजे घर बंद असते आणि ते कुलूप पाहून आले असते तरी सद्‌गुरु त्यांना भेटले असते.

आमच्यापैकी एका साधकांच्या बहिणीने पू. बाबांना पत्र लिहून त्यांचा फोटो मागितला होता; त्याचा संदर्भ देऊन पू. बाबा म्हणाले, श्रीमहाराजांबरोबर मी दावणगिरीला गेलो होतो. तेथील मंडळी पू. तात्यासाहेबांच्या नांवाचा जयजयकार करीत आणि ते त्यांना सहन होत नसे. मला ताप आला होता म्हणून मी घरीच थांबलो होतो. तेव्हां पू. तात्यासाहेब मला म्हणाले, केशवराव, तुम्हाला खरं सांगतो, महाराजांचं महत्त्व वाढवा; माझं नको. हे सांगतांना त्यांच्या डोळ्यात पाणी उभे राहिले होते. त्यांचा अतिशय संकोची आणि लीन स्वभाव होता. त्यांचे ते सांगणे दिनकरने (श्री. दिनकरराव केतकर) शब्दशः पाळले आहे. तो देखील कोठेही लोकांसमोर नसतो. पू. तात्यासाहेब माझ्यापेक्षा कितीतरी थोर होते. त्यांचे हे सांगणे. तेव्हां महाराजांचे महत्त्व वाढवा. (अशा प्रकारे फोटो देणार नसल्याचे त्यांनी मोठ्या खुबीने सांगितले.)

आज सुरुवातीपासूनच पू. बाबा फार प्रसन्न दिसत होते. ते पुढे म्हणाले आपले रोजचे जीवन पाहिले तर त्यात किती तोच तोपणा आहे. म्हणून एक्झिस्टँशिआलिस्ट (अस्तित्ववादी) म्हणतात की ह्या जीवनाची किळस येते. आलबेर काम्यूने तर माणसाला आत्महत्त्या करण्याखेरीज सुटकेचा दुसरा मार्ग नाही म्हटले आहे. भारतीय तत्त्वज्ञान्यांना हे मान्य नाही. भगवंत जर आनंदमय आहे तर जगात जे दु:ख आहे ती माणसाची कृती आहे. दु:ख हे मानण्यावर आहे.

पू. बाबा म्हणाले, योगी श्रीअरविंदांनी त्यांच्या Divine life मधे कृपेसंबंधी फार चांगले लिहिले आहे. ते पाँडिचरीला गेले तेव्हां त्यांनी राजकारणात परत यावे म्हणून पुष्कळांनी खटपट केली पण ते परत आले नाहीत. ज्याला भगवत्कृपा लाभते त्याला बाकीचे सारे क:पदार्थ वाटू लागते. त्यांचा राजकारणसंन्यास लो. टिळकांनाही आवडला नव्हता. तथापि तो असाच मिस्टिक आहे, तो संसारात परत येणार नाही असे ते म्हणाले.

## |४३४| (१ सप्टेंबर १९९५)

**पू. बाबा :** शरीर, मन आणि प्राण हे जड आहेत. योगी श्रीअरविंद आणि मदर यांनी त्यात बदल घडवून आणण्याचा प्रयत्न केला. हे करणे फार अवघड आहे.

**साधक प :** सत्ययुगात जशी बहुसंख्य माणसे धर्मपरायण होती तसा विश्वमनात बदल घडवून संपूर्ण मानवजात सुधारण्याचा त्यांचा प्रयत्न होता.

**पू. बाबा :** ज्ञानेश्वर महाराजांनीही पसायदानात 'वर्षतु सकळ मंगळी। ईश्वरनिष्ठांची मांदियाळी।' असे मागितले आहे. पण हे आयडियल आहे. प्रत्यक्ष जीवनात श्रीमहाराज म्हणाले की 'जीव जेथें आहे तेथून त्याला पुढे ढकलण्याचे काम मी केले.' हेच खरे आहे. श्री. बापूसाहेब साठ्यांचेच पहा ना. श्रीमहाराजांबरोबर ते हर्याला गेले व तेथेच वारले. श्रीमहाराज म्हणाले की ते घरी असतांना गेले असते तर प्रपंचात गुंतून राहिले असते. नंतर बापूसाहेबांच्या मुलाचेही, मृत्युसमयी आपण त्यांच्याजवळ नव्हतो म्हणून वाईट वाटून घेऊ नको. त्यांना उत्तम गती लाभली असे सांगून समाधान केले. (पहा : अध्यात्म संवाद भाग १ संवाद क्र. ७)

पू. बाबा म्हणाले, साधनात खरा त्रास होतो तो संशयाचा. संशय जाता जात नाहीत. बुद्धिप्रधान माणसांना संशय जास्त असतात. विवेकानंदांच्या

बाबतीतदेखील हे झाले. श्रीरामकृष्णांनी देह ठेवल्यानंतर ते पवहारीबाबांकडे गेले होते. वास्तविक श्रीरामकृष्णांनी त्यांना निर्विकल्प समाधीचा अनुभव दिला आणि सांगितले की याची किल्ली मी माझ्याजवळ ठेवली आहे. कारण तसे केले नसते तर त्यांच्या हातून जे कार्य घडायचे होते ते झाले नसते. पाश्चात्यांना आपले विचार आणि तत्त्वज्ञान पटवावयाचे आणि त्यांच्यावर प्रभाव पाडायचा म्हणजे तसेच उर्जस्वल व्यक्तिमत्त्व आवश्यक होते. विवेकानंदांना खरी शांती शेवटच्या काही दिवसात लाभली. तोपर्यंत ते अस्वस्थ होते. ह्या देशाचे भले व्हावे हीच त्यांची उत्कट इच्छा होती. त्या भावनेपोटी एकदा ते खोलीत जाऊन रडले होते. ब्रह्मानंद स्वामी (राखाल) यांची स्थितीही अशीच होती. रामकृष्ण मठ आणि मिशन यांचे कार्य त्यांच्या हातून करून घ्यायचे होते. त्यांनांही शेवटच्या काही दिवसात खरी शांती लाभली. विवेकानंदांच्या बाबतीत तर श्रीरामकृष्ण म्हणत की तो सप्तर्षींपैकी एक आहे. त्याला हे समजले तर तो येथे राहाणारच नाही. या दृष्टीने आपले ब्रह्मानंद बोवा मोठे भाग्यवान. त्यांचा त्यागही मोठा. एवढ्या कष्टाने मिळविलेली विद्या त्यांनी देऊन टाकली. त्या विद्येमुळेच गुरूबद्दल त्यांच्या मनात संशय निर्माण केला आणि अशी फसवणारी विद्या काय कामाची असे त्यांना वाटले. ते असतांना लोकांना त्यांचे मोठेपण कळले नाही.

श्रीमहाराजांच्या वागण्यात दुसऱ्यांबद्दल कणव आणि उत्कटता होती. कोणी विचारायला आला तर त्याचे समाधान होईपर्यंत ते सांगत. त्यामुळे काही वेळा पू. तात्यासाहेबांना ऑफिसला जायला उशीर होई. काही वेळा तर रजा लागे. सत्पुरुष मोठे हुशार असतात. ते नुसती सूचना करतात आणि नेहमी त्यांच्या सहवासात असणारे फसतात. माझीच गोष्ट सांगतो, पू. बाबा म्हणाले. श्रीमहाराजांबरोबर मी सज्जनगडला आणि मग साताऱ्याला गेलो होतो. साताऱ्यात श्रीमहाराजांनी मला येथे तुम्हाला कोणाला भेटायचे नाही का म्हणून दोन तीनदा विचारले. मी नाही म्हणालो. वास्तविक महाराज वरचेवर विचारत होते तेव्हां कोणाला भेटू असे मी त्यांना विचारायला हवे होते. पण ते काही सुचले नाही. नंतर समजले की हैदराबादला मी ज्यांच्याजवळ ज्योतिष शिकलो ते श्री. डोळे साताऱ्याला त्यांच्या मुलाकडे आले होते आणि त्यावेळी साताऱ्यातच होते!

पू. बाबा म्हणाले, आपले साधन चांगले होत नाही कारण हवेनकोपण आणि अहंकार आड येतात. चित्तशुद्धीसाठी विवेक आणि वैराग्य पाहिजे आणि

देहबुद्धी जाऊन साधनाची दिशा निर्माण झाली पाहिजे. म्हणजेच ध्येय निश्चित झाले पाहिजे. देहबुद्धी गेली म्हणजेच शाश्वत मीचा बोध होईल. तोपर्यंत शाश्वत नाम धरावे. नाम उपाधिरहित आहे त्यामुळे आपण उपाधिरहित झाल्याशिवाय ते खऱ्या अर्थाने धरता येणार नाही म्हणून साधन करतांना सावधानता पाहिजे.

बोलतांना मानसपूजेचा विषय निघाला तेव्हां पू. बाबांनी त्यांना अलिकडेच कळलेली एक हकिगत सांगितली. दर रविवारी निरूपणाला सुभेदार नांवाच्या एक म्हाताऱ्या बाई येतात, त्यांनी ही हकिगत पू. बाबांना सांगितली. या सुभेदार बाईंचे आजोबा म्हणजे आईचे वडील श्री. नागेशराव देशपांडे सुमारे बारा वर्षे गोंदवल्यास श्रीमहाराजांजवळ होते. त्यावेळी सुभेदार बाईंची आई सात आठ वर्षांची होती त्यावेळची हकिगत. पुढे तिचे लग्न झाल्यावर तिचा गोंदवल्याशी काही संबंध राहिला नाही. काही दिवसांपूर्वी ती वारली. मृत्यूपूर्वी तिने ही हकिगत सांगितली असे सुभेदार बाई म्हणाल्या. घडले ते असे - एक दिवस ही मुलगी (सुभेदार बाईंची आई) तिच्या आईबरोबर सकाळी राममंदिरात गेली. रामाचे दर्शन घेतले आणि श्रीमहाराज शेजघरात होते म्हणून त्यांच्या पाया पडण्यासाठी तेथे त्या दोघी गेल्या. शेजघरात श्रीमहाराज निजले होते त्यांच्या पायावर डोके ठेवण्यासाठी बाईंनी (सुभेदार बाईंच्या आजीनी) पायावरचे पांघरूण थोडे बाजूला केले तेव्हां श्रीमहाराजांच्या पावलांपाशी गुलाबाची दोन टपोरी फुले होती. गोंदवल्यात आणि इतक्या सकाळी ही फुले कुठली म्हणून त्या बाई श्रीमहाराजांना म्हणाल्या, महाराज तुमच्या पावलांशी गुलाबाची दोन फुले आहेत. ते पाहून श्रीमहाराज म्हणाले, अरे, हो की! बहुधा ब्रह्मानंद बोवांनी नाहीतर आनंदसागरांनी मानसपूजा केली असावी! त्यांनी मानसपूजेत वाहिलेली गुलाबाची फुले तेथे प्रत्यक्ष झाली होती! हकिगत सांगून पू. बाबा म्हणाले, "मनोमय पूजा। हेचि पढिये केशीराजा॥ घेतो कल्पनेचे भोग। न मानती बाह्यरंग॥" हेच खरे.

## ।४३५। (१५ सप्टेंबर १९९५)

मागच्या शुक्रवारी दि. ८ ला पू. बाबांना अशक्तपणा वाटत होता म्हणून आम्ही भेटलो नव्हतो. आजही थोडा वेळ बसलो.

**पू. बाबा** : Krishnamurti for Beginners ह्या संग्रहात कृष्णमूर्तींनी म्हटले आहे की जे घडते त्यात फक्त What is पहा. आपण व्याख्यान ऐकतांना, वाचतांना, दुसऱ्याशी संभाषण करतांना, कोणतीही घटना घडत असतांना त्यावर

आपली प्रतिक्रिया होत असते. खरे म्हणजे अशा प्रकारे react होता कामा नये. What is म्हणतांना कृष्णमूर्तींना नेमके काय म्हणायचे आहे ?

**साधक क** : शंकराचार्यांनी यालाच यथार्थज्ञान म्हटले आहे. कृष्णमूर्तींचे Living in the present ते हेच. स्मृती आणि कल्पना यांमधे भूतकाळ आणि भविष्य काळ आहे. तो नको, फक्त वर्तमानकाळात राहा.

**साधक ग** : What is हे मूळस्वरूप आहे. ती अवस्था आहे.

**साधक प** : विचार सर्वात सूक्ष्म असतात पण What is ही अवस्था विचारांच्याही पलीकडची आहे.

**पू. बाबा** : याचा नामस्मरणासाठी कसा उपयोग करता येईल ?

**साधक ग** : नामस्मरण करतांना देहाचा विसर पडणे हे What is च्या जवळ जाणे आहे.

**पू. बाबा** : मंगळवारी श्री. वेर्लेकर आले होते. त्यावेळी ते म्हणाले की काही वेळा नाम घेतांना अशी स्थिती होते की त्यावेळी श्रीमहाराज, नाम आणि मी येवढेच असतो. खूप आनंद होतो आणि त्या आनंदावर माझे पुढचे आठ पंधरा दिवस आनंदात जातात. ते म्हणाले ही स्थिती येणे माझ्या हातात नसते. तथापि मला माहीत आहे की मी महाराजांना आवडतो.

**साधक ग** : ही तुकाराम महाराजांनी सांगितलेली प्रेमखूण आहे.

**पू. बाबा** : नामाला व्यक्तीचे रूप देऊन - Personify करून त्याची संगत होणे कठीण आहे म्हणून नामाच्या ठिकाणी आपण श्रीमहाराजांना ठेवावे. प्रत्येक गोष्ट त्यांना सांगून करावी म्हणजे ते साक्षात होतील. रोज नामाला बसतांना श्रीमहाराजांची प्रार्थना करावी आणि नामालाच त्याचे रूप प्रकट करण्यासाठी विनवणी करावी. दहादा प्रार्थना केली की केव्हांतरी खरा भाव येईल आणि प्रेमखूण मिळेल.

## |४३६| (२२ सप्टेंबर १९९५)

पू. बाबांकडे आम्ही गेलो तेव्हां त्यांना भेटायला एक वृद्ध गृहस्थ आले होते. पू. बाबांनी हे हैदराबादचे श्री. वसंतराव तुळजापूरकर, कवी आहेत असा त्यांचा परिचय करून दिला. त्यांनी त्यांच्या बऱ्याच कविता पू. बाबांना म्हणून दाखविल्या आणि पंडित नेहरूंपासून मोठमोठ्या लोकांकडून त्यांना मिळालेल्या प्रशस्तीपत्रांबद्दल आणि सत्कारांबद्दल सांगितले. ते गेल्यानंतर पू. बाबा म्हणाले काव्याच्या प्रयोजनात कीर्ती हाही एक हेतू आहे. ते असो.

श्रीमहाराजांचे हे एक वचन पहा : " 'मी त्या भगवंताचें नांव घेतो' या जाणिवेनें नाम घेत असतां, त्या भगवंताच्या स्वरूपाची थोडी जरी कल्पना आली तरी मनुष्य ते सोडणार नाही." वचन वाचून पू. बाबा म्हणाले, पुष्कळांच्या जीवनात त्यांना येणाऱ्या अडचणी श्रीमहाराज सोडवतात असा अनुभव येतो. तशी त्यांची श्रद्धाही असते, पण तरीही नाम आत जात नाही याचे कारण काय असावे? उत्तरादाखल तेच पुढे म्हणाले, सध्या आपल्याला दृश्यातल्या अनुभवातच समाधान वाटते. त्यापलीकडे जायची इच्छाच नसते की काय कोणास ठाऊक! नामासाठी नाम घेणे किंवा मागणे बंद होणे एकच आहे. तसे होणे म्हणजेच नाम आत जाणे आहे. यासाठी सगळे प्राब्धावर सोडावे किंवा त्यापेक्षा सोपे आणि गोड म्हणजे आपले जीवन श्रीमहाराजांवर सोपवून द्यावे. माझ्या आयुष्याचा आराखडा त्यांनी आधीच ठरविलेला आहे. आणि त्याप्रमाणे होणारे सगळे काही त्यांनी ठरविलेले असल्याने ते माझ्या हिताचेच आहे असे वाटले पाहिजे. अमुक व्हावे किंवा अमुक होऊ नये ही वासना गेली तरच आत जाता येईल. आणि मग दृश्यातील रस आपोआप नाहीसा होईल.

## |४३७| (२९ सप्टेंबर १९९५)

मंगळवारी (दि २६) पू. बाबा बाजारात गेले होते तेव्हां एक हातगाडी त्यांच्या उजव्या गुडघ्यावर आदळली. रस्त्यातल्या एका माणसाने त्यांना पडता पडता सावरले आणि घरी आणून सोडले. गुडघ्यात रक्त साकळले होते तेथे पाणी झाले. ते दोनदा काढले. आता इलॅस्टिक बँडेज बांधले आहे. इतके होऊनही पू. बाबांनी नेहमीच्याच प्रसन्नतेने चर्चा सुरू केली.

**पू. बाबा** : श्री. प्रसादे नांवाचे एक गृहस्थ श्रीमहाराजांच्या (पू. तात्यासाहेब) वेळेपासून येथे येतात. काल ते स्वत: त्यांचा मुलगा आणि एक गृहस्थ भेटायला आले होते. मुलाचे प्रश्न प्रापंचिक होते. बरोबर आलेल्या गृहस्थानी पन्नासाव्या वर्षी स्वेच्छानिवृत्ती घेतली आहे. ते म्हणाले, मी ज्ञानेश्वर महाराजांच्या वाङ्मयात रमलो आहे. ज्ञानेश्वर महाराजांच्या एका अभंगाचा अर्थ त्यांनी विचारला. अभंग असा :

मी माझें मोहित राहिले निवांत। एकरूप तत्त्व देखिलें गे माय॥ १॥
द्वैताच्या गोष्टी हरपल्या शेवटीं। विश्वरूपें मिठी देतु हरि॥ २॥
छाया माया काया हरिरूपीं ठाया। चिंतिता विलया एक तेजीं॥ ३॥
ज्ञानदेवा पाहा ओहं सोहं भावा। हरिरूपीं दुहावा सर्वकाळ॥ ४॥

**साधक म** : श्रीमती किशोरी आमोणकरांची या अभंगाची कॅसेट आहे.

**पू. बाबा** : गाथ्यामधे या अभंगाचा अर्थ दिला आहे तो सांगतो. एक गवळण तिच्या सखीला आपला अनुभव सांगते आहे. ''हे सखे, मी माझ्या यथार्थ स्वरूपाला पाहिल्यामुळे स्वरूपस्थितीमध्यें गुंगून जाऊन निवांत राहिले, आणि परमात्म्यामध्यें व माझ्यामध्यें असलेलें द्वैत नाहीसें होऊन मी हरिरूपच झाले. तसेच, चिदाभास, शरीर व माया हीं हरिरूप होऊन गेलीं. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, 'अहं' 'सोऽहं' भावरूपी जो व्यापक श्रीहरि त्याच्या ठिकाणीं स्थिर राहून त्याच्या आनंदाचा प्रत्यक्ष अनुभव घ्या.''

**साधक ग** : पहिल्या चरणाचा मी आणि माझे हा मोह शांत झाल्यावर सगळीकडे एकच तत्त्व भरून राहिले आहे असा मला अनुभव आला असा अर्थ जास्त योग्य वाटतो. तसेच गायींच्या धारा काढणारी गवळण हरिरूपीं दुहावा म्हणते ते योग्यच आहे. निर्गुण निराकार सगुण साकार झाले. ज्ञानेश्वर महाराजांनी या अभंगात त्यांचा ज्ञानाचा अनुभव आणि चिद्विलासाचा सिद्धान्त सांगितला आहे.

**पू. बाबा** : हे प्रेम, हा आनंद नामस्मरणात कसे आणता येईल?

**साधक प** : सगुणाच्या प्रेमातून दृश्यापलिकडे जायला तळमळ पाहिजे. तेथे आपला मी आड येतो. आणि पुरेसे वैराग्यही नाही.

**पू. बाबा** : आज नामात प्रेम नाही. पण श्रीमहाराजांनीच म्हटले आहे की 'नामात प्रेम का येत नाही? नाम घेत नाही म्हणून.' याचाच अर्थ असा की जेवढे चिकाटीने आणि समजून नामस्मरण झाले पाहिजे तेवढे होत नाही. म्हणून नामाला बसतांना नामाचीच तू प्रसन्न हो अशी प्रार्थना करावी आणि शक्य तितके जास्तीत जास्त नाम घ्यावे.

## |४३८| (६ ऑक्टोबर १९९५)

पू. बाबांनी उडियाबाबांचे अखण्डानंदांबरोबरचे हिंदी संवाद वाचून दाखविले. त्यातला एक संवाद असा : उडियाबाबा नेहमीप्रमाणे सिद्धासनावर बसलेले होते. त्यांचे डोळे उघडे होते पण ते काहीच पहात नव्हते. अखण्डानंदांनी त्यांना विचारले की गुरु कसा असतो? तेव्हां त्यांनी एक श्लोक म्हणून दाखवला :

दृष्टिः स्थिरा यस्य विनैव दृश्यात्। वायुः स्थिरः यस्य विना निरोधात्।
चित्तं स्थिरं यस्य विनाआलम्बनात्। स एव योगी स गुरुः स सेव्यः॥

दृश्याच्या आधाराशिवाय ज्याची दृष्टी स्थिर झाली आहे, निरोध म्हणजे ताबा न ठेवताही ज्याचा प्राण स्थिर झाला आहे, कोणत्याही आलंबनाशिवाय ज्याचे चित्त स्थिर झालेले आहे तोच श्रेष्ठ योगी आणि सेवा करण्यास योग्य असा गुरु होय.

श्लोकाचा अर्थ सांगून पू. बाबा म्हणाले, श्रीमहाराज म्हणत की डोळे मिटून समाधी काय कामाची, डोळे उघडे ठेवून समाधी पाहिजे. तेच हे वर्णन आहे. मी एकदा श्रीमहाराजांना श्वासावर नाम घेण्यासंबंधी विचारले होते. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, आधी श्वास आवरून मग नाम घेण्यापेक्षा नाम घेत राहावे म्हणजे आपोआप श्वासाचा निरोध होतो. ह्या श्लोकात गुरूची लक्षणे किती छान सांगितली आहेत. डोळे उघडे असले तरी दृश्य नाहीसे झालेले असते. स्थिर होण्यासाठी चित्ताला कसल्याही आलंबनाची जरुरी नसते. स एव योगी. मी विचारतो, आपण आहोत ते असे आहोत. तर आपण श्रीमहाराजांजवळ काय मागावे?

**साधक प** : मी तरी माझे मागणे बंद करा असे मागेन.

**साधक ड** : मी रोज त्यांना नमस्कार करतो तेव्हां मनात येते की त्यांनी माझ्या पाठीवरून हात फिरवावा.

**पू. बाबा** : दृश्यातले काहीही मागितले तरी ते तात्पुरते असते. जे मागू त्याची साधन वाढण्यात परिणती झाली पाहिजे. प्रज्ञानंद महाराज नांवाच्या एका सत्पुरुषांच्या शिष्या दोन दिवसांपूर्वी मला भेटायला आल्या होत्या. त्यांनी सांगितले की त्यांनी चिरलेल्या वांग्यात त्यांना ॐ काराचा आकार दिसला! ठीक आहे. पण अशा खुणांचा परिणाम तात्पुरता राहातो. शिवाय दृश्यातली कोणतीही खूण बरोबर संशय घेऊन येते. म्हणून खूण स्थल, काल, निमित्तापलीकडची पाहिजे. थोडक्यात म्हणजे साधन करू तसतशी भीती, काळजी इत्यादी कमी होऊन विकार क्षीण झाले पाहिजेत आणि शांती आली पाहिजे. खरे म्हणजे काही मागू नये किंवा तुम्हाला योग्य वाटेल ते द्या म्हणावे.

**साधक ज** : कोणतेही कर्म करतांना त्याच्या परिणामाचा आधी विचार करावाच लागतो. मग फलाशा सोडून कर्म कसे करायचे?

**साधक क** : कर्म करतांना आपल्याला अमुक व्हावे किंवा होऊ नये असे वाटते ते श्रीमहाराजांना सांगावे; पण माझे कर्तेपण लटके आहे, तुम्ही कराल त्यात मी राहीन, तक्रार करणार नाही ही वृत्ती ठेवावी.

**साधक प** : मनासारखे झाले तर आनंदून न जाणे आणि मनाविरुद्ध झाले तर दु:ख न करणे हे फलाशा सोडून कर्म करणे आहे.

**साधक ग** : मनाविरुद्ध झाले तर श्रीमहाराजांच्या मनात नव्हते असे वाटून एकवेळ स्वस्थ राहाता येते पण मनासारखे झाले तर त्यासाठी आपण काही प्रयत्न केलेले असतात त्यामुळे मी केले म्हणून झाले अशी कर्तेपणाची भावना वाढण्याची शक्यता असते म्हणून तेथे सावध राहिले पाहिजे.

**पू. बाबा** : उडियाबाबांच्या ह्या आणखी एका संवादात काय म्हटले आहे पहा. अखण्डानंदांनी त्यांना विचारले की ध्यान कशाचे करावे. ते म्हणाले देहाचे! जसे घट आणि घट पाहाणारा वेगळे असतात तसे देह आणि देहाचे ध्यान करणारा वेगळे राहिले की देह म्हणजे मी नव्हे हे दृढ होऊन देहबुद्धी कमी होईल.

पू. बाबांनी निळोबांचा एक अभंग वाचून दाखवला.

जेववाल तेंचि जेवीन मुखें। पांघरवाल सुखें पांघरेन॥ १॥
बैसवाल तेथें बैसेन उगा। निजवाल जागा न सोडीं तो॥ २॥
जैसे कराल मी होईन तैसा। न करूनियां आशा आणिकांची॥ ३॥
निळा म्हणे जें कराल तें तें। होईन आज्ञेतें नुलंघीं॥ ४॥

**साधक ग** : 'ठेविलें अनंतें तैसेंची रहावें।' हे तुकाराम महाराजांनी जे म्हटले आहे ते कसे राहावे ते येथे निळोबांनी सांगितले आहे. ही खरी शरणागती किंवा आत्मसमर्पण आहे.

**पू. बाबा** : निळोबांची ही त्यांच्या गुरूंच्या सांगण्यावर Commentary (टिपणी) आहे.

## |४३९| (१३ ऑक्टोबर १९९५)

**पू. बाबा** : आज सकाळी शहापूरचे एक डॉक्टर आले होते M.S.झाले आहेत. त्यांनी त्यांच्या साधनातल्या अडचणी सांगितल्या. ते रोज पहाटे शांत बसून निर्विचार होण्याचा प्रयत्न करतात. बसल्यावर थोडा वेळात मनाने आत जातात आणि दीड-दोन तास त्या स्थितीत असतात. ते म्हणाले की जेव्हां जाग येताना मनस्थिती चांगली नसते तेव्हां हे जमत नाही. तसेच सकाळी हॉस्पिटलमधे गेल्यानंतर मात्र अजिबात अनुसंधान ठेवू शकत नाही. मनातून खूप वैराग्य येते त्यामुळे घरातील माणसांबरोबर गप्पागोष्टी, टी.व्ही. पाहणे इत्यादी करू शकत नाही त्यामुळे घरातल्या लोकांना मी मिसफिट वाटू लागलो आहे. मला वाटते की प्रपंच आणि परमार्थ दोन्ही एकावेळी साधणे शक्य नाही. काही वेळा डोकेदुखीमुळे किंवा इतर शरीरव्याधीमुळे साधन होत नाही.

मी त्यांना सांगितले की तुम्हाला जे आत गेल्यासारखे वाटते ती समाधी नसून तंद्री असते. तुमच्या सर्व अडचणी कुठेतरी, कोणाच्या तरी पायावर डोके ठेवल्यामुळे सुटतील. ते म्हणाले की त्यांना एक जीवन्मुक्त सत्पुरुष भेटले आहेत; पण तरी शंका जात नाहीत. मी त्यांना म्हणालो की ज्ञानेश्वर महाराज, रामदास स्वामी किंवा तुकाराम महाराज अशांसारख्या एखाद्या संतास शरण जावे. त्यामुळे आधार मिळून साधन वाढेल आणि त्यामुळे श्रद्धेची वाढ होऊन तुम्ही निर्धास्त व्हाल. लक्षात ठेवा की रात्री झोपतांना नाम घेतले तर पहाटे जाग येते तेव्हांही आपले मन चांगले असते आणि त्यामुळे साधन चांगले होते.

पू. बाबा म्हणाले, बऱ्याचशा अडचणी आपले ध्येय निश्चित झालेले नसल्यामुळे येतात. भगवंताची प्राप्ती हे सर्वोच्च मूल्य ठरवून मग त्याच्या तुलनेने पैसा, घरदार, मुलेबाळे यांची किंमत ठरवावी. त्या डॉक्टरांचे डोके दुखते तेव्हां किंवा इतर देहदु:खात साधन होत नाही पण तेव्हांदेखील घरदार पैसाअडका इत्यादींचे महत्त्व त्यांना वाटते याचाच अर्थ भगवत्प्राप्ती हे अद्यापि सर्वोच्च मूल्य झालेले नाही. हॉस्पिटलमधे अनुसंधान राहाण्यासाठी डॉक्टर पाथरकरांना श्रीमहाराजांनी सांगितले होते की ऑपरेशनच्या आधी थोडे नाम घ्यावे आणि नंतरही थोडे नाम घ्यावे. हे जमले तर समजावे की ऑपरेशन करतांनाही म्हणजे कर्मामधेही नाम चालू असते. याहीपेक्षा प्रत्येक कर्म आपल्या गुरूंचे म्हणून करावे म्हणजे त्यांची आठवण आपोआप राहाते.

आपले करणे चुकीचे असते असे नाही; पण ते अपूर्ण असते. गोष्टी, घटना प्रारब्धाने आपल्या मनाविरुद्ध घडतात. प्रयत्नांना यश येत नाही. पण ते सर्व मान्य करून त्यापासून वेगळे व्हावे. मनाने त्यात गुंतू नये. तसेच वाटले तर गुरु, शिष्याचे प्रारब्ध दुखणे वगैरे स्वत:वर घेतात. अशी बरीच उदाहरणे आहेत. नामसाधनेसाठी मनाची खूप तयारी लागते. नसा मजबूत लागतात. विवेकानंदांना मधुमेह होता. एका वैद्याने औषध दिले. औषधाचे पथ्य म्हणून पाणी न घेता चाळीस दिवस ते नुसत्या दुधावर राहिले. अशा पुरुषांची तयारी मोठी असते., पण, लक्षात ठेवा की नामाने ही तयारी होते.

आस, हव्यास आणि ध्यास ह्या साधनाच्या तीन पायऱ्या आहेत. आस म्हणजे भगवत्प्राप्तीची तीव्र इच्छा. हव्यासात केवळ तीच एक इच्छा राहाते आणि ध्यासात त्याच्याखेरीज दुसरे काही सुचेनासे होते. मग साधक सर्वकाळ साधनातच रमतो. खरे म्हणजे फक्त नाम घ्यावे, दुसरे काहीही करू नये; त्यानेच सर्व साधेल. भगवंताच्या दृष्टीने एखादा हमाल, वकील, डॉक्टर, प्रोफेसर

सगळे सारखेच. साधन करणारा आणि न करणारा हे दोनच वर्ग असतात. त्यादृष्टीने जीवन हे एक नाटक आहे. सुरुवातीला साधक असल्यासारखे बाहेर वागू नये. म्हणजे चार लोकात मुद्दाम गंभीर चेहेरा करून बसू नये. सर्वात भाग घ्यावा. बाह्यात्कारी आनंदात असावे, पण मनाने मात्र साधनात राहावे. जसा सूर्याचे पिलू झाकून प्रकाश अडविता येत नाही तसा साधक तयार होऊ लागला की त्याचा प्रभाव इतरांवर आपोआप पडतो.

**|४४०|** (१० नोव्हेंबर १९९५)

**पू. बाबा :** नुकतेच एक गृहस्थ भेटायला आले. त्यांनी कृष्णमूर्तींच्या तत्त्वज्ञानाचा चांगला अभ्यास केलेला आहे. त्यांनी कृष्णमूर्ती आणि श्रीमहाराज यांच्या शिकवणुकीतील भेद विचारला. मी त्यांना म्हणालो, कृष्णमूर्ती 'नेति' सांगावयाचे. म्हणजे जे जे तुम्हाला माहीत आहे ते 'ते' नाही. तुमच्या वासना, द्वेष, मत्सर, राग, लोभ गेले म्हणजे जे राहते ते मेडिटेशन. ते म्हणत तुम्ही प्रपंचात बंदिवान आहात. 'You are in the prison of family life.' त्यांच्या मते आपले विकार, वासना, विचार ही अव्यवस्था - 'disorder' आहे. ते गेले की order येते.

याच्याउलट श्रीमहाराजांचा भक्तिमार्ग होकारात्मक आहे. सगळीकडे भगवंत पाहणे हे त्याचे मुख्य सूत्र आहे. ते म्हणत की तुम्हाला भगवंताची नड लागली पाहिजे. ते जमले नाही तर आपलेपणा नाहीतर निदान सहवास घडावा म्हणून नाम घेतले पाहिजे. नामाच्या शक्तीची खरी कल्पना आली पाहिजे. नामाचा सहवास नाम घेतांना झाला पाहिजे. तो होत नाही कारण अद्यापि मनाची पूर्ण शुद्धी झालेली नाही. सोवळ्यातल्या आईजवळ देण्यासाठी जसे मुलाचे सगळे कपडे काढतात तसे संत आपल्याला नाम देऊन पवित्र करतात. मन पवित्र झाले, सूक्ष्म झाले म्हणजेच श्रीमहाराजांचा सहवास घडेल.

आज आपले मन प्रपंचात अडकलेले आहे. त्यातून ते सोडविण्यासाठी कर्तव्यबुद्धीने प्रपंच करावा. म्हणजे कर्मात आसक्ती असता कामा नये. आजच्या मनाच्या अवस्थेत ते अवघड आहे. खऱ्या अर्थाने कर्तव्य झाल्यास कर्म झाल्यानंतर त्याचा विसर पडेल. कर्मानंतर मनात कुठलेही तरंग येणार नाहीत. सध्या आपण जे कर्तव्य म्हणून करतो त्यात कुठेतरी मीपणा, अहंकार, ममत्व असते. ते नाहीसे होण्यासाठी हाच उपाय आहे. नामाला राम कर्ता ही जोड दिली तर ती जास्त उपयोगाची ठरते. म्हणून सावधानतेने नाम घ्यावे.

नाम चांगले झाले आणि व्यवहारात आलो की आपण नुसते घसरत नाही तर पूर्णपणे त्यात बुडतो. तेथे सावधानता पाहिजे. ही सावधानता राहाण्यासाठी चांगल्या विचारांची आणि सद्गुरूंच्या वचनांची आठवण ठेवावी.

श्रीमहाराज देहात असतांना पुष्कळ लोकांनी त्यांची (देहाची) संगत केली, अडीअडचणी विचारल्या, प्रापंचिक मार्गदर्शन घेतले. तरीपण श्रीमहाराज म्हणजे देहधारी विश्वशक्ती आहे अशी शुद्ध भावना फार थोड्यांची झाली. श्रीमहाराज हीच सूक्ष्म विश्वशक्ती अथवा परमात्मस्वरूप आहे हे मनात पक्के ठसले तर आज ते देहात नसतानाही त्या शक्तीची, त्यांच्या अस्तित्वाची भावना वाढविता येईल. मग नाम घेतांना नामाचा खरा सहवास घडेल. भाऊसाहेबांप्रमाणे मन श्रद्धासंपन्न झाले की जीवनातला कुठलाही प्रसंग अहिताचा वाटणार नाही. त्यामधे एक प्रकारची तटस्थता येईल. स्वामी रामदासांनी संन्यास घेतला पण त्यांच्या पत्नीची तिच्या शेवटच्या आजारात खूप सेवा केली. तथापि ही सेवा करतांना त्यात तटस्थता होती. ही बाई आपली पूर्वाश्रमीची पत्नी आहे अशी कर्तव्याची भावना आणि तटस्थता असा तो अपूर्व संगम होता.

## | ४४१ | (१७ नोव्हेंबर १९९५)

पू. बाबांनी आज प्रारब्धासंबंधी चर्चा सुरू केली. आत्मज्ञानी जरी झाला तरी त्यालाही प्रारब्ध भोगूनच संपवावे लागते. पण इतरांप्रमाणे त्यातून नवे बंधन निर्माण होत नाही. ह्या संदर्भात पू. बाबांनी नाथभागवताच्या तेराव्या अध्यायातील आत्मज्ञानी माणसाच्या अवस्थेचे वर्णन वाचून दाखवले. त्यातील काही ओव्या अशा :

"वृक्ष समूळीं उपडिला जाये। सार्द्रता तत्काळ न जाये। पत्र पुष्प फळ सार्द्र राहे। शुष्क होये अतिकाळें॥६३७॥ तेवीं अविद्या नासोनि जाये। भोगानुरूप दैव जें राहे। तेणें ज्ञाता वर्तताहे। निजदेहीं पाही विदेहत्वें॥६३८॥... देहाचें उत्पत्तिस्थितिनिदान। पुरुषासी वश्य नव्हे जाण। त्यासी अदृष्टचि प्रमाण। दैवयोगें चळण देहाचें॥६४२॥ उठणें कां बैसणें। तें देहासी दैवगुणें। अदृष्टगतीं देणें घेणें। खाणें जेवणें अदृष्टें॥६४३॥ स्वदेशीं कां परदेशीं। अदृष्ट नेतसे देहासी। स्वर्गनरक भोगासी। अदृष्ट देहासी उपजवी॥६४४॥ यश लाभ हानि मृत्यु। देहासी अदृष्टें असे होतू। ज्ञाता देहासी अलिप्तू। जैसा घटांतू चंद्रमा॥६४५॥ जैशी छाया पुरुषासरसी। तैसी काया सज्ञानासी। ते राहिली

अदृष्टापाशीं। निजकर्मासी भोगावया॥६४६॥...छाया विष्ठेवरी पडे। कां पालखीमाजी चढे। पुरुषासी सुखदुःख न जोडे। ज्ञात्यासी तेणें पाडें देहभोग॥६४९॥...जितुकें देहाचें वर्तन। तितुके अदृष्टास्तव जाण। अज्ञानासी देहाभिमान। त्यातें सज्ञान न धरिती॥६५४॥''

ह्या ओव्यांच्या अनुषंगाने चर्चा चालू असतांना पू. बाबांनी श्रीमहाराजांच्या चैतन्यगीतेच्या (विसाव्या) प्रारब्धाच्या अध्यायातील काही वचने वाचून दाखवली. त्यातील काही वचने येथे देत आहे.

१) प्रारब्धानुसार देहाची गति। तेथें न गुंतवावी आपुली वृत्ति॥

६) पांडव परमात्म्याचे सखे झाले। तरी वनवासांतून मुक्त नाहीं झाले॥

७) सुदामा भगवंताचा भक्त झाला। पण दारिद्र्यांतच राहिला॥

८) म्हणून देह प्रारब्धीं टाकावा। जें होईल तो आनंद मानावा॥

९) भगवंताचा जो झाला। त्याला देह प्रारब्धावर टाकतां आला॥

१३) देह सोंपवावा प्रारब्धावर। मन गुंतवावें नामावर॥

१५) देहाचे भोग देहाचे माथा। कष्ट न होती रघुनाथ स्मरतां॥

१७) देहाची गति प्रारब्धाचे हातीं। हा सिद्धान्त ठेवावा मनीं। काळ घालवावा रघुनाथचिंतनीं॥

२३) देहाचे भोग प्रारब्धानें आले। पण रामकृपेनें दूर झाले॥

२४) देह प्रारब्धाधीन हें जरी सत्य। आपण न सोडावा भगवंत॥

२५) देह टाकावा प्रारब्धावर। चित्त गुंतवावें रामावर॥

नंतर पू. बाबांनी काही आठवणी सांगितल्या.

एका बाईच्या एकुलत्या लहान मुलाच्या मृत्यूनंतर श्रीमहाराज तिच्या सांत्वनाला गेले. ती बाई मुलाबद्दल सांगू लागली तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, प्रथम माझे ऐकावे. ते म्हणाले, ज्यांच्यावर मुलासारखे प्रेम केले असे माझे कितीतरी मुलगे गेले आहेत. श्रीमहाराजांनी त्या बाईचे सांत्वन तर केलेच पण ती जेव्हां त्यांना काही खायला देऊ लागली तेव्हां म्हणाले आज काही खायचे नाही.

पू. तात्यासाहेब म्हणत की जिथे महाराज असत तिथे नित्य आनंद असे. ते दुःखी माणसाला त्याचे दुःख विसरायला लावत आणि देहबुद्धीत असला तरी त्यापलीकडचा आनंद देत.

चर्चेचा समारोप करतांना पू. बाबा म्हणाले, प्रारब्धावर विश्वास बसण्यासाठी किंवा प्रारब्ध मान्य होण्यासाठी साक्षित्वाने पहाता आले पाहिजे. साक्षित्व म्हणजेच universal awareness. प्रारब्ध जड न वाटता जिवंत वाटले पाहिजे. एखादी घटना घडतांना ती जितकी जिवंत, खरी वाटते तितके प्रारब्धही खरे वाटले पाहिजे; कारण ती घटना प्रारब्धानुसारच घडत असते. श्रीमहाराज सांगत की प्रपंचातले प्रसंग वेगळे न पाहता एकूण प्रपंचाचा स्वभाव ओळखला पाहिजे. हे जमले तर प्रारब्ध हा भगवंताचा खेळ वाटू लागेल. यासाठी पुष्कळ नाम घ्यावे. ते घेण्याची शक्ती द्या अशी श्रीमहाराजांची आळवणी करावी.

## |४४२| (२४ नोव्हेंबर १९९५)

**पू. बाबा** : वासना म्हणजे अतृप्ततेची जाणीव. वासना म्हणजे अज्ञानाने अथवा भ्रमामुळे अमुक झाले किंवा अमुक इच्छा पूर्ण झाली की समाधान होईल असे वाटणे. अर्थात हे समाधान फार थोडा काळ मिळते आणि नव्या इच्छा पुऱ्या करण्यासाठी मन धावू लागते. त्यामुळे अपूर्ण असलेल्या जीवनात सुखदु:खाचे अनुभव सारखे येत राहातात. भ्रम माणसाला पुन्हा पुन्हा इच्छातृप्तीच्या मागे ढकलतो. आज आपल्याला दृश्याचे प्रेम व खरेपण आहे. त्यामुळे ही अतृप्तीची वासना मारणे शक्य नाही. आपल्याच मनाने ह्या दृश्यातील वासनांचा नाश केला पाहिजे; आणि हे फक्त भगवंताचा आधार घेतला तरच शक्य आहे. आजचे आपले जे विकारी मन आहे त्या मनाने वासना नाहीशा करता येणार नाहीत पण त्या शुभवासना करता येतील. शुभवासना म्हणजे मला भगवंत हवा अशी वासना. हे करण्यासाठीच ज्ञानमार्ग, योगमार्ग, भक्तिमार्ग आहेत. त्यात भक्तिमार्ग तुलनेने सोपा आहे. वास्तविक तसा तो सोपा नाहीच.

श्रीमहाराजांनी साधकांचे तीन प्रकार सांगितले आहेत. पहिल्या प्रतीच्या साधकाला वाटतें की गुरु भेटले, आता काही करायचे राहिले नाही. दुसऱ्या दर्जाच्या साधकाला गुरु भेटले तरी आणखी काही तरी केले पाहिजे असे वाटते आणि तिसऱ्या दर्जाच्या साधकावर गुरुभेटीचा विशेष परिणाम होत नाही. केवळ या मार्गाकडे वळला म्हणून त्याला साधक म्हणावयाचे.

प्रत्येक प्रसंगात आणि घटनेत आपण श्रीमहाराजांशी संबंध जोडला पाहिजे. आपल्या वाट्याला आलेले कर्म त्यांच्या इच्छेने आलेले आहे असे वाटले तर हळूहळू फळाची आशा नाहीशी होईल आणि सर्व कर्मे त्यांना अर्पण होतील.

यासाठी कोणतेही कर्म करतांना सावधानता ठेवली पाहिजे. त्यामुळे विवेक आणि वैराग्य जागे राहून दृश्याचे प्रेम कमी होईल. काही बोलतांना किंवा करतांना हे श्रीमहाराजांना आवडेल का असा विचार करूनच बोलावे, करावे. मी हे आचरणात आणले आणि याचा मला खूप फायदा झाला. हा विचार सतत मनात ठेवला की वाईट बोलले जाणार नाही आणि एकूणच बोलणे कमी होईल आणि त्यांच्या अस्तित्वाची भावना वाढू लागेल. नाम घेतांना ते शक्तिमान आहे असा भाव ठेवावा. सर्व काही नाहीसे होऊन त्या विश्वशक्तीत विलीन होणे ही शेवटची अवस्था आहे. सद्गुरूंच्या कृपेनेच ती येते.

## |४४३| (१ डिसेंबर १९९५)

**पू. बाबा :** कृष्णमूर्ती म्हणत की जीवनाचे अंतिम सत्य आपल्या कल्पना, विचार, भविष्यासंबंधी विचार वगैरेंनी जाणता येणार नाही. बाहेर दृश्यात शोध घेऊन ते मिळणार नाही. त्यांच्या ह्या सांगण्यावर मी विचार केला. हे उघडच आहे की विचार हे कल्पनेपेक्षा दृश्याला जास्त धरून असतात. तथापि विचारांनी मनाच्या दृश्यासंबंधीच्या धडपडीतून आत जाणे जमणार नाही. त्यासाठी मन बदलणे हाच मार्ग आहे. भूतकाळात किंवा भविष्यकाळाच्या विचारात किंवा कल्पनात न रमता वर्तमानात म्हणजे फक्त आत्ताच्या ह्या क्षणात विचार बाजूला ठेवून आत पहा. कारण जे अनित्य आहे ते सोडून नित्य धरले पाहिजे.

आपले आजचे मन सत्त्व, रज आणि तम यांनी भरलेले आहे. चिकाटीने साधन करून रज आणि तम बाजूला सारून ते सत्त्वाने भरता येईल. पण तेवढे पुरेसे नाही. ते शुद्धसत्त्व झाले पाहिजे आणि ते फक्त गुरुकृपेने होईल. आपण मात्र प्रयत्नपूर्वक आत जाण्याचा अभ्यास केला पाहिजे. त्यासाठीच withdrawal - अलिप्त होणे आहे. आपलेपणा आणि ममत्व बाजूला ठेवून जग पाहाता आले पाहिजे. त्यासाठी गुरूच्या हातातले खेळणे झाले पाहिजे. सर्व काही त्यांच्या इच्छेने घडते असे मनोमन वाटले पाहिजे. कदाचित शरीराची म्हणजे बाह्यत्कारी अलिप्तता जमेल पण मनाने वेगळे होणे फार कठीण आहे. कशीही परिस्थिती असो, ती सद्गुरूंची कृपा आहे असे मनोमन वाटणे सोपे नाही. त्यासाठी प्रथम हवेनकोपण जायला हवे.

श्रीमहाराज म्हणत की गुरु विश्वाच्या नियमात बसत नाही. विश्वाच्या नियमांचे त्याला तसे बंधन नसते. आपले मन पालटण्यासाठी ध्येयनिश्चितीची

जरूर आहे. आपल्याविषयीच्या आपल्या कल्पना, आपला अधिकार, पैसा, सत्ता इत्यादी मनाला चिकटतात. ते मनाने बाजूला ठेवून राहाता आले पाहिजे.

पू. बाबा म्हणाले, आपले सध्याचे कर्म काळाच्या आलंबनाने होते. फळाच्या जाणिवेशिवाय कर्म करता येत नाही. पण आपल्याला श्रीमहाराजांच्या वचनाचा आधार आहे. त्यांचे आश्वासन असे : "तुम्हाला स्वत:ला कळत नाही इतके तुमच्या मनांत काय आहे तें मला कळते. तें ओळखून सुद्धा तुम्ही नाम घेता म्हणून मी तुमच्या मागेंपुढें चालतो....नामस्मरण करतांना तुम्ही मला पहात नसाल पण मी तुम्हाला पाहतो, कारण मी तुमच्या हृदयातच आहे." म्हणून नाम घेत राहाणे हेच केले पाहिजे. नाम आहे तिथे माझे प्राण आहेत हे श्रीमहाराजांचे वचन सतत आठवून आपण नाम घेतो तेव्हां श्रीमहाराज तिथे आहेत अशी श्रद्धा वाढविली पाहिजे. यासाठी सत्संगती उपयोगी ठरते. सत्संगतीने आपले मन नामाकडे वळते.

पू. बाबा शेवटी म्हणाले, जोपर्यंत दृश्याचे प्रेम आणि खरेपण आहे तोपर्यंत नामात मन रमणे शक्य नाही. प्रपंचात आपण कितीतरी वेळा लाचार होतो. तसे लाचार होऊन श्रीमहाराजांना प्रार्थना करावी. त्यांच्या मोठेपणाची जाणीव ठेवून मनाने त्यांचे मूल व्हावे. नाम घेत राहून मनोमन त्यांची प्रार्थना करून मदत मागणे अति आवश्यक आहे.

## |४४४|

मुक्काम गोंदवले. श्रीमहाराजांचा पुण्यतिथी उत्सव. रोज संध्याकाळी पू. बाबांबरोबर होणारी चर्चा सर्वश्री. रत्ननाभ, नारायण, नागराज व कु. विदुला यांनी ध्वनिमुद्रित केली होती. त्या ध्वनिफिती ऐकून पुढील संवादांचे संपादन केले आहे.

**|४४४.१|** (८ डिसेंबर १९९५) उत्सवाचा पहिला दिवस.

**पू. बाबा :** श्रद्धा म्हणजे काय ? ती वाढवायची कशी ? दरवर्षी इथं येण्यानं ती वाढेल का ? आज आपली पैशावर श्रद्धा आहे. ती या श्रध्देच्या आड येते आहे का ?

**साधक प :** खऱ्याची धारणा म्हणजे श्रद्धा. जे खोटं आहे त्याबद्दल श्रद्धा वाटणार नाही.

**पू. बाबा :** श्रत् हे सत्‌चं वैदिक रूप आहे. श्रत्+धा. सत्याची धारणा म्हणजे श्रद्धा.

**साधक प :** पण मग आमची पैशावर श्रद्धा आहे. पैसा खरा वाटतो.

**पू. बाबा :** जे खोटं आहे ते खरं वाटणं हा भ्रम आहे. म्हणजे खोट्यावरही ते खरं वाटून श्रद्धा असू शकते.

**साधक प :** पण मग खरं म्हणजे काय?

**पू. बाबा :** जे शाश्वत आहे ते खरं. त्यामधे शाश्वत सुखाची धारणा असते.

**साधक क :** ज्याच्यावर श्रद्धा असते ते खरं असलंच पाहिजे. आज मी श्रद्धेशिवाय जगूच शकत नाही. उद्या मी जगणार आहे ही श्रद्धाच आहे.

**साधक प :** आज माझी जीवनावर श्रद्धा आहे.

**साधक ब :** एखादी गोष्ट खरी आहे, पण ते मला माहीत नाही, तर साधनामुळे त्याबद्दल श्रध्दा निर्माण होईल का?

**पू. बाबा :** उदाहरणार्थ, आपण नाम सत्य आहे म्हणतो, पण आपल्याला ते पटलं आहे का? श्रद्धा ठेवणं हा मनाचा धर्म आहे का?

**साधक प :** कुठेच श्रद्धा नसली तर माणूस वेडा होईल. आज आपण अशाश्वतावर श्रद्धा ठेऊनच जगतो.

**पू. बाबा :** श्रद्धेच्या उलट संशय, अश्रद्धा नव्हे. संध्याकाळी घरी गेल्यावर हे माझेच घर आहे का असा संशय आला तर! म्हणजे श्रद्धेशिवाय आपण जगूच शकत नाही. प्रश्न आहे की ही प्रपंचातली श्रद्धा परमार्थाकडे कशी वळवावयाची?

**साधक ब :** त्यासाठी प्रथम मन मोकळं करावं लागेल. मनात भरलेला प्रपंच बाहेर काढावा लागेल.

**साधक प :** नेमकं इथंच आपण साधनावर येतो. साधन यासाठी आहे; नव्हे, ते साधनाचं मर्म आहे.

**साधक क :** मूळ श्रद्धास्थानात बदल होणं फार कठीण आहे.

**साधक प :** ज्या गोष्टी जीवनात मुळापासून आवश्यक आहेत त्या सर्वात शेवटी सुटतात. म्हणून इंद्रियविषयांपैकी जिभेवर ताबा आणणं सर्वात कठीण आहे.

**साधक क :** व्यवहारातल्या श्रद्धा आणि आध्यात्मिक श्रद्धा यांमधे मूलभूत फरक आहे. त्यामुळे तुम्ही म्हणता तशी व्यवहारातली श्रद्धा परमार्थाकडे वळवता येईल असे वाटत नाही.

**पू. बाबा** : म्हणजे दृश्यावरची माझी श्रद्धा परमार्थात उपयोगी पडणार नाही असं आहे का?

**साधक प** : मला वाटते, मनाने श्रद्धेचे रूप धारण केलेले असते. आज जे मन दृश्यातून सुख घेते त्याचे सुख घेण्याचे स्थान बदलावयाचे आहे.

**पू. बाबा** : हे सगळं बोलणं देहकेंद्रित आहे. मन केंद्रस्थानी ठेवून विचार करू या. उदाहरणार्थ, मला भगवंतावर प्रेम करावेसे वाटते पण करता येत नाही. ते का करता येत नाही? व्यवहारातल्या मनानं ते शक्य नाही का? की मन रिकामं केलं, त्यात भरलेला व्यवहार काढून टाकला तरच आध्यात्मिक श्रद्धा निर्माण होईल? आपल्याला दृश्य मनानं negate करता येईल का? असं पहा की ज्या वस्तूवर मी प्रेम करतो तिचं मला मूल्य असतं. उदाहरणार्थ, देह आणि पैसा. यांमधून मला शाश्वत सुख मिळणार नाही ही खात्री झाली म्हणजेच परमार्थ हे माझं सर्वोच्च मूल्य होईल.

**साधक प** : संसारात सुख नाही ही खात्री झाली तरी माणूस परमार्थाकडे वळेलच असे नाही. कदाचित त्याच्या मनात पोकळी निर्माण होऊन त्याला वेडही लागेल. म्हणून मग कोणीतरी सांगणारा (गुरु) लागतो. तिथे खरी श्रद्धेची गरज आहे.

**पू. बाबा** : यासाठीच विचार आणि विवेक यांचा उपयोग करून संसार negate केला पाहिजे. विचार आणि विवेक यांना वैराग्याची जोड नसेल तर संसार negate होणार नाही. यासाठी माझ्या गुरूंनी नाम घ्यायला सांगितलं आहे ना, ते मी घेणार ही श्रद्धा ठेवूनच सुरुवात करावी लागेल. आज आपण नाम घेतो म्हणजे श्रद्धा आहे पण अद्यापि नाम ही supreme value झालेली नाही. त्यासाठी प्रथम पैशाची, आप्तेष्टांची आणि शेवटी देहाची किंमत करावी लागेल. देहाची किंमत कमी करून पुन्हा तो साधनासाठी वापरावयाचा असल्याने नीट सांभाळावा लागेल. देह जाणारा असल्यामुळे फसवा आहे. म्हणून त्याच्यावर भरवसा ठेवायचा नाही.

**साधक प** : इथं खरं धाडस आहे.

**पू. बाबा** : धाडस खरंच, कारण आपलं अस्तित्वच देहामुळे आहे. आज त्याच्याशिवायच्या अस्तित्वाची आपल्याला जाणीव नाही. म्हणून देह सांभाळून पुन्हा त्याची किंमत शून्य करायची हे किती कठीण आहे. इच्छातृप्तीकडं ज्याचं लक्ष जात नाही तोच हे करेल.

**साधक क** : ज्या इच्छांच्या तृप्तीसाठी देहाची गरजच नाही अशा इच्छा तृप्त होऊ लागल्या की देहाची किंमत राहाणार नाही.

**पू. बाबा** : हे बरोबर आहे. मग देह टिकवण्यासाठीच्या अन्न, वस्त्र इत्यादी इच्छांबाबतही आहे आहे, नाही नाही अशी अवस्था होईल.

**साधक ब** : पण यासाठी सुरुवातीला देहापासून थोडं तरी वेगळं होता आलं पाहिजे. ते कसं व्हायचं?

**पू. बाबा** : श्रीमहाराज म्हणाले की आईबापांनी ठेवलेल्या नामाशी पुनरावृत्तीमुळे देहतादात्म्य होते तसं नामाची पुनरावृत्ती करून त्याच्याशी देहतादात्म्य करता आलं पाहिजे.

**साधक ब** : आजपर्यंत आयुष्यात ज्या गोष्टींची पुनरावृत्ती केली तीच येथे नडते आहे.

**पू. बाबा** : हे थोडं Paradoxical (विरोधाभासात्मक) आहे. तुम्ही म्हणता तो वास्तविक भ्रम आहे. तो देहबुद्धीतून आलेला आहे म्हणून सोडावाच लागेल. कृष्णमूर्तीही म्हणतात की याच्यातून जाणं फार कठीण आहे. वर्षानुवर्ष माणसं इथं येतात पण त्यांच्यात काही बदल झालेला दिसत नाही. अशी spiritually dead किंवा शिळी माणसं पाहून श्रीमहाराजांना काय वाटत असेल? डॉ. पाथरकरांच्या पत्नीला श्रीमहाराज एकदा म्हणाले, त्याच त्या गोष्टी बोलायचा आणि करायचा तुम्हाला कंटाळा नाही का येत? बरं हे जमत नाही हे लक्षात आल्यावर श्रीमहाराजांपुढं, बघा तुम्ही, म्हणून सपशेल लोटांगणही नाही घातलं जात. ते जमलं तरी कर्तेपण जाईल. आता म्हातारपणी तरी ते व्हायला काय हरकत आहे? मी कर्ता नाही हे धाडस करायचं म्हणजे काय ते सांगा.

**साधक प** : माझं कर्तेपण जाऊन लगेच ते कोणाकडे तरी म्हणजे श्रीमहाराजांकडे गेले पाहिजे. नाहीतर व्हॅक्यूम होईल; तो सहन होणार नाही. त्यांना कर्तेपण देता आलं पाहिजे.

**पू. बाबा** : पण ते देणंही श्रद्धेशिवाय शक्य नाही.

**साधक प** : कर्तेपण देता येत नाही कारण मला परिस्थिती कळते असं वाटतं. परवा मुंबईत वीज गेली तर ते श्रीमहाराजांच्या इच्छेनं झालं असं नाही वाटलं; मध्यप्रदेशात जास्त वीज गेली म्हणून झालं, म्हणाले. पण तिकडे त्यांनीही श्रीमहाराजांच्या इच्छेनं घेतली असं वाटत नाही. रोजच्या जीवनातल्या अगदी साध्या वाटणाऱ्या गोष्टी देखील त्यांच्या सत्तेने घडतात असं वाटलं पाहिजे. डास चावला की लगेच डास फार झाले आहेत, फवारा मारला पाहिजे,

डासांसाठीची अगरबत्ती लावली पाहिजे इत्यादी विचारचक्र सुरू होतं. माझं म्हणणं ते सगळं तुम्ही करा पण डास चावला तेव्हां ते श्रीमहाराजांच्या सत्तेनं झालं हे ओळखून त्यासंबंधीच्या विचारात गुरफटू नका.

**पू. बाबा** : त्यासाठी ती सत्ता सर्वव्यापी आहे हे जाणवलं पाहिजे.

**साधक प** : आज श्रद्धा नसेल पण विचारपूर्वक प्रत्येक गोष्टीचा त्यांच्याशी संबंध जोडायला सुरुवात करावी.

**पू. बाबा** : गीतेच्या १८ व्या अध्यायात हेच सांगितले आहे. तू लढ पण मी निमित्तमात्र आहे हे ध्यानात ठेव. ते नाचवताहेत आणि मी नाचतो आहे हे मनात ठसलं तर अहंकार राहीलच कुठे? ही खरी आध्यात्मिक प्रगती आहे.

**साधक क** : ही श्रद्धा येते कशी?

**पू. बाबा** : नामाच्या सत्तेची आपल्याला कल्पनाच नाही. श्रीमहाराज म्हणाले की नामाला देहबुद्धीचा बांध घालू नका. मी नाम घेतो तेही त्यांच्या सत्तेनेच घेतो आहे याची सारखी जाणीव राहिली पाहिजे. यासाठी सावधानता ठेवावी लागेल. स्वामी रामदासांनी एका बाईला अनुग्रह दिल्यावर ती म्हणाली की या जन्मात मला ईश्वरदर्शन होऊ दे. तेव्हां ते म्हणाले why not now !

**साधक प** : आपलं धाडस नसतं. त्यामुळे आपण सगळं पुढे ढकलत राहातो. कर्तेपणा त्यांना द्यायचा अभ्यास उद्यापासून करीन म्हणतो.

**पू. बाबा** : मी आज प्रपंचाचा आहे. ते सोडून महाराजांना दत्तक जायचं आहे. पण त्याची तयारी नाही. मग इथं यायचं कशाला? इथं नामाचं पीक आहे पण त्याची गोडी कितीजणांना आहे? म्हणजे आता नामच घेईन, दुसरं काही करणार नाही. जे घडत जाईल ते घडू दे अशी कितीजणांची तयारी आहे? Let us be frank! 'अब तो जीवन हारे' असं वाटलं पाहिजे.

**|४४४.२|** (९ डिसेंबर १९९५) गोंदवले.

**पू. बाबा** : भावना म्हणजे काय? प्रेम, भीती, द्वेष या भावना आहेत. जितका मी खरा तितकी भावनाही खरी असते. तथापि भावना तात्पुरती असते आणि अभ्यासाने ती टिकू शकते. पण तरीदेखील भावनेची एकच उंची कायम टिकत नाही. भावनेची तीव्रता टिकवणे अवघड आहे आणि ती टिकवणे देहाला सहन होणार नाही.

**साधक प** : स्वामी रामतीर्थ अमेरिकेत व्याख्याने देत तेव्हां त्यांना भावनेचा आवेग सहन करणे कठीण जात असे. बोलतांना डोळ्यांतून अश्रू वाहू

लागत आणि ते स्तब्ध होत. ते पाहून विल्यम जेम्स म्हणाला की हे फार दिवस जिवंत राहाणार नाहीत. क्षमा करा, पण मला वाटतं की ज्ञानेश्वर महाराजांनी लहान वयात समाधी घ्यायचं कारण हेच असावं. ज्ञानेश्वरी, अमृतानुभव आणि शेकडो अभंग रचतानाची त्यांची धारणा आणि भावनेची पातळी यांचा देहावर परिणाम झालाच असणार.

**साधक क** : खरा साधक असेल त्याच्या भावना सद्‌गुरूंच्या आठवणीनं उचंबळणारच.

**पू. बाबा** : कल्याण स्वामींचा एक अभंग आहे. "मज तो आवडतो मम स्वामी। निशिदिनि अंतर्यामीं॥" या आठवणीत सर्वकाळ तीच उंची असेल असं नाही, पण अनुसंधान म्हणजे आणखी दुसरे काय? आनंदसागर आणि श्रीमहाराज यांची शेवटची भेट झाली ते दृश्य भाऊसाहेब सांगत असत. आनंदसागर आले असे ऐकल्यावर श्रीमहाराज मंदिराच्या दारात आले. एकमेकांना पाहून दोघांच्याही डोळ्यात अश्रू आले. आनंदसागर स्तब्ध उभे राहिले. अष्टसात्त्विक भाव जागे झाल्यामुळे ते पुढे जाईनात. ते पाहून अरे अरे म्हणून श्रीमहाराज पुढे आले आणि आनंदसागरांना त्यांनी आलिंगन दिले. भावनेचा उद्रेक होऊन दोघेही सुमारे पाच मिनिटे रडत होते. पुढे महिना दीड महिना आनंदसागर गोंदवल्यास राहिले. जातांना नदी ओलांडून दहीवडीच्या बाजूस गेले तेव्हां ते दिसेनासे होईपर्यंत श्रीमहाराज कमरेवर हात ठेवून त्यांची पाठमोरी आकृती पहात उभे होते. यावेळीही भावना होतीच पण तिचा पहिल्यासारखा उद्रेक नव्हता. सर्वाभूती भगवद्‌भाव पहातांना ही भावनिक अवस्था असते.

**साधक क** : भावना आणि विचार यांचा समतोल असणं आवश्यक आहे का?

**पू. बाबा** : संतांच्या चरित्रात जे भक्त आहेत त्यांच्या बाबतीत विचाराला महत्त्वच नाही. त्यांना कळत नाही असं नाही, पण त्यांना होणारं ज्ञान तादात्म्यानं होत असल्यामुळे तेथे विचार लटका पडतो. दुसऱ्याचं अंत:करण ओळखणं हे ज्ञान आहे. श्रीरामकृष्ण म्हणाले ना की काचेच्या कपाटात ठेवलेल्या वस्तूंसारखं दुसऱ्याचं अंत:करण मला दिसतं. श्रीमहाराज मला म्हणाले होते की आलेल्या मनुष्याच्या मनात काय आहे ते मला कळतं पण व्यवहाराच्या उलट मी बोलत नाही.

काही माणसांत भावना प्रधान असते, काही विचारप्रधान असतात. जर आपलं मन रिकामं करता आलं तर आपण कोणत्या बाजूला जास्त आहोत ते माणसाला कळेल.

**साधक क** : विचारप्रधान मन भावनेकडे वळू शकेल का?

**पू. बाबा** : एक उदाहरण सांगतो. आगरकर वारले तेव्हां लोकमान्य टिळक त्यांच्यावरचा अग्रलेख लेखनिकाला सांगत होते. सांगतांना फेऱ्या मारत होते. सांगायचे थांबले म्हणून लेखनिकाने वर पाहिले तर ते स्तब्ध उभे होते आणि त्यांच्या डोळ्यांतून अश्रू वाहात होते. वास्तविक त्या दोघांचं बिनसलं होतं तरी हे! याला काय म्हणाल तुम्ही? काही क्षण असे गेल्यावर स्वत:ला सावरून ते लेखनिकाला म्हणाले, I am a man of dry emotions. भावना आवरायला शक्ती लागते; नाहीतर ती विचारांना झाकून टाकते.

आपला मुद्दा भावना कशी वाढवायची हा आहे. त्यासाठी प्रथम भावना शुद्ध झाली पाहिजे. म्हणजे भावनेतून विकार गेले पाहिजेत. विशेषत: द्वेष अतिशय वाईट असे श्रीमहाराज म्हणत असत. द्वेषाचे मूळ नावडीत असते. नावड वाढत गेली की द्वेष निर्माण होतो. Intense dislike is hatred. प्रेमाच्या अगदी उलट असेल तर द्वेष. माणसांमाणसातच नव्हे तर राष्ट्राराष्ट्रात द्वेष आहे. तुम्हाला त्रास देणारा, निंदा करणारा माणूस आहे. त्याच्याबद्दल प्रेम जाऊच द्या पण द्वेष न वाटणं किती कठीण आहे. द्वेषाचं मूळ स्वार्थात आहे. जप करतांना मन निर्मळ पाहिजे. त्यासाठी द्वेष, कामभावना, लोभ इत्यादी विकार कमी झाले पाहिजेत. हे सगळं श्रीमहाराजांच्या प्रेमाच्या आड येतं ह्याची खंत वाटली पाहिजे.

**साधक प** : जिथे उघड द्वेष किंवा मत्सर कळला आहे आणि त्याचं वाईट वाटतं आहे तिथं धाडस करून त्या माणसाला भेटून क्षमा मागावी, म्हणजे त्या भावनेचा निचरा होईल.

**पू. बाबा** : I have gone through it !

**साधक प** : त्यात धाडस आहे.

**पू. बाबा** : धाडस म्हणजे अपमान सहन करावा लागेल. पण अंत:करण शुद्ध होईल हे निश्चित. माझंच सांगतो. मानसपूजेत श्रीमहाराजांच्या अंगावर लाल चट्टे दिसले. अंगावर पित्ताच्या गांधी उठल्या की सगळं लाल लाल दिसतं तसं. मी म्हटलं की महाराज हे काय आहे? ते म्हणाले तुम्ही अमक्याचा द्वेष करता म्हणून मला त्रास होतो. अरे बापरे! ऐकल्यावर मला रडायला आलं हो! त्याच

दिवशी सकाळी त्यांच्या घरी गेलो. श्रावणी होती. गेलो आणि त्यांच्या पाया पडलो.

**साधक प :** बोलून, मला वाटतं, निचरा होतो आणि वातावरण निवळतं.

**पू. बाबा :** असं होईलचं असं नाही. त्याला कदाचित हा ढोंगी आहे असंही वाटेल म्हणून तेही सहन करायची तयारी पाहिजे. ज्ञानेश्वर महाराजांची किती अवहेलना झाली, पण किती शुद्ध अंत:करण त्यांचं. पसायदानात त्यांच्या मनाची उंची आणि श्रीमंती दिसून येते. श्री. खैरनार कृष्णमूर्तीजवळ नऊ वर्षे होते. ते म्हणाले की कृष्णमूर्तींनी कोणालाही नांवे ठेवलेली त्यांनी कधी ऐकले नाही. वास्तविक राजगोपालने त्यांना किती त्रास दिला तुम्हाला माहीत आहे. पण त्याबद्दलही कधी अवाक्षर नव्हते. व्याख्यानाखेरीज इतर वेळी ते नम्रपणे हळू बोलत. संकोची स्वभाव होता त्यांचा.

भावनेचं सांगतो. पू. तात्यासाहेबांचा मुलगा आजारी होता. हृदयाला सूज होती. त्याच्या आईला याची कल्पना नव्हती. पुढं आठ दिवसांनी त्याला बरं वाटू लागल्यावर हे मी त्यांना सांगितलं तेव्हां त्या म्हणाल्या माझी दोन मुलं गेली. महाराजांच्या इच्छेनं गेली. हा जगणार असेल तर त्यांच्या इच्छेनंच जगणार. मी म्हटलं, हा गेला असता तर? कल्पनेने क्षणभर त्यांना भरून आलं आणि म्हणाल्या, खचित वाईट वाटलं असतं पण पुढे समाधान टिकलं असतं! म्हणजे भावनासुद्धा अशी तयार व्हायला पाहिजे; आणि त्यासाठी तो कर्ता आहे हे फार उपयोगी पडतं. नामस्मरणाने आपल्यावर जर कोणता परिणाम प्रथम होत असेल तर तो हा आहे. अंत:करण शुद्ध होतं. साधनाच्या आड येणारे संशय नाहीसे होतात.

मघाशी मी म्हटलं ना की मन रिकामं करता आलं तर लवकर परिणाम होईल, ते कसं करावं? त्याला उपाय म्हणजे मनात सारखा एकच विचार ठेवायचा. याला monoidism म्हणतात. मनाला सारखं नामाभोवती आणि नामाच्या विचाराभोवती गुंतवून ठेवायचं. मग हळूहळू बाकीचे विचार नाहीसे होतील आणि आत्मपरीक्षण करणं सोपं जाईल. आज आपण सर्वस्वी महाराजांचे झालेलो नाही. फक्त मधून मधून आठवतं की मी त्यांचा आहे. अभ्यास करून मी सांगतो की सुरुवातीला पाच मिनिटं, दहा मिनिटं दुसरं काही नाही, मी त्यांचा आहे हा विचार टिकवायचा प्रयत्न करावा आणि हळूहळू वेळ वाढवावा. मग आतून येऊ लागेल की महाराज मी तुमचा आहे. त्यानंतर मी जगाचा आहे हे हळूहळू कमी होऊ लागेल. यासाठी चिकाटी पाहिजे. त्यात

शरणागतीचं बीज आहे. शेवटी, मी सर्वस्वी तुमचा आहे म्हटलं की संपलं! त्यांना नाम जितकं आवडतं तितकं मला आवडू लागलं की मी खरा त्यांचा झालो. भाऊसाहेबांनी ते केलं. महाराजांना सांगितलं की आपली जबाबदारी संपली, म्हणाले.

तुम्हाला हे सांगायचं कसं सुचलं सांगतो. ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायातील अभ्यासासंबंधीच्या ओव्या पहात होतो. त्यात "जैसा शरत्कालु रिगे। आणि सरिता वोहट्टू लागे। तैसे चित्त काढेल वेगें। प्रपंचौनि॥" अशी ओवी आहे. जसजसे श्रीमहाराजांचे होत जाऊ तसतसे प्रपंचापासून आपोआप वेगळे होत जाऊ.

**साधक** : अभ्यासयोगाच्या त्या सगळ्याच ओव्या फार छान आहेत.

"अथवा हें चित्त। मनबुद्धीसहित। माझां हातीं अचुंबित। न शकसी देवों॥ १०४॥
तरि गा ऐसें करी। यां आठां पाहारांमाझारीं। मोटकें निमिषभरी। देतु जाय॥ १०५॥
मग जें जें कां निमिख। देखेल माझें सुख। तेतुलें अरोचक। विषयीं घेईल॥ १०६॥
जैसा शरत्कालु रिगे। आणि सरिता वोहट्टू लागे। तैसे चित्त काढेल वेगें। प्रपंचौनि॥ १०७॥
मग पुनवेहूनि जैसें। शशिबिंब दिसें दिसें। हारपत अंवसे। नाहींचि होय॥ १०८॥
तैसें भोगाआंतूनि निगतां। चित्त मजमाजीं रिगतां। हळूहळू पांडुसुता। मीचि होईल॥ १०९॥
अगा अभ्यासयोगु म्हणिजे। तो हा एकु जाणिजे। येणें कांहीं न निपजे। ऐसें नाहीं॥ ११०॥
- ज्ञानेश्वरी अध्याय १२.

**पू. बाबा** : आपण मनाला सांगावं की अरे, त्यांना जे आवडतं ते मला क्षणभरासाठी आवडू दे. हे जमलं की हळूहळू भावना तयार होऊ लागेल. नामाची आवड निर्माण होणं सोपं नाही पण भावना जागृत झाली की अवघडही नाही. आणखी पहा की त्याला विद्वत्ता लागते असंही नाही.

**साधक ब** : उलट बरेच वेळा ती आडच येते.

**पू. बाबा** : त्या बाबतीत ब्रह्मानंद महाराज आदर्श आहेत. माझी विद्या घ्या, म्हणाले. त्यांनी जिह्वा नामाला विकली. दादा कॉमर्सचा विद्यार्थी. मला म्हणाला, बाबा, तुम्हाला कल्पना नाही. वस्तू एकदा विकली की तुमचं स्वामित्व संपलं. sold out. जीभ त्यांची राहिलीच नाही. तिच्यावर नामाचं स्वामित्व आलं. भावना वाढली पाहिजे पण त्याचबरोबर थोडा विचारही पाहिजे. मूल वाढायला लागलं की त्याचे सगळे अवयव जसे प्रमाणात वाढतात तशी आध्यात्मिक वाढ झाली पाहिजे.

**साधक प** : भावना वाढू लागली की विचार शुद्ध होतील, त्यांची शक्ती वाढेल.

**पू. बाबा** : शक्ती वाढेल आणि सिद्धी येतील. पण गुरूंचं पाठबळ असलं की त्यांपासून साधनाची हानी होणार नाही. ते बरोबर सांभाळतील.

**साधक थ** : आमचे गुरु म्हणाले की नाम घेतांना मनाची एक विशिष्ट अवस्था असते, ती नाम घेणं थांबल्यावर व्यवहारातसुद्धा किती टिकते इकडे लक्ष द्यावं म्हणजे प्रगती होते आहे ना ते समजतं.

**पू. बाबा** : उदाहरण घेऊन सांगा.

**साधक थ** : नाम घेतांना हा मुलगा महाराजांनी दिलेला आहे, माझा नाही असं मनातून आलं तर व्यवहारातही मनाची ती धारणा टिकते आहे ना हे पहावं. साधकाची प्रगती होऊ लागेल तसतशी ती धारणा जास्त काळ टिकू लागेल.

**पू. बाबा** : खरं आहे. मग डॉ. आठवल्यांचा तो पेशंट महाराजांच्या कृपेनं कॅन्सर झाला आहे म्हणाला ती अवस्था येईल. जे होतं आहे ते चांगल्यासाठीच अशी खात्री होऊन अशुभाची जाणीव कमी होऊ लागेल. अशाश्वताचा हा धर्मच आहे हे उमजेल. हीच कृपा. अंत:करण स्वच्छ झालं की त्यामधे त्यांच्या कृपेचं प्रतिबिंब स्पष्ट दिसू लागतं. आजही त्यांची कृपा आहेच. पण आपलं मन गढूळ असल्यामुळे त्यात कृपेचं प्रतिबिंब दिसत नाही. आज आपली भावना मुलंबाळं, पैसा, देह इत्यादी अनेक ठिकाणी वाटली आहे. ती एके ठिकाणी श्रीमहाराजांवर किंवा नामावर आणायला पाहिजे. एक तर मघाशी म्हटल्याप्रमाणं ती नामाकडं वळली तर हळूहळू प्रपंचाचं प्रेम कमी होईल. नाहीतर विवेकानं हे करावं लागेल. ज्याची भावना शुद्ध आहे अशाचा सहवास घडला तर हे सोपं होईल. हुबळीला मारुतीच्या मंदिराचं उद्‌घाटन झालं त्यावेळी केलेल्या निरूपणात श्रीमहाराज म्हणाले की दास्यभावाचा जर प्राण असेल तर तुम्ही माझा भोग घ्या, मला वापरा असं वाटलं पाहिजे. सर्वस्व वाहिलं पाहिजे; आणि ते मारुतीरायांनी केलं.

**|४४४.३|** (१० डिसेंबर १९९५) गोंदवले.

**पू. बाबा** : भाव म्हणजे असणेपणाची जाणीव. आज माझ्याजवळ भाव आहे का? असला तर तो कशाचा आहे?

**साधक** : माझ्या अस्तित्वाची मला खात्री आहे.

**पू. बाबा** : देहाच्या असणेपणाची खात्री आहे. देह म्हणजेच मी असे वाटते. जशी ही खात्री आहे तशी ईश्वराच्या किंवा गुरूच्या असणेपणाची पूर्ण खात्री झाली पाहिजे. आज मला दृश्याचा भाव आहे. त्यामुळे गुरु होते तेव्हांही लोकांनी त्यांना देहात पाहिले. त्यांचे खरे स्वरूप फार थोड्यांना समजले. ब्रह्मानंद महाराज बरोबर म्हणाले की महाराज हे माणूस नाहीत. माझी देहबुद्धी गेल्याशिवाय मला दृश्यापलीकडे जाता येणार नाही. जीवभाव जाऊन शिवभाव यावयाला जीवभाव विरघळला पाहिजे. मी जिवंत आहे याची जितकी खात्री आहे तितकी त्यांच्या अस्तित्वाची खात्री झाली पाहिजे.

**साधक प** : हे अपूर्ण वाटते. आपण फक्त जागेपणाचाच (conscious living ) विचार करतो आहोत. झोपेत किंवा स्वप्नात मी कोठे असतो ?

**पू. बाबा** : हा महत्त्वाचा मुद्दा आहे. देहबुद्धी आणि देहभाव यात थोडा फरक आहे. देहबुद्धी तीन्ही अवस्थांना व्यापून राहाते. देहभाव फक्त जागेपणी असतो.

**साधक प** : जागेपणीसुद्धा मी आहे असा भाव नसतो. रस्त्यात एखाद्याला विचारलं की तुझा भाव काय आहे तर त्याला कळायचं नाही, तुम्ही काय विचारताय ते.

**पू. बाबा** : जागृत अवस्थेत सुद्धा आपल्याला सर्वकाळ मी आहे हा भाव नसतो तर भाव म्हणजे तुम्हाला काय म्हणायचंय ?

**साधक प** : मी जिवंत असूनसुद्धा स्वत:बद्दलचा भाव मला ठेवता येत नाही तर मी दुसऱ्याबद्दलचा भाव कसा वाढवणार ? त्यासाठी आधी माझ्या तीन्ही अवस्थांना व्यापून असलेल्या भावाचा मी अभ्यास केला पाहिजे.

**पू. बाबा** : याचं खरं महत्त्व सांगतो. गेले ३-४ दिवस आपण श्रीमहाराजांच्या घरी आलो आहोत पण त्यांच्या अस्तित्वाची किती जाणीव राहाते ? साधक प म्हणतात त्याप्रमाणे माझ्या स्वत:च्या अस्तित्वाची चोवीस तास उघड जाणीव नसते तर त्यांच्या अस्तित्वाची जाणीव कशी ठेवता येईल ? मुद्दा तिथे आहे. ही जाणीव नसण्याचं कारण अज्ञान हे आहे. म्हणून ज्ञान झाल्याशिवाय ती जाणीव राहाणार नाही. ज्ञान झालं की भाव आपोआप येईल. आज भाव नाही असं नाही; अज्ञानामुळं त्याचा विसर पडला आहे. म्हणून स्मरण करून तो जागा करायचा आहे.

**साधक क** : तुमची स्वत:ची स्वत:बद्दलची कल्पना किंवा तुम्ही स्वत:ला काय समजता हा तुमचा भाव.

**पू. बाबा** : कल्पना नव्हे संकल्पना concept, imagination नव्हे. या भावालाच आपण व्यक्तिभाव म्हणतो. माझ्या व्यक्तिमत्त्वाचं गुरूंच्या व्यक्तिमत्त्वात म्हणजेच गुरूंच्या भावात रूपांतर कसं करायचं?

**साधक ब** : यामधे माझं व्यक्तिमत्त्व आड येतं ते नाहीसं करावं लागेल. मी नाही, तू आहेस. आज मी जो आहे तो खोटा किंवा फुसका आहे आणि तरीही तो आड येतो.

**पू. बाबा** : खोटा आहे म्हणूनच आड येतो. अज्ञानाचं हे वैशिष्ट्य आहे. ते ज्ञानाला झाकून टाकतं. तथापि एक सोय आहे. माझं व्यक्तिमत्त्व मला त्यांच्या व्यक्तिमत्त्वात समरस करता येईल. प्रेमानं हे घडेल. दुसरा मार्ग आज्ञापालनाचा. त्यांनी सांगितलं आहे ना की मी नामात आहे म्हणून; मग कसे आहेत हा विचार करायचा नाही. नामाचा धोशा लावायचा. ज्ञानेश्वर, महाराजांनी म्हटलं आहे ''जयत्याज्ञा नमस्तस्यै दर्याद्रायै निरन्तरम्'' आज्ञा म्हणजे तो सर्वज्ञ आहे. सर्वशक्तिसमन्वित आहे. तथापि भाऊसाहेब म्हणाले तसं एक गोष्ट त्याला करता येत नाही. तो दुसऱ्याचं अकल्याण करू शकत नाही. मी अज्ञानी आहे, असमर्थ आहे म्हणून त्यांच्या पायावर लोळण घ्यावी. Surrender पांढरं निशाण! ब्रह्मानंद महाराजांनी कमाल केली. कष्टानं मिळवलेली विद्या गुरुचरणी अर्पण केली. आपण निश्चय करावा. मी नाम घेतो आहे ना, आता ते पाहातील काय करायचं ते! श्रद्धासंपत्ती ती हीच. Surrender body, heart and soul in the Divine is religion. म्हणजे मी नाहीच. हे खरं व्हायला पाहिजे. त्याच्यामधे मग दोन गोष्टी येतील. १) माझ्या करण्याला सत्यता येईल आणि २) त्याला भावनात्मक अंग येईल. त्यांची आवड ती माझी आवड होईल. ''पवित्र तो देह वाणी पुण्यवंत। जो वदे अच्युत सर्वकाळ॥''

आता आणखी एक प्रॉब्लेम काढू का? भाव हा स्थिर असू शकतो तसा अस्थिरही असू शकतो. काही लोक असतात, सत्यनारायण काय; गणपती उत्सव काय, झांजा, आरत्या टिळेमाळा करतात आणि घरात अचानक काही अपमृत्यू वगैरे झाला की सगळं बंद! माझा देवावरचा विश्वास उडाला म्हणतात. महाराजांनी असं कसं केलं म्हणतात. पण भाऊसाहेबांचंच नव्हे तर त्यांच्या सुनेचंही सगळं निराळं! प्रत्यक्ष पाहिलेलं सांगतो. पू. तात्यासाहेब गेले तेव्हां मी ताईंना (पू. तात्यासाहेबांच्या पत्नी) जरा आडवळणानं सांगितलं की ते गेले. एक क्षणभर त्या थांबल्या आणि म्हणाल्या, 'महाराजांची इच्छा.' किती कठीण आहे. बासष्ट वर्षांचा सहवास. तर त्या काय म्हणाल्या, 'महाराजांनी मला या

घरात आणलं तेव्हां यांच्या मांडीवर मृत्यू यावा अशी माझी इच्छा होती. पण महाराजांची इच्छा तशी नव्हती.' पहा, ही बाई कुठे शिकलेली नव्हती, काही नव्हती पण हा भाव! हा स्थिर भाव. हा साधला पाहिजे. तू करशील ते बरोबर आहे ही मनाची प्रतिक्रिया झाली की भाव स्थिर झाला. बरोबर आहे, मला सहन होत नाहीये, पण ते बरोबरच आहे. श्रीमहाराजांसारखा ब्रह्मज्ञानी पुरुष चुकेल कसा? मी एक सुचवू का? आज माझी जी परिस्थिती आहे त्यात प्रत्येक गोष्ट तुझ्या इच्छेनं घडते आहे असं मनांत आलं नाही तरी म्हणत राहायचं. सारखी स्वत:ला सूचनाच द्यायची. मला हे का सुचलं ते सांगतो. श्रीरामकृष्णांनी त्या कोष्टयाची गोष्ट सांगितली आहे ना; काही झालं तरी रामइच्छा! तसं घरात काही गडबड झाली तरी तुमची इच्छा, फायदा झाला, तुमची इच्छा, नुकसान झालं, तुमची इच्छा; अगदी आठवून स्वत:ला शिकवत राहायचं. हा अभ्यास आहे. कोणी आपला अपमान केला तर त्या माणसाचा आपण तिरस्कार करतो. पण तो नांवाला पुढे आहे, श्रीमहाराज सर्वकाही करवीत आहेत असं मनात आलं पाहिजे. याला आणखी एक पार्श्वभूमी आहे. माझ्या घराचे ते मालक आहेत, कुटुंबप्रमुख आहेत अशी जाणीव झाली पाहिजे. म्हणजे मग मी आणि माझ्या सगळ्यावर त्यांचं स्वामित्व येईल. मग नामस्मरण सुद्धा ते करून घेतील. लहान मूल जसं प्रत्येक गोष्ट आईला सांगतं तसं त्यांचं मूल व्हावं. साधलं ना, तर फार रम्य आहे ते! आठवण ठेवायची खुबी आहे. अहो, नव्या चपला आणल्या तरी पू. तात्यासाहेब त्या महाराजांना दाखवून मग घालायचे! आपल्या प्रत्येक कृतीत त्यांना ओवता आलं पाहिजे. हे करता येईल की नाही? आपण विसरतो, पण नामाला हे सगळं पाहिजे बघा. भाऊसाहेब म्हणायचे तसं प्रत्येक गोष्ट त्यांच्या कानावर घातली की आपली जबाबदारी संपली. ते आपण शिकलं पाहिजे.

**।४४४.४।** (११ डिसेंबर १९९५) गोंदवले.

**साधक ४** : भगवंतांनी गीतेत "दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया। मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते॥७.१४॥" असं सांगितलं आहे. मामेव ये प्रपद्यन्ते - जे केवळ मलाच निरन्तर भजतात. मला वाटतं, त्यासाठी नामाचं चिंतन झालं पाहिजे.

**पू. बाबा** : खरं आहे. आपण नामस्मरण करतो. नामाचं चिंतन करीत नाही. तथापि तुम्ही म्हणता ते नामाचं चिंतन कसं करायचं ते सांगा.

**साधक थ** : "कृष्ण विष्णु हरि गोविंद। या नामाचे निखळ प्रबंध। माजी आत्मचर्चा विशद। उदंड गाती॥९.२१०॥" मला वाटतं, या ज्ञानेश्वरीमधल्या ओवीत चिंतनासंबंधी सांगितलं आहे. नामाच्या बाबतीत तीन पायऱ्या सांगता येतील. नाम म्हणणं, नाम घेणं आणि नाम होणं यामध्ये वैखरीपासून पश्यन्तीपर्यंतचा प्रवास आहे. मनाला आकर्षित करणारा तो कृष्णच विष्णु म्हणजे सर्वव्यापी आहे. इंद्रियांचा स्वामी आहे. आकाश आणि अवकाश भिन्न नाहीत, तसे नाम आणि नामी भिन्न नाहीत. हे चिंतन करत करत सगुणातून निर्गुणात जाता येईल. चिंतनें चिंतनें तद्रूपता असे तुकाराम महाराजांनी सांगितले आहे.

**साधक** : मंत्र वेगवेगळे असले तरी सर्वांचं स्वरूप एकच आहे.

**पू. बाबा** : तथापि नाम घेतांना नामीची, निदान गुरूंची तरी आठवण होते का?

**साधक ब** : खरं आहे; नाम घेतलं तरी चिंतन होत नाही. नाम आणि नामी यात भेद नाही याचं चिंतन कसं करायचं?

**पू. बाबा** : खरं सांगू, त्यासाठी नामाला वाहून घेतलं पाहिजे. यासाठीच सत्संग पाहिजे आणि तो मिळणं कठीण आहे. ग्रंथ आहेत पण ते वाचतांना मी बाजूला ठेवला पाहिजे. वाचतांना ते मलाच सांगत आहेत असा भाव पाहिजे. मग एक ओवीदेखील पुरेशी होईल. तिचं चिंतन होईल. हा अभ्यास आहे. कालपासून आपली भावासंबंधी चर्चा चालली आहे. "बोलावा विठ्ठल पहावा विठ्ठल करावा विठ्ठल जीवभाव" असं तुकाराम महाराजांनी सांगितलं आहे. विठ्ठल जीवभाव करायचा म्हणजे माझा आधीचा जो जीवभाव आहे त्या ठिकाणी विठ्ठल आणायचा आहे. आज माझा भाव काय आहे?

**साधक थ** : आज माझ्या स्वत:संबंधी काही कल्पना आहेत, तसेच माझे अस्तित्व प्राणावर आहे. अहंकार आहे. या सर्वांचा मिळून मी बनलेला आहे. अहंकार आणि माझेपण जाऊन, कर्तेपण जाऊन, तो कर्ता आहे, तोच सर्व काही आहे असे वाटू लागले म्हणजे विठ्ठल जीवभाव झाला असे म्हणता येईल.

**पू. बाबा** : म्हणजे तुझ्याशिवाय मी आता राहूच शकत नाही असं होतं का? म्हणजे मी देहाने राहिलो तरी या देहातच त्याचे अस्तित्व जाणवू लागते. 'तुका म्हणे देह भरिला विठ्ठले' म्हणजे या देहात विठ्ठल स्थिर झाला असं म्हणता येईल का?

**साधक प** : बोलावा विठ्ठल या अभंगातच भावासंबंधी सर्व काही आलेलं आहे.

**पू. बाबा** : माझ्या देहात तो आहे हे जाणवणं म्हणजेच देवदर्शन आहे.

**साधक प** : या अभंगात साधन कसं करावं ते सांगितलं आहे. बोलावा विठ्ठल - वैखरीने नाम घेऊन सुरुवात करावी. आज माझा जीवभाव काय आहे याचं आत्मनिरीक्षण करून त्या ठिकाणी विठ्ठलाला आणायचं आहे. तो जीवभाव करायचा आहे. त्यासाठी अखंड नामस्मरणाचा सोस घेतला पाहिजे. मागे फिरता कामा नये. आता मन विठ्ठलाकडे वळलं आहे. एकदा का विठ्ठल जिभेवर बसला की साधनाचे कष्ट नाहीत. कामक्रोधादि विकार नाहीसे झाले की जीव पूर्ण विठ्ठलमय होईल. आज मला नामस्मरण करावेसे वाटते पण त्यासाठी जी किंमत मोजायला पाहिजे त्याला माझी तयारी नाही. त्यामुळे नुसते बोलणे होते.

**साधक** : नामाबद्दलचे बोलणेही कमी करून नुसते नाम घेतले पाहिजे. आज नामाबद्दल बोलण्यात देखील माझी करमणूक होते.

**पू. बाबा** : दृश्य आणि भगवंत वेगळे आहेत असं आज वाटतं. त्या ऐवजी सर्व दृश्यात तो दिसला पाहिजे. खरंच, साधनाच्या दृष्टीनं हा अभंग महत्त्वाचा आहे. आज मला नामाची हाव नाही. ती कशी निर्माण होईल ?

**साधक प** : आपल्या मार्गापेक्षा वेगळं सांगणाराचं किंवा विरोधी सांगणाराचं श्रवण करू नये.

**पू. बाबा** : बरोबर आहे. त्यामुळं आपली श्रद्धा डळमळते. म्हणून श्रीमहाराजांनी सांगितलं आहे, एक ग्रंथ पाहिजे. दुसरं एक विचारतो. इथं इतकी माणसं येतात, भेटतात. नामस्मरण होतं का म्हणून विचारलं की मनासारखं होत नाही म्हणतात. प्रामाणिक असतात. त्यांना नाम घ्यावंसं मनापासून वाटतं. तरी ते होत नाही.

**साधक** : नामदेवांनी हा प्रश्न पांडुरंगालाच विचारला आहे.

अमृताहुनि गोड नाम तुझें देवा। मन माझें केशवा कां बा नेघे॥ १॥
सांग पंढरिराया काय करूं यासी। कां रूप ध्यानासि न ये तुझें॥ २॥
कीर्तनीं बैसता निद्रें नागविलें। मन हें भुललें विषयसुखा॥ ३॥
हरिदास गर्जती हरिनामाच्या कीर्ति। न ये माझ्या चित्तीं नामा म्हणे॥ ४॥

**पू. बाबा** : आमचीच अडचण सांगितली आहे. काय करावं ? मला वाटतं, शक्ती कमी पडते.

**साधक थ** : भगवंतांनी सांगितलं आहे, मामेव ये प्रपद्यन्ते. दुसऱ्या कोणाला नाही, केवळ मला शरण येतात तेच ही दुस्तर माया तरून जातात. त्यांनी दुसरा पर्यायच ठेवलेला नाही.

**पू. बाबा** : खरं आहे हो! पण शरण जायलाही शक्ती लागते. सोपं आहे का ते? ते आत्मनिवेदन आहे, समर्पण आहे त्यात. आपली शक्ती नाही हे आपल्या लक्षात येतं पण त्याचंही फारसं वाईट वाटत नाही हो! आज नाम होतं आहे तेही त्यांच्या कृपेनं होतं आहे असं वाटत नाही. ते तिकडून येतं आहे असं वाटत नाही. साधनातला मी जात नाही. एखाद्या माणसाचा जसा सहवास होतो तसा नामाचा सहवास होत नाही. ते जास्त सूक्ष्म, मानसिक आहे. त्यासाठी शक्ती कशी वाढवावी? कादंबरी वाचतांना जशी ओढ लागते तशी नामाची ओढ वाटत नाही.

**साधक प** : आज मला कंटाळा येतो आणि तो जाण्यासाठी बाहेरून कोठून तरी शक्ती मिळवायची अशी माझी भूमिका आहे, ती चुकीची आहे. मला वाटते की जे शक्तिस्वरूप आहे त्या नामालाच **appeal** (आवाहन) का करू नये? त्यासाठी पाहिजे तर समाधीचं दर्शन घेऊन या, पादुकांची पूजा करा, काहीही करा पण नाम आपल्या शक्तीनं घ्यायचा प्रयत्न करण्याऐवजी त्यांच्याजवळ शक्ती मागा.

**पू. बाबा** : म्हणजे कोणत्याही रीतीनं का होईना, त्यांना मधे आणा. तुझ्या शक्तीनं, तुझ्या कृपेनं तुझं नाम घेतो असं एखादं वचनं आहे का?

**साधक** : तुझिया कृपेनें तुझे गुण गाऊ। तेणें सुखी राहू सर्वकाळ॥

**पू. बाबा** : गुण गाऊ आणि नाम घेऊ, दोन्ही एकच.

**साधक** : तुका म्हणे मज तुझ्या नामापुढे। तुच्छ हे बापुडे सकळही॥

**पू. बाबा** : तुच्छ हे सकळ. वा, किती छान आहे.

**साधक प** : तुच्छ म्हटलं आहे. व्यर्थ म्हटलं तर काहीतरी व्हॅल्यू आहे. पण तुच्छ म्हणजे टाकाऊ -काहीच किंमत नाही.

**साधक थ** : मामेकं शरणं व्रज. शरण कसं जायचं आहे? समजा समुद्राला शरण जायचं आहे, तर काठावर बसून शरण नाही जाता येणार. त्यासाठी समुद्रातच शिरावं लागेल.

**साधक** : सांडून मीठपणाचा लोभु। मिठें सिंधुपणाचा घेतला लाभू। तेवीं अहं जाऊनि मी शंभु। शांभवी जालों॥ असं अमृतानुभवात सांगितलं आहे.

**पू. बाबा** : पण मीच नाहीसा झाला तर हे सुख भोगायचं कुणी हो?

**साधक ब** : माणूस बाकीचं सगळं देईल पण मी कसा द्यायचा? मला माझ्या खांद्यावर कसं बसता येईल?

**पू. बाबा** : मी नाहीसा करण्यामधेच कृपा आहे.

**साधक ब** : तुम्ही म्हणाल माझी तयारी नाही म्हणून तो कृपा करत नाही.

**साधक** : याला विचाराचा मार्ग उपयोगी पडतो. मी कोण आहे याचा विचार करा असं रमण महर्षी सांगत. ते म्हणाले की या प्रश्नाला दृश्यात काही उत्तर नाही म्हणून या प्रश्नाचं चिंतन दृश्यापलीकडे जायला मदत करतं.

**साधक ब** : हे म्हणजे माझ्यासारख्या रांगता न येणाऱ्या माणसाला तुम्ही दौडायला सांगत आहात.

**साधक** : रामकृष्ण म्हणाले की बाकी काही न करता दासभाव ठेवावा.

**साधक ब** : होय; पण त्यांचा दास व्हायला आज मला त्यांच्या अस्तित्वाची जाणीव नाहीये ना!

**साधक** : भरताने रामाची दासभावाने सेवा केली. सेवा करायला रामाच्या सान्निध्याची जरूरी होतीच असं नाही. राम चवदा वर्षे वनवासात गेला तेव्हांही भरताने त्याची सेवाच केली.

**पू. बाबा** : हो, हे खरं आहे हं! हे साधनच आहे.

**साधक ब** : पण थोडं तरी सान्निध्य पाहिजे माझ्यासारख्या माणसाला. निदान त्यांचा आवाज यावा तू हे कर म्हणून! त्याचं खरेपण मला समजतं.

**पू. बाबा** : दृश्यात जे अनुभव अथवा प्रचीती येते त्याला संशयाची किनार राहाते. म्हणून एका ग्रंथावर किंवा त्यांच्या आश्वासनावर श्रद्धा ठेवून करत राहावं. तुकाराम महाराजांनी कसं केलं असेल? कोण होतं त्यांना सांगायला? याच्याशिवाय दुसरा काय उपाय आहे मला सांगा.

**साधक प** : नाही, दुसरा उपाय नाही. करत राहाणं हेच खरं.

**|४४४.५|** (१२ डिसेंबर १९९५) गोंदवले.

**पू. बाबा** : एक वचन आहे. नाम हा सत्संगतीचा पाया आणि कळस आहे. या वचनाचा अर्थ काय? देहाचा सहवास म्हणजे जशी खरी संगत नव्हे तसं नामाची संगत म्हणजे कशाची संगत? नाम म्हणजे आपण समजतो ते आहेच

पण त्याच्याही पलीकडे काहीतरी आहे. मला वाटतं की तुमचा जसा आध्यात्मिक विकास होऊ लागतो तसा त्या नामाचा खरा अर्थ जाणवू लागतो. नामाचं स्मरण आहे, पण ही स्मृती आपल्या नेहमीच्या स्मृतीपेक्षा वेगळी आहे. स्वामी रामतीर्थ गंगेच्या काठावर कडक थंडीत ॐकाराचा जप करत बसले होते. अमलानंदांचे एक शिष्य परवा आले होते ते म्हणाले की ते स्वामी स्वरूपानंदांना भेटले होते तेव्हां त्यांनी स्वामींना विचारलं की नाम घेतांना तुम्हाला काय वाटतं? स्वामी म्हणाले, नाम घेऊन लागलो की मी नामात भुलून जातो. नामाचं स्वरूप काय आहे? वेदान्त काय सांगतो?

**साधक थ :** परमात्मा अनंत शक्तिमान आहे. मन, बुद्धी, तर्कापलीकडे आहे. जगाशी त्याचा नित्य संबंध आहे. जग नाहीसं झालं तरी तो राहाणारच आहे. त्याचं वाचक नाम आहे.

**पू. बाबा :** वाचक म्हणजे काय? तस्य वाचकः प्रणवः। असं पतंजलींनी म्हटलं आहे.

**साधक थ :** वाचक म्हणजे संकेत - symbol. वटवृक्षाच्या बीजामध्ये जसे अनंत वटवृक्ष असतात तसा नामामध्ये अनंताचा संकेत आहे. नाम जोपर्यंत अक्षरं वाटतात तोपर्यंत त्याची मोजदाद राहील. पण त्याच्या शक्तीची जाणीव आणि अनुभव येऊ लागले की त्याचं अनंतपण मनावर बिंबून मोजण्याला काही अर्थ राहाणार नाही. माझा अनुभव सांगतो. जोपर्यंत रोज ठराविक संख्या पुरी करायचा आग्रह होता तोपर्यंत नाम वेगानं व्हायचं. पण जसजशी त्याच्या शक्तीची जाणीव होऊ लागली तसतसा तो वेग मंदावला आणि नामात गोडी निर्माण होऊ लागली. नामाची संगत म्हणजे सत्याचीच संगत आहे. त्याच्या शक्तीची संगत आहे. शक्तीची जाणीव होते तसा अहंकार कमी होऊन नाम हा शक्तीचा अनंत सागर आहे हे जाणवते.

**पू. बाबा :** तुम्ही नामाची शक्ती म्हणत आहात त्या शक्तीचं स्वरूप काय आहे? शक्ती म्हणजे काय? डॉक्टर औषध देतात म्हणजे औषधाची शक्ती काम करते. तसं नामाची शक्ती म्हणजे काय? ती दृश्यातली आहे की सूक्ष्मातली?

**साधक थ :** ती आद्यशक्ती आहे. तो सर्व प्रकारच्या शक्तींचा उगम आहे. वटवृक्षाचं बीज नगण्य असलं तरी वृक्ष त्यातूनच येतो तसं सर्व काही त्या नामातून आलं आहे. आपल्याला तो अक्षरसमूह असला तरी पंच ज्ञानेंद्रियांची

शक्ती तर त्यामुळे विकसित होतेच, पण त्याच्याही पलीकडे तीच शक्ती अंतर्मुख करते.

**पू. बाबा** : एकाला नामाचा अनुभव येतो आणि तितकंच नामस्मरण करणाऱ्या दुसऱ्याला येत नाही असं कां होतं? एकाला औषधाचा उपयोग होतो, दुसऱ्याला होत नाही तसं काही हे आहे का? की त्याचं काही पथ्य आहे? नाम घेतलं की बरं वाटतं म्हणजे काय? प्रत्येकाला ते का वाटत नाही? वटबीजाचं तुम्ही उदाहरण दिलत ते सांकेतिक आहे.

**साधक ब** : वासनांना किंवा विकारांना बळी पडतो त्यामुळे अनुभव येत नाही.

**पू. बाबा** : नाही, सांगणारे प्रामाणिक असतात. एकाला ईश्वरदर्शन होतं, दुसऱ्याला होत नाही.

**साधक प** : देवदर्शनाच्या कल्पना वेगवेगळ्या असतात. नामामुळे वासना, विकार क्षीण होऊ लागले तर आपण देवाच्या जवळ जात आहोत असं वाटलं पाहिजे. आपल्याला दृश्यातला काहीतरी अनुभव आला पाहिजे असं वाटतं.

**पू. बाबा** : त्यातून पुढं नामानंच देहबुद्धी ओलांडून जायचं आहे.

**साधक प** : त्यासाठी ईश्वरदर्शनाची संकल्पनाच बदलली पाहिजे.

**पू. बाबा** : जैसा शरत्कालु रिगे। आणि सरिता वोहटू लागे। असा काहीतरी तो अनुभव असला पाहिजे. ईश्वरदर्शनाची संकल्पना बदलायची म्हणजे काय? जितका मला देहाचा विसर पडू लागेल तितकं माझं नाम बरोबर चाललं आहे, मी ईश्वरदर्शनाच्या वाटेवर आहे असं वाटलं पाहिजे. स्वत:ला प्रयत्नाशिवाय सहज विसरता आलं पाहिजे. नामाची गोडी वाटू लागणं ही शक्तीची जाणीव आहे. त्याच्या अलिकडचा टप्पा म्हणजे नाम घेतांना एक rhythm - लय येईल. त्याला वेळ लागतो. त्यासाठी प्रथम बैठक किती वेळ झाली इकडचं लक्ष कमी झालं पाहिजे. लयीमधे माणसाला अर्धजागृती असते. म्हणजे लय बिघडली तर तो दचकतो, बैठक बिघडते. काही वेळा नाम घेतांना तसं होईल. बाहेरच्या आघातांचे परिणाम होतील. तिथं साधकानं सावध राहून स्वत:ला सांभाळलं पाहिजे. हे जमू लागलं की गीतेच्या भाषेत सांगायचं म्हणजे समता येईल. हे झालं म्हणजे नामाच्या शक्तीचा थोडा अनुभव आला असं म्हणता येईल. परब्रह्माला जेव्हां भान आलं तेव्हां ॐकार स्फुरला. महाराज नाही का म्हणाले, ॐकार ॐकार म्हणतात तो मीच. ते ॐकारस्वरूपच आहेत. आता संगतीचं पाहू. संगत म्हणजे बरोबर जाणे. देहाची संगत खरी नव्हेच. इथं

आज्ञापालनाचं महत्त्व आहे. त्यांनी नाम घ्यायला सांगितलं आहे ना? आपण किती करतो? श्रीमहाराज पू. तात्यासाहेबांच्या बाबतीत म्हणाले, त्याचं साधन त्यालाच करावं लागेल. मग इतरांची काय कथा?

**साधक प :** साधन करावंसं वाटतं तेव्हां मनानं जबरदस्तीनं साधन करायला सांगितलं आणि करायला लावलं की अर्धी संगत झाली म्हणता येईल आणि साधन करतांना स्वत:ला विसरला की पूर्ण संगत झाली म्हणता येईल.

**साधक ब :** देहाचं भान कमी झालं म्हणजे त्या प्रमाणात तो उपाधिरहित होईल आणि उपाधिरहित झाल्यामुळे उपाधिरहित अशा नामाच्या जवळ गेला, त्याची संगत झाली असे म्हणता येईल.

**पू. बाबा :** होय, आणि मग त्याची चटक लागेल. संगतीला थोडी सगुणाची बाजू आहे.

**डॉ. आठवले :** त्यांचं स्वरूप म्हणजे त्यांनी जे प्रेम केलं त्याची आठवण होते.

**साधक प :** त्यापेक्षादेखील तो स्पर्श म्हणजे मनाला जो आकार येतो त्याची आठवण म्हणता येईल.

**पू. बाबा :** वा! हे छान आहे. म्हणजे त्यांचं प्रेम भोगतांना मनाला जो आकार होता तो आकार नाम घेतांना मनाला येणं ही त्यांची संगत आहे.

**साधक प :** त्यात त्यांचा सहवास आहे. नुसतं सहवासाचं स्मरण नव्हे.

**डॉ. आठवले :** श्रीमहाराज म्हणाले, मी नामात आहे ते हेच. नाम घेतलं की ते आहेतच. ते प्रेममय आहेत. त्यामुळे नाम घेतांना त्यात रंगत येते.

**पू. बाबा :** त्यांचा हा प्रेमाचा सहवास किती वाढवता येईल?

**डॉ. आठवले :** नामाचं आणि त्यांचं एकत्रितपण आहे त्याची वरच्यावर अगदी व्यवहारातदेखील आठवण ठेवता येईल.

**साधक प :** तुम्ही म्हणालात ती लय आणि प्रेम दोन्ही एकच आहेत.

**साधक थ :** तुकाराम महाराजांनी म्हटलं आहे 'लावोनी मृदुंग पिटू टाळघोष। सेवू ब्रह्मरस आवडीनें।' त्यात एक लय आहे.

**पू. बाबा :** होय, लयीचं महत्त्व फार आहे. एक लॉजीशियन बाई आहे ती म्हणते की तर्कशुद्ध विचारालासुद्धा लय असते. ज्यांना संगीताचं अंग आहे त्यांना कदाचित ही लय लवकर साधेल. नाम हा सत्संगतीचा पाया आहे हे किती बरोबर आहे. लयीमधे समरसता आहे. ही लय वाढवावी कशी? तिच्याआड काय येतं?

**साधक ब** : वासना भोगूनही समाधान नाही हे नामानं लक्षात येतं आणि मग वासनेमागं जाणं कमी होतं हा नामाचा परिणाम आहे.

**साधक प** : नामाच्या तृप्तीला शिळेपण नाही आणि अंत नाही. कारण नाम अनंत आहे. लयदेखील अभ्यास करून शिकावी लागते. कारण ज्याला भारतीय संगीतात गोडी वाटते त्याला पाश्चात्य संगीतात गोडी वाटेलच असे नाही. म्हणून संगीताच्या अभ्यासाप्रमाणे नामाच्या लयीचाही अभ्यास करावा लागतो.

**पू. बाबा** : म्हणजे समजा साडेतीन कोटी नाम होऊनदेखील लय आली नाही तर काहीतरीच होईल नाही का? म्हणून नाम समजून घेतलं पाहिजे. नामाचा अर्थ काय? ते नाम मी का घेतो? माझं ध्येय काय आहे? या प्रश्नांची उत्तरं स्पष्ट मिळाली पाहिजेत. म्हणजेच ध्येय आणि ते साध्य करण्याचा मार्ग स्पष्ट झाले पाहिजेत.

**डॉ. आठवले** : श्रीमहाराजांना मी विचारलं की पुष्कळ माणसं नाम घेतांना दिसतात पण त्यांच्यात काही बदल झालेला दिसत नाही; असं का होतं? तेव्हां ते म्हणाले याचं कारण वृत्तीपर्यंत नाम पोचलं नाही तर त्याचा व्हावा तितका परिणाम होत नाही. त्यावेळी त्यांनी ते घड्याळातल्या चक्रांचं उदाहरण दिलं होतं. म्हणून ते म्हणाले की वृत्ती नामाला चिकटली पाहिजे. कारण वृत्ती म्हणजे वासनेचं सूक्ष्म रूप आहे.

**पू. बाबा** : पाया आहे हे कळलं. आतां कळस आहे हे उघडच आहे. ते वाढत गेलं पाहिजे. तुका म्हणे मज आहे हा भरंवसा। विठ्ठल सरिसा चालतसे।। ही संगतीची परमावधी आहे. म्हणजे मग साधनाचा वेळ आणि इतर वेळ अशी विभागणीच राहाणार नाही. सर्वकाळ त्याची संगत राहील. ज्यामुळं त्याच्या संगतीत खंड पडेल असं वागणंच मग होणार नाही.

### ।४४४.६। (१३ डिसेंबर १९९५) गोंदवले.

**पू. बाबा** : लौकिकाला माणूस अतिशय भुलतो. स्तुती ही रक्तातली साखर आहे असं महाराज मला म्हणाले. ज्ञानेश्वर महाराजांनी अमानित्व सांगितलं आणि सांभाळलं. मलाही तो अभ्यास करायला महाराजांनी सांगितलं; असो. श्रीमहाराजांचं एक वचन आहे त्याचा अर्थ सांगा. "नामामधें मी आहे ही प्रचीति आली की नाम सिद्ध झालं." मी म्हणजे श्रीमहाराज. ते विश्वमानव झालेले असतात. त्यांची प्रचीति येणं म्हणजे काय?

**साधक ब** : नाम हा माझा प्राण आहे असं त्यांनी सांगितलं आहे. आज माझे अस्तित्व मला प्राणामुळं समजले.

**पू. बाबा** : नाम सिद्ध झालं म्हणजे काय आणि प्रचीति म्हणजे काय यावरच सांगा. इतर वचनं नकोत.

**साधक प** : प्रत्येकाची प्रचीतीची संकल्पना वेगळी असते. त्यामुळे प्रत्येकाची प्रचीती वेगळी असेल पण नामाची सिद्धता सर्वांना सारखीच असणार.

**साधक थ** : नामाबरोबर त्यांची आठवण होणं म्हणजे नाम सिद्ध होणं.

**साधक ब** : प्रत्येक नामाबरोबर महाराजांचं अस्तित्व जाणवणं हे नाम सिद्ध होणं म्हणता येईल.

**पू. बाबा** : त्यांच्या अस्तित्वाचा स्पर्श झाला आहे. नाम आणि नामी एकच आहेत हा भाव स्थिर होणं म्हणजे नाम सिद्ध होणं म्हणता येईल.

**साधक ब** : नाम घेतांना देहाच्या विसरामध्ये त्यांचं असणं आहे. नामात ते प्रगट झाले की मग नाम ही संकल्पना न राहाता ते सत्य होईल.

**साधक प** : नामात त्यांचं अस्तित्व जाणवू लागलं की माझ्यातही बदल होईल. मी पूर्वीसारखा राहाणार नाही.

**डॉ. आठवले** : ब्रह्मानंदं परमसुखदं या श्लोकात गुरूची जी लक्षणे सांगितलेली आहेत त्यांचं नामात दर्शन होऊ लागलं की ते नामात आहेत हे खरं समजेल आणि त्या जाणिवेतून येणारं नाम हे सिद्ध नाम होईल.

**पू. बाबा** : वा! हे फार छान आहे हं! नामात गुरूची लक्षणे जाणवू लागली की ते आणि नाम वेगळे नाहीतच.

**साधक** : मग नामाच्या स्थूल संकल्पनेपासून परमात्मस्वरूपापर्यंत नाम घेऊन जाईल.

**साधक थ** : नाम हा शब्द असला तरी तो अनंत शक्तीचा दर्शक आहे. नाम सिद्ध झालं की त्या शक्तीची जाणीव होऊन शब्द आणि शक्ती वेगळे राहाणार नाहीत.

**पू. बाबा** : प्रत्येकाची प्रचीती वेगळी असली तरी तिचे मर्म एकच असेल ना?

**साधक प** : प्रचीती तुमच्या स्वभावविशेषाप्रमाणे आणि मार्गाप्रमाणे राहील. भक्ताला प्रेमाची प्रचीती येईल तर कर्मयोग्याला कर्मामध्ये प्रचीती येईल.

**साधक क :** तथापि सर्व मार्गात अहंकार गलित होऊन त्यांच्या शक्तीची जाणीव होणं हे एकच असेल. नामानंच सगळं जग चाललेलं आहे हे समजेल.

**पू. बाबा :** याला आज सुरुवात कशी करता येईल? त्यांची सत्ता काम करते आहे हे कसे जाणवेल?

**साधक प :** सुरुवातीला संगत जाणवेल. ज्यांची माझ्याशी संगत आहे त्यांची माझ्यावर सत्ता असेलच असे नाही.

**पू. बाबा :** बरोबर आहे; पण त्या संगतीतून आवड निर्माण होईल आणि मग सत्ता जाणवेल असं काही आहे का? मला वाटतं त्यासाठी आधी शरणागती येईल.

**साधक ब :** मी शरण जायला ते योग्य आहेत हे समजेल. जो आपल्यापेक्षा श्रेष्ठ आहे त्याचीच आपल्यावर सत्ता चालू शकते.

**साधक क :** जे तयार झाले ते गुरूंच्या सत्तेची जाणीव झालेली असल्यामुळे त्यांचं वर्णन करतांना वाहवून जातात. ज्ञानेश्वर महाराज किंवा एकनाथ महाराज होते ना! नामाची प्रचीती आली म्हणजे नाम सिद्ध झालं. तुमची स्वत:ची जी संकल्पना असेल तेथून सुरुवात होऊन नंतर त्यांच्या सत्तेचा बोध होईल.

**पू. बाबा :** आज आपल्याला संगतही नाही आणि सत्तेचा बोधही नाही.

**साधक क :** काही वेळा असं वाटतं पण ते टिकत नाही.

**पू. बाबा :** ज्ञानेश्वर महाराजांनी म्हटल्याप्रमाणे थोडा वेळ शेवाळं बाजूला होतं. श्रीमहाराजांनी म्हटलं आहे की अनुभव आला तरी संशय राहातोच.

**साधक प :** कोणाचं सत्तेच्या जाणिवेनं समाधान होईल, कोणाचं त्यांच्या प्रेमानं होईल तर कोणी त्यांच्या व्यापकतेच्या जाणिवेनं समाधान पावेल.

**साधक क :** कोणत्याही प्रकाराने त्याला पूर्णता येईल, तृप्ती येईल. आणि तृप्ती आहे तिथे प्रेम असणारच. तथापि नाम सिद्ध होण्याचा अद्वैताचा अनुभव सर्वांचा एकच असणार.

**पू. बाबा :** नाम सिद्ध झालं की त्या नामातच आपल्या गुरूंचं ऐश्वर्य जाणवू लागेल. नाम आणि नामी एकच आहेत हे जाणिवेत आलं की नाम सिद्ध झालंच.

**साधक क :** नाम हा श्रीमहाराजांचा आवाज आहे असं ब्रह्मानंद महाराज म्हणाले. आणखी एक आहे की प्रचीती कशीही येवो तिचं खरं मूल्य तिच्यातून समाधान आलं पाहिजे. श्रीमहाराज म्हणाले की मी समाधानस्वरूप आहे.

**पू. बाबा :** नाम मिळालं म्हणजे सगळं मिळालं असं ज्याला वाटेल त्याचा कर्तेपणा आपोआप जाईल.

**साधक प :** नाम म्हणजेच महाराज आहेत. तेच सर्वस्व आहेत.

**साधक क :** बुद्धीला किंवा मनाला काही वाटलं, समजा आज साधन नीट झालं नाही तर तेही नामालाच सांगावं. या सर्वात मुख्य भाव तळमळीचा आहे. ती कमी पडते.

**पू. बाबा :** त्यासाठी प्रत्येक नाम घेतांना ते आहेत, ते आहेत ही भावना जोडावी. त्यांच्या अस्तित्वाची खरीखुरी जाणीव झाली की आपलं संपूर्ण जीवनच बदलून जाईल. त्यासाठी ब्रदर लॉरेन्सनं सांगितल्याप्रमाणं त्यांच्याशी संभाषण करावं. त्यासाठी जरा वेळ मिळाला की नाम घ्यावं. आपलं सगळं बाह्यात्कारी होतं. आत जाता आलं पाहिजे.

**|४४४.७|** (१४ डिसेंबर १९९५) गोंदवले.

**पू. बाबा :** श्रीमहाराज म्हणाले, आपल्याला समाजात राहायचं आहे. तुमच्या अभ्यासात समाजाची व्याख्या केली आहे ना? मी म्हणालो, होय. जर्मन आणि अमेरिकन विचारवंतांनी समाजाची चांगली व्याख्या केली आहे. समाज म्हणजे नुसता माणसांचा समुदाय नव्हे. जेव्हां त्या सर्व माणसांचा विचारसमूह एक असतो तेव्हां त्यांचा समाज होतो. व्यक्ती जातात पण त्या समूहाचं विचारधन कायम राहातं. श्रीमहाराज म्हणाले, गाध्यांचं असंच आहे. संतांचं खरं कार्य समाजाच्या विचारात बदल करून त्यांना वर उचलणं हे आहे. एकदा वाशीमचे एक कीर्तनकार आले होते. त्यांनी कीर्तनात एक अभंग सांगितला. श्रीमहाराजांना तो आवडला. तो अभंग सांगतो.

कंठीं राहो नाम हा माझा नवस। पुरवावी आस गुरुराया॥ १॥
वसोनी अंतरीं बोलवी उत्तर। जेणें हा संसार सार होय॥ २॥
सर्व चराचरीं दृष्टी ऐसी करी। दावीं रूप हरी अखंडित॥ ३॥
ऐशिया वासने स्वामी साह्य होणें। काळ वांयां जाणें ऐसें न हो॥ ४॥
तुज ऐसा नाहीं त्रिभुवनीं उदार। कृपे देईं वर जनार्दना॥ ५॥

माणूस हा वासनांचा पुंज - **a bundle of desires** आहे. वासना सहज नाहीशा होत नाहीत म्हणून त्यात कशा प्रकारचा बदल कर ते एकनाथ महाराजांचे गुरु जनार्दन स्वामी त्यांच्या गुरूजवळ मागत आहेत. नवसामधे

सामर्थ्य आहे यात शंका नाही. कंठात नाम राहील हा नवस पुरवावा अशी प्रार्थना ते करत आहेत. नाम हे जड आणि सूक्ष्म यांना जोडणारी साखळी आहे. सुरुवातीलाच ते सूक्ष्म होणार नाही म्हणून ते कंठी राहो म्हटले आहे. कंठी नाम राहाण्यासाठी आपण काय करावे ? कंठी राहो म्हणतांना विचार जिथं चालतात तिथं नाम राहावं असं मागणं आहे का? जडामधे तृप्ती असते. उदाहरणार्थ, तहान लागली आणि पाणी मिळालं की तृप्ती येते. तसं कंठात नाम राहिलं तर जडाच्या पातळीवरची तृप्ती येईल का? कंठात नाम म्हणजे वैखरी नाही, त्यामुळे त्याचा थकवा नाही. कंठामधे नामाची केवळ स्पंदने असतील. धड सूक्ष्मही नाही आणि स्थूलही नाही अशी ती स्थिती आहे. एका दृष्टीनं हा अभ्यास सोपा आहे. दुसरा माणूस आपल्याशी बोलतो तेव्हां ते ऐकतांना कंठात नाम राहायला काय हरकत आहे? ही अखंड नामस्मरणामधली एक पायरी आहे, आणि त्याचा अभ्यास करायची इथं गोंदवल्यात सोय आहे. उदाहरणच द्यायचं तर चांगलं गाणं ऐकलं, आवडलं की नंतरही त्याचे सूर मनात राहातात तसं नाम राहिलं पाहिजे. अगदी लिहीत असतांनादेखील आत नाम चालू राहातं हा माझा अनुभव आहे. स्नान करतांना आणि जेवतांना नाम टिकवायचा अभ्यास कितीजण करतात ? सगळे व्यवहार करतांना जर काळजी राहाते तर नाम का राहात नाही ?

**डॉ. आठवले** : कर्म करतांना आठवण झाली की नाम चालू होतं पण ते फार वेळ राहात नाही.

**साधक क** : कर्मात गुंतल्यामुळे ते येतं जातं. त्यासाठी सूक्ष्म शक्ती लागते ती आज पुरेशी नाही. अभ्यासाने ती वाढवावी लागेल. त्याला सावधानता लागेल आणि योग्य व्हॅल्यूएशनही झालं पाहिजे.

**पू. बाबा** : आपलं **shifting attention** असतं.

**साधक क** : अभ्यासानं ते (**shifting**) कमी होईल.

**पू. बाबा** : यासाठी काही साधक मला ती शक्ती द्या अशी प्रार्थना करतात आणि तुम्ही माझ्याबरोबर राहा असं गुरूंना आवाहन करतात.

**साधक क** : प्रत्येकाला स्वतःला योग्य ती युक्ती शोधावी लागेल.

**साधक प** : जनार्दन स्वामींनीही त्यांच्या गुरूंना आवाहनच केलं आहे.

**डॉ. आठवले** : एक प्रयत्न करून पाहिला. शरीराच्या प्रत्येक अवयवाशी नामाचा संबंध लावला तर थोडा वेळ ते चालतं पण नंतर त्याचा विसर पडतो.

**साधक प :** वास्तविक जाणीव सर्व शरीराला व्यापून आहे पण आपले अवधान सर्व शरीराला व्यापून नसते. आत्ता तुमच्याकडे पाहातांना त्या पाहाण्यातच जाणीव असते. म्हणून मला वाटतं की आधी आपल्या देहात नाम भरले की नंतर जगात ते सर्वत्र अनुभवाला येईल. आज नामाच्या व्याप्तीचा आपल्याला आपल्या देहापुरताही अनुभव नाही. देहाच्या कुठल्याही अवस्थेत नाम चालले पाहिजे.

**पू. बाबा :** श्रीमहाराज म्हणाले की श्वासावर नाम घेण्यापेक्षा श्वासासारखं नाम चाललं पाहिजे. श्वास थांबला तर माणूस कसा कासावीस होतो तसं नाम थांबलं तर कासावीस झालं पाहिजे.

**साधक ब :** आणखी नाम कंठात राहिलं तर उगीच साधनाचं प्रदर्शन होणार नाही. आपल्याला नाम घेत बसायचं असतं आणि घरचं काही काम निघाल्यामुळे बाहेर जावं लागतं आणि मग नाम घ्यायचं सोडून मी हे काय करतो आहे अशी excitment - अस्वस्थता येते. कंठात नाम ठेवणं जमलं तर मग ही अडचण राहाणार नाही.

**डॉ. आठवले :** त्यासाठी मला वाटतं की काही काळ तरी एकांतात गेलं पाहिजे.

**पू. बाबा :** एकांत सोसणं सोपं नाही. मी हे अनुभवानं सांगतो बरं का! एकांत पचणं फार कठीण आहे असं श्रीमहाराज म्हणाले. आपण आपल्या घरातच एकांत पाहिला पाहिजे. त्याकरता दिवसातला काही वेळ मौनात राहायचा अभ्यास करावा. मग ते सोपं जातं. एकांताची आतून प्रेरणा आली तरच त्याचा विचार करावा असं ते म्हणाले. एकांताची भीती बाहेरची नसून आतलीच असते. आणि गैरसमज टाळण्यासाठी घरातल्यांना सांगावं की मी सामान्य माणूस आहे, पण अभ्यासात आहे. अजून मला साधलेलं नाही. ते साधावं या दृष्टीनं मी माझं खाणं, वागणं करत असतो. घरात कोणावर नाराज असतो असा त्याचा अर्थ करू नका. श्रीमहाराज म्हणाले की ज्याची बायको त्याला साधू म्हणते तो खरा साधू झाला म्हणता येईल.

**डॉ. आठवले :** मध्यंतरी एका आश्रमात गेलो होतो. तेथे तबला पेटीची साथ घेऊन त्यांचं मोठ्यानं नाम चाले.

**पू. बाबा :** त्याला नामसंकीर्तन म्हणतात.

**डॉ. आठवले :** पण तेथे माझं नामस्मरण होईना.

**पू. बाबा** : नामसंकीर्तनाला ही तबला पेटीची उपाधी आहे. काल आपण नाम घेतांना लय यावी म्हटलं ती निरुपाधिक पाहिजे.

**साधक प** : सुरुवातीला थोडं नामसंकीर्तन करून मग त्या लयीत प्रत्येकाचं नाम चालू राहाणं शक्य आहे.

**पू. बाबा** : स्वामी रामदास नामसंकीर्तन करत नसत.

**साधक प** : होय पण ते आणि गुरुदेव रानडेही मोठ्यानं नाम घेत आणि काही वेळा नाचत असत. मला वाटतं, नामसंकीर्तनातून लय आली आणि त्यातून जर नामाच्या अर्थापर्यंत पोचता आलं तर काय हरकत आहे? एकदा का तुम्ही अर्थापर्यंत पोचलात की मग लयही राहात नाही.

**डॉ. आठवले** : सामूहिक नामस्मरणात नामाचं पावित्र्य राहात नाही असं मला वाटतं.

**पू. बाबा** : काही वेळा असं होतं खरं! मागं एकदा सूर्यग्रहण आलं होतं त्या दिवशी पुण्यात एका साधूंनी मंडपात लाउडस्पीकरवर तेरा अक्षरी मंत्र चालू ठेवला होता. आणि मग दिवसभर जितकी माणसं तिथं होती तितक्या सर्वांचा अमुक इतका जप झाला असं जाहीर केलं. श्रीमहाराजांना हे सांगितल्यावर, लोकांना नामाचं पावित्र्य कळत नाही, काय करावं! येवढेच ते म्हणाले.

**डॉ. आठवले** : एकट्यानं मोठ्यानं नाम घेणं आणि नाचणं वेगळं.

**पू. बाबा** : श्रीरामकृष्ण नाही का नाचायचे? पण एरवी आत सावध आणि शांत नाम चालावं. तुम्ही अर्थापर्यंत पोचलात आणि त्यांचं अस्तित्व जाणवू लागलं की मग तुम्ही लयीच्याही पलीकडे जाता. आपण इथं त्यांच्या सत्तेचं दर्शन घेतलं की मग ती सत्ता आपल्या घरी न्यावी. त्यासाठी भावनेचं पोषण झालं पाहिजे. भावनेचं पोषण झालं की त्याचा परिणाम काय होतो ते सांगतो. १९६१ साली पू. तात्यासाहेबांचा तेरा कोटी जप पूर्ण झाला. खूप अन्नदान झालं. तेव्हा सौ. ताई (पू. तात्यासाहेबांच्या पत्नी) म्हणाल्या की अगदी महाराज असल्यासारखं सगळं चाललं आहे. आणि त्यानंतर स्वत: महाराज देहात आले आणि त्यांनी सौ. ताईंना सगळं ठीक चाललं आहे ना म्हणून विचारलं. त्या म्हणाल्या तो भ्रम नव्हता. प्रत्यक्ष महाराज आले होते!

**|४४४.८|** (१५ डिसेंबर १९९५) गोंदवले.

**साधक ब** : मला पुष्कळ नाम घ्यावंसं वाटतं पण मन आड येतं. त्याला काय करावं?

**साधक प** : वैखरीनं नाम घ्यावं. लहान मुलं बोलायला शिकतात ते वैखरीनेच. ती मुलं उच्चार करतात त्या सगळ्या शब्दांचे त्यांना अर्थ माहीत नसतात. आपल्यालाही आज नामाचा अर्थ माहीत नसला तरी त्याचं उच्चारण व्हावं.

**साधक क** : हा mechanism च असा आहे की वैखरीने घेता घेता ते आत्मसात होते. तेथे मनाचा संबंधच राहात नाही. मनाचा संबंध पुढे thought forms (विचार चित्रे) व्हावयाला लागतात तेथे येतो. म्हणून कंठामध्ये नाम स्थिर व्हावयाला प्रथम वैखरीच उपयोगी पडते. स्वामी रामदासांनी तसे केले.

**पू. बाबा** : हे म्हणतात ते बरोबर आहे. हा mechanism च आहे. त्या त्या शब्दांची तुमच्या मेंदूत धारणा होते आणि मग त्यातून विचार निर्माण होतो. आपण दृश्याशी चिकटलेले आहोत म्हणून नाम आत जायला सगुणाच्या पूजेपासून सुरुवात करावी. तिथं भावनेची जोड दिली की भावना जागी होते. कंठात नाम जातं याचा अर्थ मेंदूतून नाम हृदयात उतरतांनाचा तो टप्पा आहे. कंठी राहो नाम याचा अर्थ ते आत स्थिर झालं पाहिजे. हाच खरा नामाचा अभ्यास आहे. यासाठी नामाने येणाऱ्या शक्तीची गळती सावध राहून थांबवली पाहिजे. हे एक व्रतच आहे. भक्ती तशी सोपी नाहीच, पण लोकांना तसं वाटतं. त्यांच्या काहीतरीच अपेक्षा असतात आणि मग फसगत होते. यासाठी आपल्या मनाचे सर्व भाग - कल्पना, भावना, विचार, स्मृती इत्यादी नामानं भरून टाकाव्या. मी नाम घेतो आहे आणि श्रीमहाराज ते कौतुकानं ऐकताहेत अशी कल्पना करायला काय हरकत आहे? आपल्या दिवसभरातल्या सगळ्या गोष्टीत त्यांना ओवावं. 'सूत्रे मणिगणा इव.'

**साधक क** : मग माझी आवड नावड राहात नाही.

**पू. बाबा** : तसं नाही. श्रीमहाराजांची जी आवड नावड ती माझी होते. तुम्हाला सांगतो, कसं वागावं ते त्यांनी मला शिकवलं. त्यांच्या चरित्राचं चिंतन करू लागलं की मन थक्क होतं. दुसऱ्याचं अंतःकरण दुखवायचं नाही म्हणून विषारी अन्न खाल्लं! खरोखर आपल्याला समजूच शकत नाही, पण केवढा मोठा आदर्श आपल्यापुढे आहे. प्रपंचाच्या गोष्टी बोलतांना माझे ओठ करपतात म्हणाले आणि असं असूनही जन्मभर प्रापंचिकांना शिकवत राहिले. म्हणावं तर अतिमानव पण सामान्यांमधे वावरले. जन्म कर्म च मे दिव्यम् हेच खरे. माझं

खरं कोण आहे? महाराज आहेत असं वाटलं पाहिजे. त्यांच्या बाजूनं ते आहेतच, आपण आपल्याकडून पुढे पाऊल टाकलं पाहिजे. अमूर्तची परि मूर्ती कारुण्याचा असे ते आहेत.

**साधक ब :** बाबा, मला वाटतं, व्यक्ती म्हणून मला जो आकार आहे तो अहंकाराचा आहे. तो नाहीसा करून श्रीमहाराजांशी समरस कसं व्हायचं?

**पू. बाबा :** त्यासाठी प्रत्येक कृतीत त्यांना ओवलं पाहिजे. जाता येता, उठता बसता त्यांची आठवण झाली पाहिजे. श्रीरामकृष्णांनी त्या कोष्टयाची गोष्ट सांगितली आहे ना, तसं. प्रत्येक घटनेत रामइच्छा. त्यासाठी नाम इतकं घ्यावं की त्यांना वाटलं पाहिजे, कोण आहे हा? एकदा पाहू या.

**साधक आ :** तुका म्हणे या विठ्ठलासी आता। न ये विसंबता माझे मज॥

**पू. बाबा :** विसरायचं म्हटलं तरी आता विसरू शकत नाही.

**साधक क :** श्रीरामकृष्ण म्हणाले की भगवंताचं नाम घेतल्यावर ज्याच्या डोळ्यांना पाणी येतं त्याचा कर्मक्षय झालेला असतो.

**पू. बाबा :** असं म्हणता येईल की आपल्या वृत्ती दृश्याला धरून असतात. पण ते दृश्य पदरात न पडतादेखील नामामुळे वासना शांत होणं म्हणजे नाम कंठी राहाणं आहे. हे केव्हां होईल, तर कर्ता तो आहे हे आतमधे ठसेल तेव्हां. येवढेच नव्हे, तर गुरूंचा आपल्यावर ताबा आहे याची जाणीव होईल. यासाठी सपाटून नामस्मरण करावं आणि त्याला राम कर्ता ही जोड द्यावी.

**|४४४.९|** (१६ डिसेंबर १९९५) गोंदवले.

**पू. बाबा :** आज सकाळी अभंग झाला त्याच्या दुसऱ्या चरणात "विठ्ठलें हें अंग व्यापिली ते काया। विठ्ठल हे छाया माझी मज॥" म्हटले आहे. विठ्ठल हे छाया माझी मज म्हणजे काय? विठ्ठलाचं नाम आत स्थिर झाल्यावर हा बाहेर झालेला परिणाम आहे काय? काया माणसाची पण छाया विठ्ठलाची हा अनुभव काय आहे? त्याचा अर्थ असा आहे की माणसाचं projection असतं ते त्याच्याप्रमाणे असतं. इथे त्या projection मधे विठ्ठल आला आहे. म्हणजे मूळ रूपात आत विठ्ठल इतका भरलेला आहे की आता माझी सावली देखील त्या विठ्ठलाचीच झालेली आहे. जे आत आहे ते बाहेर आलं आहे. असा माणूस ज्याला स्पर्श करील त्यालादेखील नामाचं स्फुरण येईल. गौरांग महाप्रभूंची अशी अवस्था होती. मात्र ही सूक्ष्म देहाची छाया असल्यामुळे ज्याला सूक्ष्म दृष्टी आलेली आहे त्यालाच ती दिसेल. देह नामाने भरला की नाम सगुण होतं. तुका

म्हणे या विठ्ठलासी आतां। न ये विसंबता माझे मज।। ही खरी spiritual development आहे. सुरुवातीला मी माझ्या शक्तीने नाम घेत होतो. विठ्ठलाचे सान्निध्य ठेवण्याचा प्रयत्न करत होतो, पण आता अशी स्थिती झाली आहे की त्या विठ्ठलाला सोडतो म्हटले तरी तसे करता येत नाही. (पहा : अध्यात्म संवाद भाग १ संवाद २२ गुरुदेवांनी संकेश्वरच्या शंकराचार्यांना दिलेले उत्तर)

**साधक थ :** तुकाराम महाराजांचा अभंग आहे - बळियाचे अंकित। आम्ही झालो बळवंत।। म्हणजे सुरुवात जरी दास्यभावाने झाली तरी स्वामीवर सेवकाचे स्वामित्व येते आणि स्वामी हा स्वामी असल्यामुळे त्याचे स्वामित्व असतेच. नाम सगुण झाले की असे परस्पर स्वामित्व येत असावे.

**पू. बाबा :** आपण कोणता भाव ठेवून नाम घेतलं पाहिजे? मला वाटते, नामाने शरीरातील जड जाऊन म्हणजे तम आणि रज जाऊन ते सूक्ष्म, सत्त्वमय झाले पाहिजे. म्हणजे मग कोरे नाम येईल. नामाची शक्ती इतकी आहे की ती भगवंताला खेचून आणते. अब्दुल करीम खान मी सुरांना गोंजारतो म्हणायचे. श्री. शंकरराव देशपांडे काही वर्षे त्यांच्याकडं गाणं शिकायला होते. ते एकदा बोलतांना मला म्हणाले की मला नामाला गोंजारायचंय! किती रम्य कल्पना आहे नाही?

**साधक ब :** कल्पना नाही, तो नामाच्या प्रेमाचा आविष्कार आहे. लहान मुलाला आई कशी गोंजारते? प्रेम असतंना!

**पू. बाबा :** होय. म्हणजे नामाचं प्रेम आलं तरच गोंजारणं शक्य आहे की गोंजारण्यातून प्रेम येईल?

**साधक आ :** ज्या मुलाबद्दल तुम्हाला प्रेम वाटत नाही त्याला कदाचित तुम्ही हातही लावणार नाही.

**पू. बाबा :** काय हो, खरंच नामाबद्दल असा वात्सल्याचा भाव आला तर काय होईल?

**डॉ. आठवले :** गोड वाटेल.

**पू. बाबा :** नुसतं गोड वाटेल म्हणून ते स्पष्ट होत नाही. गोंजारण्याच्या क्रियेमधे आत सौंदर्याचं भान आहे. त्यात निरागसपण आणि सहजता आहे. त्यात रसमयता आहे.

**साधक प :** मला वाटतं, आपण निष्पाप बनलो तर नामही आपल्याला गोंजारेल.

**पू. बाबा** : पू. तात्यासाहेब सांगायचे की श्रीमहाराजांकडे गेलं आणि त्यांनी पाठीवरून हात फिरवला की शरीरावर रोमांच यायचे. म्हणजे, गुरूही तुम्हाला गोंजारतात, पण त्यासाठी निरागस झालं पाहिजे. आता प्रश्न आला की नामासाठी निरागस व्हायचं म्हणजे काय करायचं ?

**साधक अ** : त्यात सगुण आणि निर्गुणाचं मीलन आहे.

**पू. बाबा** : नाम घेतांना किंवा कीर्तन करतांना काही वेळा श्रीमहाराज नाचायचे आणि त्यानंतर बायका त्यांची दृष्ट काढायच्या. काय भाव असेल त्यात! लहान मुलाची दृष्ट काढतात तशी महाराजांची दृष्ट काढायची!

**डॉ. आठवले** : रमण बसलेले असायचे. इतके प्रसन्न दिसायचे की त्यांच्याकडे पाहून कित्येकांच्या डोळ्यांना पाणी यायचं.

**पू. बाबा** : जिथे अहंकार आहे तिथे निरागसता शक्य नाही. मूल मोठं होऊ लागलं की त्याचा अहंकार वाढू लागतो आणि त्यामुळे निरागसता नाहीशी होते. श्रीमहाराज मला म्हणाले की कमी दिवसांचं मूल जसं कापसात ठेवून सांभाळतात तशी मी लोकांची अंत:करणं सांभाळली! माणूस हा चांगल्यावाईटाचं मिश्रण आहे म्हणून ज्ञानेश्वर महाराज म्हणाले खळांची व्यंकटी सांडो.

**|४४४.१०|** (१७ डिसेंबर १९९५) पुण्यतिथी (गुलालाचा दिवस)

**पू. बाबा** : तुकाराम महाराज म्हणाले "विषयीं विसर पडला नि:शेष। अंगीं ब्रह्मरस ठसावला॥ माझी मज झाली अनावर वाचा! छंद या नामाचा घेतलासे॥" आज दहा बारा लोक तरी भेटले. ते म्हणाले वाणी आणि खाणं कसं आवरायचं ते सांगा. वाणी आवरणं हे मोठं शक्तीचं काम आहे. गोड बोलण्यानं व्यवहार बिघडत नाही. ह्या अभंगाचा अर्थ सांगतांना श्रीमहाराज म्हणाले की ब्रह्मज्ञान होईल पण ब्रह्मरस म्हणण्यात विशेष आहे. विषय भोगतांनादेखील त्यात रस निर्माण होतो पण तो तात्पुरता असतो. इथे तो ब्रह्मरस ठसावला, कायमचा झाला म्हटलं आहे. नाम घेतांना वाचा अनावर होणे म्हणजे गाडी उताराला लागणे आहे. मग ब्रेक लावून ती थांबवणं जसं अवघड होतं तसं एकदा नाम सुरू झालं की ते थांबत नाही आणि त्यातच गोडी वाढू लागते. त्याचा त्रास नाही होत. नामाची तृप्ती यावी, आपल्याला तो रस मिळावा असं वाटतं का ?

**डॉ. आठवले** : वाटतं ना! पण त्याचबरोबर अद्यापि आपली ती लायकी नाही हे लक्षात येतं.

**पू. बाबा** : म्हणजे काय?

**डॉ. आठवले** : नामाने श्रीमहाराजांची जवळीक साधता येते. तथापि आणखी जवळीक साधावी असे वाटत नाही.

**पू. बाबा** : काय आड येते?

**डॉ. आठवले** : सगळेच आड येते. आता बाकी कटकटी वेळेच्या दृष्टीने कमी झालेल्या असल्या तरी त्यांची आवड अजून गेलेली नाही. काही वेळा वाटते की गोंदवल्याला तरी कशाला जायचे? त्यापेक्षा घरी नाम घेत बसावे. पण इकडे यावे, सत्संग व्हावा, माणसे भेटावी, चांगले विचार ऐकायला मिळावे याचीही ओढ वाटते.

**पू. बाबा** : याचा अर्थ माझ्या जीवनाचे एक ध्येय ठरलेले नाही. त्याचा घट्टपणा आलेला नाही.

**साधक क** : ब्रह्मरसाची थोडी तरी कल्पना आल्याखेरीज ते होणार नाही.

**पू. बाबा** : नसेल त्या गोडीची कल्पना आलेली. पण तो मिळतो म्हणून त्यांनी सांगितले आहे त्यावर विश्वास नाही का? भजावे रघुनाथासी। अर्पण होऊन जावे त्यासी। असे का वाटत नाही? आपण कशासाठी काय करतो याचा विचार करावा असे श्रीमहाराज म्हणाले. या सगळ्याच्या मुळाशी नामाची श्रद्धा नाही. आपली व्यवहारातली दृष्टी जात नाही. नाम आणि नामी एक आहेत हे आपल्याला समजत नाही.

**साधक क** : म्हणजे अजून दृश्याला चिकटलेले आहोत. परमार्थ बोलता येतो पण तसे वागणे होत नाही. श्रीमहाराजांच्या चरित्रात शेवटचे पत्र आहे त्यात श्रीमहाराजांनी उपदेश करून शेवटी म्हटले आहे - "दीनावरी कृपा करावी कांहीं॥ ही आशा धरूनि पोटीं। सांगितल्या सलगीच्या गोष्टी। 'हें आम्हास माहीत आहे'। असें म्हणून पत्र वाचितां त्रासूं नये॥ ऐशी करा मति। रामनामाची पहा प्रचीति॥" हा उपदेश स्थिर होऊन आचरणात यावा म्हणून सत्संग करायचा.

**साधक प** : माझ्या शक्तीनं हे मी करीन हे शक्य नाही.

**पू. बाबा** : "आपुलिया अंगें तोडी मायाजाळ। ऐसे बळ नाहीं कोणापासी॥"

**साधक क :** दृश्य आपोआप सुटलं पाहिजे; जखमेची खपली पडल्यासारखं.

**पू. बाबा :** याला काय करावं ?

**डॉ. आठवले :** काही नाही, नुसतं नाम घ्यावं. दुसरं काय करणार ?

**साधक प :** त्यासाठी साधक अ म्हणतात तशी आधी प्रार्थना आली पाहिजे.

**पू. बाबा :** "संतांचा पढियावो कैशापरी लाहो। नामाचा आठवो कैसा राहे॥" पढियावो म्हणजे नुसता प्रिय नव्हे. त्यांना मी आवडेन असा. विशेषत: नवरा बायकोच्या प्रेमाबाबत प्राकृतात हा शब्द योजलेला आहे.

**साधक क :** पढियावोमध्ये फार व्यापक अर्थ आहे. श्रीमहाराजांना मी प्रिय कसा होईल म्हटले की माझ्या जीवनाचा पॅटर्नच बदलला पाहिजे. जे त्यांना आवडते तेच मी करीन आणि जे आवडत नाही ते टाळीन म्हटल्यावर सगळेच आले. मला वाटते ह्या एका ओळीप्रमाणे आचरण झाले तरी त्यात सगळे येईल.

**पू. बाबा :** "नामस्मरण करावं आणि राम कर्ता आहे ही भावना ठेवावी ही माझी सार्वत्रिक आज्ञा आहे" असं श्रीमहाराजांनी म्हटलं आहे. सार्वत्रिक म्हणजे universal. हे थोर माणसाचं काम आहे. मी थोडा विषय बदलतो हं! कर्तेपणा कसा सोडावा ? कर्तेपणाचं खरं स्वरूप काय आहे ?

**साधक अ :** त्याचं स्वरूप असं वेगळं नाही. ते माझ्यातच आहे.

**साधक प :** हे बरोबर आहे. बाह्य गोष्टी एकवेळ सोडता येतील पण माझे विचार, भावना इत्यादी कसे सोडायचे ?

**पू. बाबा :** काय हो! पण मग हे कसं करायचं ? समजा तुमच्याकडे पेशंट आला तर तुम्ही डॉक्टर म्हणून त्याला तपासून औषध देणार. तिथं मी कर्ता नाही म्हणून कसं चालेल ?

**साधक अ :** तिथं स्वत:शी थोडंस सावध राहून स्वत:कडे हा औषध देतो आहे असं त्रयस्थपणे पाहाता आलं पाहिजे.

**साधक प :** बाह्य गोष्टींबाबत ठीक आहे. आता या उदाहरणात स्वत:बद्दल त्रयस्थपणानं विचार परत मीच करणार आहे ना ? त्याच्यापेक्षा त्यांच्या इच्छेनं घडतं आहे हा भाव साधण्यासारखा आहे.

**पू. बाबा :** दासभाव इथं फार उपयोगी पडेल.

**|४८५|** (१९ जानेवारी १९९६) मालाड.

**पू. बाबा :** स्वामी रामदासांच्या Gospel मधला हा उतारा पहा :

"The Vasanas do not leave us suddenly. Divine power, when it acts in us, can alone completely destroy vasanas. They are like the six heads of the serpent Kaliya. The heads are kama, krodha, lobha, moha, mada and matsarya. The serpent can be subdued only by Krishna - the Supreme Being. When light comes, darkness disappears. So, when the divine reveals Himself in you, all the vasanas automatically disappear." (The Gospel of Swami Ramdas by Swami Satchidananda. Anandashram chapter XXIX para 269)

(वासना आपल्याला एकाएकी सोडत नाहीत. जेव्हां आपल्यामधली दैवी शक्ती कार्यरत होते तेव्हांच वासनांचा समूळ नाश होतो. वासना ह्या कालिया सर्पाच्या सहा फणांसारख्या आहेत. काम, क्रोध, लोभ, मोह, मद आणि मात्सर्य या त्या सहा फणा होत. ह्या सर्पाला सर्वश्रेष्ठ सत्ता असलेला कृष्णच नमवू शकतो. प्रकाश आला की अंधार नाहीसा होतो त्याप्रमाणे जेव्हां आपल्यामधे दैवी शक्ती प्रकट होते तेव्हां सर्व वासना आपोआप नाहीशा होतात.)

साधकाला वासना त्रास देतात हे खरे. पण प्रत्येक वासनेशी वेगळेपणाने झगडणे हे अनेक आघाड्या एकाचवेळी सांभाळण्यासारखे कठीण आहे. आपण अल्पशक्ती आहोत, म्हणून तुम्हीच सांभाळा अशी सद्गुरूंची प्रार्थना करावी आणि कृतीवर ताबा आणण्याचा प्रयत्न करावा. सर्वकाळ माझ्या सर्व कृती भगवंत पाहातो आहे अशी मनाला शिकवण द्यावी.

भक्तीच्या भाषेत, जे काही घडते ते त्याची इच्छा आहे म्हणून भक्त निश्चिंत होतो. जे काही होते ते त्यांनीच पाठवले आहे. त्याचे काय करायचे ते तेच पाहतील अशी वृत्ती झाली म्हणजे समस्या उरणार नाही, मन शांत राहील आणि नाम आणि अनुसंधान चांगले राहील.

**|४८६|** (२ फेब्रुवारी १९९६)

**पू. बाबा :** गुरूंवर पूर्ण श्रद्धा असली की अडचणीच राहात नाहीत. विशेषत: तुम्ही त्यांच्या सहवासात असलात तर फारच सोपे जाते. मात्र

त्यासाठी ते सांगतील ते कोणताही विकल्प मनात न आणता करायची तयारी पाहिजे. दिनकरने (श्री. दिनकरराव केतकर) एकदा श्रीमहाराजांना विचारले की आपण येथे नसता तेव्हां (पू. तात्यासाहेब बाहेरगावी जात तेव्हां) आम्ही आमचे प्रश्न, अडचणी कोणाला विचाराव्या? श्रीमहाराज म्हणाले की 'मी' बाजूला करून तो प्रश्न आपल्यालाच विचारावा आणि आतून जे उत्तर येईल ते माझेच सांगणे समजावे. याला फार अर्थ आहे. श्रीमहाराजांचे एक आश्वासन आहे. ''नाम घेतांना मला मनानें धरून ठेवा. माझें मन तुमच्या मनाची जागा घेईल. मग तुम्ही माझ्यासारखे व्हाल.''

मनाने धरणे म्हणजे काय यावर चर्चा झाली. धरणे म्हणजे श्रीमहाराजांच्या अस्तित्वाची कायम जाणीव राहणे. सध्या आपल्याला फक्त जिवंत, हालचाल करणाऱ्या व्यक्तींचे आणि प्राण्यांचे अस्तित्व समजते. श्रीमहाराजांच्या सत्तेमुळे काही मदत होते याची जाणीव आहे पण सातत्याने त्यांचे अस्तित्व जाणवत नाही. भगवंताच्या आणि संतांच्या अस्तित्वाचा प्रकाश-चैतन्य वेगळेच असते. सामान्य दृश्याची त्याच्याशी तुलना करता येणार नाही. आपले गुरु सतत आपल्याजवळ आहेत असे शिष्याला वाटू लागले की त्याच्या अडचणी आपोआपच नाहीशा होतात. आज आपल्याला दृश्य इतके खरे वाटते की त्यामुळे गुरूंच्या अस्तित्वाची आपल्याला कल्पना येत नाही. तसबिरीसमोर उभे राहून श्रीमहाराजांच्या कानावर घातले की आपली जबाबदारी संपली असे श्री. भाऊसाहेबांना वाटत असे व ते निश्चिंत होत असत.

**साधक ड :** आम्हीही आज श्रीमहाराजांच्या कानावर घालतो. पण मग आपल्या मनासारखे होईल याची वाट पाहतो.

**पू. बाबा :** यासाठी मनाने त्यांचेवर संपूर्णपणे सोडून त्यांना योग्य वाटेल ते ते करतील आणि ते माझ्या हिताचेच असेल अशी वृत्ती झाली पाहिजे. आज वासना हा आपला driving force आहे. ती सद्वासना झाली तरच तसे मन तयार होईल.

आपले नामस्मरण श्रीमहाराज करवून घेतात. म्हणून जपाला बसतांना मनोमन त्यांची प्रार्थना करूनच जपाला सुरुवात करावी. मग नाम कसे झाले वगैरेचा काहीही विचार करू नये. हळूहळू नामच आपला हात धरेल आणि नेईल. आपल्या साधनेने भक्त आपल्या गुरूला आणि भगवंताला ऋणी करून ठेवतात.

आपल्याला भगवंताच्या प्रेमातच पडले पाहिजे. त्यामुळे वासना बदलून काम होईल. त्यासाठी त्यांना आवडणारे नाम घेतले पाहिजे. आज आपल्याला

नामाशी तसे नाते जोडता येत नाही. म्हणून आपण श्रीमहाराजांना त्यांच्याच सत्तारूपाने धरणे व हाक मारणे केले पाहिजे.

## |४४७| (९ फेब्रुवारी १९९६)

आमच्यापैकी एक साधक परदेशी गेले होते ते काल परत आले. नेहमीचे सर्वजण काल पू. बाबांचा वाढदिवस म्हणून संध्याकाळी मालाडला गेले होते. काल पू. बाबांना ८८ वे वर्ष लागले. काल बरीच गर्दी होती त्यामुळे विशेष बोलणे झाले नाही.

**पू. बाबा :** गेल्या आठवड्यात बिहारमधील एक जोडपे भेटायला आले होते. रांचीजवळच्या एका गावात राहातात. बाई अनपढ असली तरी कृष्णनामाचा रोज पंचवीस हजार जप करते. तिने सांगितलेली हकिगत सांगतो. ती म्हणाली की तिच्या मनात नामासंबंधी शंका येत. त्याबद्दल कोणाला विचारावे अशी तिला तळमळ लागली. स्वप्नात तिला एक व्यक्ती दिसली पण त्यापासून काहीच बोध झाला नाही म्हणून ती स्वस्थ राहिली. काही दिवसांनी स्वप्नात पुन्हा तीच व्यक्ती दिसली तेव्हां हा कोणीतरी बंगालमधला सत्पुरुष असावा असे वाटून तिने आणि तिच्या नवऱ्याने कलकत्त्याला जाऊन चौकशी केली पण काही पत्ता लागला नाही. काही दिवसांनी तिसऱ्यांदा ती व्यक्ती स्वप्नात दिसली. मात्र यावेळी ती व्यक्ती तिच्याशी काहीतरी बोलली. त्या बोलण्यातले मुंबई आणि कृष्णबाग हे शब्द तिच्या लक्षात राहिले म्हणून नवऱ्यासह ती मुंबईला व्ही. टी. स्टेशनवर आली. तेथे एका हमालाला त्यांनी कृष्णबाग कोठे आहे म्हणून विचारले. सुदैवाने त्याला ते मालाडला कोठेतरी आहे हे माहीत होते. त्याला काही पैसे देऊन त्याच्याबरोबर ती दोघे मालाडला आली. त्यांना स्टेशनच्या बाहेर सोडून येथे कोठेतरी चौकशी करा असे सांगून तो हमाल परत गेला. त्यावेळी सकाळी दहाचा सुमार होता. त्यावेळी मी बाजारात भाजी आणायला गेलो होतो. बाजारात तिने मला पाहिले आणि यही वो महात्मा है असे तिने नवऱ्याला सांगितले आणि माझ्यामागून ती दोघे घरी आली. मी शक्यतो सकाळी कोणाला भेटत नाही म्हणून मी त्यांना संध्याकाळी या म्हणून सांगितले. संध्याकाळी चारसाडेचारच्या सुमारास ती दोघे परत आली आणि त्यांनी ही सगळी हकिगत सांगितली. त्या बाईच्या शंका म्हणा किंवा प्रश्न म्हणा, सांगतो :

१) नामाचे पावित्र्य कसे जाणवेल ?

२) नामात मधुरता - गोडी कशी येईल ?

३) नामाने उद्धार होईल का?

मी तिला सांगितले ते सांगतो.

१) स्नानाने शरीर शुद्ध होते तसे नाम घेतले की शुद्ध वाटले पाहिजे. विचार, विकार कमी होऊन मन शांत झाले पाहिजे. याच्या उलट नाम थांबले की अपवित्र वाटले पाहिजे.

२) नाम घेत राहिले की ते खोल जाते. मग गुरूंचे आणि नामाचे सान्निध्य लाभते आणि त्यामुळे नामात गोडी येते.

३) बोलण्याच्या ओघात त्या बाईंनी सांगितले की मातंग ऋषींची (मातंग म्हणजे मांग) शिष्या शबरी भिल्लीण त्यांना फार आवडते. म्हणून मी त्यांना म्हणालो की तिला जर निदिध्यासाने रामदर्शन झाले आणि उद्धार झाला तर आपला का होणार नाही? मात्र त्यासाठी शबरीसारखी निष्ठा हवी.

ही हकिगत सांगून पू. बाबा म्हणाले, मी तत्त्वज्ञानाचा अभ्यास केला आहे. पण या अनपढ बाईची निष्ठा पहा! खडीसाखर टाकली की मुंगळ्यांना आमंत्रण द्यावे लागत नाही. तुम्ही खडीसाखर बना म्हणजे संत तुमच्याकडे चालत येतील असे श्रीमहाराजांनी म्हटले आहे. माझ्या वाढदिवसाआधी मला शिकविण्यासाठीच श्रीमहाराजांनी त्या बाईला माझ्याकडे पाठवले!

नंतर मनासारखे साधन का होत नाही हा विषय निघाला. पू. बाबा म्हणाले, तुकाराम महाराजांच्या एका अभंगात 'विधवेसी एक सुत। त्यासी अहर्निश चित्त॥' म्हटले आहे. ती स्थिती साधनाच्या बाबतीत झाली पाहिजे. आता याखेरीज दुसरे काही नाही असे झाले पाहिजे. सत्संग आणि आज्ञापालन यांना फार महत्त्व आहे. अहंकार आपला नाश करतो. हा अहंकार आज्ञापालनानेच नाहीसा होईल. एकदा सुट्टी सुरू होताच रात्री साडेअकरा वाजता श्रीमहाराजांनी उद्या सकाळी बाहेरगावी जा असे सांगितले आणि आम्ही तसे केले.

**साधक ग :** नाम घेतांना श्रीमहाराजांच्या अस्तित्वाचा भाव कसा ठेवायचा?

**पू. बाबा :** थोडे सूक्ष्मात गेल्याखेरीज ते कळणार नाही. केवळ शब्दांनी ते सांगता येणार नाही. सुरुवात म्हणून स्थूलात एकसारखी त्यांच्या अस्तित्वाची भावना ठेवावी. सर्व काही त्यांना सांगून करावे.

**साधक प :** त्याचीही यांत्रिक सवय होण्याची शक्यता असते म्हणून आत उतरूनच श्रीमहाराज सर्व काही कसे करतात ते पहायला शिकले पाहिजे. जप

झाला तरी त्यांनी कसा करून घेतला आणि झाला नाही तर त्यांनी कसे अडथळे आणले ते पहायला शिकले पाहिजे.

## ।४४८। (१६ फेब्रुवारी १९९६)

**पू. बाबा :** परवा बुधवारी मिरजेचे डॉ. सतीश इनामदार त्यांच्या बनारस हिंदू युनिव्हर्सिटीमधील एका मित्रासह भेटायला आले होते. ते गृहस्थ अर्थशास्त्राचे प्राध्यापक होते. आता रिटायर झाले आहेत. त्यांचा तत्त्वज्ञानाचा अभ्यास चांगला असून शिवाय कृष्णमूर्तींशीही निकटचा परिचय होता. विशेषत: कृष्णमूर्तींच्या अखेरच्या तीन वर्षात हा परिचय जास्त दृढ झाला होता. त्यांनी कृष्णमूर्तींशी झालेल्या चर्चेतला काही भाग सांगितला.

१) एकदा त्यांनी कृष्णमूर्तींना विचारले की तुम्ही लोकांना जे सांगता ते आपण होऊन सांगता की कोणाची आज्ञा आहे म्हणून सांगता? कृष्णमूर्ती म्हणाले, तसे पाहिले तर आपण लोकांचेच सांगत असतो. काही वाचलेले असते, काही ऐकलेले असते. पण मी सांगतो ते मात्र कोठून येते ते मला माहीत नाही.

२) तुम्ही भक्तीचे इंग्रजीत भाषांतर कसे करता म्हणून विचारल्यावर कृष्णमूर्ती म्हणाले, मी त्याचे भाषांतर **Love (Love with capital L)** असे करतो. त्यांच्या ह्या भाषांतराच्या संदर्भात आमचे व्रजगोपिकांच्या भक्तीसंबंधी बोलणे झाले.

३) नामस्मरणाबद्दल तुमचा आक्षेप का म्हणून विचारल्यावर कृष्णमूर्ती म्हणाले, खरे नामस्मरण कोण करतो? बहुतेकांचे नामस्मरण रटाळ **(hackneyed)** असते. नाम हे स्मरणातून येत नाही. ते सत्स्वरूप आहे; क्षणोक्षणी नवे आहे. म्हणून नाम घेतांना प्रत्येक नाम ताजे वाटले पाहिजे. असे नाम कोण घेतो?

४) कृष्णमूर्ती म्हणाले, जगात मी आणि माझे याने प्रत्येकजण बांधलेला आहे. माझे ध्येय **Freedom** - स्वातंत्र्य हे आहे. पू. बाबा म्हणाले, त्याच्यासाठी मी त्याचा आहे असे वाटले पाहिजे. एकदा 'मी' त्याला दिला, अहंकार गेला की काम झाले. **you die to yourself.**

५) कृष्णमूर्ती म्हणाले, खरे श्रवण करतांना कोणी दिसत नाही.

६) कृष्णमूर्ती म्हणाले, तुम्ही ज्या अर्थी अनुभव म्हणता तसा मला नाही, पण **feeling** असते. इतर व्यवहार करतांना ते क्षीण होते, पण निर्विचार झालो की ते असते. निर्विचार होण्याची कला मला लहानपणापासूनच आहे.

७) कृष्णमूर्ती म्हणाले, मी आकाशाशी एकरूप होतो.

**साधक क** : निसर्गदत्त महाराज एकदा म्हणाले की माझ्याबद्दल तुम्ही जी जी म्हणून कल्पना करता तो मी नाही. म्हणजे मी कल्पनेच्या पलीकडे आहे.

## |४४९| (२३ फेब्रुवारी १९९६)

**पू. बाबा** : अहमदाबादचे प्रा. रा. ब. आठवले एकदा श्रीमहाराजांना भेटायला आले होते. श्रीमहाराजांना ते म्हणाले मी आपल्याला काही विचारू का? यावर श्रीमहाराज म्हणाले की काही प्रापंचिक प्रश्न असेल तर मलाच माझा प्रपंच धड करता आला नाही आणि आध्यात्मिक प्रश्न असेल तर एका नामापलिकडे मला काही माहीत नाही. यावर आठवले म्हणाले, महाराज! मला असे अडवू नका; मला विचारू द्या. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, विचारा. आठवले म्हणाले, मी पॉंडीचरीला काही दिवस श्रीअरविंदांकडे राहून आलो. रमण महर्षींच्या आश्रमातही काही दिवस राहिलो होतो. पण माझे मन शांत होत नाही. सारखे भिरभिरत असते.

पू. बाबा म्हणाले, वास्तविक प्रा. आठवले मोठे संस्कृत पंडित होते. जयदेवाच्या रसगंगाधराचे त्यांनी मराठीत भाषांतर केले आहे. त्यांना गाण्याचे चांगले अंग होते; कीर्तनही चांगले करीत. त्यांचा एक मुलगाही गवई आहे. पण पहा, असे असूनही त्यांच्या मनाला स्वस्थता नव्हती. मला वाटते, माणूस जितका विद्वान तितका तो जास्त अस्वस्थ होतो; असो.

श्रीमहाराजांनी त्यांना विचारले, तुम्हाला मन शांत व्हावसं वाटतं म्हणजे काय वाटतं? आणि पुढे म्हणाले, जोपर्यंत काही करणं (कर्म) आहे तोपर्यंत मन अस्वस्थच राहाणार. करण्याचं होणं होत नाही तोपर्यंत मन शांत होणार नाही. म्हणून तुम्ही आणखी काही ठिकाणी जा आणि ज्याला भेटल्याबरोबर समाधान वाटेल तेथे तुमचे काम होईल असे समजा. पुढे प्रा. आठवले निंबाळला गेले आणि गुरुदेव रानड्यांना भेटल्यावर त्यांचं समाधान झालं.

ही हकिगत सांगून पू. बाबा म्हणाले, नामस्मरणदेखील करणं न होता होणं झालं पाहिजे. सॉक्रेटिसनेही ह्या होण्याला फार महत्त्व दिलं आहे. आणि अगदी अलीकडे बरट्रांड रसेलनेही असेच म्हटले आहे. कर्मात समाधान मिळणार नाही. कर्म अपूर्णच आहे. ते गळून पडलंच पाहिजे. म्हणजे देह आहे तोपर्यंत कर्म राहणारच पण मी करतो (मी कर्ता) हा भाव नाहीसा झाला पाहिजे. श्रीमहाराज एकदा म्हणाले की ब्रह्मानंद बोवांनी एक आज्ञापालनाखेरीज काहीही केले नाही.

त्यांना नामाची सत्ता आणि पूर्णता पटली आणि नाम आणि श्रीमहाराज एकच आहेत ही खात्री झाल्यानंतर फक्त नामस्मरण राहिलं.

**साधक प** : नाम पूर्ण आहे असं म्हटल्यावर वास्तविक पुढं काही चर्चेची गरजच नाही. ती चर्चा करणं म्हणजे नाम अपूर्ण आहे, त्याला आणखी कशाची तरी जोड द्यायला पाहिजे असं वाटणं आहे.

कर्तेपणा साधनात कसे अडथळे आणतो यावर पूर्वीचेच मुद्दे पुन्हा तपासले गेले. साधक प म्हणाले की कर्तेपणापेक्षा भोक्तेपणा जास्त त्रास देतो. कर्तेपणापेक्षा तो जास्त खोल आहे.

**पू. बाबा** : हे खरे आहे. मी भोग घेतो – मग ते सुख असो वा दु:ख असो – हे जास्त खोल आहे. जोपर्यंत भोगवासना गेली नाही तोपर्यंत साधन नीट होणार नाही.

**साधक ग** : म्हणूनच 'जितं सर्वं जिते रसे' किंवा 'रसवर्जं रसोप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते' असे म्हटले आहे.

**पू. बाबा** : गोपींनी काय केले पहा. कृष्ण जेव्हां त्यांच्याजवळ नसे तेव्हां तो उभा कसा राहातो, हसतो कसा, मुरली कशी वाजवतो इत्यादी त्याचेच चिंतन करीत. त्यामधे त्यांना देहाचा विसर पडे. देहबुद्धी जायला देहाचा विसर पडलाच पाहिजे. मी भगवंताचे किंवा श्रीमहाराजांचे भोग्य आहे. ते मला भोगताहेत. माझे सुख, माझे दु:ख हा सगळा त्यांचा भोग आहे असा भाव झाला तर नामात रस येईल.

चर्चा चालू असतांना श्री. बापूसाहेब दामले, डॉ. आप्पासाहेब आठवले, श्री. कर्णिक व श्री. साठ्ये ही मंडळी आली. नामसाधनाअभ्यास शिबिर केव्हां घ्यावयाचे हे विचारायला ते आले होते. दि. ६, ७ व ८ मार्चला गोंदवल्याला आरोग्य शिबिर होणार आहे त्याचीही माहिती त्यांनी पू. बाबांना दिली.

पू. बाबा म्हणाले, सध्या माझी प्रकृती ठीक नाही. अशक्तपणा वाटतो. यावर डॉ. आठवले म्हणाले की गोंदवल्याला आलात की सगळे ठीक होते. तेव्हां पू. बाबा म्हणाले, खरोखर माझ्यातून ती सत्ता काम करते आहे असे वाटू लागले की आंबा पाडाला लागला म्हणून समजावे. माझी अद्यापि ती अवस्था नाही. महाराजच सर्व काही करतात हे विचाराने पटते पण आतून वाटत नाही.

## |४५०| (१ मार्च १९९६)

**पू. बाबा** : रविवारी निरूपणानंतर एक गृहस्थ मला भेटायला आले होते. ते गुरुदेव रानडे यांचे अनुग्रहीत आहेत. ते म्हणाले की तुम्ही एकदा निंबाळला या.

आम्ही निंबाळ म्हणजे मयखाना केला आहे. मयखाना म्हणजे दारूचा गुत्ता. तिथे दारुडे जसे दारू पिऊन बेहोश होतात तसे नामाने बेहोश झाले पाहिजे. कृष्णदास नांवाचा एक व्यापारी श्रीमहाराजांचा भक्त होता. तो श्रीमहाराजांना म्हणत असे की महाराज, मला नामात मस्त करा. श्रीमहाराजांना ते फार आवडत असे. नामात मस्ती कशी येईल? यासाठी, मला वाटते, भावनेचे पोषण केले पाहिजे. 'रामरतन धन पायो' असे मीराबाईने म्हटले तसे आपल्याला गुरूंनी दिलेल्या नामाबद्दल का वाटत नाही. 'वस्तु अमोलिक दी मेरे सतगुरु'. नाम हीच सद्गुरूंनी दिलेली अमूल्य वस्तू आहे. आपल्याला त्यांनी दिलेले नाम दिव्य आहे, पवित्र आहे असे का वाटत नाही?

**साधक क** : प्रपंचात आपल्याला सुख मिळेल असे माणसाला वाटत असते. दु:ख भोगत असतांनादेखील हे संपले की सुख मिळेल असे वाटते. दु:ख जसे संपणारे आहे तसे त्या दु:खानंतर येणारे सुखही संपणारे आहे असा विचार कोणी करीत नाही. सध्या मिळणारे सुख क्षणिक आहे; त्यापेक्षा शाश्वत सुख मिळवावे असे वाटत नाही.

**साधक ग** : आज नामाविना काही अडते आहे असे वाटत नाही. नामाविना प्रपंच ही अडचण वाटली पाहिजे.

**पू. बाबा** : विवेकाने आणि भावनेने हे साधेल पण त्यासाठी आधी ते पाहिजे असे वाटले पाहिजे.

## |४५१| (८ मार्च १९९६)

पू. बाबांनी आज ब्रह्मानंद महाराजांच्या बऱ्याच गोष्टी सांगितल्या. ब्रह्मानंद महाराज सांगलीला गेले की श्री. आपटे यांच्याकडे किंवा दुसऱ्या एका गृहस्थांकडे उतरत. त्या दुसऱ्या गृहस्थांकडे (पू. बाबांना त्यांचे नांव आठवले नाही) गोखले नांवाचे एक गृहस्थ जात असत. नुकतेच ते पू. बाबांना भेटले त्यावरून आज ह्या आठवणी निघाल्या.

एका कानडी गृहस्थांनी एकदा ब्रह्मानंद महाराजांना विचारले की तुम्ही आम्हाला नाम दिले आणि त्यात आनंद आहे म्हणून सांगितले तो आनंद कोणता? प्रश्न विचारल्याबरोबर ब्रह्मानंद महाराज एकदम म्हणाले, 'गाढवा! मी कुठले, महाराजांनी नाम दिले.' इतके महाराज त्यांच्यामधे शिरलेले होते. 'मी नाही, तेच आहेत' ही थोर अवस्था त्यांना नामस्मरणाने आणि

गुरुआज्ञापालनाने लाभली. ते म्हणाले, उगीच काही शंका काढत बसू नये, महाराजांनी सांगितलेले नाम घ्यावे.

एकदा त्यांना विचारले की नि:शब्द नाम म्हणजे काय? तेव्हां ते म्हणाले की सामान्यत: आपण वैखरीत किंवा मध्यमेत नाम घेतो; तेथे शब्द आहे. त्याच्याही पलीकडे पश्यन्तीमधे आणि नंतर परेमधे नाम गेले की तेथे शब्द नाही, केवळ स्फुरण आहे. तेथे नि:शब्द नाम आहे. एकनाथ महाराजांनी त्याला महामौन म्हटले आहे.

असेच एकदा ब्रह्मानंद महाराजांना तुरीय अवस्था म्हणजे काय असे त्यांच्या एका शिष्याने विचारले तेव्हां ते म्हणाले, तुला समजेल का? पण सांगतो, कोणाला सांगू नकोस. आत्ता तू मला पाहातो आहेस. ही झाली एक (जाग्रत) अवस्था. समज, एक माणूस झोपलेला आहे. त्या झोपेत त्याची बायको त्याला भेटली आणि हसली. वास्तविक प्रत्यक्षात काहीच घडले नाही. पण जेव्हां हे घडले असे त्याला वाटले तेव्हां ते खरेच होते. ही दुसरी अवस्था (स्वप्न). तिसऱ्या अवस्थेमधे काहीच नाही. मी आहे पण त्या मीचेही भान नाही (सुषुप्ति). ह्या तीन्ही अवस्थांकडे 'मी' साक्षीदार म्हणून पाहातो ही चवथी तुरीय अवस्था.

पू. बाबा म्हणाले, ब्रह्मानंद महाराज किंवा गुरुदेव रानडे हे आपले आदर्श आहेत. साधक कसा पाहिजे हे त्यांच्यापासून शिकावे.

## ।४५२। (१५ मार्च १९९६)

**पू. बाबा :** आज तरी आपले साधन देहाच्या सुस्थितीवर अवलंबून आहे. ज्या आहारामुळे आळस येणार नाही, पोट साफ राहील असे सात्त्विक अन्न घेतले पाहिजे. पोट हलके असते तेव्हां साधन चांगले होते, मनाला सूक्ष्मता येते असा माझा अनुभव आहे. ही सूक्ष्मता टिकेल असे साधकाने वागले पाहिजे. मनाला सूक्ष्मता येते म्हणजे काय ते सांगतो. श्री. तुमच्या ओळखीचे आहेत. त्यांना मी त्यांच्यावर नाराज आहे असे उगीचच वाटत होते. त्याबाबतीत ते माझ्याजवळ काहीच बोलले नव्हते. पण जपाला बसलो की त्यांची अस्वस्थता माझ्यापर्यंत पोचत असे इतकेच नव्हे तर एकदा तेही मला दिसले. त्यांच्या पत्नीचा मला फोन आला. नंतर मी त्यांना पत्रही लिहिले पण त्यात तुमच्याबद्दल माझ्या मनात कोणतीही नाराजी नाही असे स्पष्ट लिहिले नाही आणि ते तेच घेऊन बसले; असो. सांगायचा मुद्दा म्हणजे नामाने मनाला जी

सूक्ष्मता येते ती टिकवण्यासाठी देहाकडे आणि आहाराकडे लक्ष दिले पाहिजे. असे करणारा माणूस कदाचित चार पाच मैल चालू शकणार नाही पण त्याचे साधन आणि स्मृती सतेज राहातील.

पू. बाबा म्हणाले, नुकतेच पनवेलचे एक गृहस्थ आणि त्यांची पत्नी भेटायला आले होते. त्यांची सर्व मुले सुस्थितीत आहेत. काहीजण परदेशातही गेले आहेत. त्या बाईंनी त्यांच्या आजोबांची एक गोष्ट सांगितली. त्यांचे आजोबा विद्यार्थीदशेत असतांना एकदा काही वाचत बसले होते, तेव्हां एक माणूस तेथे आला आणि त्यांना त्याच्याजवळच्या एका केळ्यातले अर्धे केळे दिले, उरलेले अर्धे स्वत: खाल्ले आणि निघून गेला. पुढे काही वर्षांनी ते (बाईंचे आजोबा) पनवेलच्या काका पुराणिक नांवाच्या एका सत्पुरुषांना भेटायला धूतपापेश्वरच्या पुराणिकांबरोबर गेले तेव्हां काका पुराणिकांनी अर्धे केळे खाल्लेले लक्षात आहे ना म्हणून त्यांना विचारले. पुढे आजोबांनी त्यांचा अनुग्रह घेतला आणि आम्हाला सदैव सत्संग राहू दे असे त्यांनी गुरूंजवळ मागितले. त्या बाई म्हणाल्या की तेव्हांपासून त्यांच्या घरी अध्यात्म आहे. बाईंनी बऱ्याच तीर्थयात्रा केल्या आहेत. त्यांनी एक मार्मिक प्रश्न विचारला. त्या म्हणाल्या की पुष्कळ ठिकाणी हिंडले; गोंदवल्यालाही गेले होते पण काळजी नाही असा माणूस पाहायला मिळाला नाही. सत्पुरुषांना काळजी नसते म्हणतात, तेव्हां हा भ्रम आहे का? तुमचा काय अनुभव आहे? मी त्यांना म्हणालो, मी काय सांगू? हे तुम्ही एखाद्या सत्पुरुषाला विचारा. तथापि एक सांगतो की गोंदवल्यासारख्या ठिकाणी गेल्यावर काळजी कमी होते; पूर्ण निर्भयता येते असे नाही. पण पुन्हा संसारात आलात की काळजी तुमच्या मानगुटी बसते.

त्यांचा दुसरा प्रश्न शरणागतीसंबंधी होता. त्यांनी विचारले, शरण जायचे म्हणजे काय करायचे? मी सांगितले की शरणागतीमधे समर्पण आहे. मी त्यांना सांगितले नाही पण शरणागतीत होलिस्टिक व्ह्यू (समग्रतेची दृष्टी) आहे. श्रीमहाराज म्हणत, लग्न झाले की आठ तास मी तुझी बायको किंवा नवरा राहीन असे म्हणता येत नाही; पूर्णपणे अर्पण व्हावे लागते, तसे आहे. त्या म्हणाल्या हे करता येईल का? मी म्हणालो की संतांच्या चरित्राकडे पाहिले तर हे शक्य दिसते 'एका जनार्दनीं शरण' म्हटल्यावर एकनाथ महाराज वेगळे राहिलेच नाहीत.

पू. बाबांनी आम्हाला विचारले की काळजीचे मूळ कशात आहे? काळजी सुटणे शक्य आहे का?

**साधक प** : देहाच्या ज्या साहजिक क्रिया असतात त्याबद्दल उदाहरणार्थ, मी खाल्ले की त्याचे काय होईल याची मी काळजी करत नाही. बेबीजवळ असलेल्या primitive brain चे ते कार्य आहे. पण माझ्या सध्याच्या मेंदूचे कार्य इंद्रियांद्वारा बाहेरचे जग आत घेणे हे आहे. माझी सगळी काळजी बाहेरच्या जगातल्या वस्तू आणि घटनांबद्दल आहे, कारण त्यात अपूर्णतेमुळे अनिश्चितता आहे. जगाचा हा जो स्वभाव आहे तो जाणला तर काळजी लागणार नाही.

**साधक ज** : घडते ते प्रारब्धानुसार किंवा श्रीमहाराजांच्या इच्छेने घडते असे म्हटले तरी माझ्या दैनंदिन जीवनात जे प्लॅनिंग करावे लागते ते करायचे की नाही? नाही म्हटले तर त्याशिवाय मला जगता येणार नाही.

**पू. बाबा** : जीवनात प्लॅनिंग करावे लागेलच पण ते करतांना फळाविषयी आग्रह नसावा. घडते ते त्यांच्या इच्छेनुसार घडते हे लक्षात घेऊन नित्य अनुसंधानात राहावे.

**साधक ग** : श्रीमहाराजांनी म्हटले आहे की "व्यवहाराच्या चालीनें चालावें। वेळप्रसंग पाहून वर्तावें। चित्तीं समाधान राखावें॥"

आपण शेवटचा भाग विसरतो.

**साधक ब** : विसरतो असे नाही; आपली आणि समाधानाची ओळखच नाही. महाराजांची इच्छा हे आपले नुसते बोलणे होते. आतून तसे वाटत नाही.

**साधक प** : दृश्यात जिथे तुमचा दुसऱ्याशी संबंध येतो तिथे प्लॅनिंग अवश्य करा पण खरा मारा आतच आहे. मला मीपणा माहीत आहे पण मी माहीत नाही. माहीत आहे तो मीपणा आतून सुटला पाहिजे.

**साधक ग** : काळजीचे मूळ वासनांत आहे. साधनानेच वासना क्षीण होतील आणि साधक क म्हणतात त्याप्रमाणे माझी काळजी किती कमी झाली हे माझे साधन कसे चालले आहे याचे मोजमाप आहे.

**पू. बाबा** : शरण जायला जी शक्ती लागते ती आज माझ्याजवळ नाही. पण म्हणून शरण जायचा भाव आणायचा नाही हे योग्य नाही. मला ती शक्ती द्या, मला शरण जायला शिकवा अशी श्रीमहाराजांची प्रार्थना करावी.

## ।४५३। (२२ मार्च १९९६)

**पू. बाबा** : सोमवारी मला स्वामी चिद्विलास नांवाचे एक स्वामी ठाण्याहून भेटायला आले होते. स्वामी पँट शर्ट या पोशाखात मोटरसायकलवरून त्यांच्या वहिनींना घेऊन आले होते. पन्नास बावन वर्षांचे असावेत. लग्न केले नाही. हे

वर्णन येवढयासाठीच केले की स्वामी म्हटल्यावर वेगळीच प्रतिमा आपल्या डोळ्यांसमोर येते. त्याला तसे महत्त्व नाही. ह्या स्वामींच्या गुरूंनी त्यांना नामस्मरण करायला सांगितले आहे. त्यांना नामस्मरण करतांना काही अडचण आली आणि त्यांच्या म्हणण्याप्रमाणे मी त्यांच्याकडे गेलो आणि ती अडचण दूर केली. आपले हरिपाठाचे पुस्तक त्यांनी वाचले आहे. त्यामुळे मी त्यांना माहीत आहे. त्यांची अडचण सांगतोच; पण ती कशी सुटली ते त्यांच्या गुरूंना सांगितल्यावर गुरूंनी त्यांना मला भेटायला सांगितले म्हणून ते आले होते. त्यांची अडचण अशी की नामस्मरण करायला बसतो तेव्हां ते चालते पण इतर व्यवहार सुरू झाले की ते टिकत नाही. नामस्मरण तर अखंड व्हायला हवे; तर ते कसे करावे? मी त्यांना सांगितले की सत्संगती आणि शरणागती हाच त्याला मार्ग आहे. सद्गुरूंना शरण जावे. त्यांची प्रार्थना करावी. वास्तविक तेच आपले साधन करून घेतात. दुसरे असे की आपल्याला एका वेळी दोन तीन अवधाने ठेवायची सवय असते. त्यामुळे व्यवहारात नामाचे अवधान अभ्यासाने ठेवणे शक्य आहे. मात्र अखंड नाम चालू राहावे अशी तळमळ पाहिजे. त्या तळमळीतच शरणागतीचा उदय आहे.

साधक अ यांनी स्वामी रामदासांच्या In the Vision of God ह्या पुस्तकातील काही वचने एकत्र करून पू. बाबांना दाखविली होती. त्यातली काही वचने पू. बाबांनी आम्हाला वाचून दाखवली. पहिल्या वचनात त्यांनी I constantly repeated the Name with love and faith असे म्हटले आहे. पू. बाबांनी विचारले की येथे love शब्दाचा अर्थ काय आहे? आपल्याजवळ काही प्रमाणात तरी faith म्हणजे श्रद्धा आहे.

**साधक प** : love म्हणजे प्रेम.

**पू. बाबा** : नामाचे प्रेम लागण्यासाठी आपण काय केले पाहिजे? प्रेमाची एक गोष्ट सांगतो. आमच्या ओळखीचे एक भटजी होते. रोज दुपारी ते बुद्धिबळे खेळत असत. एकदा खेळतांना डाव अडला. मांडलेला डाव त्यांनी तसाच ठेवला आणि दोन दिवसांनी त्यांना खेळी सुचली. ते म्हणाले की मांडून ठेवलेल्या डावाकडे येता जाता नुसता पाहात होतो आणि मग सहज खेळी सुचली. माझ्या मनात आले की नाम घेतांना ही सहजता पाहिजे. नामात कष्ट नसावे. ही सहजता प्रेमाशिवाय येणार नाही. प्रेम आहे तिथे कष्ट नाहीत.

**साधक ज** : नामाची संगत ठेवली तर प्रेम येईल.

**पू. बाबा** : पण नामाची संगत राहात नाही ना!

**साधक ब** : नामाच्या संगतीपेक्षा श्रीमहाराजांची संगत ठेवणे सोपे आहे. ते आणि नाम भिन्न नाहीतच. आज देखील मी जे नाम घेतो आहे ते त्यांच्या कृपेनेच. म्हणून नाम घेतांना त्यांची आठवण ठेवावी. ही आठवण इतर उपाधींसारखी उपाधी नाही कारण तेच ते आहेत.

स्वामी रामदासांच्या दुसऱ्या वचनात म्हटले आहे की नामातून मी मौनात गेलो आणि नाम चालू राहिले. पू. बाबा म्हणाले, ॐकार ही नादब्रह्माची खूण आहे. ते केवळ स्पंदन आहे. नामस्मरण जसे सूक्ष्म होत जाईल तसे ते जास्त स्पंदनमय जाणवू लागेल आणि शेवटी नामस्मरण होत राहील; ते करावे लागणार नाही. हा अनाहत नादाचा आविष्कार आहे.

आणखी एका वचनात स्वामी रामदासांनी Name was running in his mind all the time म्हटले आहे.

**साधक प** : पहिल्या वचनात प्रेम आणि श्रद्धापूर्वक मी नाम घेतले म्हटले आहे. त्याची परिणती अखंड नाम चालण्यात झाली. ती कृती राहिली नाही.

आणखी एका वचनात त्यांनी वैखरीने नाम घेतांना होणाऱ्या नादाचे आणि आनंदाचे वर्णन केले आहे. ''आपण नाम घ्यावें, तें आपणच आपल्या कानांनीं ऐकावें, आणि तें घेतां घेतां त्यांत शेवटीं स्वत:ला विसरून जावें, हाच नामसाधनेतला आनंदाचा मार्ग आहे.'' असे श्रीमहाराजांनी म्हटले आहे. यामुळे माणसाचे भरकटणारे मन नामावर येते आणि तो स्वत:ला विसरतो. मोठ्याने नाम घेतांना एक लय निर्माण होते.

चर्चेत आलेला आणखी एक मुद्दा असा की आज आपण विचाराने नाम घेतो म्हणजे बाहेरून नाम घेतो कारण बरेच वेळा विचार आत्मसात झालेले नसतात. प्रेमाने नाम येऊ लागले की ते आतून येईल आणि श्रीमहाराजांनी म्हटल्याप्रमाणे गाडी उताराला लागेल.

## **|४५४|** (१२ एप्रिल १९९६)

गेले काही दिवस पू. बाबांची पाठ बरीच दुखते आहे. पावलांवरही सूज आहे.

साधक ब आणि साधक प गोंदवल्याला दहाबारा दिवस राहून आजच परत आले. गोंदवल्याला त्यांचा जप कसा झाला याची पू. बाबांनी चौकशी केली. दोघांचाही रोज सात आठ तास चांगला जप होत असे असे त्यांनी सांगितले.

**पू. बाबा** : गोंदवल्याला जप चांगला होतो असा आपला नेहमीचाच अनुभव आहे. श्रीमहाराज म्हणाले होते की कोल्हापूरचे श्री अंबाबाईचे मंदिर,

नाशीकचे काळाराम मंदिर आणि रामेश्वरचे मंदिर ही जागृत देवस्थाने आहेत. साधकाला या ठिकाणी मदत मिळते. रामेश्वरला मला याचा अनुभव आला. साधनाला मदत होते याची कारणेही श्रीमहाराजांनी सांगितली होती. पहिली गोष्ट म्हणजे आपण या ठिकाणी साधन करण्याच्या हेतूने जातो. सद्गुरूंनी साधन करवून घ्यावे असा आपला भाव असतो. त्यामुळे अहंकार थोडा विरळ होतो. दुसरी गोष्ट म्हणजे अनेक लोकांनी तेथे मनापासून साधन केलेले असते. त्याची कंपने त्या वातावरणात असतात आणि त्याचीही मदत होते. तिसरे म्हणजे ज्या प्रमाणात आपले मन सूक्ष्म होते त्या प्रमाणात ते सद्गुरूंच्या मनाजवळ जाते. त्यांचे मन विश्वमनच असते. त्यामुळे त्यांची आपल्याला त्या पातळीवर मदत होते. गोंदवल्याचा हा प्रभाव आणखी शंभर वर्षे राहील असे श्रीमहाराज म्हणाले होते.

**साधक प :** दिवसभर साधन चांगले व्हायचे पण मग संध्याकाळी थोडा मानसिक थकवा वाटायचा आणि त्यामुळे रात्री साधन विशेष व्हायचे नाही. मला वाटते की साधनास अनुकूल नसलेले मन तिकडे वळवण्यास जी शक्ती लागते त्यामुळे हा थकवा येतो. शरीराच्या थकव्याशी याचा संबंध नाही.

**पू. बाबा :** साधनाच्या आड अहंकार येतो. तो नाहीसा करण्यासाठी शरण गेले पाहिजे. शरण म्हणजे surrender आहे. पॉंडीचरीच्या मदरनी म्हटले आहे की तो sacrifice - यज्ञ नाही. ते आत्मसमर्पण आहे. Sacrifice चा अहंकार वाटण्याची शक्यता असते.

**साधक ब :** गोंदवल्याचे दोघे साधक गोंदवल्याहून पायी नेमावरला आणि तेथून जालन्याला जाऊन परत आले. ते म्हणाले की प्रवासात नामोच्चारण होत असे पण श्रीमहाराजांचा अस्तित्वभाव नेहमी जागृत राहात नसे.

**पू. बाबा :** नामस्मरण करतांना हा अस्तित्वभाव सतेज राहिला पाहिजे. आपले आजचे मन साधनाच्या आड येते ते बाजूला ठेवले पाहिजे. त्यासाठी सतत स्मरण पाहिजे. नाम घेतांना अस्तित्वाची भावना जागी ठेवता आली तर त्यात रस येतो. असे रसमय नाम व्हावे अशी सतत प्रार्थना करावी.

## |४५५| (१९ एप्रिल १९९६)

पू. बाबांची पाठ खूप दुखते आहे. पोटातही वात धरतो. त्यामुळे कोणत्याही स्थितीत स्वस्थ बसवत नाही म्हणून काल ते फक्त थोडा मध आणि पाण्यावर राहिले.

**पू. बाबा :** महाराजांना एकदा म्हणालो की आहाराच्या बाबतीत काही प्रयोग करावेसे वाटते. महात्मा गांधींच्या प्रयोगांवरून मला ते सुचले होते. ऐकल्याबरोबर श्रीमहाराज म्हणाले, हे काय नवे वेड डोक्यात शिरले आहे? त्यापेक्षा नामावर प्रयोग करावे. मला अर्थ समजला नाही म्हणून म्हणालो, म्हणजे काय करायचे? महाराजांनी विचारले, तुम्ही कोणते नाम घेता? प्रश्न ऐकून मी थोडा वेळ गप्प बसलो आणि म्हणालो, तुम्ही दिले ते नाम मी घेतो. महाराजांनी विचारले, तुम्हाला तसे वाटते का? आणि पुढे म्हणाले की तुम्ही घेता ते नाम केवळ त्याची छाया आहे. ते नाम येईल तेव्हां तुम्ही स्वत:ला विसरून जाल. त्यावेळी महाराजांनी जे सांगितले त्यावर विचार करत होतो तेव्हां आठवले की छाया म्हणजे काय असे त्यांना तेव्हां विचारले होते. तेव्हां महाराज म्हणाले की पुष्कळ गर्दीत माणसे मोठ्याने बोलत असावीत, अशा वेळी त्या गर्दीत तुम्हाला काहीतरी महत्त्वाचे असे अगदी हळू आवाजात सांगावे तसे ते नाम आहे. दृश्याच्या गर्दीत आणि गोंगाटात ते हरवून जाते.

पू. बाबा म्हणाले, त्यानंतर मी नामाचेच चिंतन करीत होतो. आपण जे नाम घेतो ते त्यांनी दिलेल्या नामाची छाया आहे तर त्यांनी दिलेले नाम काय आहे? काही वेळानंतर मला बूम् बूम् असा आवाज ऐकू येऊ लागला आणि त्यानंतर माझेच व्यक्तित्व दुभागले आणि उत्तर आले की त्यांनी दिलेले नाम हे नादब्रह्म आहे. ते पश्यन्तीतून येते आणि सद्गुरू त्याच्याही पलीकडे परेमधे म्हणजे शब्दब्रह्म असतात. शिष्याला नाम देण्यासाठी ते नादब्रह्मापर्यंत खाली वाकतात. मग माझ्या लक्षात आले की आपले नाम वैखरीने आणि फारतर मध्यमेत असते म्हणून ती त्यांनी दिलेल्या नामाची छाया आहे. पश्यन्तीत चालणारे नाम म्हणजे त्यांनी दिलेले नाम. त्यात माणूस गेला की तो नामात रंगतो आणि तेच नाम त्याला पुढे शब्दब्रह्मापर्यंत नेते. गुरुदेव रानड्यांनी ते केले. असा शिष्य भेटला म्हणजे गुरूलादेखील धन्य वाटत असेल.

त्यानंतर नामाला बसलो होतो तेव्हां असंख्य विचारांनी मनात गर्दी केली. निश्चयाने मी त्यांना बाजूला ढकलत होतो आणि नवे नवे विचार मनात येत होते. आणि मग वीज चमकून एकदम लख्खकन प्रकाश पडावा तसे झाले. जीवनात जे जे घडते, जे जे येते त्याला नाही म्हणू नये. त्याचा स्वीकार केला पाहिजे. असू दे! हे विचारदेखील त्यानेच पाठवले आहेत. जी परिस्थिती आहे, ज्या माणसांशी संबंध आहे ते सगळे त्यांचे करणे आहे. ते बरोबर असणार

अशी वृत्ती झाली तरच शरणागती शक्य आहे. मदर म्हणते की प्रत्येक घटना Divine Dispensation - ईश्वरी संकेत आहे.

नंतर विषय निघाला की आपली इंद्रिये - त्यात बुद्धीदेखील आली - बहिर्मुख आहेत त्यामुळे बाह्य जगाचे जास्तीत जास्त ज्ञान करून घेण्यास ती उपयोगी पडतात. त्यासाठी त्यांची शक्ती वाढावी म्हणून मी आजवर प्रयत्न केला. उदाहरणार्थ स्मरणशक्ती वाढवली. हे सगळे आता अंतर्मुख होण्याच्या आड येते.

**साधक प** : बाहेरच्या जगाचे जसे मी वेगळेपणाने ज्ञान करून घेतो तसेच आतलेही ज्ञान करून घ्यायचे आहे असे वाटते त्यामुळे आत उतरणे जमत नाही. याचाच अर्थ आज बुद्धी देहाला चिकटली आहे. हे चिकटणे किंवा आसक्ती नाहीशी झाली पाहिजे. राम कर्ता ही भावना झाली तरच कर्तेपणाचा अभिमान नाहीसा होईल. मला आत जायचे आहे म्हणतांना आत जाण्याच्या आड हा 'मी'च येतो. म्हणून हा 'मी' हा अहंकार गेला पाहिजे आणि तो शरणागतीनेच जाईल.

**पू. बाबा** : पण मग शरण जावे. त्याच्या आड कोण येते?

**साधक ग** : भाषा म्हणून हे ठीक आहे पण जो 'मी' मला आत जाऊ देत नाही तोच शरण जाण्याच्या आड येतो.

**पू. बाबा** : ध्येय निश्चित नाही आणि तशी तळमळही नाही हे या सगळ्याच्या मुळाशी आहे. ज्याला करायचे आहे त्याला परिस्थिती आड येत नाही. परवा म्हणजे बुधवारी संध्याकाळी न्यूयॉर्कहून एका साधकांचा फोन आला होता. ते गुळवणी महाराजांचे अनुग्रहीत आहेत. त्यांनी एक विलक्षण अनुभव सांगितला. ते म्हणाले की येथे भौतिक सुखसोयी इतक्या आहेत की बाहेर पडणारे बर्फ, गाड्यांची रहदारी वगैरेचा घरात अजिबात पत्ता लागत नाही. सकाळी ते ध्यानाला बसले होते आणि एकाएकी गार वाऱ्याची झुळूक यावी तशी नामाची झुळूक त्यांच्या अंगावर आली आणि शरीर थरथरले! त्यानंतर निळा प्रकाश दिसू लागला आणि मग तो फिकट होत होत पांढरा झाला. मी त्यांना सांगितले की हे सगळे बरोबर आहे. हे सगळे नामाचेच अनुभव आहेत. निळा प्रकाश ज्ञानाचा तर पांढरा भक्तीचा आहे. ते म्हणाले की येथे आमचा रोज लक्षावधि डॉलर्सचा व्यवहार चालू असतो पण नामामुळे मी त्या सगळ्या व्यवहाराच्या वर असतो. हे सांगून पू. बाबा म्हणाले याचा अर्थ असा की ध्येय निश्चित होऊन तळमळ लागली की व्यवहार साधनाच्या आड येत नाही.

## |४५६| (२६ एप्रिल १९९६)

**पू. बाबा :** नाम धरून ठेवणे कठीण आहे. त्यापेक्षा सगुण धरून ठेवणे, त्याच्या अनुसंधानात राहाणे सोपे आहे. सगुणाच्या उपासनेत आपण प्रोजेक्शन (प्रक्षेपण) केलेले असते. ते जितके रसरशीत असेल तितका तो जिवंतपणाचा भाव मूर्तीत प्रगट होतो आणि उलटून तो भक्ताच्या हृदयात प्रवेश करतो. मग त्याची उपासना असेल त्यानुसार भगवंताची अथवा सद्गुरूंची मूर्ती हृदयात स्थिरावते. भक्त आपल्या कल्पनेनेच मूर्तीत जीव भरतो आणि कल्पना तीव्र झाली की मूर्ती त्याच्याशी बोलू लागते, त्याच्या हातांनी खाते. नाम फार सूक्ष्म असल्यामुळे त्याचा आधार - आलंबन घेणे कठीण आहे.

**साधक प :** हे खरे असले तरी नामाला उपाधी नाही. रूपाचे चिंतन करतांना बंधने येतात. दुसरे म्हणजे आज आपले जीवन दृश्याने इतके भरलेले आहे की त्यात नवीन दृश्य भरायला जागा नाही. रेडिओ, टी. व्ही. इत्यादी माध्यमांमुळे इंद्रिये थकलेली आहेत. उदाहरणार्थ, मुरारीबापूंसारख्यांचे टी. व्ही. वरचे संकीर्तन ऐकतांना आपण तन्मय होतो, पण ते तेव्हढ्यापुरतेच राहाते.

**पू. बाबा :** मला साधत नाही हे कळते, पण ते साधावे अशी तळमळही लागत नाही. म्हणजेच ध्येयनिश्चिती होत नाही. मग कसे व्हायचे? आपली आजची जीवन पद्धति अशी आहे की स्वस्थ बसणे आपल्याला माहीतच नाही. हे जोपर्यंत जमत नाही तोपर्यंत आत जाणे शक्य नाही. यासाठी उपासना उपयोगी पडते. 'भक्त्या निर्मितं देवं अद्वैतादपि सुंदरम्' परब्रह्माला सगुणामधे आणले हे संतांचे केवढे उपकार आहेत.

**साधक ग :** भक्त आपल्या कल्पनेने मूर्तीत जीव भरतो आणि मूर्ती त्याच्याशी बोलू लागते असा भक्तांचा अनुभव असतो. पण श्रीमहाराजांना बरे वाटत नव्हते म्हणून रामरायांच्या डोळ्यांना आलेले पाणी तेथील सर्वांनी पाहिले.

## |४५७| (१० मे १९९६)

**पू. बाबा :** गेल्या महिन्यात न्यूयॉर्क येथील साधकांनी फोन करून सांगितलेला रंगांचा अनुभव मी तुम्हाला सांगितला. त्यानंतर मला रंगांचा अनुभव आला होता त्याची आठवण झाली. 'आनंदसाधना' मधे मी त्याचा

उल्लेख केला आहे. तेव्हां काय झाले ते सांगतो. एम्. ए. च्या वर्गाला लेक्चर द्यायचे होते. गीतेतील 'प्रकाशं च प्रवृत्तिं च' या १४ व्या अध्यायातील श्लोकावर सांगायचे होते. त्यावरचे शंकराचार्यांचे भाष्य मी वाचले होते. पण प्रकाश शब्दाचे महत्त्व लक्षात येत नव्हते म्हणून श्रीमहाराजांना विचारले तेव्हां ते म्हणाले, अज्ञान म्हणजे अंधार आणि ज्ञान म्हणजे प्रकाश आहे. आत्मस्वरूप स्वसंवेद्य आहे. ती शुद्ध जाणीव आहे. (शुद्ध जाणीव म्हणजे feeling. Reality is feeling) पण ते (आत्मस्वरूप) केवळ स्वसंवेद्य नाही तर स्वयंप्रकाशही आहे. प्रकाशात वस्तू दिसतात तसे आत्मस्वरूप चर्मचक्षूंना दिसत नाही पण ते जाणिवेत येते. नंतर संध्याकाळी लेक्चर होते म्हणून लोकलने चाललो होतो. लोकलमधून जातांना नामस्मरणात तंद्री लागली आणि भानावर आलो तेव्हां गुलाबी प्रकाश दिसला आणि मग शरीरात आलो. लेडबीटरने भक्तीचा रंग निळा सांगितला आहे. पण श्रीमहाराज म्हणाले की ते बरोबर नाही. निळा रंग ज्ञानाचा आहे. भक्तीचा रंग पांढरा आहे; कारण भक्तीत जसे सगळे मार्ग येतात तसे पांढऱ्या रंगातही बाकीचे रंग सामावलेले आहेत. आणखी एक अनुभव सांगतो. नामस्मरण करतांना एकदा मला काळा रंग दिसू लागला. त्यासंबंधी श्रीमहाराजांना सांगितल्यावर ते म्हणाले, आपले पूर्वीचे पाप आपल्याला त्या रंगाच्या रूपात दिसते!

या संदर्भात पू. बाबांनी एक जुनी हकिगत सांगितली. बडोद्याच्या सयाजीराव गायकवाडांचे दत्तक वडील मल्हारराव गायकवाड यांची मुलगी अक्कलकोटच्या संस्थानिकास दिली होती. त्यामुळे त्यांना अक्कलकोट स्वामी महाराज माहीत होते. त्यांनी आपल्याकडे बडोद्यास यावे असा त्यांचा प्रयत्न असे; पण स्वामी जात नव्हते. शेवटी एक ब्राह्मण पंचवीस हजार रुपये द्या, मी त्यांना घेऊन येतो म्हणाला. पैसे घेऊन तो अक्कलकोटला गेला. स्वामींजवळच्या लोकांना पैसे देऊन त्याने त्यांना स्वामींना राजी करायला सांगितले. पण स्वामी जेव्हां तयार होईनात तेव्हां तो त्यांना शरण गेला व खरे ते सर्व सांगितले. यावर स्वामी म्हणाले, त्या भोसडीच्याला कोठे माझी भेट पाहिजे? त्याचे पाप मला दिसते आहे ना!

पू. बाबांनी त्यानंतर दुसराच विषय काढला. ते म्हणाले, प्रमाण, विपर्यय, विकल्प, निद्रा आणि स्मृती या पाच वृत्ती पतंजलींनी सांगितल्या आहेत. त्यात झोपेसंबंधी 'अभावप्रत्ययालंबना वृत्तिर्निद्रा।' असे म्हटले आहे. म्हणजेच झोप ही देखील वृत्ती असून तिच्यामधे अनुभवाचा अभाव असतो. असा अभाव

असला की माणसाला आनंद होतो. तेव्हां असा अभाव जागेपणी शक्य आहे का? शून्यात गेल्यावर काय अवस्था होते? बुद्ध त्या शून्याशीच थांबले. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात की त्या अवस्थेतही शून्य आहे म्हणून सांगणारा कोणीतरी शिल्लक राहातोच.

**साधक प** : गीतेत त्याग आणि संन्यास हे दोन मार्ग सांगितलेले आहेत. त्यापैकी त्यागात कर्म चालते पण त्यात कर्म करणारा गुंतलेला नसतो. वासना नाहीशा झाल्याखेरीज अशी अवस्था येणे शक्य नाही. म्हणून क्रिया शून्यामाजी जिरो दे असे ज्ञानेश्वर महाराजांनी म्हटले आहे.

**साधक क** : हेतूशिवाय कर्म होणार नाही हे जरी खरे असले तरी आम्ही त्या कर्माच्या फळात गुंतलेले असतो. त्यामुळे जागेपणीचे तर राहूच द्या, झोपेतही कर्म चालू असते.

**पू. बाबा** : म्हणूनच 'देवा आतां ऐसा करी उपकार। देहाचा विसर पाडी मज॥' असे तुकाराम महाराजांनी म्हटले आहे. देहाचा विसर आणि त्यांच्या अस्तित्वाचा भाव ह्या दोन्ही गोष्टी फार महत्त्वाच्या आहेत. त्यातूनच मी नाही हा भाव म्हणजेच अभाव निर्माण होईल. पण त्यासाठी सावधानता पाहिजे.

दुसऱ्याचे अंत:करण न दुखवता त्याचा दोष श्रीमहाराज कसा दाखवत हे सांगतांना पू. बाबा म्हणाले, श्रीमहाराज देहात होते तेव्हांची गोष्ट. एकदा पू. तात्यासाहेबांनी केस राखले. श्री. गिजरेशास्त्री मोठे कर्मठ. त्यांना ते आवडले नाही. पण श्रीमहाराजांना कसे सांगणार? तथापि, तुम्ही मोठ्यांची मुलं, तुम्हाला कोण बोलणार असं ते तात्यासाहेबांना म्हणाले. पुढे काही दिवसांनी पू. तात्यासाहेबांनी पुन्हा पहिल्यासारखी हजामत केली. त्यानंतर ते जेव्हां श्रीमहाराजांच्या पाया पडले तेव्हां आता हे कसं चांगलं दिसतं असं श्रीमहाराज म्हणाले.

एक दिवस श्रीमहाराज बहिर्दिशेला जाऊन आले तेव्हां श्री. गिजरे शास्त्री स्नान करून रस्त्यावरून पाणी शिंपडत येत होते. त्यांना पाहून श्रीमहाराज म्हणाले, शास्त्रीबोवा, मी बहिर्दिशेला गेलो होतो तिकडे काहीतरी विसरले आहे ते घेऊन येता का? शास्त्रीबोवा तिकडे गेले तो तेथे एका द्रोणात दोन कडबू ठेवलेले होते ते त्यांनी श्रीमहाराजांना आणून दिले आणि पुन्हा स्नान न करता नित्यकर्म केले. ते पाहून श्रीमहाराज म्हणाले, पहा बोवा! शास्त्रीलोकच असे वागल्यावर काय करणार? श्री. गिजरेशास्त्री सांगत, श्रीमहाराजांनी हे अशा आवाजात म्हटले की मी माझ्या कर्मठपणातून बाहेर पडलो.

पू. बाबा ही हकिगत सांगत होते तेव्हां चिपळूणचे एक वृद्ध गृहस्थ त्यांना भेटायला आले. त्यांच्या रोजच्या दिनक्रमाबद्दल सांगतांना रोज रामरक्षा, देवपूजा करतांना गणपति अथर्वशीर्षाची आवर्तने इत्यादी नित्यनेमाबद्दल त्यांनी सांगितले. एकूण कार्यक्रमात नामस्मरण विशेष नव्हतेच. ते गेल्यानंतर पू. बाबा म्हणाले, पहा, हे असे होते. पूर्वीच्या माणसांचा कर्मठपणाचा दोष सोडला तर त्यांच्या वागण्यातली शिस्त वाखाणण्यासारखी असते. सगुणाची उपासना खरोखर रम्य असते. नारदभक्तिसूत्रात पूजासक्ति सांगितली आहे. दास्य, सख्य वगैरे कोणताही भाव असो. गोपी कामभावाने गेल्या तरी तो परमात्मा असल्यामुळे तो कामही दिव्य बनला.

**|४५८|** (१७ मे १९९६)

**पू. बाबा** : डॉ. सोनारांचा फोन आला होता. रतलामला श्रीमहाराजांचं एक ठिकाण आहे. तिथं नामसप्ताह व्हायचा आहे. लोकांना नामाबद्दल शंका असतात. इच्छा असते पण नामस्मरण होत नाही. तेव्हां लोकांना त्यासंबंधी काय सांगावं असं त्यांनी विचारलं. मी म्हणालो की शुक्रवारी आमची मंडळी जमतात तेव्हां त्यांच्याशी बोलून मग काय ते सांगतो. तेव्हां त्यांना काय सांगावं. आपली सर्वांची खूप नाम घ्यावं अशी इच्छा असते, पण होत नाही. असं का होतं ? तुम्ही कुणीही सांगा. बाकी सगळं होतं पण नाम कां होत नाही ?

**साधक ड** : मला वाटतं की नामाला आमची low priority आहे. बाकीच्या गोष्टींइतकं त्याचं महत्त्व वाटत नाही.

**पू. बाबा** : म्हणजे ध्येय निश्चित ठरलेलं नाही असं म्हणता येईल का ?

**साधक ज** : ध्येय तर नाहीच; पण त्याच्यापेक्षा दृश्याचं महत्त्व जास्त वाटतं.

**साधक ब** : ध्येय ठरलं नाही हे मला मान्य नाही. नाम घेणार नाही तर मी दुसरं काय करणार आहे ? ध्येय ठरलेलं आहे. नाम घ्यावं असं वाटतं, पण काहीतरी अडचण आहे. काय ते कळत नाही.

**साधक ग** : परवा पहाटे उठलो तेव्हां तुकाराम महाराजांचा एक अभंग आठवला. सत्संगतीच्या महतीच्या संदर्भात त्याचा नेहमी उल्लेख करतात. पण त्यातला दुसराच एक महत्त्वाचा भाग माझ्या लक्षात आला. तुकाराम महाराजांनी म्हटलं आहे "संतचरणरज लागता सहज। वासनेचें बीज जळोनि जाय॥ १॥ मग रामनामीं उपजे आवडी। सुख घडोघडी वाढो लागे॥ २॥"

रामनामात गोडी निर्माण व्हायला आधी वासना समूळ नाहीशा झाल्या पाहिजेत. म्हणजे आमच्या वासनाच नामाच्या आड येतात.

**साधक ज :** बाकीच्या सगळ्या वासना गेल्या नाहीत तरी नाम घ्यावं ही मुख्य वासना झाली पाहिजे. दृश्यात जे आहे त्याचा आपल्यावर पगडा आहे.

**पू. बाबा :** पण आज आपलं नाम दृश्यातलंच आहे. आज तरी ते कर्म आहे. तथापि औषध घेतलं की मी बरा होणार हा जसा विश्वास वाटतो तसा नामाबद्दल का वाटत नाही ?

**साधक ज :** औषध घेऊन बरं व्हावं असं मला वाटत असतं आणि पाचदा औषध घेतलेलं असेल तर तीनचारदा तरी मी बरा झालेला असतो. नामाखेरीज राहिलो तरी मला अस्वस्थ वाटत नाही. नामापासून मला काय पाहिजे ? शांती पाहिजे म्हणतो, पण म्हणजे काय ते कळत नाही.

**पू. बाबा :** असं कां म्हणता ? पुष्कळांना नामाचा अनुभव येतो. नामातून समाधान मिळावं असं आपण म्हणतो.

**साधक ग :** नामाच्या शक्तीचा प्रत्येकाला केव्हां ना केव्हां अनुभव येतो पण त्या अनुभवातून शिकून आपण पुढे जात नाही. खरं म्हणजे आम्हाला नामाच्या शक्तीची कल्पनाच नाही.

**पू. बाबा :** शक्तीचं राहू द्या; आपल्याला नामापासून काही मागायचं नाही. पण आपलं भाऊसाहेबांसारखंही नाही. त्यांचं कसं होतं; कोणी आलं तर बोलले, नाहीतर नाम चालू. अकरा कोटी जप झाला. रिटायर झाल्यावर त्यासाठी अठ्ठावीस वर्षं लागली पण त्याचंही त्यांना काही नव्हतं. महाराजांना आवडतं म्हणून घेतो इतकं साधं आणि सरळ होतं. आपलं तेही नाही. महाराजांनी दिलं आहे ना, मग घ्यायचं. बाकी मला काही माहीत नाही, असं होत नाही. त्याची Process - प्रक्रिया काय आहे, वैखरीने घ्यावं की कसं इत्यादी शंका कुशंका जात नाहीत.

**साधक ब :** नाम होतं ते त्यांच्या कृपेनंच होतं हे जरी खरं असलं तरी जी एक शिस्त लावून घेतली आहे त्याच्या पलीकडं ते जात नाही. कारण आमचं नाम घेणं अजून कर्मच आहे; आणि कर्माचा थकवा येतो.

**साधक भ (पूज्य बाबांना) :** तुम्ही सांगता की जाता येता नाम घ्यावं. उदाहरणार्थ पोळ्या करतांना नाम घ्यायला काय हरकत आहे ? पण तेही होत नाही. जेवतांना तर नाहीच. काही अडचण असली म्हणजे मात्र नाम होतं. पण सगळं ठीक चालू असलं की ते विसरतं.

**साधक ग :** ह्याचाच अर्थ आज आम्हाला नामावाचून आमचं अडतं आहे असं वाटतच नाही. नाम थांबलं की स्वामी रामदास कासावीस व्हायचे.

**साधक ड :** आमच्या अडचणी त्या काय? वास्तविक आता सगळा संसार झाला आहे. खूप नाम घ्यावं असं वाटतंही, पण अजून बाहेरची खेच आहे. नाम सोडून टी.व्ही. वरचे फडतूस कार्यक्रम नाहीतर बातम्या पहात ऐकत बसतो

**पू. बाबा :** अडचण असली की नाम होतं. पण म्हणून कुंतीसारखं आपल्याला जमणार नाही. ते सोसलं पाहिजे ना!

**साधक ग :** पण नाम झालं नाही याचंही वाईट वाटत नाही.

**पू. बाबा :** नुकतेच काही साधक नेमावरला पायी गेले होते. त्यांनी सांगितले की नामोच्चारण झालं पण ते करतांना त्यांच्या अस्तित्वाची जाणीव सतत नव्हती. त्यांची जर ही स्थिती तर कसं व्हायचं? नुसतं नामोच्चारण का होईना, ते घरीच कां होऊ नये? त्यासाठी इतका त्रास कशाला घ्यायचा? असं पहा की जागेपणा, झोप आणि स्वप्न या तीन्ही अवस्थात नाम झालं पाहिजे असं जर आहे तर त्यासाठी प्रथम जागेपणात तरी जास्तीत जास्त - निदान रोज पाच सहा तास नाम व्हायला नको का? रिटायर झालेल्यांना तर यापेक्षा जास्त वेळ मिळतो. जागेपणी नाम खोल गेल्याखेरीज झोपेत आणि स्वप्नात ते कसे टिकेल? आपण लिहीत असतो, बोलत असतो तेव्हां ठीक आहे, पण एरवी नाम टिकायला काय हरकत आहे?

**साधक ड :** आमची आता अर्धवट स्थिती झाली आहे. मन व्यवहारात पूर्वीसारखं रमत नाही आणि जितकं व्हावं असं वाटतं तितकं नामस्मरण होत नाही. बरं त्याचंही वाईट वाटत नाही. पण साधक ब म्हणतात त्याप्रमाणं ध्येय ठरलं आहे हे नक्की.

**पू. बाबा :** पण पाऊल पुढं पडलं पाहिजे ना? धुमसतं आहे पण पेटत नाही. ते पेटलं पाहिजे. त्यासाठी लागणारी तळमळ नाही. पण ती तळमळही नामाच्या शक्तीनेच येईल. पण ते मात्र सतत घेतलं पाहिजे **Now it is high time !**

## |४५९| (१ जून १९९६)

(दि. २१, २२ व २३ मे रोजी दुपारी नामामृतधारा ह्या व्हीडीओ कॅसेटसाठी पू. बाबांची प्रवचने झाली म्हणून दि. २४ रोजी येऊ नका असे त्यांनी सांगितले

होते. तसेच दि. १ जूनला श्री. दत्ताण्णा येणार आहेत म्हणून दि. ३१ मे ऐवजी दि. १ ला या असे पू. बाबांनी सांगितले होते.)

पू. बाबा श्री. दत्ताण्णांना म्हणाले की येथे येणाऱ्या सर्वांना खूप नामस्मरण करावेसे वाटते पण त्यांच्या हातून ते होत नाही. येणारी सगळी माणसे प्रापंचिक असतात हे लक्षात घेऊन त्यांची स्थिती अशी का होते ते सांगा.

**श्री. दत्ताण्णा** : त्याचे कारण ध्येयनिश्चिती झालेली नाही.

**साधक ग** : ध्येय ठरले आहे पण ते सर्वोच्च ध्येय झालेले नाही.

**श्री. दत्ताण्णा** : ते परमध्येय झाले की माणसाला मी नामासाठी जगतो असे वाटू लागते. ज्याचे पाकीट चोरीला गेले आहे तो माणूस जसा चोरामागे धावेल, मित्र किंवा शत्रू कोणीही जरी वाटेत भेटले तरी थांबणार नाही तसा तो ध्येयामागे लागेल.

**साधक प** : नामात रंगणे फार अवघड आहे.

**पू. बाबा** : नुसत्या नामाचा सहवास अवघड आहे. त्याला श्रीमहाराजांच्या सहवासाची जोड द्यावी.

आज पू. बाबांनी एक आश्चर्यकारक हकिगत सांगितली. दर रविवारी निरूपणाला येणाऱ्या एका बाईंनी त्यांना ती सांगितली. निंबाळला गुरुदेव रानड्यांच्या आश्रमात एक गृहस्थ व त्यांची पत्नी राहातात. गुरुदेव हयात होते तेव्हांपासून बाई सैपाकघरात काम आणि देखरेख करतात. आता म्हाताऱ्या झाल्या आहेत. शौचाला त्रास होतो म्हणून ऑपरेशन केले. तपासणीत तो कॅन्सर ठरला. तथापि बाई स्वस्थ आहेत. गुरुदेव असतांना म्हणजे १९५७ पूर्वी - कारण १९५७ मधे गुरुदेवांनी देह ठेवला - ह्या बाईंच्या छातीवर गाठी उठल्या. त्यांनी ते गुरुदेवांना सांगितले. ते म्हणाले, त्याचा तुम्हाला त्रास होणार नाही. पण एक कराल का? रोज पाच हजार जप करा आणि जप झाल्यावर तोंडातील थुंकी त्या गाठींना लावा. त्यांनी एक दीड महिना तसे केल्यावर त्या गाठी नाहीशा झाल्या! नामाची शक्ती आणि त्या बाईंची गुरुदेवांवरील श्रद्धा यांचे हे उत्कृष्ट उदाहरण आहे.

प्रेसिडेंटेस् हाउसमधे गुरुदेव रानडे यांनी राष्ट्रपती राजेंद्रप्रसाद यांच्यासमोर काही व्याख्याने दिली. त्यात त्यांनी संतांचे काही अनुभव सांगितले. व्याख्यानानंतर एक युरोपिअन बाई त्यांना म्हणाली की संतांचे अनुभव ठीक आहेत पण तुमचा अनुभव काय? तेव्हां ते म्हणाले, **I speak my experiences through other's !**

## |४६०| (७ जून १९९६)

**पू. बाबा** : परवा रविवारी निरूपणानंतर एक साधक भेटले. ते म्हणाले की आता पूर्वीसारखे ध्यान लागत नाही. रोज दहा हजार तरी जप होतो पण त्यात रसरशीतपणा राहिलेला नाही. मी त्यांना सांगितले की ते परत पाहिजे असेल तर बाकीचे सगळे व्याप सोडावे लागतील.

अलीकडेच मला एक अनुभव आला तो सांगतो. मी अखंड नाम घेण्याच्या प्रयत्नात असतो. स्वामी रामदासांनी म्हटले आहे की लोकांशी बोलतांना वा लिहीत असतांना त्यांचे नाम थांबे पण त्यानंतर लगेच सुरू होत असे. तसे होतेच असे नाही. काही वेळा नाम थांबले आहे हे थोड्या वेळाने लक्षात येते आणि ते पुन्हा सुरू होते. त्यामुळे मनात विचार आला की आपण जर नाम घेत आहोत तर नाम घेणारा माणूस आपल्याला ओळखता आला पाहिजे. नुकतेच त्याचे प्रत्यंतर आले. नागपूरच्या श्री. डी. पी. कुलकर्ण्यांचे एक नातेवाईक कुटुंब आले होते. त्या गृहस्थांचे वडील सत्तर पंचाहत्तर वर्षांचे असावे. दिसायला म्हणजे कपडे वगैरे थोडे गबाळे दिसत होते आणि मागे एकटेच बसले होते. त्यांच्याकडे पाहून माझ्या मनात विचार आला की हे काहीतरी वेगळे काम आहे. इतरांशी बोलणे झाल्यावर मी त्यांना पुढे या म्हणालो तेव्हां मला स्वच्छ मंत्र ऐकू आला. रेव्हिन्यू डिपार्टमेंटमधे ते मोठ्या हुद्यावर होते; म्हणाले की आता फक्त नामस्मरण करतो. साडेतीन कोटी जपाचा संकल्प केला आहे; त्यापैकी सव्वा कोटी झाला. नामात रस येतो का म्हणून मी त्यांना विचारले तेव्हां अजून नाही असे ते म्हणाले. ते म्हणाले की काही वेळा रात्री लवकर झोप लागत नाही. मग मी नाम घेत बसतो आणि श्रीमहाराजांची प्रार्थना करतो की तुम्ही मला झोपवा. मग तास दीड तासाने केव्हां तरी झोप लागते. पण तोपर्यंत नाम चालू राहाते.

**साधक ड** : मागे तुम्ही बालभावासंबंधी सांगितले होते म्हणून मी परवा श्रीमहाराजांना म्हणालो की मी तुमच्या मांडीवर झोपतो. थोड्या वेळाने मलाच वाटू लागले की महाराज बसले आहेत आणि आपण त्यांच्या मांडीवर लोळतो आहोत हे काही ठीक नाही. म्हणून मग म्हटले की मी तुमच्याजवळ झोपतो. आईची मांडी दुखेल असा मूल कधी विचार करते का? लक्षात आले की बालभाव कठिण आहे.

**पू. बाबा** : ते गृहस्थ सतत नाम घेत असल्यामुळे त्या नामाच्या लहरी माझ्यापर्यंत पोचल्या. These very walls will resound with the

Name असे स्वामी रामदासांनी म्हटले आहे ते खरे असले पाहिजे. जेकब म्हणून एक जर्मन मानसोपचार तज्ञ होता. तो केवळ आवाजाच्या साहाय्याने आजार आणि जखमा बऱ्या करीत असे. अनाहताचा अनुभव खरा आहे. मात्र त्यासाठी तेवढी सूक्ष्मता आली पाहिजे.

किती प्रकारांनी माणसं साधन करीत असतात! परवा एक नाथपंथी संसारी गृहस्थ भेटायला आले होते. पुण्यात राहातात. ज्ञानेश्वर महाराजांच्या संजीवन समाधीला सातशे वर्षे झाली म्हणून ते आळंदीला गेले होते. समाधीसमोर उभे असतांना त्यांच्या मनात विचार आला की समोरच्या अजानवृक्षाखाली सामुदायिकपणे ज्ञानेश्वरीची सातशे पारायणे करावी. तिथल्या पंचांनी त्यांना परवानगी दिली आणि सोयही करून दिली. पारायणांना सुरुवात झाली आणि त्यांच्या मनात विचार आला की हे आपल्या मनानेच चालले आहे का त्यामागे माउलीची प्रेरणा आहे? ते म्हणाले की हा विचार मनात आला आणि दुसऱ्या दिवशी सकाळी माउलीची मनोहर बालमूर्ती समोर आली व छान चालले आहे असे तिने सांगितले. किती पारायणे झाली म्हणून मी विचारल्यावर ते म्हणाले की सुमारे सव्वाशे झाली. आता सातशे होवोत अगर न होवोत, माउलीचे दर्शन झाले आता पूर्ण करून घेणे माउलीच्याच हातात आहे. प्रत्येक गोष्ट माउलीला सांगून करायची आता त्यांना इतकी सवय झाली आहे की खुर्चीवर बसलेले असतांना उजव्या गुडघ्यावर डावा टाकायचा झाला तरी माउलीला सांगून ते करतात. ते म्हणाले, मला आता ती बाधा झाल्यासारखे झाले आहे. मी त्यांना म्हणालो की अनुसंधान ते यापेक्षा दुसरे काय असते?

सत्पुरुषांच्या मनाच्या सूक्ष्मतेच्या संदर्भात पू. बाबांनी निसर्गदत्त महाराजांची एक आठवण सांगितली. एकदा निसर्गदत्त महाराजांना भेटायला एक युरोपिअन बाई आली होती. तिने एक मोठी पपई आणली होती ती त्यांच्यापुढे ठेवली. निसर्गदत्त महाराजांनी ती उचलून समोरच्या भिंतीवर फेकली. पपईचा गर सगळीकडे पसरला तो लोकांनी साफ केला. आपल्या भोगवासना घेऊन लोक इथे कशाला येतात येवढेच ते म्हणाले. ती बाई गप्प बसली. कोणती वासना घेऊन ती आली होती कोणास ठाऊक!

**साधक ग :** गुरुदेव रानडे एकदा त्यांच्या खोलीकडे निघाले होते. सकाळची वेळ होती. त्यांनी जाता जाता सैपाकघरात डोकावून पाहिले. त्या दिवशी भाजी करण्यासाठी एक मोठा लाल भोपळा काढला होता. त्या भोपळ्याकडे पाहून फेकून द्या, फेकून द्या असे म्हणून ते पुढे गेले. येवढा मोठा

भोपळा कसा फेकायचा म्हणून तेथे काम करणारांनी तो फोडला तर तो आतून पूर्ण कुजलेला होता!

**साधक प :** ह्या महिन्यातल्या श्रीमहाराजांच्या एका प्रवचनात आहे की माझा अभिमान नाहीसा करा अशी कोणीतरी श्रीमहाराजांची प्रार्थना केल्यावर ते म्हणाले की अभिमान माझा म्हणता तोपर्यंत तो मी कसा नाहीसा करणार? ("'माझा अभिमान दूर कर' असे म्हणणारे लोक आहेत; पण अभिमान 'माझा' म्हणतो आणि नाहींसा करायला भगवंताला सांगतो, याला काय म्हणावें?" श्रीगोंदवलेकर महाराज यांची प्रवचने. आवृत्ति ४ थी. संग्राहक गो. सी. गोखले. दि. ४ जूनचे प्रवचन) अभिमान किंवा अहंकार नाहीसा होणे फार कठीण आहे. म्हणून जप करतांना श्रीमहाराजांच्या अस्तित्वाची कल्पना करावी.

**पू. बाबा :** हा अभ्यास सतत खंड न पडता केला पाहिजे. "स तु दीर्घकालनैरन्तर्य सत्कारसेवितो दृढभूमि:॥१.१४॥" असे पतंजलींचे सूत्र आहे. वृत्तिनिरोधाचा अभ्यास कसा करावा ते त्यांनी सांगितले आहे. कोणताही अभ्यास दीर्घकाळ, खंड न पडता आणि आदरपूर्वक म्हणजे आस्थेने केला की तो दृढ होतो.

नंतर प्रारब्धाच्या सिद्धान्तासंबंधी बोलणे निघाले तेव्हां पूर्वी केलेल्या शुभ अथवा पुण्यकर्मांमुळे आपले रक्षण होते असे पू. बाबा म्हणाले, भर्तृहरीच्या नीतिशतकातला पुढील श्लोक त्यांनी सांगितला.

वनेरणेशत्रुजलाग्निमध्ये महार्णवे पर्वतमस्तके वा।<br>
सुप्तं प्रमत्तं विषमस्थितं वा रक्षन्ति पुण्यानि पुराकृतानि॥

(अरण्यात, युद्धात, शत्रूच्या कैदेत, पाण्यात, आगीमधे, समुद्रात किंवा पर्वतशिखरावर सापडलेले असतांना, तसेच झोपेत, बेसावध असतांना किंवा कठिण प्रसंगात पूर्वी केलेली पुण्यकर्मे रक्षण करतात).

**साधक ग :** हे खरे आहे. जुनी गोष्ट आहे. एका वाड्यासमोरच्या रस्त्यावर सात आठ वर्षांची दोन मुले खेळत होती. एकाएकी वाड्याचा बंद असलेला दरवाजा भिंतीतून निखळला आणि रस्त्यावर ती मुले खेळत होती त्यांच्यावर पडला. सर्वांना वाटले की दरवाजाखाली मुले चिरडली. पण दरवाजा पडतांना हवेच्या झोताने दरवाजाच्या दिंडीचे दार उघडले आणि उघडलेल्या दिंडीच्या पोकळीत ती दोन्ही मुले सुरक्षित राहिली!

आमच्यापैकी एका साधकांनी एक अलिकडची हकिगत सांगितली. त्यांची बहीण अमेरिकेत असते. तिथल्या एका युनिव्हर्सिटीत शिकवते. त्यांचे

तिमजली घर आहे. घराच्या मागे शंभर वर्षांचा जुना वृक्ष होता. त्याची सावली सबंध बंगल्यावर पडत असे. सुमारे दीड महिन्यापूर्वी तेथे मोठे वादळ झाले आणि आसपासचे सर्व वृक्ष उखडून फेकले गेले. घरे जमिनदोस्त झाली. यांच्या घरामागचे झाडही उखडले आणि बाजूच्या दुसऱ्या एका बंगल्यावर पडले आणि यांचा बंगला सुरक्षित राहिला!

अशा घटना आपल्याला माहीत असतात. पण चमत्कार असा की तरीही प्रारब्धाच्या सिद्धान्ताचा आतून स्वीकार होत नाही.

**|४६१|** (१४ जून १९९६)

आमच्यापैकी एका साधकांच्या घरच्या लोकांच्या आजारासंबंधी पू. बाबांनी चौकशी केली, आणि म्हणाले, मी तुम्हाला दोष देतो असे समजू नका, पण हे संबंध आहेत ना, त्यात साधनी माणसाने गुंतून जाता कामा नये.

**साधक :** या सगळ्या धावपळीत श्रीमहाराजांच्या कृपेने साधन चांगले चालले आहे. सगळे करावे लागत असले आणि बराच खर्च होत असला तरी मी त्यात तसा गुंतलेला नाही. सगळ्या गोष्टींकडे मी situation म्हणून पाहातो आहे.

**पू. बाबा :** ह्या आठवड्यात एक गृहस्थ भेटायला आले होते. त्यांनी ज्ञानेश्वर महाराजांच्या एका अभंगाचा अर्थ विचारला. त्या अभंगातला ज्ञानेश्वर महाराजांचा अनुभव आणि आपले रोजचे जीवन यात दोन ध्रुवांचे अंतर आहे. अभंग असा :

विश्वाचें आर्त माझ्या मनीं प्रकाशलें। अवघेंचि जालें देहब्रह्म॥ १ ॥
आवडीचें वालभ माझेनी कोंदाटले। नवल देखिलें नभाकार गे माये॥ २ ॥
बाप रखुमादेविवरु सहज निटु जाला। हृदयीं नटावला ब्रह्माकारें॥ ३ ॥

यादवांनी गाथ्यात अर्थ दिला आहे तो असा : सर्व जगत् ज्या ब्रह्मप्राप्तीची रात्रंदिवस इच्छा करीत आहे, तें ब्रह्म माझ्या मनांत प्रगट झाल्यामुळे माझा देह ब्रह्मरूप झाला. त्या परमात्म्याचें प्रेम माझ्या ठिकाणीं कोंदून भरलें. तें आकाशस्वरूप चैतन्य मी पाहिलें, हें मोठें आश्चर्य वाटतें. रखुमादेवीवर बाप जो श्रीविठ्ठल, ज्याची भेट होणे फार कठिण, तो मला सहज प्राप्त झाला, असें श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात.

गाथ्यात देहब्रह्म हा एक शब्द दिला आहे पण ते दोन वेगळे शब्द पाहिजेत. तसेच 'निटु' चा अर्थ सरळ असा न करता प्राप्त असा केला आहे.

आर्त म्हणजे काय? मला वाटते, तळमळ, ओढ असा अर्थ असावा. यावरून आठवले, श्रीमहाराजांना एकदा आरती शब्दाचा अर्थ विचारला होता. श्री. बाबूराव गद्रे तेव्हां तेथेच होते. ते संस्कृत विषय घेऊन एम. ए. झालेले होते. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले यांनाच अर्थ विचारा. बाबूराव म्हणाले आर्तवरून आरती म्हणजे आर्त होऊन मारलेली हाक असा अर्थ असावा. श्रीमहाराज म्हणाले, मला नाही तसे वाटत. आरतीमधे त्या परब्रह्माची - तेजाची स्तुती असते. ते तेज आपल्यामधे प्रगट व्हावें म्हणून आपण आरती घेतो.

विश्वाचे आर्त म्हणजे ओढ, तळमळ, खेच काय असावी? ती परब्रह्माशी एक होण्याची ओढ असावी. **God created the universe and he is dragging it towards Himself** असे ॲरिस्टॉटलने म्हटले आहे. विश्वाचा अपुरेपणा जाऊन त्या पूर्णत्वाचा तादात्म्याने बोध झाला आणि मग सर्व देहांचे वेगळेपण जाऊन ते ब्रह्मरूपच झाले. ते आत्मतत्त्व आकाशाप्रमाणे सगळीकडे भरले. जीवाची जी खरी आवड ती पूर्ण झाली आणि मग कोणताही आडपडदा न राहाता तो श्रीविठ्ठल समरसतेने माझ्या हृदयात स्थिर झाला.

नंतर आपले साधन का होत नाही याबद्दल चर्चा झाली. काही वेळा चांगली सूक्ष्मता येते, पण मग आपणच व्यवहारात गुरफटून खाली घसरतो. सेंट ऑगस्टीनने म्हटल्याप्रमाणे **I am pulled down by my own weight !**

**साधक प :** हे अगदी खरे आहे. खरोखर, आपल्या साधनाच्या आड दुसरे कोणीही येत नाही. तथापि साधनाला अनुकूल असे वातावरण पाहिजे हेही खरेच.

**साधक ग :** आजही आम्हाला अपुरेपणाची जाणीव आहे. तो अपुरेपणा नाहीसा व्हावा म्हणून आम्ही धडपडतो. पण हा अपुरेपणा देहबुद्धीतून आलेला असल्यामुळे, अमुक वासना पूर्ण झाली की आपण सुखी होऊ असे वाटते. त्यातून पूर्णता येईल असे वाटते.

**साधक प :** सर्वात वाईट गोष्ट म्हणजे साधन राहिले तरी त्याचे वाईट वाटत नाही.

**साधक ब :** आमच्या हातून आदर्श साधन होत नाही; पण आता संसारातही तसा रस नाही. वाट्याला आलेले कर्म करत असतांना आम्ही शक्य तितके नाम घेतो ते फुकट जाते का? हेच नाम आम्हाला पुढे नेणार नाही का? की घेतलेले नाम आमच्या नकळत आमच्या संसारातील अडचणी दूर करण्यात खर्च पडते?

**पू. बाबा** : घेतलेले नाम कधीच फुकट जात नाही; पण साधन जर समजून केले तर ते लवकर फलदायी होते. संसारात राहून नामस्मरण करतांना आपली भूमिका काय असावी ते ब्रह्मानंद महाराजांनी फार छान सांगितले आहे. एकदा त्यांनी श्री. गणपतराव दामल्यांना तुम्ही नाटक पाहाता का म्हणून विचारले. ते म्हणाले, होय, कधी कधी पाहातो. तेव्हां ब्रह्मानंद महाराज म्हणाले की त्या नाटकातल्या पात्रांप्रमाणे आपणही ह्या संसाराच्या नाटकातले एक पात्र आहोत असे समजून राहावे. नाटकातल्या पात्राचे अस्तित्व नाटककारावर अवलंबून असते तसे आपणही भगवंताने निर्माण केलेले पात्र आहोत हे ओळखून राहावे. सारे कर्तृत्व त्याचे; आपण फक्त पुढे नाचणारे! पू. बाबा म्हणाले, हे खरेच आहे. आपण कर्तृत्व आपल्याकडे घेतो आणि सुखदु:ख भोगतो. त्याऐवजी ते श्रीमहाराजांकडे देऊन निश्चिंत व्हावे.

सौ. बाई (श्री. भाऊसाहेबांच्या पत्नी) आजारी असतांना त्यांनी श्री. भाऊसाहेबांना हाक मारली तेव्हां ते म्हणाले की अगं, महाराजांना हाक मार. तेच खरे उपयोगी पडतील. हे लक्षात घेऊन आपणही सगळा भार श्रीमहाराजांवर टाकून निश्चिंत, निर्भय व्हावे.

## ।४६२। (२१ जून १९९६)

**पू. बाबा** : मागचे दोन शुक्रवार, साधनाला अनुकूल वातावरण कसे करायचे यावर आपली चर्चा चालू आहे. मी यावर विचार केला. सत्संगती, सद्विचार आणि नामस्मरण म्हणजे नामाची संगत हे उपाय आहेत पण हे तीनही किती कठीण आहेत हे आपण पाहिले आहे. आपल्यापैकी प्रत्येकाला खूप नाम घ्यावे असे वाटते पण ते घडत नाही. त्यासाठी लागणारी आत्मिक शक्ती कमी पडते. भगवंतांनी "दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया। मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते॥७.१४॥" असे गीतेमधे सांगितले आहे. (ही अलौकिक म्हणजे अति अद्भुत अशी माझी त्रिगुणमयी योगमाया मोठी दुस्तर आहे. तथापि जे मलाच निरंतर भजतात ते या मायेला उल्लंघून म्हणजे संसारातून तरून जातात.) ही माया आपल्या आड येते. शरणागतीनेच ती नाहीशी होते. त्यासाठी म्हणजे ती शक्ती यावी म्हणून वातावरण सुधारले पाहिजे.

आता सगळे वातावरण बदलणे काही आपल्याला शक्य नाही म्हणून फक्त आपल्या भोवतीचे वातावरण शुद्ध होईल, साधनाला अनुकूल बनेल असा प्रयत्न केला पाहिजे. तसे केले की पंचकोश शुद्ध होतील आणि साधनासाठी लागणारी

सूक्ष्मता देहात येईल. त्यासाठी एक उपाय म्हणजे प्रपंचात आपल्याला जे काही करावे लागते ते न कंटाळता, उत्तम प्रकारे पण कर्तव्य म्हणून करावे. कर्तव्य म्हणून कर्म केले की त्यात फळाची अपेक्षा राहात नाही आणि कर्तव्य केल्याचे समाधान राहाते. कर्तव्य म्हणून कर्म केले की अहंकार वाढत नाही, आणि कोणती रुखरुखही राहात नाही. भगवद्गीतेत कर्माचा ऊहापोह केलेला आहे. कर्माच्या मर्यादाही दाखविल्या आहेत. शंकराचार्यांनीही 'चित्तस्य शुद्धये कर्म न तु वस्तूपलब्धये।' असे म्हटले आहे. कर्म कर्तव्य म्हणून केले की राम कर्ता ही भावना दृढ होईल.

नाम घेतांना श्रीमहाराजांचे अस्तित्व जाणवले पाहिजे. त्यासाठी नाम आणि श्रीमहाराज यांची सांगड घालावी. त्यांचे चरित्र आठवावे. प्रत्येक गोष्ट त्यांना सांगून करावी.

गोपीनाथ कविराज नांवाच्या एका सत्पुरुषांनी कुंडलिनी जागृतीसंबंधी लिहिले आहे. नामाचा अनुग्रह घेणाऱ्या प्रत्येकाची कुंडलिनी जागी झालेली असते. पण नामाची पथ्ये पाळली नाहीत तर ती ऊर्ध्वमुख न होता अधोमुख होते. त्यामुळे वासना कमी न होता उलट त्या वाढतात. मंत्र हे शक्तिमय असतात. गायत्रीमंत्र, किंवा शंकर, विष्णु, राम यांचे मंत्र हे तारक मंत्र असून त्यांची शक्ती विलक्षण आहे. त्यांनी कुंडलिनी जागी होते.

## |४६३| (२८ जून १९९६)

**पू. बाबा** : तीन चार दिवसांपूर्वी एक बाई भेटायला आल्या होत्या. त्यांनी आणि त्यांच्या नवऱ्याने गुळवणी महाराजांचे शिष्य दत्तमहाराज कवीश्वर यांच्याकडून अनुग्रह घेतलेला आहे. ह्या बाई रात्री ध्यानासाठी बसल्या की जवळपास कोणी आहे असे वाटून त्यांना भीती वाटायची म्हणून त्या गुरूंकडे गेल्या. त्यांनी त्यांना 'दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा' ह्या मंत्राचा जप करायला सांगितले. ह्या जपाने काय होते म्हणून त्यांनी विचारले. गुरु म्हणाले, ते तुम्ही मालाडच्या बेलसऱ्यांना विचारा, म्हणून त्या आल्या होत्या. त्यांनी विचारले की मंत्रामधे भीती नाहीशी करायची शक्ती असते का? मी त्यांना सांगितले की मंत्र शक्तिस्वरूप असतो. तो परमात्म्याचे चिन्ह आहे. परमात्म्यात अभय आहे. मंत्र देतांना गुरूने आपली शक्ती त्यात घातलेली असते. येथे येण्यापूर्वी त्या इंदूरला कोणाकडे तरी गेल्या होत्या. त्यांनी त्यांना 'अहं ब्रह्मास्मि' जप करायला सांगितले होते. तसेच कलावतीदेवींनीही एक जप

सांगितला होता. मी त्यांना सांगितले की जो जप तुमच्या गुरूंनी प्रथम दिलेला होता, तेवढाच करा. त्या बाईंनी विचारले की ते भय कशाचे आहे? मी सांगितले की ते अजाताचे भय आहे. अनंताशी संबंध आल्यावर काही साधकांना शून्याचा अनुभव येतो त्याचे ते भय आहे. बाई म्हणाल्या, तुम्ही म्हणता तसेच असावे. कारण ध्यान करतांना त्यांना विचार आणि वृत्ती थांबल्यासारखे वाटत असे. त्यांचे समाधान झाले.

पण ते असू द्या. आपण बरेचदा श्रीमहाराजांच्या अस्तित्वासंबंधी बोलतो. आज त्यांचे अस्तित्व कशा प्रकारचे आहे? त्या बाबतीत, मला वाटते, आपल्या संकल्पना सदोष आणि दृश्याला धरून असतात.

**साधक प** : मला त्यांचे अस्तित्व आहे याची शंका वाटत नाही. हवा किंवा आकाश जसे सर्वव्यापी आहे तशा प्रकारचे ते काहीतरी आहे असे वाटते. माझ्या दोन बोटांमधील रिकाम्या अवकाशातही ते आहेत असे वाटते; पण ते मी वर्णन करून सांगू शकत नाही. माझी अडचण ही आहे की मला त्यांची अतिशय गरज आहे अशी तळमळ मला लागत नाही.

**पू. बाबा** : आज माझे अस्तित्व मला कसे आहे?

**साधक प** : मी देहरूप, वासनारूप असल्याचे मला जाणवते. देह आणि वासना सोडून मला माझी कल्पना करता येत नाही. श्रीमहाराजांची संकल्पना करतांना ही संकल्पना 'माझी' आहे ही भावना राहाते. त्यामुळे श्रीमहाराजांचे स्वयंभू अस्तित्व कळायला कठीण होते.

**साधक क** : अस्तित्व दोन प्रकारचे आहे. एक खंडित म्हणजे येणारे जाणारे म्हणून काळातले आणि दुसरे अखंड आणि काळापलीकडचे. माझे खरे अस्तित्व जे तीन्ही अवस्थांना व्यापून आहे ते अखंड असले पाहिजे.

**पू. बाबा** : म्हणजेच सातत्य हा त्याचा मुख्य गुणधर्म आहे. प्राण आणि नाम यांचा संबंध जोडल्यास अखंडाकडे जाता येईल. आज माझ्याजवळ फक्त प्राण अखंड आहे म्हणून मानसिक जप करावा. तो अखंड करणे शक्य आहे.

## **|४६४|** (५ जुलै १९९६)

**पू. बाबा** : आपले मनासारखे साधन होत नाही कारण आपण व्यक्ताच्या पलीकडे जाऊच शकत नाही. तेथे आपली शक्ती कमी पडते. ती वाढावी असेही तीव्रतेने वाटत नाही. श्रीमहाराजांचे अव्यक्तातील अस्तित्व आपल्या लक्षात येत नाही आणि त्यांच्या आश्वासनावरही पुरती श्रद्धा नाही. ब्रह्मानंद

महाराज किंवा भाऊसाहेब यांच्यासारखे सर्व काही त्यांच्यावर सोपवता आले पाहिजे. पण आपल्या वासना त्याच्या आड येतात. आपला जन्मच वासनेमधून आहे. अगदी भगवंताचे दर्शन व्हावे अशी शुभवासना राहिली तरी त्या वासनेतूनच पुन्हा जन्म आहे.

विचाराचा मार्ग चांगला; पण तो कठीण आहे. दुसरा मार्ग प्रेमाचा. तुकाराम महाराजांनी दगडाच्या विठोबालाच घट्ट धरले. मीराबाईने 'मेरे तो गिरिधर गोपाल दूसरो न कोई' असे सांगून पुढे म्हटले की 'अँसुवन जल सींच सींच प्रेमबोलि बोई। अब तो बेल फैल गई आनंदबन होई॥'

श्री. भाऊसाहेबांचा आदर्श समोर ठेवावा. मरतांना माझ्या मुखात नाम राहील, मी महाराजांकडे जाणार आहे ही खात्री झाली पाहिजे. बाकीचे विचार सोडून नामात रंगून गेले पाहिजे, तरच हे शक्य होईल.

## |४६५| (१२ जुलै १९९६)

**पू. बाबा :** चार दिवसांपूर्वी एक बाई भेटायला आल्या होत्या. अमेरिकेत असतात. ISKCON च्या सदस्या आहेत. श्रीप्रभुपादांशी त्यांचा संबंध आलेला होता. नामस्मरण करतात. त्यांनी विचारले की एखादी गोष्ट करावी की करू नये असा संभ्रम निर्माण झाला तर गुरु देहात असतांना त्यांना विचारता येते. पण त्यांनी देह ठेवल्यानंतर कोणाला विचारायचे ? मी त्यांना सांगितले की ते देहाने गेले तरी शिष्याच्या हृदयात असतात. त्यांचे स्मरण करून त्यांनी सुचविलेला मार्ग या भावनेने आपल्याला त्यातल्या त्यात जे योग्य वाटते ते करावे आणि नंतर त्यामुळे काहीही झाले तरी ते योग्यच आहे असे मानून त्याबद्दल हर्ष वा शोक करू नये. पू. बाबा पुढे म्हणाले की आपल्या हृदयातले गुरूंचे अस्तित्व आपल्या जाणिवेत यावे यासाठी नामस्मरण आहे. वास्तविक ते सर्वव्यापी आहेत. पण आपली जाणीव ते समजण्याइतकी सूक्ष्म नाही. ती सूक्ष्म व्हावी म्हणून नामस्मरण करावे. नाम घेतांना नाम आणि नामी एकच आहेत हा भाव असावा.

नंतर पू. बाबांनी तुकाराम महाराजांचे शिष्य निळोबा यांचे काही अभंग वाचून दाखवले. निळोबा मकासरे-पिंपळनेरकर यांचा तुकाराम महाराजांशी साक्षात संबंध आला नाही पण स्वप्नात त्यांचा अनुग्रह झाला. अभंग असा :

विसारें गोविला। अवघा आंखुनी ठेविला॥ १॥
देऊनिया अहंभावो। भक्ति सांठविला देवो॥ २॥

नामाचें चिंतन। करूनि केला हा स्वाधीन॥ ३॥
निळा म्हणे जिवेंसाठीं। करूनिया सामाविला पोटीं॥ ४॥

एखादे घर किंवा जमीन खरेदी करायची असली तर तिच्या चतु:सीमांचा उल्लेख खरेदीपत्रात करतात. खरेदीचा व्यवहार निश्चित ठरल्यावर करार पक्का ठरल्याची खूण म्हणून आगाऊ थोडी रक्कम देऊन करारात बांधून घेतात. येथे भगवंत खरेदी करण्यासाठी बिसार म्हणून अहंकार दिला. ज्ञानेश्वर महाराजांनीही एका अभंगात 'देह बळी देऊनी साधिलें म्या साधन।' म्हटले आहे. निळोबा म्हणतात की सतत नामाच्या चिंतनात राहून देवाला स्वाधीन केले आणि शेवटी जीवाचे मोल देऊन त्याला पोटात - हृदयात साठवून ठेवले. हृदयातला मीपणा गेल्याशिवाय तो आत साठविला येत नाही. जेथे मीपणा आहे तेथे त्याला जागा नाही. त्याला स्वाधीन करायचा मार्ग एकच - सतत त्याच्या चिंतनात राहाणे.

पू. बाबांनी निळोबांचा आणखी एक अभंग सांगितला.

उगेंच आतां बैसेन मी म्हणें। तंव हा करणें चेष्टवितो॥ १॥
दृष्टीपुढें हा उभाचि ठाये। ऐकणे होउनी राहे श्रोत्रबिळीं॥ २॥
मनही नेउनी लपउनी ठेवी। चित्तासी हा गोवीं आपणापासीं॥ ३॥
निळा म्हणे बाई हृदयींच राहिला। अवघाचि रोधिला जागा येणें॥ ४॥

नामस्मरण करू लागलात की शक्ती वाढू लागते आणि एक तर ती प्रपंचातल्या क्षुद्र वासना पुऱ्या करण्यात खर्च पडते नाहीतर सात्त्विकपणाचा अहंकार वाढू लागतो. वास्तविक कर्तेपणा नाहीसा करण्याचे जे साधन तेच अहंकार वाढवते. म्हणून मी नाम घेतो ते सद्गुरूंकडून आलेले नाम घेतो, तेच माझे साधन करवून घेतात हा भाव सुरुवातीपासून वाढवावा. त्यांची प्रार्थना करावी, कारण त्यांची कृपा झाली तरच साधक पुढे जातो. 'यमेव एष वृणुते तेन लभ्य:।' असे कठोपनिषदात म्हटले आहे. त्यांच्या कृपेने मी साधन करतो हे कळण्यातच त्यांची कृपा आहे.

## ।४६६। (१९ जुलै १९९६)

**पू. बाबा :** खरोखर आपण श्रद्धेने दरिद्री आहोत. उपनिषदात श्रद्धेला संपत्ती म्हटले आहे. श्रीमहाराजांकडे येणारी मोठी माणसे पाहिली तशी सामान्य माणसेही पाहिली. श्री. सुखठणकर एवढे I.C.S अधिकारी, पण त्यांचा मुलगा साधी केंब्रिजची परीक्षाही पास झाला नाही म्हणून रडतांना पाहिले.

पाचलेगावकर तर माझा मित्रच. चांगली आध्यात्मिक प्रगती झालेला. पण समाजकार्य आणि प्रसिद्धीच्या मागे लागल्याने त्यांची प्रगती खुंटली.

या मोठ्या लोकांप्रमाणे सामान्य वाटणारी पण आध्यात्मिक दृष्ट्या प्रगत माणसेही पाहायला मिळाली. आपल्या येथे एक बाई प्रवचनाला येतात. भजने गोड म्हणतात. त्यांच्या आईला श्रीमहाराजांनी लिहिलेले एक पत्र त्यांनी फ्रेम करून ठेवले आहे, ते परवा त्यांनी दाखवले. ह्या बाईंचे वडील नोकऱ्यांची धरसोड करीत असत. काही दिवस ते पू. तात्यासाहेबांच्या ऑफिसातही नोकरीला होते. एकदा ते श्रीमहाराजांना भेटायला आले होते. नंतर त्यांची बायको (म्हणजे येथे येणाऱ्या बाईंची आई) श्रीमहाराजांना भेटायला आली होती. नवऱ्याच्या धरसोड वृत्तीबद्दल आणि नोकरी न करता घरात स्वस्थ बसण्याबद्दल त्यांनी श्रीमहाराजांकडे तक्रार केली तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, बाई, मी सांगेन ते ऐकाल का ? बाई हो म्हणाल्या, तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, त्यांना (नवऱ्याला) नांवे ठेवणे सोडून द्या आणि तेरा कोटी जपाचा संकल्प सोडा. जप करून घेण्याची जबाबदारी माझी. घरच्या ओढाताणीच्या परिस्थितीतही बाईंनी संकल्प सोडला. काही वेळा अंगावर धड लुगडे नसे. सवाष्ण म्हणून कोणीतरी बोलवीत आणि तेथे लुगडे मिळे! ह्या अशा परिस्थितीत त्यांनी निष्ठेने जप चालू ठेवला. मुलीच्या लग्नाची काळजी होती. श्रीमहाराजांना सांगितल्यावर ते म्हणाले, आता मी जबाबदारी घेतली आहे ना! तेव्हांपासून ती काळजीही सुटली आणि एका गृहस्थाने मुलीला मागणी घातली आणि तिचे लग्न झाले. तिच्या लग्नानंतर आठ-दहा दिवसातच तिचे वडील वारले आणि सासरची माणसे तर तिला लगेच त्यांच्या गावी घेऊन जाणार होती. बाई तिला म्हणाल्या तू निश्चिंतपणे जा, माझ्याबरोबर महाराज आहेत. या बाई डायरी ठेवत असत. त्यात शेवटची नोंद साडेबारा कोटी जप झाला पन्नास लाख राहिला, आता महाराजांच्या मनात असेल तसे होईल असे लिहिलेले आहे. म्हणजे जप महाराज करवून घेत आहेत हा भाव शेवटपर्यंत पक्का होता. सुरुवातीला जप शब्दरूप होता; पुढे ते केवळ स्फुरण राहिले.

या बाईंचे वडील कारवारचे. ते भटकळ येथे वारले. अखेरच्या दिवसात या बाईंना आपल्यालाही तेथेच मृत्यू यावा असे वाटू लागले, पण तिकडे जायला पैसे नव्हते. अचानक एका गृहस्थाने त्यांना तीन रुपये आणून दिले. ते खर्चून त्या पुण्याला गेल्या. तेथे एका राममंदिरात त्या कीर्तनाला गेल्या. कीर्तनानंतर आरतीचे तबक फिरवत असतांना त्यात कोणीतरी दहा रुपयांची नोट टाकली. आरती फिरवत असतानाच पुजाऱ्याने या बाईंना थांबा म्हणून सांगितले आणि

नंतर ती दहा रुपयांची नोट त्यांना दिली. ते पैसे खर्च करून त्या भटकळला गेल्या. अशा प्रकारे श्रीमहाराजांनी त्यांची शेवटची इच्छा पूर्ण केली.

ही हकिगत सांगून झाल्यानंतर पू. बाबांनी विचारले की त्या बाईंना जे साधले ते आपल्याला का साधत नाही? मला वाटते, आपला अहंकार साधनाच्या आड येतो.

**साधक प** : कर्तेपणा आणि भोक्तेपणा साधनाच्या आड येतात. साधन व्हावे अशी तळमळ लागत नाही.

**साधक** : पुष्कळ नाम घ्यावे असे वाटते पण व्यवहारात उतरले की ते मंदावते. हा नामपंथ कसा आहे?

**पू. बाबा** : महाराजांना पंथ वगैरे मान्य नव्हता. सुरुवातीपासूनच त्यांनी मला लोकांना सांगायला सांगितले आणि त्यामुळे काही लोक माझा द्वेष करू लागले; म्हणून एकदा मी श्रीमहाराजांना म्हणालो की पंथीयांकडून मला फार त्रास झाला. माझे हे म्हणणे त्यांना आवडले नाही. ते म्हणाले माझा पंथ वगैरे काही नाही. जो नाम घेतो तो माझाच असतो. आणि खरोखर दुसऱ्या सत्पुरुषांचे अनुग्रह घेतलेली कितीतरी माणसे श्रीमहाराजांकडे आली.

पू. बाबा पुढे म्हणाले, नामस्मरणाच्या चार अवस्था सांगता येतील. पहिल्या अवस्थेत थोडे नामस्मरण होते आणि पुष्कळदा आणि पुष्कळ वेळ विस्मरण होते. दुसऱ्या अवस्थेत विस्मरणाचा काळ कमी होतो. तिसऱ्या अवस्थेत साधक नामात रंगतो. या अवस्थेत नाम सर्वकाळ चालतेच असे नाही पण सतत स्फुरण असते. चवथ्या अवस्थेत साधक नाममय होतो. तेथे तद्रूपता असते.

**साधक क** : हे स्फुरण म्हणजेच आत्मतत्त्व आहे. रमणांनी त्याचे स्थान हृदयात आहे असे म्हटले आहे. शंकराचार्यांनीही प्रातर्नमामि हृदि संस्फुरमात्मतत्त्वम् असे म्हटले आहे. ते अवस्थात्रयसाक्षित्व आहे.

**पू. बाबा** : त्यालाच लयसाक्षित्व म्हणतात.

तीन अवस्थांवरून श्री. भाऊसाहेबांची आठवण निघाली. पू. बाबा म्हणाले की श्री. भाऊसाहेबांना एकदा स्वप्न पडले. स्वप्नात एका माणसाने तुमच्यावर मूठ मारू का म्हणून विचारले. भाऊसाहेबांनी स्वप्नातच त्याला सांगितले की मारायची असली तर महाराजांना विचारून मार. म्हणजे श्रीमहाराज त्यांच्या तीन्ही अवस्थांना व्यापून होते. पू. तात्यासाहेबांच्या मुखाने श्रीमहाराज बोलत याचे त्यांना काहीच आश्चर्य वाटत नसे कारण श्रीमहाराज सर्वशक्तिसमन्वित, कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम् समर्थ आहेत ही त्यांची खात्री होती. त्यांना

(श्रीमहाराजांना) काय अशक्य आहे, ते भिंतीतून बोलतील असे ते म्हणत. श्रीमहाराज भेटले, आता काही करायचे राहिले नाही असे त्यांना वाटले. याउलट दुसऱ्या एका साधकांना श्रीमहाराजांनी तुमच्या आयुष्यातल्या महत्त्वाच्या घटना कोणत्या म्हणून विचारले तेव्हां नोकरी, लग्न, घरदार इत्यादी गोष्टी त्यांनी सांगितल्या. ते ऐकून श्रीमहाराज त्यांना म्हणाले, म्हणजे माझ्या भेटीला काहीच महत्त्व नाही!

विषय निघाला की कर्म तर करावेच लागेल पण त्यामधे गुरफटून जाता कामा नये. या संदर्भात पू. बाबांनी गीतेच्या ८ व्या अध्यायातील अधिभूत, अधिदैव आणि अधियज्ञ यांचा अर्थ सांगितला. ज्या कर्मात इंद्रिये गुंतलेली आहेत ते अधिभूत, त्या कर्मामागची चेतना, अहंकार हे अधिदैव आणि अज्ञान नाहीसे झाले, भेदभाव नाहीसा झाला की होणारे कर्म अधियज्ञ समजावे. पू. बाबांनी या बाबतीत शंकराचार्यांच्या विवेकचूडामणीतले दोन श्लोक सांगितले.

अकृत्वा दृश्यविलयम् अज्ञात्वा तत्त्वमात्मन:।
ब्रह्मशब्दैः कुतोमुक्तिरुक्तिमात्र फलैनृणाम्॥६३॥

जोपर्यंत दृश्याचा लय होत नाही आणि आत्मतत्त्वाचे - स्वचे ज्ञान होत नाही तोपर्यंत ब्रह्म या शब्दाचा केवळ उच्चार करून मुक्ती कशी मिळेल? दृश्याची ओढ नाहीशी झालीच पाहिजे.

तत्त्वदर्शन होऊन तद्रूपतेने ज्ञान झाले की काय होते ते सांगतात.

बाह्ये निरुद्धे मनस: प्रसन्नता मन:प्रसादे परमात्मदर्शनम्।
तस्मिन्सुदृष्टे भवबन्धनाशो बहिर्निरोध: पदवी विमुक्ते:॥३३५॥

दृश्याचा निरास होऊन परमात्मदर्शन झाले की चित्त प्रसन्न होते (मन शांतचित्त होते) आणि तदाकार झाल्यावर जन्ममृत्यूचा साखळदंड तुटतो. म्हणून दृश्याकडे पाठ फिरवणे ही मुक्तीची पहिली पायरी आहे.

**साधक :** वास्तविक आता संसारात काही अडचण नाही. उलट श्रीमहाराजांनी कल्पनेपलीकडे सुस्थितीत ठेवलं आहे.

**साधक ब :** मग तुम्हाला तृप्ती आहे का?

**साधक क :** तशी तात्पुरती तृप्ती असते पण पुन्हा काहीतरी निघतंच.

**पू. बाबा :** श्री. काशीकरांचा प्रपंच चांगला होता. एकदा श्रीमहाराज त्यांना म्हणाले, एका माणसांने अफू विकत घेऊन खाल्ली आणि दुसऱ्याने स्वत:च्या शेतात पिकवून खाल्ली तरी परिणाम एकच ना? आणखी एकदा प्रपंचाबद्दल बोलतांना म्हणाले, विष्ठा कोणत्या रंगाची चांगली? प्रपंचाकडे पहाण्याची त्यांची

ही दृष्टी होती. चांगला प्रपंच म्हणजे सहज न सापडणारी रक्तातली साखर आहे असेही एकदा म्हणाले. तेव्हां सांभाळा; आयुष्य चालले आहे. उद्याचा भरंवसा नाही, तेव्हां आता सगळे सोडून नामाला घट्ट धरा. प्रपंचात कमी जास्ती होणारच. तुम्ही असलात तरी आणि नसलात तरी तो चालूच राहातो. नाम इतके घ्यावे की नामात शेवटचा श्वास जाईल याची खात्री वाटली पाहिजे.

## |४६७| (३० जुलै १९९६)

आज गुरुपौर्णिमा. सकाळी पू. बाबांचे निरूपण झाले. त्यानंतर त्यांच्या घरी गेलो. निरूपण करतांना पू. बाबा म्हणाले की येथे मंदिरात निळा प्रकाश दिसतो आहे. घरी गेलो तेव्हां म्हणाले की येथेही तसाच निळा प्रकाश मला दिसतो आहे. महाराज सगळीकडे आहेत. आपणच कमी पडतो. काल रात्रभर जागा आहे. तेव्हांपासून खूप नामस्मरण झाले.

स्वामी माधवनाथांनी आज सकाळी देह ठेवल्याचे पू. बाबांनी सांगितले. फार चांगले होते; त्यांचे माझ्यावर प्रेम होते असे पू. बाबा म्हणाले. संध्याकाळी साधक पू. बाबांना म्हणाले, पाहिजे तर डोक्यात काठी मारा पण आता करून घ्या. आता फार काळ झाला. पू. बाबा म्हणाले, असे काठी मारून होत असते तर काय पाहिजे होते? पण आपण पाहू. असे निराश होण्याचे कारण नाही. मी श्रीमहाराजांजवळ प्रार्थना करीन. आणि लक्षात ठेवा, काही दिवस एकांतात जावेच लागेल. मी सांगितले तसे श्रीमहाराजांजवळ अखंड नामस्मरण मागा. उगीच हे वाच ते वाच नको. विचाराचा मार्ग अवघड आहे. तेव्हां अखंड नामस्मरण हेच ध्येय होऊ द्या. मृत्यूची भीती बाळगा. आणखी एक म्हणजे महाराजांना म्हणावे की नामाचे खरेपण मला समजू द्या.

पैसा, शरीरप्रकृती, नातेवाईक काहीही उपयोगाला येत नाही. आता संख्येचे बंधन न ठेवता, आजपासून मी अखंड नामस्मरण करेन असा निश्चय करा. ज्ञानेश्वर महाराजांचा हरीपाठ तुम्ही वाचलाच आहे पण पुन्हा एकदा त्याचा बारकाईने अभ्यास करा. साधनाला त्याचा खूप उपयोग होईल.

## |४६८| (२ ऑगस्ट १९९६)

**पू. बाबा :** मंगळवारी (दि. ३० जुलै) सकाळी सव्वासात वाजता आंघोळ करतांनाच स्वामी माधवनाथ गेले. साडेसात वाजता ते गेल्याचा मला पुण्याहून फोन आला. माझ्यावर त्यांचा लोभ होता. स्वामी स्वरूपानंदांनी त्यांच्यावर

अनुग्रह केला. पुण्याला त्यांनी त्यांच्या केंद्रात मला एकदा बोलावले होते. मी तेथे गेल्यावर त्यांनी मला मिठी मारली आणि म्हणाले, 'मी तुमचं नामाचं प्रेम चोरतो,' मीही त्यांना म्हणालो, 'मी तुमचं ध्यान घेतो.' त्यांचा नाथ संप्रदाय होता. सोऽहम् चे ध्यान सांगत. मला म्हणाले, ध्यान सोडले तर एरवी मी माझ्या माणसांना तेरा अक्षरी रामनामाचा जपच करायला सांगतो.

**साधक ग** : अलिकडे ते तसे आजारीच होते.

नंतर पू. बाबा म्हणाले, मी एकदा श्रीमहाराजांना विचारले की मारुतीमधे पशूचे गुण जास्त होते पण तो श्रीरामाचा दास झाला आणि त्यामुळे भक्तीचा आदर्श ठरला ही केवळ पौराणिक कथा आहे का? तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, नाही; आणि पुढे एकदम म्हणाले, हा माझा अनुभव असेल तर! त्यावेळी लक्षात आले नाही, पण पुढे काही दिवसांनी लक्षात आले. ब्रह्मानंद महाराजांनी "माझे सद्गुरुराव मारुतिअवतार। कोणी हो संदेह धरू नये॥" म्हटले आहे. तसेच श्री. आण्णासाहेब घाणेकरांनाही त्यांनी मला सांगायचे ते मारुतीला सांगावे म्हणजे मला कळते असे सांगितले होते.

बिभीषण मारुतीला म्हणाला, मी राक्षस कुळात जन्मलो, राम माझा अंगीकार करील का? तेव्हां मारुती म्हणाला, मी तर पशु, पण रामाने मला आपला म्हटले, मग तू तर ज्ञानी भक्त आहेस. रामनामाच्या शक्तीबद्दल बोलतांना एकदा श्रीमहाराज म्हणाले की रामनामाने माणसाचा देव बनतो, मग पशूचा माणूस होईल यात काय आश्चर्य आहे?

नंतर पू. बाबा म्हणाले मी पूर्वी (बहुधा १९३८ साल असावे) श्री. भाऊसाहेबांना पोथी वाचून दाखवत असे. भावार्थरामायण वाचून दाखवत असतांना सुंदरकाण्डात सप्तपाशांचे आणि मारुतीने ते कसे तोडले याचे वर्णन आहे. त्यासंबंधी मी श्रीमहाराजांना विचारले होते. नाथांचे स्पष्टीकरण आणि श्रीमहाराजांनी सांगितले त्यामधे काही ठिकाणी फरक होता म्हणून मग मी ते लिहून ठेवले होते. नुकतेच जुने कागद पहातांना ते सापडले म्हणून त्याबद्दल सांगतो.

भावार्थ रामायणाच्या सुंदरकाण्डात १९ व्या प्रसंगात दिलेल्या ओव्या अशा आहेत:

रामनामाचिया आवर्ती। सप्तपाश विनिर्मुक्ती। पावोनिया स्वयें मारुती। गर्जे त्रिजगतीं स्वानंदें॥ १०॥ काळपाश कर्मपाश। धर्मपाश ब्रह्मपाश। मायापाश मोहपाश। जन्मपाश सातवा॥ ११॥ काळपाश तो आयुष्यघात। कर्मपाश तो अनैश्वरवंत। धर्मपाश तो आश्रमगत। वेदविहितार्थ ब्रह्मपाश॥ १२॥ देहममता

मोहपाश। मुख्य माया तो आशापाश। कनककांता हा जन्मपाश। सप्तपाशीं जीवबद्ध॥ १३॥ सप्तपाशांची निवृत्ती। रामनामें करी मारुती। येरांच्या न चले युक्ती। पडे गुंती देहपाशी॥ १४॥

पहिला काळपाश. याला नाथांनी आयुष्यघात म्हटले आहे. क्षणोक्षणी माणूस या पाशात ओढला जातो पण त्याला त्याचे भान नसते. साधकाने हे भान ठेवले तर साधनातला आळस जाऊन साधन जलद होईल.

**साधक ग :** युधिष्ठिराला यक्षाने जगातले सर्वात मोठे आश्चर्य कोणते म्हणून विचारले तेव्हां तो म्हणाला की आसपास इतरांचा मृत्यू पाहात असतांनादेखील माणसाला आपण इतक्यात मरणार नाही असे वाटते हे जगातले सर्वांत मोठे आश्चर्य आहे.

**पू. बाबा :** दुसरा कर्मपाश. म्हणजे आपल्या हातून घडणारी कर्मे, नोकरीचाकरी आणि त्यातून निर्माण होणारी सुखदु:खे. आपल्या वाट्याला आलेले कर्म कर्तव्य म्हणून केले तरच यातून सुटका होते.

तिसरा धर्मपाश. आश्रमभंग म्हणजे ब्रह्मचर्य, गृहस्थ इत्यादी जे चार आश्रम सांगितलेले आहेत त्यानुसार वर्तन न होणे. सध्याच्या आपल्या जीवनाच्या पद्धतीमधे ह्याला महत्त्व नसले तरी ठराविक कालानंतर माणसाने वानप्रस्थाप्रमाणे प्रपंचातून मनाने दूर झाले पाहिजे.

चवथा ब्रह्मपाश. यात वेदविहित कर्मे, जप, तप इत्यादी येतात.

पाचवा मोहपाश. यात देहाविषयीची ममता येते. थोडक्यात देहबुद्धी असे म्हणता येईल. श्रीमहाराजांनी याखेरीज शेतीवाडी, घरदार, दागदागिने, नांवलौकिक इत्यादींची हाव म्हणजे मोहपाशच होय असे सांगितले होते.

सहावा मायापाश. आशेचे बंधन. काहीतरी घडावे ही वृत्ती. श्रीमहाराज म्हणाले, आशा भविष्याबद्दलच असते म्हणून एकूण भविष्यकाळाचा विचार हा मायापाश होय. नैराश्याखेरीज विरक्ती येत नाही.

सातवा जन्मपाश. कनककांता, प्रपंचाची हौस हा जन्मपाश होय. श्रीमहाराज म्हणाले, मी प्रपंचाचा आहे ही ठाम भावना असणे हाच जन्मपाश. ही वासना माणसाला पुन:पुन्हा जन्माला घालते.

नाथांनी यांखेरीज आठवा पाश सांगितला आहे. त्या ओव्या अशा -

"आठवा पाश तो वितंड। त्याचे पीटीं पाश उदंड। ज्याचें नांव पाषांड। काळे तोंड पैं त्याचे॥ १५॥ सकळ पाशांचे छेदन। कराबया रामनाम प्रवीण। नामें हनुमंत संपन्न। पाश छेदन तेणें केलें॥ १६॥

यानंतर पू. बाबांनी गुरुपौर्णिमेदिवशीचाच विषय पुन्हा काढला आणि म्हणाले की आता दुसरे काही न करता अखंड नामस्मरणाचेच ध्येय निश्चित करा. काळ थोडा राहिला आहे. शेवटी मुखात नाम आले पाहिजे.

सामान्य वाटणारी काही माणसेदेखील तळमळ असेल तर थोड्या काळात खूप प्रगती करतात. साधक यांनी त्यांच्या शेजारी राहणाऱ्या साधकांच्या वडिलांचे उदाहरण दिले. शेवटच्या आजारात त्यांनी घरातील माणसांना जवळ बसू नका म्हणून सांगितले. त्यांचा नातू त्यावेळी लहान होता आणि त्यांचा खूप लाडका होता. त्यालादेखील जवळ आणू नका म्हणाले. एक दिवस संध्याकाळी सहा वाजता साधक त्यांना पहायला गेले तेव्हां ते डोक्यावर पांघरूण घेऊन झोपले होते. साधक जवळ आल्याचे समजल्यावर तोंडावरचे पांघरूण काढून म्हणाले, अहाहा! महाराजांची छान आरती केली. प्रसन्न वाटते आहे. त्यानंतर तासाभरातच त्यांनी शांतपणे देह ठेवला.

## |४६९| (९ ऑगस्ट १९९६)

**पू. बाबा :** नुकत्याच बेळगावच्या एक बाई भेटायला आल्या होत्या. चाळिशीतल्या असाव्या. त्यांचा मुलगा मुंबईत इंजिनिअरिंग शिकतो. तो कांदिवलीला राहातो. दोन महिन्यांपूर्वी बाईंची बायपास सर्जरी झाली. नामस्मरण करतात. त्यांनी येथे आल्यावर केशवराव कोण, ते कोठे राहातात असे मला विचारले. त्यांना मी बसायला सांगून त्यांची चौकशी केली. त्या म्हणाल्या की बायपास सर्जरीच्या वेळी त्यांच्या नवऱ्याला आणि इतर नातेवाइकांना भीती वाटत होती पण त्या शांत होत्या. ॲनेस्थेशियाचा थोडा डोस दिला तेव्हां अर्धवट बेहोशीत मी गुरुदेवांची प्रार्थना केली तेव्हां ते तेथे आले आणि म्हणाले, घाबरू नको, मी आहे. गुरुदेव म्हणजे कोण असे मी त्यांना विचारल्यावर त्यांच्या काहीशा कानडी हेलात म्हणाल्या, 'आपले महाराज हो'. ऑपरेशन झाल्यानंतरही श्रीमहाराज जवळ आहेत असे त्यांना जाणवत होते. आता गुरुदेव बरोबर असतात असे त्या म्हणाल्या.

त्या बाईंनी मानसपूजा करतांना श्रीमहाराजांना एक अडचण विचारली की नामस्मरण होते पण त्याबरोबर आपले स्मरण कसे राहील? श्रीमहाराजांनी नाथभागवतातला तेरावा अध्याय पहायला त्यांना सांगितले. बाईंनी त्याप्रमाणे केले पण अध्याय वाचूनही त्यांना काही समजले नाही म्हणून पुन्हा मानसपूजेत

श्रीमहाराजांना तसे सांगितले तेव्हा श्रीमहाराज म्हणाले, केशवरावांना विचारावे. म्हणून येथे आल्यावर केशवराव कोण म्हणून त्यांनी विचारले.

पू. बाबा म्हणाले, मीही मग त्यांना नाथभागवताच्या त्या अध्यायातल्या काही ओव्या समजावून दिल्या. त्या ओव्या वाचतो.

''तुझें स्वरूप अतर्क्य जाण। अतिसूक्ष्म आणि निर्गुण। तुज भजावया कवण स्थान। आम्हांसी जाण कळेना॥५३१॥ ऐसें कल्पील जरी मन। तरी ऐक सावधान। अतिसुगम भजनस्थान। मी सांगेन तें ऐक॥५३२॥ नुलंघितां पर्वतकोटी। न रिघतां गिरिकपाटीं। दूरी न करिता आटाटी। जे स्थानीं भेटी सदा माझी॥५३३॥ भजनस्थान निरुपम। जेथ मी वसें पुरुषोत्तम। प्राप्तीलागीं अतिसुगम। विश्रामधाम भक्तांचें॥५३४॥ सर्व सुखाचा आराम। निजहृदयीं आत्माराम। सर्वदा असे सम। भजावें सप्रेम ते ठायीं॥५३५॥ आदि ब्रह्मा अंतीं मशक। सर्वांचे हृदयीं मीचि एक। ऐसे पाहे तो सभाग्य देख। हें भजन चोख मत्प्राप्ती॥५३६॥ ज्या मज हृदयस्थाचे दीप्तीं। मनबुद्ध्यादिकें वर्तती। ज्या माझिये स्फुरणस्फूर्ती। ज्ञानव्युत्पत्ती पायां लागे॥५३७॥ त्या मज हृदयस्थाच्या ठायीं। भजनशीळ कोणीच नाहीं। शिणतां बाह्य उपायीं। जन अपायी पडताती॥५३८॥ ऐशांत सदैव कोणी एक। निजभाग्यें अत्यंत चोख। मज हृदयस्थाचा विवेक। करूनि निष्टंक मद्भजनीं॥५३९॥ करितां हृदयस्थाचें भजन। माझें पावे तो निजज्ञान। वैराग्ययुक्त संपूर्ण। जे ज्ञानीं पतन रिघेना॥५४०॥ ज्या ज्ञानभेणें जाण। धाकेंचि पळे अभिमान। तें मी आपुलें त्यांसी दें ज्ञान। जे हृदयस्थाचें भजन करिती सदा॥५४१॥ ज्या ज्ञानाचिये ज्ञानसिद्धी। अखिल जाती आधिव्याधी। संशय पळती त्रिशुद्धी। भक्त निजपदीं पावती॥५४२॥

- एकनाथी भागवत. अध्याय १३

पू. बाबा म्हणाले, मी त्या बाईंना सांगितले, श्रीमहाराज हृदयात आहेत; तिथे नाम व त्यांचे स्मरण एकत्र आहे. बाईंचे समाधान झाले. खरे म्हणजे त्यांचे समाधान होतेच आणि श्रीमहाराजांनी मला विचारायला सांगितले होते आणि त्या श्रद्धेमुळे लगेच समाधान झाले.

**साधक ब** : या ओव्यांत बरेचदा भजन शब्द आला आहे. येथे त्याचा नेमका काय अर्थ घ्यायचा? तसेच येथे सांगितल्याप्रमाणे मन हृदयावर केंद्रित करावे की बेंबीवर?

**पू. बाबा** : भजन म्हणजे भक्ती. मन बेंबीवरही केंद्रित करता येते. वासनांचा उगम तेथून आहे. पण हृदयस्थाचे ध्यान करणे सोपे जाते.

**साधक प :** स्मरण म्हणत असतांना ते स्मृतीवर अवलंबून नसून ते स्वत: स्फुरणरूप आहे हे लक्षात घेतले पाहिजे.

**पू. बाबा :** स्मरण शब्दाचा श्रीमहाराजांनी जो अर्थ सांगितला होता तो सांगतो. मी आहे ही आपल्याला असणारी जाणीव एकसारखी हृदयात जाणवणे हे स्मरण. ती जाणीव स्वसंवेद्य आहे. त्या बाई म्हणाल्या की रोज रात्री नाम मला नाम घेण्यासाठी उठवते. बाई खऱ्या श्रद्धावान आहेत. आपल्याला ही काही विशेष अवस्था आली आहे ही भावनाच त्यांना नाही. ही साधी आणि शुद्ध अंत:करणाची माणसेच परमार्थात जलद वाटचाल करतात.

**साधक प :** नामस्मरण चांगले होण्यासाठी निर्विचार होणे आवश्यक आहे. आधी विचाराने आणि तर्काने विभाग करून मग एकत्व बघण्यापेक्षा निर्विचार होणे सोपे आहे. विचारांवर विचार करणे थांबवावे. त्यांना विरोधही करू नये, मग ते विरून जातील.

देहपणाचा अभिमान नष्ट होतो म्हणजे काय होते याचेही वर्णन तेराव्या अध्यायात आहे. त्यासंबंधीच्या पू. बाबांनी वाचून दाखविलेल्या ओव्या :

"काया वाचा आणि मन। दृढ आवरावे आपण। तुटों नेदावें अनुसंधान। सदा सावधान निजरूपीं॥५६३॥ ते स्वरूपसुखीं लोधल्या जाण। देहाचें स्फुरेना देहपण। अहंकारेंसीं मावळे मन। स्वानंद पूर्ण वोसंडे॥५६४॥ तेथ संमुख ना पाठिमोरें। एकपण ना दुसरें। देवो भक्त हेंही नुरे। सुखें सुखभरें सुखरूप॥५६५॥ मी एक सुखरूप आहें। वेगळेपणें ठावें नोहे। येणें आत्मानुभवें राहे। एवढी प्राप्ती होये मद्भक्तां॥५६६॥ म्हणाल काष्ठाच्या परी त्यासी। पडला असेल अहर्निशीं। हेंही न घडे गा तयासी। सांडूनि हेतूसी देहीं वर्ते॥५६७॥ तोही प्रारब्धाचेनि बळें। आहारनिद्रादि खेळेंमेळें। देहींची कर्में करितां सकळें। सर्वथा नातळे देहबुद्धी॥५६८॥ दंड काढोनि नेलिया कुंभारें। पहिले भवंडीं चक्र फिरे। तेवीं प्रारब्धाचेनि संस्कारें। कर्मानुसारें देह वर्ते॥५६९॥ कुलालचक्रीं बैसली माशी। न हालतां भोंवे चक्रासरसी। कोटी फेरे म्हणती तिसी। तेवीं मुक्तासी देहकर्में॥५७०॥ यापरी देहकर्मीं वर्ततां। ज्ञाता न म्हणे अहं कर्ता। जेवीं वाऱ्याचिया स्वभावता। दिसे चपळता गलितपत्रीं॥५७१॥ जेवीं का पुरुषासवें छाया असे। परी ते छायेसी पुरुष न बैसे। तेवीं ज्ञात्यासवेंही देह दिसे। परी तो देहदोषें मैळेना॥५७२॥ निजछायेरसी बैसों जातां। छायाचि पळे तत्त्वतां। तेवीं मद्भक्तीं माया पाहतां। माया स्वभावतां मिथ्यात्वें पळे॥५७३॥... यापरी ते अतिसंज्ञान। जाणोनि

देहाचें मिथ्याभान। देहकर्मीं वर्ततां जाण। देहाचें देहपण स्फुरेना॥५७७॥ आपुली छाया देखिली शूळी। तीलागीं पुरुष न तळमळीं। तेवी देहाची होत होळी। ज्ञाता न डंडळी निजबोधें॥५७८॥

- एकनाथी भागवत. अध्याय १३

|४७०| (१६ ऑगस्ट १९९६)

**पू. बाबा** : गोंदवल्यास राहाणाऱ्या एका गृहस्थांनी साडेतीन कोटी जप केला तथापि ते म्हणाले की त्यानंतर जी एक प्रकारची समाधानी वृत्ती झाली पाहिजे तशी ती झालेली नाही. याचे कारण नाम घेतांना आपल्याला त्याची सत्यता वाटत नाही. भावनेशिवाय नाम झाले तर त्याचा तितकासा परिणाम दिसत नाही. आपल्या प्रपंचात आपल्याला भावना असते. जुन्या आठवणीत भावना असतात; हेच गुंतणे. प्रपंचातली ती भावना भगवंताकडे वळवून नाम घेतले तर भाव निर्माण होतो. ह्या भावातून नकळत अस्तित्वाची जाणीव होत राहील आणि खऱ्या अर्थाने नामस्मरण होईल.

आपले कोठे अडते ते प्रत्येकाने पहावे व सावधानतेने ते दूर करण्याचा प्रयत्न करावा. आज आपल्याला विचाराने समजलेले आहे, परंतु विचाराच्या पलीकडे जाऊन नामात प्रेमाची भावना आली पाहिजे.

माझे नामस्मरण चांगले झाले किंवा आता मी इतरांपेक्षा बरा साधक आहे असे विचार मीपणामुळे येतात आणि ते साधकाला खाली खेचतात. नामस्मरणाच्या प्रगतीतच अहंकारामुळे खाली येण्याची भीती अंतर्भूत आहे, म्हणून ते सांभाळले पाहिजे. मी चा उपयोग करूनच मी ला बाजूला सारायचे आहे. म्हणूनच, जे होणार ते सर्व ठरलेले आहे हे लक्षात ठेवावे; त्यात माझे नामही आले. नाम चांगले झाले तर ते त्या नियतीमुळे झाले अशी मनाची समजूत करून घेतली पाहिजे तरच मी केले किंवा मी करतो हा अहंकार कमी होईल. सर्वांगीण शारीरिक आणि मानसिक शुद्धता होईल.

या शुद्धतेसंबंधीचा माझा एक अनुभव सांगतो. एकदा मला किडनीचा खूप त्रास होत होता. श्रीमहाराजांना सांगितल्यावर ते म्हणाले, दु:खाच्या ठिकाणी लक्ष केंद्रित करून शवासनात नाम घ्यावे. तसे केल्यावर मला बरे वाटू लागले. नंतर हे कसे होते असे श्रीमहाराजांना विचारल्यावर ते म्हणाले की नामाने भगवंताचे दर्शन होते तर दुखणे बरे झाले यात काय विशेष!

पू. बाबा म्हणाले, आपण आपल्याशीच प्रामाणिक झालो तर आपल्या आड काय येते हे कळण्यास मदत होईल. आपल्या विचारांचे श्रद्धेत रूपांतर झाले पाहिजे. अहंकार गेला तरच श्रद्धा निर्माण होते. संतांच्या संगतीत अहंकार गळून पडतो.

पू. बाबांनी योगी श्रीअरविंद आणि मदर यांच्या Transformation विषयी उल्लेख करून सांगितले की मदर यांच्या मते सर्वांत शेवटी शरीराचे Transformation (रूपांतर) आहे. नामाचा परिणाम शरीरातील प्रत्येक पेशीवर (cell) होतो. नामाच्या संस्पर्शाने शरीरातील पेशी साधकाला भीती, अशांतता दूर करण्याला मदत करतात. त्या म्हणत Thoughts are infected by emotions. (विचारांना भावनांचा संसर्ग होतो) असे जर आहे तर आपल्या भगवंताविषयीच्या किंवा गुरुविषयीच्या विचारांना प्रेमाची भावना असली पाहिजे.

श्री. काकासाहेब तुळपुळे एकदा काही साधकाशी गुरुदेव रानड्यांसंबंधी बोलत बसलेले असतांना मधेच थांबले आणि म्हणाले, आता आपण नाम घेऊया. नाम घेणे हेच खरे आहे म्हणून प्रत्येक साधकाने आपआपल्या मनोरचेप्रमाणे नामाला पूरक असे सद्ग्रंथ वाचन, गुरुवचनांचे वाचन किंवा भजन वगैरे करावे पण शक्यतो नामच घ्यावे. श्रीमहाराज आपल्याला नामात रंगण्यासाठी मदत करीतच असतात. जेथे घोडा अडायची शक्यता असते तेथे घोड्याला टाच मारतात असे श्रीमहाराज म्हणत.

एका साधकाला श्रीमहाराजांनी सपाटून नाम घ्यावे असे सांगितले. गुरूंची सूचना ही वास्तविक आज्ञाच असते, पण ते लक्षात आले पाहिजे. तुम्ही फक्त नाम घ्या बाकी सर्व मी करतो असे श्रीमहाराज सांगतात तेव्हां खरोखर ती आज्ञा असते. केवळ शिष्याकडून आज्ञाभंगाचा प्रमाद घडू नये म्हणून ते प्रत्यक्ष आज्ञा करीत नसत.

श्रीमहाराजांना आवडते म्हणून नाम घेतो असे श्री. भाऊसाहेबांसारखे जमले तर उत्तमच. एकदा श्रीमहाराज म्हणाले, इंजेक्शन देण्यापूर्वी जेथे ते द्यायचे असेल तो भाग स्पिरिटने स्वच्छ करतात तसे मन शुद्ध करून नाम घ्यावे. सुरुवातीला देहधारी श्रीमहाराजांची आठवण राहिली तरी नंतर हळूहळू ती जाऊन नामाच्या सत्तेची जाणीव वाढेल आणि नाम सर्वस्व वाटू लागेल. नामात ही भावना आल्यावर मग अस्तित्वाची जाणीव स्थिर होऊ लागेल.

**|४७१|** (२३ ऑगस्ट १९९६)

आम्ही गेलो तेव्हां पू. बाबांशी एक गृहस्थ बोलत बसलेले होते. (पू. बाबांच्या बोलण्यातून ते डॉक्टर आहेत हे समजले.) पू. बाबा त्यांच्याशी आयुर्वेदातील, विशेषत: हिरडा, आवळा, हिंगाष्टक, गंधर्वहरीतकीची कृती इत्यादींसंबंधी बोलले. ते गृहस्थ म्हणाले आयुर्वेदात हिरड्याचे महत्त्व इतके आहे की 'यस्य माता गृहे नास्ति तस्य माता हरीतकी।' असे म्हटले आहे.

**पू. बाबा** : रोग औषधांनी बरा होत नाही, तो प्रारब्धाने बरा होतो. औषधांनी आजाराचा भर कमी होतो असे श्रीमहाराज म्हणत. औषधांइतकाच आहारातील बदल आणि समतोलपणा महत्त्वाचा आहे. योग्यप्रकारच्या व्यायामामुळेही आजार कमी होतो. जुनी गोष्ट आहे; मला किडनीचा त्रास होत असे. कर्नल नायडूंनी (डॉ. सरोजिनी नायडू यांचा नवरा) मला तपासले आणि Floating Kidney आहे असे त्यांना आढळल्यावर ते म्हणाले, Young man, do some yoga exercises. किडनी शिवावी असे काही डॉक्टरांचे म्हणणे आहे असे मी त्यांना सांगितल्यावर ते म्हणाले, They are young fools ! माझ्या मोठ्या भावाला इन्फ्लुएंझा झाला होता. १०४° ताप होता कर्नल नायडूंनी त्याला बर्फाच्या पिशवीने शेकायला सांगितले. That will give him some relief म्हणाले. खरे म्हणजे औषधाचे काम इतकेच असते. डॉक्टर, हे तुम्हाला सांगायचे म्हणजे Carrying coal to Newcastle किंवा कोकणात मीठ विकायला जाण्यासारखे आहे.

ते डॉक्टर गेल्यानंतर पू. बाबा आम्हाला म्हणाले, आज तुमची वाटच पहात होतो. परवा म्हणजे बुधवारी दिनकर (श्री. दिनकरराव केतकर) एका जर्मन बाईला भेटायला घेऊन आला होता. ही बाई कान्हनगडला आनंदाश्रमात जाते. तेथे त्यांची ओळख झाली. दुपारी साडेअकरा वाजता ती आली. त्यावेळी मी शक्यतो कोणाला भेटत नाही म्हणून मी तिला दुपारी चार वाजता यायला सांगितले. ती ओके म्हणाली. दिनकरकडेच ती थांबली होती त्याला नंतर फोन करून मी तिला तीन वाजताच बोलावले.

तीन वाजता आल्यानंतर तिने भारतीय पद्धतीने मला आणि ह्यांना (सौ. आईंना) नमस्कार केला. ती म्हणाली की आनंदाश्रमात माताजी कृष्णाबाईंनी तिला नमस्कार करायला आणि दररोज स्नान करायला शिकवले. माताजींचा तिला पाच वर्षे सहवास लाभला. मला त्या माझ्या आईच वाटत असे ती म्हणाली.

स्वत:विषयी सांगतांना ती म्हणाली की आता ती बेचाळीस वर्षांची आहे. लग्न केले नाही. आई वडील जर्मनीत असतात. वडील आता ऐंशी वर्षांचे आहेत. ती म्हणाली की दहा बारा वर्षांपूर्वी तिला अतिशय डिप्रेशन (विषण्णता, उद्विग्नता) आले. बऱ्याच उपचारांनंतर मानसोपचारतज्ज्ञांनी तिला जगप्रवासाचा सल्ला दिला. ते परवडणारे नव्हते म्हणून तिने **Lufthansa Airlines** मधे एअर होस्टेसची नोकरी पत्करली. पुष्कळ ठिकाणी हिंडली पण डिप्रेशन जात नव्हते. अशा स्थितीत कोणीतरी तिला इंडियात कान्हनगड नांवाचे ठिकाण आहे तेथे जा असे सुचविले. खूप कष्टाचा प्रवास करून ती कान्हनगडला आनंदाश्रमात पोचली आणि माताजींच्या (कृष्णाबाई) दर्शनानेच तिला एकदम बरे वाटले. माताजींनी तिला त्रयोदशाक्षरी मंत्र दिला आणि तो कसा म्हणावयाचा ते शिकवले. तिने मला मंत्र म्हणून दाखवला. थोडे जर्मन ॲक्सेंटस् असले तरी शब्दांचे उच्चार शुद्ध होते. तिने सांगितले की पू. माताजींच्या उपदेशामुळे आणि आनंदाश्रमातील पवित्र वातावरणामुळे ती डिप्रेशनमधून बाहेर आली. आता ती नियमित जप करते येवढेच नव्हे तर स्वप्नातही जप होतो असे ती म्हणाली. तिने विचारले की हे कसे घडते ? मी तिला म्हणालो, आमच्या महाराजांनी सांगितले आहे की जागेपणी अखंड जप करायची जबाबदारी तुमची; ती तुम्ही पार पाडा. मग झोपेत आणि बेशुद्धीत तुमचा जप चालू ठेवायची जबाबदारी माझी आहे. तिने विचारले की काम करतांना जप थांबतो आणि काही वेळानंतर तो थांबल्याचे लक्षात येते; याकरिता काय करावे ? मी तिला सांगितले की प्रेमाने अथवा भीतीने स्मरण एकसारखे चालू राहाते. मृत्यू केव्हांही येईल. **Death is round the corner.** तो पुढच्या क्षणीदेखील येण्याची शक्यता आहे म्हणून त्यावेळी नामस्मरण चालू राहिले पाहिजे अशी स्वयंसूचना देत राहिले तर नाम चालू राहाते. हा अभ्यास आहे. यातूनच नाम सहज होते. म्हणजे नाम आपण घेत नाही तर ते सहजपणे चालू राहाते.

पू. बाबांना एकदम कबीराचे 'मन लागो मेरो यार फकीरीमें' हे पद आठवले. त्या पदाच्या शेवटच्या चरणात 'कहत कबीर सुनो भाई साधो, साहिब मिले सबूरीमें' असे म्हटले आहे. पू. बाबा म्हणाले, मला ही ओळ फार आवडते. जुनी गोष्ट आहे, त्यावेळी मी सतरा अठरा वर्षांचा होतो. एका मुसलमान मुलाशी माझी मारामारी झाली. आमचे मुसलमानी राज्य. तेव्हां शिपायांनी मला धरून पोलीसचौकीवर नेले. तेथे एक सुमारे तिशीतला पोलीस अधिकारी

बसलेला होता. माझ्याकडे पाहून त्याने विचारले, 'क्यों मियाँ, क्यों आये है?' धरून नेणाऱ्या शिपायांनी सर्व हकिगत सांगितली आणि म्हणाले, बड़ा चंट लडका है, सुनता नहीं। मारामारी करता है। त्याने विचारल्यावर घडले ते सर्व मी त्याला सांगितले तेव्हां तो म्हणाला, बेटा, अब तू छोटा है। आगे पूरी उमर है। जरा सबर करना सीख। त्याने येवढे सांगून मला सोडून दिले. तेव्हांपासून सबर माझ्या मनात घट्ट बसला आहे.

पू. बाबांनी त्या जर्मन बाईला नाम सहज होते म्हणून सांगितले होते. तोच विषय पुन्हा निघाला.

**साधक प** : मी नाम घेतो आहे आणि ते घेतांना काहीतरी हेतू आहे. हा कर्तेपणा नामाकरिता नाम होईल तेव्हां नाहीसा होईल. वास्तविक आज आपण जे नाम घेतो ते त्यांच्या कृपेनेच होते, पण ते लक्षात येत नाही किंवा लक्षात आले तरी ते टिकत नाही.

चर्चेत पुन्हा पूर्वीचेच मुद्दे आले व सर्वांचे एकमत झाले की अभ्यास इतका झाला पाहिजे की ते सहज होऊन जाईल. नामस्मरणात सहजपणा येण्यासाठी जागेपणी नामस्मरणाचा अभ्यास केला पाहिजे. हा अभ्यासही श्रीमहाराज आपल्याकडून करवून घेत आहेत आणि त्यातून काही मिळवायचे नाही असे वाटू लागले की नाम सहज होईल.

पू. बाबांनी नंतर दोन जुन्या आठवणी सांगितल्या. श्री. आण्णासाहेब घाणेकर एकदा मालाडला पू. तात्यासाहेबांकडे राहायला आले होते. सुमारे महिनाभर होते. एक दिवस ते व्हरांड्यातल्या खिडकीजवळच्या पेटीवर नामस्मरण करत बसले होते. ते कोणाच्याच लक्षात राहिले नाही. सगळ्यांची जेवणे झाली आणि मग त्यांना जेवायला बोलवायचे राहून गेले हे लक्षात आले. पू. तात्यासाहेबांनी नंतर त्यांना जेवायला बोलावले आणि काय घडले ते सांगितले. काही विशेष न घडल्यासारखे त्यांनी जेवण केले. पण पू. तात्यासाहेबांच्या मनाला ती गोष्ट लागली म्हणून रात्री जे घडले ते श्रीमहाराजांना (पेटीवर) सांगितले. श्रीमहाराजांनी आण्णासाहेबांना विचारले की खरेच तुम्हाला काही वाटले नाही का? श्री. आण्णासाहेब म्हणाले, होय महाराज, माझ्या मनात काहीही आले नाही. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, मला असं वाटतं की साधन सहज घडतं तेव्हां साधकाचा अभिमान नाहीसा होतो आणि अशी अवस्था येते. जे घडते ते त्याच्या (भगवंताच्या) इच्छेने घडते, त्यात दोष नाहीच ही वृत्ती स्थिर होते.

हंस हे सरस्वतीचे वाहन आहे. त्यासंबंधी एकदा मी श्रीमहाराजांना विचारले की हंस दूध आणि पाणी वेगळे करतो तसा विवेक जागा झाला पाहिजे असा प्रतीकात्मक अर्थ आहे काय? श्रीमहाराज म्हणाले, मला असं वाटतं की ते तर आहेच पण तो मानससरोवरात विहार करणारा हंस आहे. नाम घेतांना त्या हंसाप्रमाणे मानससरोवरात आत बुडी मारता आली पाहिजे.

शंकराचार्यांनी आत्मानात्मविवेकावर भर दिला आहे आणि सांगितले आहे की ह्या विवेकाला वैराग्याची जोड नसेल तर विवेक पांगळा ठरतो. त्यामुळे साधकाची प्रगती होत नाही. गीतेतही श्रद्धावान् लभते ज्ञानम् असे सांगतांना लगेच तत्परं संयतेन्द्रिय: ही अतिशय महत्त्वाची पदे योजलेली आहेत.

समर्थांनी 'साधक भावें नमस्कार घाली। त्याची चिंता साधूस लागली। सुगम पंथें नेऊन घाली। जेथील तेथें॥' दासबोध ४.६.२४॥ असे म्हटले आहे. त्याचा अर्थ असा की तुम्ही एखाद्या सत्पुरुषाकडे श्रद्धापूर्वक गेलात आणि त्याच्याकडून तुमचे (पारमार्थिक) काम व्हायचे नसेल तर ज्याच्याकडून तुमचे काम व्हावयाचे आहे त्याच्याकडे तुम्हाला कसे पाठवता येईल याची काळजी तो घेतो आणि भगवंतापर्यंत तुम्हाला नेण्याचे तुमचे काम तो करून देतो.

## |४७२| (३० ऑगस्ट १९९६)

आमच्यापैकी एक साधक गोंदवल्याहून नुकतेच परत आले. पू. बाबांनी त्यांना तेथे श्रीमहाराजांची आठवण एकसारखी राहिली का असे विचारले.

**साधक** : नाही, पण जप चांगला झाला. चांगले वाटले.

**पू. बाबा** : तो तेथील वातावरणाचा आणि अन्नाचा परिणाम. तथापि सांगून ठेवतो, श्रीमहाराज म्हणाले की सत्पुरुषाच्या घरच्या अन्नातही विशेष शक्ती असते त्यामुळे तुम्ही जो भाव ठेवून त्याच्याकडे जाल तो भाव पुष्ट होतो. तुम्हाला जर संसाराचे प्रेम असेल तर त्या अन्नामुळे तो भाव पुष्ट होईल.

**साधक ख** : हे फार महत्त्वाचे आहे.

**पू. बाबा** : प्रवचनाला येणाऱ्या एक बाई आहेत, त्यांनी गेल्या रविवारी वृत्ती म्हणजे काय म्हणून विचारले. त्यांना काय सांगावे?

**साधक प** : मनाच्या वृत्ती आणि चित्तवृत्ती यात फरक आहे. पतंजलींनी चित्तवृत्तींचा निरोध सांगितला आहे. चित्त हे जास्त खोल आहे. मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार हे सोयीसाठी वेगवेगळे भाग केले तरी पंचीकरणाप्रमाणे प्रत्येक वृत्तीत ते असतात. त्यांच्यापैकी एक प्रधान असते.

**पू. बाबा :** वृत्ती म्हणजे स्पंदने असून ती हवेनकोपणातून म्हणजे वासनेतून येतात. वासना नाहीशा झाल्याखेरीज ती स्पंदने थांबणार नाहीत. म्हणून नाम इतके घ्यावे की येणारे प्रत्येक स्पंदन म्हणजेच प्रत्येक वृत्ती नामाची व्हावी. प्रापंचिकाच्या परमार्थाला श्रीमहाराज हिरवा म्हणजे टवटवीत परमार्थ म्हणत आणि नाथांचे उदाहरण देत. ते म्हणत तुम्ही समर्थांच्याकडे गेलात तर दुपार झाली की ते म्हणतील चल, मी एक झोळी घेतो आणि तूही एक घे; आपण भिक्षा मागून आणू. नाथांचे तसे नाही; ते पाहुण्याला पुरणपोळी खायला घालतील

**|४७३|** (६ सप्टेंबर १९९६)

**पू. बाबा :** रविवारच्या प्रवचनांना अधूनमधून येणारे एक गृहस्थ परवा भेटायला आले होते. त्यांची मुले अमेरिकेत असतात; तिकडे काही दिवस गेले होते. पूर्वी काही वर्षे ते अमेरिकेत होते तेव्हां कृष्णमूर्तींच्या व्याख्यानांना जात असत. त्यांच्या तत्त्वज्ञानाचा त्यांनी अभ्यास केला आहे. त्यांनी एक फार छान प्रश्न विचारला. ते म्हणाले ज्ञानेश्वर महाराज सांगतात त्यात आणि कृष्णजींच्या सांगण्यात खूप साम्य वाटते. तथापि self consciousness आणि कृष्णमूर्ती सांगतात तो self alertness यात काय फरक आहे ? त्यांनी alertness शब्द वापरला. बहुधा त्यांना awareness म्हणायचे असावे. मी त्यांना सांगितले की self conciousness मधे self वर जोर आहे alertness (awareness) मधे तसे नाही. वास्तविक साधनाने self क्षीण करायचा आहे, आणि शेवटी तो नाहीसा करून तद्रूप व्हायचे आहे.

**साधक प :** कृष्णमूर्तींनी awareness च्या बाबतीत circle without centre असे म्हटले आहे

**पू. बाबा :** ते बरोबर आहे. स्पिनोझा त्याचे वर्णन circumference without centre असेच करतो. पंधरा दिवसांपूर्वी भेटलेल्या त्या जर्मन बाईने अजपाजप म्हणजे काय म्हणून विचारले होते. अजपाजप होतो, तो करायचा नसतो. मी तिला सांगितले की श्वास येतो जातो त्यावर जप करतांना लक्ष केंद्रित करावे. काही दिवस हा अभ्यास केला की हळूहळू श्वास आणि जप यांमधे एक लय येते. मग तास दीड तास कसा जातो ते कळतही नाही. यातूनच मग अजपाजप होऊ लागतो.

**साधक क :** माझा अनुभव असा आहे की श्वासावर लक्ष ठेवल्यास जपात खंड येतो.

**साधक ज** : माझाही हाच अनुभव आहे.

**साधक क** : म्हणून मला वाटते की आपल्याला जमलेल्या पद्धतीने जप चालू ठेवला तर आपोआप श्वास मंद होऊन त्यात एक लय येते. शेवटी प्रत्येकाची सवय आणि मनोरचना याप्रमाणे प्रयत्न केल्यास जप करायची पद्धत प्रत्येकाला साध्य होते.

**|४७४|** (२७ सप्टेंबर १९९६)

**पू. बाबा** : रविवारी निरूपणाला येणाऱ्या एका गृहस्थांनी निरूपणानंतर विचारले की आपण बहिर्मुख आहोत ते अंतर्मुख व्हावयाचे म्हणजे काय आणि ते कसे व्हावयाचे ?

नंतर यावर बरीच चर्चा झाली. चर्चेचा निष्कर्ष असा की आपली ज्ञानेंद्रिये ह्या खिडक्या आहेत. त्यांच्या आणि कर्मेद्रियांच्या द्वारा आपण दृश्याचा भोग घेत असतो. जोपर्यंत वासना आहेत तोपर्यंत मनाची धाव त्या वासना पुऱ्या करण्यासाठी बाहेर राहाणारच. योगमार्गाने चित्ताच्या वृत्ती रोधल्या जातात. त्यासाठी शक्ती लागते. योगाच्या अभ्यासाने ती शक्ती आली आणि चित्तशुद्धी झालेली नसली तर त्या शक्तीचा दुरुपयोग केला जाऊन साधकाचे पतन होण्याची भीती असते. शिवाय प्रापंचिकाला ह्या मार्गाने जाण्यात खूप अडचणी आहेत.

दैनंदिन व्यवहार करावयाचा म्हणजे बाहेर यावे लागणारच; पण ते तेवढ्यापुरते असावे. त्यात गुंतून जाऊ नये. त्यासाठी मन नामात गुंतवून ठेवले पाहिजे. अंतर्मुख होण्यामध्ये देहाचा विसर आहे. देहाच्या विसराची थोडीशी चुणुक मिळाली तरी त्याची चटक निर्माण होईल आणि दृश्याची ओढ कमी होईल. 'अनुहादी गुंतलो नेणे बाह्यरंग। वृत्ती येता मग बळ लागे॥' अशी तुकाराम महाराजांची अवस्था झाली. श्रीरामकृष्णांचेही असेच होत असे. अंतर्मुख होण्यासाठी वृत्ती शांत झाल्या पाहिजेत. त्यासाठी चित्तशुद्धी आवश्यक आहे. म्हणून सर्व कर्मे करतांना मी ही भगवंतासाठी करतो आहे असा भाव हवा. 'मदर्थमपि कर्माणि कुर्वन् सिद्धिमवाप्स्यसि।' असे भगवंतानीच गीतेमध्ये सांगितले आहे.

बहिर्मुख आणि अंतर्मुख या सापेक्ष संज्ञा (**relative terms**) आहेत. माझे आजचे जीवन Bogus (बनावट, खोटे) आहे हे पटले तर त्यातला रस नाहीसा होईल आणि मग मन अंतर्मुख होईल. खोटी नोट जशी आपण जवळ ठेवत

नाही तसे बहिर्मुख जीवन खोटे वाटू लागले की त्याची ओढ नाहीशी होऊन मन आत वळेल. दुसरे असे की आज मी आणि जग वेगळे आहोत अशा भेदात्मक वृत्तीने मी जगतो आहे. वास्तविक मी ह्या जगाचाच भाग आहे. पण मी ते विसरतो आणि संकुचित जीवन जगतो. पण साधनाने हा भेद गेला तर मी नाहीसा होईल आणि मग बहिर्मुखता राहाणारच नाही. नामस्मरण करतांना त्याची पथ्ये सांभाळलीच पाहिजेत. शुद्ध, पवित्र अन्नाचे त्या दृष्टीने फार महत्त्व आहे. 'पवित्र ते अन्न। हरिचिंतनी भोजन॥' म्हणून पूर्वी घरातली मोठी माणसे जेवतांना गोविंद गोविंद म्हणावे असे सांगत असत.

नामस्मरण करतांना स्थळाकाळाचा विसर पडला पाहिजे असे सांगतांना पू. बाबांनी त्यांचा एक अनुभव सांगितला. रोज दुपारी जेवणानंतर तासभर झोपण्याची त्यांची सवय आहे. एक दिवस नेहमीप्रमाणे दुपारी नाम घेत ते झोपी गेले. घड्याळातले दोनचे ठोके ऐकून त्यांना जाग आली. दुपार असल्यामुळे साहजिकच सगळीकडे झगझगीत उजेड होता पण त्यांची समजूत झाली की रात्रीचे दोन वाजले असून कोणीतरी ट्यूबलाइट लावले आहेत!

## ।४७५। (४ ऑक्टोबर १९९६)

पू. बाबा : रविवारी एक गृहस्थ निरूपणाला येतात. वारकरी आहेत. आळंदीच्या कीर्तनसंस्थेत त्यांनी वेदान्ताचा अभ्यास केला आहे. त्यांनी विचारले, सर्व संत सांगतात की भगवंताच्या साक्षीने कर्म करा. याचा अर्थ काय?

नंतर साक्षी म्हणजे काय यावर चर्चा झाली. कर्म करतांना स्वतःकडे साक्षित्वाने पाहाणे आणि भगवंताच्या साक्षित्वामधे कर्म करणे यात फरक आहे. पंचदशीच्या नाटकदीप प्रकरणातील दीप साक्षी आहे पण तो भगवंतासारखा साक्षी आहे का? भगवंत म्हणजे शक्ती आणि कर्म करणारा त्या शक्तीचाच भाग. असे असूनही कर्म करतांना ती शक्ती माझ्याकडून कर्म करवीत आहे असा भाव नसतो. मी कर्ता आहे म्हणून भोक्ताही आहे. मी पणा नाहीसा झाला की माझेपणही नाहीसे होईल आणि कर्म घडेल. भगवंत साक्षी आहे असा भाव यावयाला प्रथम त्याचे अस्तित्व जाणिवेत आले पाहिजे. तो साक्षी आहे हा ज्ञानमार्ग; त्यापेक्षा तोच सगळे करतो आहे किंवा त्याच्या इच्छेने सगळे घडते आहे असे वाटणे आणि त्यानुसार वागणे हा भक्तिमार्ग. ज्ञानमार्गापेक्षा आचरणास हा सोपा, पण तसा सोपा नाहीच.

भगवंत साक्षी आहे. आपल्या जीवनात तो कोणतीही ढवळाढवळ करीत नाही, आपण जे सुखदु:ख भोगतो ते आपल्या कर्माचे फळ असते. 'नादत्ते कस्यचित पापं न चैव सुकृतं विभु:।' असे भगवंतानी गीतेत सांगितले आहे. भगवंत ज्याप्रमाणे आपली कर्मे साक्षीभावाने पाहातो त्याप्रमाणे आपणही आपली कर्मे साक्षीभावाने पाहू शकलो तर कर्म घडेल पण त्याचे कर्तेपण आपल्याकडे येणार नाही आणि जीवनात कृतार्थता येईल.

कर्म करताना भगवंत पाहातो आहे, तो साक्षी आहे असा भाव आला तर आपल्या हातून वावगे कर्म घडणारच नाही. भगवंत 'अवस्थात्रयसाक्षी' आणि 'पंचकोषविलक्षण' आहे. त्यामुळे निदान अन्न, प्राण आणि मन हे तीन कोष ओलांडल्याखेरीज साक्षित्व कळणार नाही. साक्षित्वासाठी अंतर्मुख होणे आवश्यक आहे म्हणून साधन करताना सावधानता पाहिजे. मी आता भगवंतासाठी जगतो असे वाटू लागले तरच ही अंतर्मुखता आणि साक्षित्व शक्य आहे.

चर्चेच्या शेवटी पू. बाबा म्हणाले की अजूनही साक्षित्वाचा पूर्ण उलगडा झालेला नाही पण ते आपण आणखी केव्हातरी पाहू.

## |४७६| (१८ ऑक्टोबर १९९६)

आज संकीर्ण विषयांवर चर्चा झाली. पू. बाबा म्हणाले, देवाकडून येतं ते शुद्ध आणि पवित्र असतं. आपण विषयाची, वासनांची भेसळ करून ते अपवित्र करतो. श्रीमहाराज पावसातून येणाऱ्या पाण्याचं उदाहरण देत. जोपर्यंत चित्तात विषय आहे, दृश्याची, प्रपंचाची ओढ आहे तोपर्यंत अंत:करण शुद्ध होणार नाही. ते शुद्ध करायला नामस्मरण हाच मार्ग आहे. श्रीमहाराजांनी सांगितलं आहे ते सरळ घ्यावं, श्रद्धेनं घ्यावं. महाराज सांगतात ते सरळ घ्या; त्यातून अर्थ काढू नका असं भाऊसाहेब म्हणत.

माणसाच्या वासना खोल दडलेल्या असतात. त्यालाच स्वत:च्या मनाचा थांग लागत नाही. श्रीमहाराजांनी आनंदसागरांना लग्न करायला सांगितले तेव्हां त्यांची लग्न करायची इच्छा नव्हती. एकदा घरातल्या बायकांच्या पसंतीसाठी लुगडी दाखवायला आणली होती. महाराजांनी सहज म्हणून आनंदसागरांना कोणत्या लुगड्याचा रंग चांगला आहे असे विचारले. आनंदसागरांनी त्यापैकी एक लुगडे निवडले! वास्तविक ज्याची लग्न करायची इच्छा नाही त्याला या गोष्टीत रस असू नये. तेव्हां श्रीमहाराजांनी मोठ्या खुबीने आनंदसागरांना

त्यांच्या वासनेची जाणीव करून दिली आणि त्यानंतर आनंदसागरांनी लग्न केले. याच्या उलट ब्रह्मानंद महाराजांना श्रीमहाराजांनी त्याबाबत कधी विचारले नाही. त्याच्या कूटस्थातदेखील काम नाही असे ते म्हणाले.

साधनकालात साधकाने खूप जपून राहावे लागते. आहार शुद्ध ठेवावा लागतो. विवेकानंदांना समाधिलाभ झाल्यानंतर श्रीरामकृष्णांनी त्यांना काही दिवस स्वत:च्या हाताने स्वयंपाक करून जेवायला सांगितले होते.

नामस्मरणाचे महत्त्व कळूनही आपण अद्यापि स्वत:ला झोकून देत नाही अजूनही आपल्या मनाची तयारी होत नाही याला काय म्हणावे? सोळाव्या अध्यायात सत्त्वशुद्धीचे वर्णन करतांना ज्ञानेश्वर महाराजांनी दिलेला दृष्टान्त अप्रतिम आहे. "गांवा गेलिया वल्लभु। पतिव्रतेचा विरहक्षोभु। भलतैसा हानिलाभु। न मनी जेवी॥ तेवी सत्स्वरूप रुचलेपणें। बुद्धीचे जें का अनन्य होणें। ते सत्त्वशुद्धी गा म्हणे। केशिहंता॥" रुचलेपणें आणि गा या शब्दांत सौंदर्य आहे.

## |४७७| (२५ ऑक्टोबर १९९६)

आम्ही पू. बाबांकडे गेलो तेव्हा दोन वृद्ध गृहस्थ पू. बाबांशी बोलत बसलेले होते. थोड्या वेळाने ते गेल्यानंतर पू. बाबा म्हणाले, आत्ता हे दोघे गेले त्यांच्यापैकी एका गृहस्थांचे डोळे मधुमेहामुळे गेले आहेत. ते म्हणाले की त्यांची आई वारली त्यावेळी त्यांनी त्यांचे सगळे पुण्य तिला दिले. हे पुण्य म्हणजे काय असते? डॉ. कुर्तकोटी जेव्हां समाधीतून खाली आले तेव्हां त्यांनी मला समाधीतून खाली का आणले असे श्रीमहाराजांना विचारले तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, खाली आणले नाही; पुण्यांश कमी आहे त्यामुळे खाली यावे लागले!

रजोगुण आणि तमोगुण कमी होऊन सत्त्वगुणाची वाढ होणे हे पुण्य होय. यासाठी सत्संगाची आवश्यकता आहे. सत्त्वगुण वाढू लागला की नामस्मरण करतांना भगवंताच्या आणि सद्गुरूंच्या अस्तित्वाची एकसारखी जाणीव राहील.

दोन दिवसांपूर्वी एक गृहस्थ भेटले होते. ते म्हणाले, मी कर्ता नाही, राम कर्ता आहे असे श्रीमहाराज म्हणत. राम कर्ता याचा अर्थ काय? मी त्यांना सांगितले की जगात जे जे म्हणून घडते आहे ते शक्तीचे कार्य आहे. माझ्या जीवनात देखील सर्व काही त्या शक्तीनेच घडते आहे ह्याची जाणीव म्हणजे राम कर्ता. त्या शक्तीचे सगुण रूप या अर्थाने श्रीमहाराज राम कर्ता असे म्हणत असत.

साधनामुळे होणारा शक्तिसंचय हे पुण्य. तथापि आपल्या वासनांमुळे हे पुण्य नाहीसे होते. अगदी भगवंताचे दर्शन व्हावे अशी वासना असली तरी त्यात पुण्यक्षय आलाच. म्हणून सद्‌गुरूंनी सांगितले म्हणून मी नाम घेतो; त्यातून काय होणार ते मला माहीत नाही अशा निष्ठेने कोणतीही अपेक्षा न ठेवता नाम घेतले पाहिजे.

## |४७८| (१ नोव्हेंबर १९९६)

**पू. बाबा** : गारोडीबाबा नांवाचे श्रीमहाराजांचे एक शिष्य होते. त्यांचे एक शिष्य होते. त्यांचे नाव राघवदास. जातीने रजपूत, दिसायला चांगले होते. गारोडीबाबांनी त्यांना लग्न करायला सांगितले, पण त्यांच्या मनात संन्यास घ्यावा असे होते म्हणून त्यांनी लग्न केले नाही. त्यांच्याबद्दल बोलतांना गुरुआज्ञा पाळली नाही म्हणून ह्या जन्मी त्यांना मुक्ती नाही असे श्रीमहाराज म्हणाले. पण तरीदेखील त्यांना भेटून या असे श्रीमहाराजांनी मला सांगितले म्हणून मी त्यांना भेटायला आळंदीला गेलो. मी गेलो तेव्हां ते हजामतीला बसले होते. ते आंघोळ करून आल्यावर मी त्यांना नमस्कार केला आणि माझे नांव सांगून श्रीमहाराजांकडून आलो आहे म्हणून सांगितले तेव्हां त्यांनी मलाच तीन चार वेळा नमस्कार केला! त्यांनी सांगितले की ते उत्तर हिंदुस्थानात गेले होते तेव्हां तिकडे त्यांना एक कबीरपंथी साधू भेटले. त्यांनी नामस्मरण करू लागल्यावर येणाऱ्या काही अवस्था सांगितल्या. राघवदासांनी मला त्या सांगितल्या.

ते म्हणाले, आपण नेहमी जे नामस्मरण करतो ते देहाच्या पातळीवरचे कर्म असते. ही पहिली अवस्था आहे. देहाच्या अन्नमय कोशातून नाम प्राणमय कोशात गेले की नामस्मरण जड कर्म न राहाता जिवंत होते. ही दुसरी अवस्था. प्राणाशिवाय जिवंतपणा नाही. फूल कसे जिवंत असते! झाडावर उमलू लागले की सगळीकडे त्याचा सुगंध पसरतो. तसे जिवंत नाम येऊ लागले की त्याचा सुगंध येतो. प्राणमय कोश ओलांडून मनोमय कोशात नाम शिरले की मनाची सर्व अंगे नामाने भरून जातात. ते साधू म्हणाले की विचार दुसऱ्याकडून घेता येतात आणि दुसऱ्यांना देता येतात. पण भाव किंवा नामाच्या प्रेमाची तशी गोष्ट नाही. पू. बाबा म्हणाले, त्यांनी भाव हा शब्द प्रेम ह्या अर्थाने वापरला, गुरुदेव रानड्यांनीही भाव शब्दाचा प्रेम असाच अर्थ केला आहे. शंकराचार्य 'भाव, भवनम्, अस्तिता' असे म्हणतात. त्या साधूंनी कबीराचे एक पद राघवदासांना सांगितले ते असे :

भक्तिका मारग झीना रे।
कोई जाने जाननहार, सन्तजन जे परवीना रे॥ टेक॥
नहीं अचाह चाह कुछ उर में, मन लोलीना रे॥
साधुनकी संगतमें निशिदिन रहत भीना रे॥
शब्दों सुरति बसे इमि जैसे, जलबिच मीना रे॥
जल बिछुरे ततकाल होत, जिमि कमल मलीना रे॥
धनकुलका अभिमान त्याग करि, रहे अधीना रे॥
परमारथके हेत देत शिर, विलम न कीना रे॥
धारण करी संतोष सदा, अमृतरस पीना रे॥
भक्तहीनि कबीर सकल परगट कह दीना रे॥

(भक्तीचा मार्ग सूक्ष्म आहे. भक्तीमधे रंगलेले साधक आणि संत यांना हा मार्ग माहीत आहे. ह्या मार्गावर हृदयामधे कोणतीही आवड किंवा इच्छा आणि नावड किंवा अनिच्छा राहात नाही. मन भक्तीमधे लीन होते. असे भक्त रात्रंदिवस सर्वकाळ साधूंच्या संगतीत निमग्न असतात. शब्द आणि सुरत म्हणजे जीव आणि शिव किंवा आत्मा आणि परमात्मा पाणी आणि त्यात राहाणाऱ्या माशाप्रमाणे एकत्र असतात. पाण्याचा वियोग झाला तर कमल म्लान होते तशी (परमात्म्यापासून वियोग झाला तर) भक्तांची अवस्था होते. संपत्ती आणि कुलाभिमान यांचा त्याग करून ते भक्तीच्या आधीन झालेले असतात आणि परमार्थासाठी प्राण द्यावा लागला तरी त्यासाठी ते क्षणाचाही विलंब करीत नाहीत. सर्वकाळ संतोष वृत्ती धारण करून ते सदैव अमृतरसपान करीत असतात. कबीर सांगतात की मी सर्व भक्तांसाठी हे उघडपणे सांगत आहे.)

**पू. बाबा** : आपल्याला आपल्या जिवंतपणाची जी जाणीव आहे त्या जाणिवेपर्यंत नाम गेले पाहिजे. श्रीमहाराज म्हणाले की मधाचे पोळे मधाने पूर्ण भरले की त्यातून मध जसा ठिबकू लागतो तसे शरीरात नाम भरले पाहिजे.

**साधक क** : आपली जाणीव चेतनमय आहे तशी ती स्पंदनमयही आहे. त्या स्पंदनमय जाणिवेपर्यंत नाम पोचणे म्हणजे प्राणापर्यंत नाम पोचणे आहे.

## |४७९| (२२ नोव्हेंबर १९९६)

**पू. बाबा** : आज एक गृहस्थ त्यांच्या मुलीला आणि जावयाला घेऊन आले होते. जावई नोकरी करतो. पण त्याला शिझोफ्रेनिआ (छिन्नमानस, दुभंगलेले व्यक्तिमत्त्व) झाला असावा. आपण श्रीरामकृष्ण किंवा विवेकानंद आहोत असे

त्याला अधूनमधून वाटते. मानसोपचार चालू आहेत. त्याचे गोव्याकडचे कोणीतरी गुरु आहेत. त्यांनी शक्तिपात करून त्याची कुंडलिनी जागृत केली असे तो सांगत होता. पण मला वाटते की त्यासाठी त्याची योग्य ती तयारी झालेली नसल्यामुळे त्याला हा त्रास होत असावा.

**साधक** : माझ्या एका नातेवाइकांना असाच त्रास होत होता. जुनी गोष्ट आहे. त्यांना होत असलेल्या त्रासावर उपाय काय असे मी श्रीमहाराजांना (पेटीवर) विचारले होते. श्रीमहाराजांनी त्यांना दररोज वीस पंचवीस मिनिटे थंड पाण्यात कटिस्नान (Hip bath) करावयास सांगितले होते. त्यासाठी मी त्यांना एक मोठा टबही आणून दिला पण त्यांनी तो उपचार करून पाहिला नाही.

**पू. बाबा** : अयोग्य प्रकाराने जागी झालेली कुंडलिनी शांत करण्यास हा उपाय चांगला आहे. त्या गृहस्थांना मी हा उपाय सुचवेन.

यानंतर मुख्य विषयाकडे पू. बाबा वळले. ते म्हणाले, गीतेमधे समत्वाला फार महत्त्व दिलेले आहे. परमार्थात समत्वाला महत्त्व आहेच. सुख दुःख, राग द्वेष, निंदा स्तुती, जय पराजय इत्यादी द्वंद्वांचे स्वरूप विरोधी दिसले तरी प्रकार एकच आहे. या द्वंद्वापलीकडे कसे जायचे ? समत्वं योग उच्यते असे गीता सांगते. हा equilibrium - समतोल कसा आणायचा ?

**साधक ग** : equilibrium पेक्षा equanimity हा शब्द जास्त योग्य वाटतो कारण समत्व ही मनाची अवस्था आहे. ही साक्षीभावाच्या अलिकडची अवस्था आहे.

**पू. बाबा** : जाणीव सगळीकडे सारखी आहे. दृश्य जीवनाचा खरा अर्थ - त्याची असारता - या जाणिवेपर्यंत पोचला तर समत्व येईल. हा अभ्यास आहे. सुख-दुःख किंवा निंदा-स्तुती ह्या माकडचेष्टा आहेत असे लो. टिळक म्हणत.

**साधक क** : ज्ञानेश्वरांच्या कितीतरी अभंगांत सम शब्द आला आहे. पंढरपूरचा पांडुरंगही समचरण आहे.

## |४८०| (२९ नोव्हेंबर १९९६)

**पू. बाबा** : दोन दिवसांपूर्वी एक गृहस्थ भेटायला आले होते. गोव्याचे आहेत. त्यांनी विचारले की समत्व म्हणजे नेमके काय ? माझे माझ्या देहाच्या बाबतीत तरी समत्व आहे का ? एखाद्या अपघातात किंवा आजारात डोळा जायच्याऐवजी जर हाताचे किंवा पायाचे एखादे बोट गेले तर मला कमी दुःख होते

पू. बाबा म्हणाले, मला प्रथम सांगा की देहाच्या बाबतीत आपले समत्व आहे का? ''आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन। सुखं वा यदि वा दु:खं स योगी परमो मत:॥६.३२॥'' असे गीतेत म्हटले आहे. मी माझ्याकडे जसा पहातो तसे सर्व जगाकडे पहाता येईल का?

देहाच्या समत्वासंबंधी प्रथम चर्चा झाली. माझ्या बोटापेक्षा माझ्या डोळ्याला मी जास्त महत्त्व देतो हे खरे असले तरी माझा डोळा दुखतो तेव्हां मला होणारे दु:ख आणि बोटाला दुखापत झाली तर होणारे दु:ख यांमधे दु:ख म्हणून कोणताच फरक नाही. सुखदु:ख या मनाच्या अवस्था आहेत. शरीराचे दु:ख, आजार असूनही मनुष्य स्वस्थ असू शकेल. दुसरे असे की चर्चेसाठी आपण जरी माझा डोळा, माझे बोट असे म्हणत असलो तरी प्रत्यक्षात आज माझे माझ्या देहाशी तादात्म्य आहे आणि त्यामुळे देहाचे सुखदु:ख माझ्या सुखदु:खाहून वेगळे नाही आणि या अर्थाने देहाच्या पातळीवर समत्व आहे.

आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति ही अवस्था म्हणजे 'किंबहुना चराचर आपणचि जाहला' ही ज्ञानेश्वर महाराजांनी सांगितलेली किंवा 'सीयराममय सब जग जानि। करउँ प्रनाम जोरि जुगपानी॥' ही तुलसीदासांनी सांगितलेली अवस्था आहे. सर्वत्र मी अथवा परमात्मा भरलेला आहे असे ज्ञान झाले की वेगळे समत्व राहातच नाही. आपण समत्वाचा विचार करतो तेव्हां भेद असूनही त्यामधे समत्वदृष्टी अभिप्रेत आहे. जसा मी भगवंताचा अंश आहे तसा दुसरा समोरचा माणूसही त्याचाच अंश आहे हे सहज लक्षात येत नाही पण जर हे मनात ठसले तर समोरच्या माणसाने केलेला अपमान हीदेखील भगवंताचीच इच्छा आहे असे वाटू लागेल आणि माणूस कायम मनाच्या वरच्या पातळीवर राहील.

ह्या महिन्याच्या सुरुवातीला गोंदवल्याला नामसाधन अभ्यास शिबीर झाले होते त्या संदर्भात पू. बाबा म्हणाले की अजूनही परवाच्या गोंदवल्याच्या मुक्कामाचा त्यांच्यावर परिणाम आहे. त्या छायेत ते आहेत.

**साधक प :** गोंदवल्याला आपण श्रीमहाराजांच्या जवळ आहोत असे वाटते. समाधीसमोर गेल्यावर तेथे नाम भरलेले आहे हे लक्षात येते तर शेजघरामधे शांतीचा अनुभव येतो.

**पू. बाबा :** श्रीमहाराजांनी एकदा चार प्रकारच्या मुक्तींसंबंधी सांगितले होते ते आत्ता आठवले म्हणून त्या संदर्भात सांगतो. आपण गोंदवल्याला असतो तेव्हां श्रीमहाराजांच्या लोकात असतो ही झाली सलोकता. कोठेही गेलो तरी

श्रीमहाराज बरोबर आहेत असे जाणवू लागले की त्याला समीपता म्हणता येईल. 'तुका म्हणे मज आहे हा भरंवसा। विठ्ठल सरिसा चालतसें॥' हा समीपतेचा अनुभव आहे. वेगळे असूनही एक आहोत असे वाटू लागणे ही सरूपता. शिष्याची अंगलट गुरूसारखी होते असे श्रीमहाराज म्हणाले. 'जीवू परमात्मा दोनी। बैसूनिया ऐक्यासनीं।' अद्यापि जीव परमात्माहून वेगळा आहे पण त्याच्या निकट आहे. सायुज्येतत वेगळेपणा नाहीच. कोणत्याही योगाचे हे अंतिम लक्ष्य आहे.

श्रीमहाराज गोंदवल्यात आहेत तसे ते आपल्या घरीही आहेत असे वाटले पाहिजे. वास्तविक त्यांना कोठेही जाणे येणे नाही पण ते आपल्या घरीही आहेत हे जाणवण्यासाठी आपले मन सूक्ष्म झाले पाहिजे. त्यासाठी केवळ आपले कर्तेपण त्यांना देऊन भागणार नाही. तेच कुटुंबप्रमुख (अग्रणी) आहेत, कर्ते आहेत, मी त्यांच्या आश्रयाला आहे असे वाटले पाहिजे. भाऊसाहेबांना हे सहज साधले. स्वत:च्याच घरी दक्षिणा मागतांना 'मी नाही का महाराजांच्या घरात राहात? या त्यांच्या विचारण्यात मोठा अर्थ आहे. विश्व स्पंदनमय आहे. श्रीमहाराजांची स्पंदने आपल्या अंतर्जगतात भरली की आपले काम झाले.

## ।४८१। (६ डिसेंबर १९९६)

**पू. बाबा :** आज तुम्हाला एक विचित्र अनुभव सांगायचा आहे. पॉंडीचेरीच्या मदरनी जगात चांगल्या शक्ती असतात तशा वाईट शक्तीही काम करत असतात असे म्हटले आहे. त्यांना आलेले या बाबतीतले काही अनुभव सत्प्रेमने **Life without Death** या पुस्तकात दिले आहेत.

चार दिवसांपूर्वी संध्याकाळी नेहमीपेक्षा थोडे जास्त पाणी नकळत प्यायलो त्यामुळे रात्री जास्त वेळा उठावे लागले. शांत झोप लागली नाही. नामस्मरण करत पडलो होतो आणि माझ्या आसपास कोणाचा तरी - दुष्ट शक्तीचा म्हणा - वावर आहे असे मला जाणवू लागले. जप चालू होता पण त्यात नेहमीचा गाढपणा - खोली येईना. तुम्हाला काय करायचे असेल ते खुशाल करा असे मी त्या शक्तीला बजावले. नंतर काही वेळाने उठून संडासात गेलो होतो. बाहेर पडतांना दाराशी थोडा उंचवटा आहे त्याला अडखळलो पण प्रत्यक्षात कोणीतरी मधे पाय घालून पाडते आहे असे जाणवले आणि मी खाली पडलो. पडतांना समोरच्या वॉशिंग मशीनवर कपाळ आपटले. पायाला आणि बरगड्यांनाही मार लागला. पडतांना मी 'महाराज' असे ओरडलो. पडूनही कोठे

फ्रॅक्चर झाले नाही. उठलो आणि मार लागलेल्या ठिकाणी आयोडेक्स लावले. पण जगातल्या दुष्ट शक्ती म्हणजे काय याचा अनुभव आला; आपले नाम अद्यापि किती खोल जायला पाहिजे ते समजले. ज्याचे नाम खोल गेले आहे त्याच्या जवळपास फिरकण्याची दुष्ट शक्तींना भीती वाटेल.

तुकाराम महाराजांनी "रात्रिदिन (रात्रंदिन) आम्हां युद्धाचा प्रसंग। अंतर्बाह्य जग आणि मन॥" या अभंगात पुढे "जीवासी आगोज पडती आघात। येता जाता नित्य नित्य वारू॥ तुका म्हणे तुझ्या नामाचिया बळें। अवघीयांचे केलें काळें तोंड॥" असे म्हटले आहे. यामधे दृश्यातून होणारे आघात तर आहेतच, पण श्रीमहाराज म्हणाले की दुष्ट शक्तींकडून होणाऱ्या आघातांनाही तोंड द्यावे लागते आणि एका नामाच्या शक्तीनेच त्यांचा पराभव होतो असे तुकाराम महाराजांनी स्पष्ट करून सांगितले आहे.

नामस्मरण करतांना श्रीमहाराजांच्या अस्तित्वाची जाणीव झाली पाहिजे या मुद्द्याची चर्चा चालू असतांना मधेच पू. बाबा एकदम म्हणाले, "नाना, मी अद्यप ताजा आहे. माझी तारीफ म्हणून सांगत नाही, पण अजून मी नवे वाचतो; ते लक्षात राहाते. नवे नवे चांगले विचार सुचतात. ज्ञानेश्वरी वाचतांना ती लोकांना सांगण्यासाठी काही नवीन विचार स्फुरतात. हे सारे एका नामस्मरणाने घडते. संसारापेक्षा अशा गोष्टीत श्रीमहाराजांची कृपा पाहाता आली पाहिजे."

**।४८२।** (१३ डिसेंबर १९९६)

**पू. बाबा** : १९३७-३८ साल असावे. अश्विन-कार्तिकातली काकड आरती होती. त्यावेळी निरूपणासाठी श्रीमहाराजांचा जो अभंग घेतला होता तो सांगतो.

नामापासीं सर्व सत्ता। नामें होय ब्रह्मवेत्ता॥ १॥
नाम धन्य तिन्ही लोकीं। नाम घेतां होय सुखी॥ २॥
नाम निश्चल घेती जेथें। अवघी तीर्थें येती तेथें॥ ३॥
नामें हरती दोष पाप। नामें होती पुण्यरूप॥ ४॥
दास म्हणे नामीं प्रीति। त्याचे पूर्वज उद्धरती॥ ५॥

त्यावेळी हा अभंग ऐकून श्रीमहाराज म्हणाले, यात काय कठीण आहे? आणि त्यांनी स्वत: जनाबाईचा एक अभंग काढला आणि त्याचा अर्थ सांगितला. अभंग असा :

जिह्वा लागली नामस्मरणीं। रित्या मापें भरी गोणी॥ १॥
नित्य नेमाची लाखोली। गुरु आज्ञेनें मी पाळी॥ २॥
मज भरंवसा नामाचा। गजर नाम्याच्या दासीचा॥ ३॥
विटेवरी ब्रह्म दिसे। जनी त्यासी पाहतसे॥ ४॥

श्रीमहाराजांनी या अभंगाचा जो अर्थ सांगितला तो अप्रतिम आहे. ते म्हणाले, जनाबाईने - नामदेवाची मोलकरीण हो - नामस्मरण केले आणि तिचे पोते म्हणजे जीव - देह नामाने भरून गेला. आपणही नामस्मरण करतो. मग आपले पोते का भरत नाही? श्रीमहाराज म्हणाले, तिचे माप रिकामे होते त्यामुळे त्यामधे नाम भरले जात होते. आपले माप म्हणजे चित्त आधीच वासना विकारांनी भरलेले आहे त्यामुळे घेतलेले नाम त्यावरून वाहून जाते. गोणीत टाकायसाठी मापात काही राहातच नाही. म्हणून हा देह जर नामाने भरावा असे वाटत असेल तर प्रथम माप रिकामे केले पाहिजे. म्हणजे चित्त शुद्ध झाले पाहिजे. त्यासाठी नाम घेतांना काय करावे? (साधक ज ना) तुम्ही सांगा.

**साधक ज :** मी श्रीमहाराज म्हणजे शांती, समाधान असे समजतो. मला ते पाहिजे. त्यासाठी ते आत आहेतच अशी भावना ठेवून नाम घ्यावे. नामातून दुसरे काही पाहिजे अशी इच्छा ठेवू नये. नामाच्या आड जे जे काही दृश्य अथवा प्रपंच येतो ते दूर सारावेच लागेल. काही झाले तरी माझे समाधान राहिले पाहिजे आणि ते आतच आहे.

**साधक प :** तुम्ही म्हणता ते मला बरोबर वाटतं.

**पू. बाबा :** जनाबाईनं किती नाम घेतलं. नित्य नेमाची लाखोली म्हणजे काय हो! आणि तेही गुरुआज्ञा म्हणून घेतलं. त्यातून तिला दुसरं काही साधायचं नव्हतं.

**साधक प :** गुरुआज्ञा म्हणून नाम घेतांना मीपणा राहिला नाही. नाहीतर मी रोज इतकं नाम घेतो असा अहंकार होण्याची शक्यता असते. नाम शक्तिमय आहे. त्यामुळे त्या शक्तीने अहंकार पुष्ट होण्याची भीती असते. म्हणूनच गुरूकडून नाम घ्यायला सांगतात. मग जे नाम घेतलं जातं ते त्यांच्या शक्तीचा परिणाम असतो. मात्र नाम घेतांना ही जाणीव टिकली पाहिजे.

**पू. बाबा :** लाख या संख्येला तसं महत्त्व नाही. दिवसात जेवढा म्हणून रिकामा वेळ मिळेल तेवढा सर्व वेळ शक्य तितकं म्हणजे जास्तीत जास्त नाम घ्यावं असं श्रीमहाराज सांगत. शक्य तितकं म्हणजे कमीत कमी असा अर्थ लोक काढतात. परिणामी अनुग्रह देतांना भटजी रोज एक माळ तरी करावी असं

सांगतात, तेवढंच होतं; तसं उपयोगाचं नाही. आपला व्यवहार सांभाळून रोज तीन साडेतीन तास म्हणजे दहा हजार तरी नाम व्हावं.

एकांतासंबंधी बोलणं निघालं तेव्हां पू. बाबा म्हणाले की एकांत पचला पाहिजे. सुरुवातीला पाहिजे तर दोन तीन जणांनी एकत्र राहून मौन पाळावे आणि आपल्याला कितपत जमते ते पहावे. पण एकांत महत्त्वाचा आहे.

नामाच्या लाखोलीच्या संदर्भात साधक ग यांनी विनोबांच्या आईची गोष्ट सांगितली. त्यांनी देवाला तांदुळांची लाखोली वाहायचा नेम केला होता. त्यासाठी त्या रोज तांदूळ मोजत असत. ते पाहून एक दिवस विनोबांचे वडील त्यांना म्हणाले की रोज असे तांदूळ मोजत बसण्यापेक्षा एक तोळा तांदूळ घेऊन त्यात किती तांदूळ होतात ते पहा आणि त्याची पट करून एकदम एक लाख तांदूळ वाहा म्हणजे झालं! त्या म्हणाल्या की विन्याला विचारून सांगते. त्याप्रमाणे विनोबांना विचारल्यावर ते म्हणाले, आई, तू जे तांदूळ देवाला वाहातेस ते गणिताचं काम नाही. ती भक्ती आहे. एक एक तांदूळ निवडतांना आत चालणारं भगवंताचं स्मरण महत्त्वाचं आहे. म्हणून एक एक तांदूळ मोजूनच घेतला पाहिजे.

जनाबाईच्या अभंगाच्या संदर्भात पू. बाबा पुढे सांगू लागले. ते म्हणाले, नाम हे माझे सर्वस्व आहे असे ही दासी गर्जना करून सांगते आहे. तिला विटेवर पांडुरंग दिसत नाही तर तिच्या हृदयातले परब्रह्मच विटेवर साकार झालेले दिसते. काय अनुभव असेल हो!

नंतर नामाच्या शक्तीसंबंधी बोलणे निघाले. नाम जिवंत आहे हे आपण विसरतो. स्मरण करतांना ही जाणीव जागी ठेवली पाहिजे. हे नाम येते कोठून याचा शोध घेतला तरी काम होईल. मी अशी जी जाणीव आहे त्या जाणिवेशी ते जडलेले आहे ह्याची जाणीव जागी झाली पाहिजे. 'जय जय स्वसंवेद्या आत्मरूपा'. नामस्मरणामुळे विकार कमी होतात आणि संसारातले चिकटणेही सुटते.

**साधक ब** : आमचे माप रिकामे कसे होईल? (चित्तशुद्धी कशी होईल?)

**पू. बाबा** : (आमच्यापैकी एका साधकांना) तुम्ही सांगा.

**साधक** : ते सांगणे अवघड आहे पण श्रीमहाराजांच्या सत्तेची जाणीव कशी जागी असते आणि तिची व्याप्ती कशी वाढते त्याचा अनुभव सांगतो. जेव्हां माझ्यावर मोठे कौटुंबिक संकट एकाएकी कोसळले तेव्हां श्रीमहाराजांमुळेच माझे मन शांत राहिले. आजही काही कौटुंबिक समस्या आहेत पण आता मी

त्यात गुंतलेलो नाही. झाले झाले, नाही नाही अशी वृत्ती बनली आहे. मला वाटते की यासाठी आज्ञापालन महत्त्वाचे आहे. आज मी ज्या पातळीवर आहे त्या वैखरीच्या पातळीवर मला श्रीमहाराजांचे अस्तित्व जाणवते आहे आणि माझी खात्री आहे की जसजशी नामात सूक्ष्मता येईल तसतसे मला श्रीमहाराजांचे सूक्ष्मातले अस्तित्व जाणवू लागेल.

**साधक ब** : संसारात कमी जास्ती घडणारच. संसारातली संकटे जावी असे मला वाटते पण त्याचबरोबर किंवा त्याच्यापेक्षाही जास्त महत्त्वाचे म्हणजे त्यासाठी माझे नाम खर्च पडून त्या संकटांचा परिहार होऊ नये येवढी श्रीमहाराजांनी कृपा करावी.

## **।४८३।** (२० डिसेंबर १९९६)

**पू. बाबा** : १९६१ साल होते. गोंदवल्याला श्रीमहाराजांची प्रवचने दुपारी बॉम्बे हाउसमधे होत असत. एक दिवस काही मंडळी तेथे बसलेली असतांना विषय निघाला की तुकाराम महाराजांच्या अभंगांतला कोणता अभंग श्रीमहाराजांना सर्वात जास्त आवडत असेल? मला विचारल्यावर मी पुढील अभंग सांगितला.

आलें फळ तेव्हां राहिले पिकोन। जरी तें जतन होय देठीं॥ १॥
नामेंचि सिद्धी नामेंचि सिद्धी। व्यभिचार बुद्धि न पवतां॥ २॥
चालिला पंथ तो पाववील ठाया। जरि आड तया नये कांहीं॥ ३॥
तुका म्हणे मध्यें पडती आघात। तेणें होय घात हानि लाभ॥ ४॥

मला हा अभंग आवडायचे कारण साधन करतांना घ्यायची काळजी आणि पाळावयाची पथ्ये यात चांगली सांगितली आहेत.

नंतर आम्ही श्रीमहाराजांना त्यांना तुकाराम महाराजांचा कोणता अभंग आवडतो म्हणून विचारले, तेव्हां ते म्हणाले की त्यांचा प्रत्येक अभंग, नव्हे प्रत्येक शब्द मला आवडतो कारण तो भगवंताकडून आलेला आहे.

## **।४८४।**

श्रीक्षेत्र गोंदवले येथील श्रीमहाराजांचा पुण्यतिथी उत्सव १९९६. पू. बाबांच्या खोलीत झालेल्या चर्चेची टिपणे कु. विदुला गद्रे, श्री. रत्नाभ, नारायण आणि नागराज यांनी ठेवली होती. त्या टिपणांचा उपयोग करून पुढील मजकूर दिला आहे.

## |४८४.१| (२४ डिसेंबर १९९६) दुपारी ३॥ वाजता.

**पू. बाबा :** वर्षानुवर्षे आपण येथे येतो. आपल्या प्रगतीचे काही चिन्ह आहे की नाही? Stagnation होता कामा नये. आपण ध्येयाकडे सरकतो आहो की नाही? ध्येयाचे आकर्षण वाढते आहे का? त्यासाठी negative (नकारात्मक) म्हणजे आजचे जीवन नकोसे झाले पाहिजे, आणि positive (होकारात्मक) म्हणजे भगवंत हवा असे वाटले पाहिजे. त्यावर मनन, चिंतन आणि निदिध्यास झाला पाहिजे. त्यासाठी विवेक आणि वैराग्य जिवंत पाहिजे. होणार ते होयेना का। जाणार ते जायेना का॥ ही समर्थांनी सांगितलेली वृत्ती बनली पाहिजे. यासाठी सत्संगती फार आवश्यक आहे. मिळता प्रचीतीचे संत। एकांतावरी एकांत॥ अंबूराव महाराज अलाहाबादला गुरुदेव रानड्यांकडे गेले होते तेव्हां रात्री दोन दोन वाजेपर्यंत ते दोघे बोलत बसायचे. तुला काय अनुभव आला, मला काय अनुभव आला, आणि गुरूसंबंधी गोष्टी. हा सत्संग. आता आपणही दहा दिवस नामाच्या चिंतनाखेरीज काही करायचं नाही असं ठरवू या.

उत्सवाचा हेतू सांगतांना एकसष्ट साली बॉम्बे हॉलमधे श्रीमहाराज म्हणाले, एकतर मृत्यूची जाणीव पाहिजे आणि ज्याकरता आपण इथं येतो त्याचं स्थान आपल्या जीवनात किती घट्ट झालं आहे याचा शोध घेतला पाहिजे. आणखी एका उत्सवात म्हणाले, उत्सव संपल्यानंतर पुढचा उत्सव केव्हां येतो असं वाटलं पाहिजे. वासनांची, कितीही भोगल्या तरी तृप्ती होत नाही. त्यांच्यामागे धावणे थांबून साधनात अस्वस्थता - तळमळ वाढली पाहिजे.

## |४८४.२| (२५ डिसेंबर १९९६)

**पू. बाबा :** आपल्याला जर अडचणी नाहीत तर कुठं अडलंय? की आपण साधन करतो पण त्याची पथ्ये पाळत नाही? आपले विकार जात नाहीत याचं आपल्याला रडू येतं का? त्यांच्या अस्तित्वाची जाणीव वाढते आहे का? हा अभ्यास आत्ता केला नाही तर केव्हां करणार? आपण फार लवकर शिळे होतो आणि परमात्मा तर प्रतिक्षणी नवीन आहे. त्या नवीनपणात शिरायला मी विरघळला पाहिजे. आपल्या आजच्या जीवनाचा पश्चात्ताप झाला पाहिजे. बाकी कशाहीपेक्षा गुरूचं सान्निध्य महत्त्वाचं.

निराश होऊ नका, पण अन्नदान इत्यादी बाह्यात्कारी गोष्टीतही प्रमाणाबाहेर गुंतू नका. श्रीमहाराज असतील तिथं अन्नदान असतं. पण अन्नदान असतं तिथं

ते असतीलच असं नाही. एखादा उदार धनिकही कीर्तीसाठी अन्नदान करील. साधन करीत राहावं आणि साधनानं मी क्षीण होतो आहे ना इकडं लक्ष द्यावं.

## ।४८४.३। (२६ डिसेंबर १९९६)

**पू. बाबा** : आपण मार्गावर आहोत, मार्ग चालतो आहोत पण मला वाटतं, मार्गावरची पथ्यं आपण सांभाळत नाही. हौदाला गळती फार आहे. आपण सपाटून नाम घेतो का? श्रीमहाराज म्हणाले, आपण नामाला वाहून घ्यावं. वाहून घेतल्यासारखं आपलं वागणं आहे का? मृत्यूची जाणीव आहे का? समर्थांनी म्हटलं आहे "कोण समयो येईल कैसा। याचा न कळे की भरंवसा। जैसे पक्षी दाही दिशा। उडोनि जाती॥" डोळ्यांना झापडे बांधावी. "हरी मुखें म्हणा हरी मुखें म्हणा। पुण्याची गणना कोण करी॥" श्रीमहाराज म्हणाले, नामस्मरणानं पुण्य इतकं वाढतं की त्याची मोजदादच करता येत नाही. ते म्हणाले, "असं कोणतं पाप आहे की जे नामासमोर उभं राहू शकेल?"

"हँस हँस कंत न पाइया। जिन रोया तिन पाया॥" असं कबीरानं म्हटलं आहे. आज नामस्मरण हे कर्म आहे पण त्याची शक्ती आणि वैशिष्ट्य हे आहे की या कर्मानेच कर्माचे कर्मपण नाहीसे होते. ते दिव्य कर्म बनते. नामस्मरण हा श्रीमहाराजांचा weak point आहे. ते केलं तर ते आपल्यासाठी काहीही करतात असा अनेकांचा अनुभव आहे. पू. तात्यासाहेबांच्या बाबतीत ताई (त्यांच्या पत्नी) म्हणाल्या, सज्जनाची संगत होती. जी बाई नवऱ्याच्या बाबतीत असं म्हणते तो नवरा चांगला आणि प्रपंचामधे चांगली संगत होती असं जो नवरा म्हणतो ती बाई चांगली.

उगीच इकडं तिकडं हिंडून काही साधत नाही. श्रीमहाराजांनी सांगितलं आहे "सदा सर्वकाळ माझ्याशी वास। हाच धरावा ध्यास। त्याला न जावें लागे कोठे। घर बसल्या राम भेटे॥" त्यांची आणखी दोन वचने सांगतो.

१) मी, भगवंत साक्षात् पुढे उभा आहे असे समजून नामस्मरण करावे.

२) तुमचे देहावर जितके प्रेम आहे तितके प्रेम ब्रह्मानंदबुवांनी नामावर केले.

श्रीमहाराजांनी त्यांचं अस्तित्व ओळखायचे चार पर्याय सांगितले आहेत. सगुणात, मनाने, रूपाने आणि नामाने. ते म्हणाले, एका माणसाचे डोळे गेले म्हणजे तो माणूस गेला का? तसा मी देहाने नसलो तरी आहे.

दुसऱ्यांचे दोष काढू नयेत. त्यामुळे दोषांच्या चिंतनाचीच सवय लागते.

## |४८४.४| (२७ डिसेंबर १९९६)

**पू. बाबा :** बैलाला जशी चालतांना तो थांबू नये म्हणून टोचणी असते तशी उत्सव ही आपल्याला टोचणी आहे. पुढे जाण्यासाठी सत्संग, सद्विचार, सद्ग्रंथ आणि नाम हे पर्याय श्रीमहाराजांनी सांगितले आहेत. आपण नामावर भर द्यावा. आपलं अंत:करण शुद्ध झालं पाहिजे. त्यासाठी दुसऱ्यांचे दोष पाहाणे सोडून द्यावे. प्रतिक्रिया थांबल्या पाहिजेत. अगदी दुसरा आपला द्वेष करत असला तरी प्रतिक्रिया होता कामा नये. परमार्थात त्याची बाजू नाही; फक्त माझी बाजू. मृत्यूच्या वेळी नाम येईल इतकं नाम घेतलं पाहिजे.

अंत:करण शुद्ध होण्याच्या आड आसक्ती आणि मीपणा येतो. श्रीमहाराज म्हणाले, खूप खावं आणि खूप नाम घ्यावं. मी हसलो, तेव्हां म्हणाले, प्रकृतीचा नियम सांगितला; खूप खाऊन नामस्मरण होणारच नाही. जीभ जिंकणं - खाणं आणि बोलणं - फार अवघड आहे.

## |४८४.५| (२८ डिसेंबर १९९६)

**पू. बाबा :** जनाबाईने एका अभंगात म्हटले आहे "मज भरंवसा नामाचा। गजर नाम्याच्या दासीचा॥" तो नामाचा भरंवसा आपल्याला कसा वाटेल? मला वाटते, ध्येय निश्चित ठरल्याशिवाय ते होणार नाही. त्यासाठी मनाचा **one track** झाला पाहिजे. नामाने मला हे साधेल असा आज आपल्याला भरंवसा वाटत नाही. आज आपला भरंवसा पैशावर आहे. समजा बसचे तिकीट दहा रुपये आहे आणि तेवढे पैसे आपल्याजवळ आहेत, तर आपल्याला प्रवासाचा भरंवसा असतो. तसं माझ्याजवळ नाम आहे तेव्हां आता श्रीमहाराजांकडे जाता येईल असा भरंवसा वाटतो का? तो कसा निर्माण होईल? त्यासाठी नामाला सत्यत्व आलं पाहिजे. वैखरीचं नामच आपल्याला सूक्ष्मात घेऊन जातं. आपण जी भाषा बोलतो तिचं मूळसुद्धा अदृश्यात असतं. जे नाम त्यांनी दिलं ते भाषा जेथून येते तिथपर्यंत गेलं की नामाचा भरंवसा आला. त्यासाठी अखंड नामस्मरण हाच उपाय आहे. त्यानं माझं अंत:करण नामरूप होईल. नर्व्हस् सिस्टिम नामानं स्पंदित होईल. यासाठी मौन आणि एकांत आवश्यक आहेत. रात्री १२ ते ३ हा प्रापंचिकाला एकांत आहे. खरं म्हणजे करणाऱ्याला काही आडकाठी नाही.

नाम आतून येत असतांना ते तिथून येतं आहे, माझं नाही, ही जाणीव उत्पन्न होणं फार महत्त्वाचं आहे. त्याने कर्तेपणा नाहीसा होईल. नाम श्वासाच्या

लयीत घेण्यापेक्षा नाम जर सारखं घेतलं तर आपोआप ती लय जमून जाईल. ते जास्त अंगभूत होईल.

**साधक क :** नामस्मरणाने नामाचे प्रेम आपोआप वाढते का?

**पू. बाबा :** हो. कारण अस्तित्वभावना वाढते आणि मला अस्तित्वाचं प्रेम आहे.

**साधक क :** नामामधे प्रेम वाढविण्याची शक्ती कशी काय आहे?

**पू. बाबा :** अगदी उघड आहे. प्रेम म्हणजे एकजीव होणं आणि नाम हे भगवंताशी एकजीव असल्यामुळे स्वाभाविकपणे प्रेम येणारच. मी नाम का घेतो? चिकाटीनं घेतो का? हा प्रश्न आहे. तसंच नामाची पथ्यं सांभाळतो का?

नामाचं प्रेम आलं की रजोगुणी (कर्ममार्गी) माणसाला हे कर्म भगवंतासाठी करतो आहे असे वाटू लागेल. भावनाप्रधान माणूस नुसतंच गुणगान करील तर ज्ञानप्रधान माणसाला नामाच्या शक्तीचा अनुभव लवकर येईल.

या सगळ्याच्या आड आपला अहंकार येतो. हा अहंकार, हा मी नाहीसा झाला पाहिजे. त्यासाठी त्याला गुरुचरणी बळी दिला पाहिजे. म्हणून आज्ञापालन महत्त्वाचं आहे.

## |४८४.६| (२९ डिसेंबर १९९६)

**पू. बाबा :** "विठ्ठल सोयरा सज्जन सांगाती" हा तुकाराम महाराजांचा अभंग अनुभवाच्या दृष्टीने अतिशय श्रीमंत अभंग आहे. नामाचे चांगल्या अर्थाने obsession (बाधा) झाले पाहिजे. कारण obsession is always compulsive. ते केल्याशिवाय चैन पडत नाही. विठ्ठलाशिवाय राहाणे तुकाराम महाराजांना अशक्य झाले. श्रीमहाराजांच्याशिवाय राहाणे आपल्याला अशक्य झाले पाहिजे. यासाठी काही जरी झाले तरी महाराजांची इच्छा अशी प्रतिक्रिया आली पाहिजे. हा अभ्यास आहे. यामधे स्वीकाराचे बीज आहे. स्वीकार ही आग आहे. ती मनाला त्रास देते. महाराज चुकतील कसे, ही भाऊसाहेबांची प्रतिक्रिया. हे शिकले पाहिजे. शांताश्रम स्वामींसारखे एकसारखे नाम घेतले पाहिजे. जागेपणी नाम घेणे कठीण आहे असे ब्रह्मानंद महाराज म्हणाले. श्रीमहाराजांना विचारलं, पुष्कळ नाम घेतलं तर काय होईल? एकदम म्हणाले, तोंडाने नाम घेतांना त्याची एक मर्यादा आली की नाम डोक्यात चालेल आणि तेथून मग ते हृदयात उतरेल. श्री. वेर्लेकरांना याचा अनुभव आला. Massive

Heart attack आला. डॉक्टरनी नातेवाइकांना बोलवा म्हणून सांगितले, तेही त्यांना समजले, पण आतून ते निर्भय होते. ते म्हणाले, हृदयात नाम चालू होतं. ते चालू असतांना हार्ट बंद पडलं तर बिघडलं कुठं?

अशा प्रकारचा अनुभव येण्यासाठी काय करावं? सुरुवातीला दिवसभरात तुटकपणानं का होईना नाम घेत राहावं. व्यवहारात काय करायचं ते केल्यावर आता काय करायचं ते श्रीमहाराज पाहातील म्हणून त्यांच्यावर सोपवून द्यायला शिकलं पाहिजे. आग्रह आणि तक्रार गेली पाहिजेत. कारण कर्माचं जितकं चिंतन करावं तितकं ते वाढतच जातं. मृत्यूनंतर जे आपल्याबरोबर येणार नाही त्याची चिंता करणं सोडून द्यावं. नाहीतर कर्म परमार्थाच्या आड येतं. महत्त्वाची गोष्ट म्हणजे कर्म तेच राहील, कर्ता सुधारला पाहिजे.

**साधक ग :** आज आमचं नाम कर्माच्या पातळीवर आहे, तेव्हां त्या कर्मानेच कर्ता सुधारेल का?

**पू. बाबा :** हो, आणि तो सुधारतांना कर्माचं कर्मपण क्षीण होऊ लागेल, ही महत्त्वाची गोष्ट आहे. आपण एक वर्षभर, पुढच्या उत्सवापर्यंत हे करून पाहू या ना! अडचण काय आहे? नाहीतर मग इथं येण्याला काय अर्थ आहे? घरी नित्य नैमित्तिक कर्मे करावीच लागतील, पण ती करतांना नाम टिकवायचा प्रयत्न करावा. नाम विसरलं तर काहीतरी चुकलं असं वाटलं पाहिजे. आपण किती करू शकतो ते तरी समजेल. शुभस्य शीघ्रम्। कुणाला ठाऊक उद्या कसा उजाडणार आहे ते!

## |४८४.७| (३० डिसेंबर १९९६)

**पू. बाबा :** आपल्यासारख्यांना श्रीमहाराजांनी जवळ केलं आहे यापेक्षा उदारपण ते आणखी कोणते?

**साधक ब :** होय. आत्तापर्यंत श्रीमहाराज माझ्या अवगुणांवर पांघरूण घालत आलेले आहेत हे आता मला समजायला लागलं आहे.

**पू. बाबा :** खरं आहे. बुद्धीची वाढ खूप झाली. आता थोडा प्रेमाचा स्पर्श होऊ दे. त्यासाठी त्यांच्याजवळ रडावं. धोये गये हम इतने की बस् पाक हो गये। कंठीं राहो नाम हा माझा नवस यामधे प्रार्थनेची सगळी अंगं आहेत. बौद्धिक अंग आहे, आध्यात्मिक अंग आहे, प्रेमाचं अंग आहे. श्रीमहाराज भजनामधे कसं पाहिजे म्हणाले, त्यांची प्रार्थना करतांना थोडं तरी हृदय हललं पाहिजे.

रघुवर तुमको मेरी लाज। सदा सदा मैं शरण तिहारो।
अशी भावना यावयाला काय करावं ? तळमळ निववी रे राम कारुण्यासिंधू असं समर्थांनी म्हटलं आहे.

**साधक प :** माझ्यात काहीतरी कमी आहे आणि तो खड्डा भरून काढायला मी परमार्थ करतो आहे.

**पू. बाबा :** साधक जीव शिवाची प्रार्थना करतो तेव्हां अपूर्ण पूर्णाला शोधत असतो. तेथे तादात्म्य येण्यासाठी भावना पाहिजे. नुसती बुद्धी उपयोगी पडत नाही.

**साधक प :** कमीपणाची तीव्र भावना येते पण ती आवरता येत नाही.

**पू. बाबा :** पण ते दयासिंधू आहेत. त्यांनी सांगितले आहे की रामनामाचा पहिला अनुभव म्हणजे आपले दोष आपल्याला कळतील. आपण असे असूनही श्रीमहाराजांनी किती सांभाळलं हा अनुभव प्रत्येक नाम घेणाऱ्याला येईल. जो नाम घेतो तेथें जाणें मला भाग आहे असं त्यांनी म्हटलं आहे. अस्तित्वभावना आली तर काळजी, भीती कमी होईल.

**साधक ग :** विनोबांनी म्हटलं आहे की अभय हा गुण फक्त नामस्मरणानेच येईल.

**पू. बाबा :** आपल्यासारख्यांना श्रीमहाराजांनी जवळ केलं आहे यापेक्षा आणखी उदारता ती काय ? तारी तारी रे रामराया। गेला गेला जन्म वाया॥ हे आपण शिकलं पाहिजे. आज आपल्याला त्यांच्या अस्तित्वाची भावना आहे, पण दृश्याच्या मानाने ती फार क्षीण आहे. तिचं पोषण झालं पाहिजे. प्रत्येक गोष्ट करतांना महाराज, हे मी आपल्यासाठी करतो आहे अशी त्यांची प्रार्थना करावी. म्हणजे मग आपण जे केलं ते त्यांच्या साक्षीनं केलं ही जाणीव राहाते. त्यामुळे कर्म शुद्ध होऊन समाधान राहातं असा माझा अनुभव आहे.

## |४८४.८| (३१ डिसेंबर १९९६)

**पू. बाबा :** श्रीमहाराजांचं एक वाक्य सांगतो. असा सत्पुरुष नाही की ज्याने मानसपूजा केली नाही. वृत्तीला एक बुद्धीचं आणि दुसरं कल्पनेचं अशी दोन अंगं असतात. काय करावं ते बुद्धी सांगते. पण ते कसं करावं ते कल्पना ठरवते. वृत्ती जर थांबतच नाहीत तर मग त्या भगवंताकडे वळवाव्या. ते मानसपूजेमुळे साधतं. आपल्या कल्पनेतून भगवंत साकार होतो. पण त्यासाठी कल्पना स्थिर, घट्ट झाली पाहिजे. You want to build something by

imagination. मग त्यासाठी लागणारं मटीरिअल आधी गोळा करा. आधी पूजेचं साहित्य गोळा करायची शक्ती वाढवा. सर्व साहित्य गोळा करून नीट मांडून झालं की पूजेची सुरुवात आराध्यमूर्तीच्या पावलांपासून करून मग हळू हळू वर जा आणि मग मूर्तीच्या मुखावरील हास्यावर स्थिर व्हा. हे वाटतं तेवढं सोपं नाही. श्रीमहाराजांची मानसपूजा करत असलात तर त्यासाठी प्रथम आपल्याला आवडणारा श्रीमहाराजांचा फोटो समोर ठेवून त्याच्याकडे थोडा वेळ पाहून डोळे मिटा आणि डोळ्यांसमोर ती मूर्ती आणायचा प्रयत्न करा. एकदम जमणार नाही पण प्रयत्न सोडू नका. याचा मानसपूजेला फार उपयोग होतो. शेवटी विश्वमन जेवढ सूक्ष्म आहे तेवढं माझं मन सूक्ष्म झालं पाहिजे.

**साधक ग :** आज ते तेवढं सूक्ष्म होत नाही. त्या व्यापकतेचं सगुण रूप म्हणून आज आपण श्रीमहाराजांकडे पाहातो.

**पू. बाबा :** नुसतं पाहाणं पुरेसं नाही. आपलं मन त्यांना वाहिलं पाहिजे.

**साधक प :** आज मी आकुंचित असल्यामुळे त्यांच्याकडे पाहाण्याची माझी दृष्टीही आकुंचित आहे. ती व्यापक, विशाल झाली पाहिजे. भगवंताने कल्पनेने निर्माण केलेली जी सृष्टी आज प्रत्यक्षात आहे तिच्याशी माझ्या कल्पनेने निर्माण केलेली सृष्टी एक झाली पाहिजे.

**पू. बाबा :** याचा अर्थ श्रीमहाराजांच्या इच्छेशी माझी इच्छा समरस झाली पाहिजे.

**साधक प :** होय त्यांची जी कल्पनासृष्टी आहे तशीच माझी झाली पाहिजे

**पू. बाबा :** म्हणजे 'ईश्वराचे जे मनोगत। तेचि आपुलें उचित। इच्छेसाठी भगवंत। अंतरू नये की॥'

**साधक प :** ईश्वराच्या मनात जे जे आहे ते ते माझ्या मनात यायला लागलं की अनुभव वेगळा राहातच नाही.

**पू. बाबा :** पण याला माझी इच्छा सोडली पाहिजे.

**साधक प :** आकुंचित किंवा स्वकेंद्रित इच्छा सोडली पाहिजे. मानसपूजेने वाढणाऱ्या शक्तीचे प्रयोग करता कामा नये. नाहीतर साधक पुन्हा खाली घसरेल.

**पू. बाबा :** म्हणजे संकल्पात मोठी शक्ती आहे यात शंका नाही. त्या शक्तीचा श्रीमहाराजांचं सान्निध्य वाढविण्यासाठी उपयोग करावा. सर्व व्यवहारात सारखं त्यांना बरोबर घ्यावं. शेवटी ते माझ्या हृदयात येऊन

स्थिरावले पाहिजेत. ज्ञानेश्वर महाराजांनी म्हटलं आहे "पांडवांसि सदा काळीं। कृष्ण राहिला जवळी। ज्ञानदेव हृदयकमळीं। तैसाचि स्थिरावला॥' काय अनुभव आहे!

**साधक क :** मानसपूजेतदेखील सुरुवातीला उपचारांची विविधता राहील. पण मग हळूहळू जसंजसं प्रेम वाढेल तसतशी उपचारांची उपाधी कमी होऊ लागेल. गीतेत सांगितलं आहे की तो भावाचा भोक्ता आहे. पुढे तर फक्त स्मरण राहील. पूजा अशी राहाणारच नाही. सान्निध्य राहील.

**पू. बाबा :** होय, आणि जे काही पानफूल असेल ते अतिशय प्रेमानं दिलं जाईल. पू. तात्यासाहेब म्हणायचे, वस्तू कोणीही देईल, आपलं आतलं दिलं पाहिजे. त्याला महत्त्व आहे. माझी विद्या, माझी कला, नव्हे मी तुला अर्पण आहे. तुझं भोग्य आहे मी! तथापि लक्षात ठेवा, महाराजांना देतांना जे काही द्यायचं ते स्वच्छ, चांगलं, पवित्र असावं. त्याशिवाय योग्य मानसिक वातावरण तयार होणार नाही. स्नान वगैरे करून पाच दहा मिनिटं नामस्मरण करावं आणि मग आवाहन करून पूजेला सुरुवात करावी. आवाहन करतांना खात्री वाटावी की मी नाम घेतो ना, मग ते येणारच. आणि ते तिथं असतात बरं का! मग शांत मनानं त्यांची पूजा करावी. प्रत्येक गोष्ट त्यांना सांगून करावी. पुढं पुढं त्यांना विचारून करावी म्हणजे संभाषणाला सुरुवात होते. स्मरण आणि संभाषण (Recollection and conversation) हे ब्रदर लॉरेन्सने सान्निध्याचे पहिले दोन टप्पे सांगितले आहेत. हे दोन टप्पे पचनी पडले की मग तिसरा टप्पा अखंड अनुसंधानाचा (Sustained awareness). या पूजेचं विसर्जन करू नये. पूजा झाली आता आपण माझ्या हृदयात विश्रांती घ्या अशी त्यांची प्रार्थना करावी.

**राघवेंद्र स्वामी :** श्रीमहाराज मला म्हणाले, पुजारी म्हणून राहू नये.

**पू. बाबा :** तो व्यवहार होतो सगळा. तिथे ते पावित्र्य राहात नाही. आतमधे परमात्मा जागृत झाल्याखेरीज परमार्थ नाही. त्यासाठी बाहेरून काहीही करा पण आतमधे त्यांच्या चरित्राचं, लीलांचं चिंतन करावं, म्हणजे आपल्या मानसिक जगतात ते घडू लागतं आणि मग तो केवळ कल्पनेचा खेळ न राहाता त्याचा अनुभव येऊ लागतो. विठ्ठल सरिसा चालतसे ही कल्पना नाही. अशा रीतीने सुरुवातीला दृश्याचा उपयोग करूनच सूक्ष्मात प्रवेश करावा लागेल. मानसपूजा करतांना काहीतरी खूण अशी पाहिजे की ते आहेत. नाम घेतांना महाराज माझ्याजवळ आहेत असं का वाटत नाही? काय चुकतं?

**साधक प** : आत्ता आपण श्रीमहाराजांबद्दल बोलतो आहोत. आत्ता ते कुठे आहेत? इथे आहेत असं आपल्याला प्रत्येकाला वाटतं आहे का? की आपण नुसता तर्कच चालवतो? जेव्हां आपण त्यांच्याबद्दल बोलतो तेव्हांसुद्धा आपण त्यांना आणत नाही म्हणजे त्यांच्या सांगण्यावर आपला दृढ विश्वास नाही. आत्ता ते आहेत असं वाटायला लागलं तर मानसपूजेतही त्यांना आणता येईल. तसं आत्ता का वाटत नाही याचं प्रत्येकानं स्वत:शीच उत्तर शोधावं. मला वाटतं की त्यांच्या शब्दावर शब्दश: विश्वास ठेवला पाहिजे. ते म्हणताहेत ना, जिथं नाम आहे तिथं मी आहे; तेवढं तरी खरं वाटलं पाहिजे. हे मी माझ्या मनाला शिकवलं पाहिजे. मला कळत नसेल, पण ते आहेत असं तरी निश्चित वाटलं पाहिजे.

**पू. बाबा** : होय, आज असंच करावं लागेल. त्यांनी दिलेलं नाम घेऊन मनाला सांगायचं की ते आहेतच आहेत. तिथे प्रार्थना उपयोगी पडेल. आज मी समजतो आहे पण तुम्ही दाखवून द्या की तुम्ही कसे आहात ते. मला प्रचीती द्या तुम्ही आहात म्हणून. आज कर्म म्हणून मी नाम घेतो आहे पण त्या कर्मात देखील तुम्ही आहात हे मला समजू द्या. माझी श्रद्धा बळकट करण्यासाठी एवढी भीक घाला! माझ्या नामाला अध्यात्माचा रंग येऊ द्या! त्यांचं चिंतन करायला बसतांना प्रार्थना करूनच बसलं पाहिजे.

**साधक ग** : नाम हे असं कर्म आहे की तिथे आपला कर्तेपणा नाहीसा करायचा आहे

**पू. बाबा** : एक असं तरी पाहिजे, मला दुसरं काही माहीत नाही, मी नुसतं नाम घेणार. ते आपल्याजवळ नाही. आपली काहीतरी कल्पना असते, हे होईल ते होईल आणि ते तसे घडते. म्हणजे नामाची सगळी शक्ती तिकडे जाते. Dimension बदललं पाहिजे ना? त्यासाठी त्यांची प्रार्थना करावी की आता हे तुम्हीच थांबवा. मी अज्ञानी आहे त्यामुळे फसतो आहे. आता तुम्हीच बघा. तुमचं सान्निध्य स्थिर होऊ द्या.

## ।४८४.९। (१ जानेवारी १९९७)

**पू. बाबा** : महत्त्वाचा विषय आहे. स्वीकाराशिवाय भक्ती नाही. स्वीकार ही आग आहे; ती वासना जाळते. स्वीकाराची सुरुवात कशी करावी? स्वीकार ही मानसिक अवस्था आहे. ती कशी येईल? श्री. भाऊसाहेबांनी श्रीमहाराजांचा स्वीकार केला. श्रीमहाराज करतात ते बरोबरच. ते कल्याणाचं असतं ही आणखी पुढची पायरी. पण विनातक्रार स्वीकार करता आला पाहिजे. राम कर्ता

म्हणजे त्याचा स्वीकार. श्रीमहाराज म्हणाले नामाला रामाच्या कर्तृत्वाची जोड द्यावी. इथे जी सत्ता काम करते ती माझ्या घरी माझ्या जीवनात नेली पाहिजे. इथे सगळं बरोबर म्हणतो पण ते या कम्पाउंडच्या बाहेर जातच नाही. काय करावं! पहिली गोष्ट, त्यांना आवडतं तेच करायला शिकलं पाहिजे. व्यवहारात तुम्ही काय करता, कोणते कपडे घालता याचा त्याच्याशी संबंधच नाहीये. पण कोणाचा द्वेष करायचा नाही, दोष काढायचा नाही हे आलं पाहिजे.

**साधक प :** मी ठरवलं की द्वेष करायचा नाही पण मनात आला तर काय करायचं? कसा काढायचा तो?

**साधक ग :** स्वीकार करायचा म्हणजे प्रथम माझं कर्तेपण फोल आहे हे पाहिलं पाहिजे; जोपर्यंत ते पटत नाही तोपर्यंत स्वीकार होणार नाही.

**साधक क :** स्वीकार करायला जी शक्ती लागते ती प्रेमातून येईल. किंवा माझं जे ध्येय आहे त्याला अनुरूप हे हिताचं आहे असं वाटल्याशिवाय स्वीकार होणार नाही.

**साधक ग :** मी अमुक करेनच हा जो अभिमान आहे तो गेलाच पाहिजे.

**पू. बाबा :** जे घडेल ते स्वीकारायचं. मग त्याची अवस्था सुखदु:खापलीकडे जाईल.

**साधक प :** Authority - अधिकार आहे आणि त्यांनी जबाबदारी घेतली आहे याला आधार म्हणता येईल.

**साधक ब :** मी तुझं काम करतो असं त्यांनी सांगितलं तर माझं मन शांत राहील.

**पू. बाबा :** ही शेवटची पायरी झाली. तिथं प्रिय अप्रिय राहाणारच नाही.

**साधक प :** स्वीकारात तितिक्षा आहे.

**पू. बाबा :** सामान्य माणसाला हे शक्य आहे का?

**साधक प :** राजाशी जिचं लग्न झालं तिला खाण्याची काळजी लागते का? 'काय समर्थाची कांता। कोरान्न मागे॥'

**साधक ग :** श्रीमहाराजांनी ज्याला आपला म्हटलं त्याला सामान्य कसे म्हणायचे? श्री. भाऊसाहेबांनी श्रीमहाराजांचा स्वीकार केला तेव्हां त्यांना त्यांच्या सर्वज्ञतेची, शक्तीची जाणीव होती. श्रीमहाराज कसे चुकतील हे त्यांनी घट्ट धरून ठेवले होते.

**पू. बाबा :** होय. त्यांना काय अशक्य आहे म्हणायचे. म्हणजे आज आपली जी मनाची धारणा आहे महाराजांच्याबद्दल, ती बदलायला पाहिजे.

पू. तात्यासाहेब गेले तेव्हां त्यांच्या पत्नी - ताई पाच मिनिटे स्वस्थ बसल्या आणि महाराजांची इच्छा म्हणाल्या. ही बाई काय विद्वान होती? पण तिने स्वीकार केला होता.

**साधक क :** स्वीकाराचं हे फार मोठं उदाहरण आहे. स्वीकारातूनच सहन करण्याची शक्ती येते. एवढा दु:खाचा प्रसंग त्यांनी शांतपणे सहन केला यामागे महाराज करतात ते बरोबरच करतात ही भावना होती.

**साधक प :** त्यांच्यावर पूर्ण विश्वासच पाहिजे. Yes, Father yes, and always yes !

**पू. बाबा :** तिथं संशय नाही. श्रीमहाराज म्हणाले, बाईच्या मांडीवर तिचं मूल निजलेलं आहे. आई माझा गळा दाबेल असं त्याला कधीतरी वाटेल का?

**साधक ग :** हा उपजत स्वीकार झाला. आपल्याला तो आणायचा आहे. तो झाल्याची खूण काय?

**साधक प :** स्वीकार झाला की मनाला दुसरी बाजूच राहाणार नाही. खरं म्हणजे पोचल्याचीच अवस्था आहे ती.

**पू. बाबा :** लहान सहान गोष्टींनी आपण हलतो. मी हे केलं असतं किंवा दुसऱ्या कोणी अमूक करायला नको होतं असं आपल्याला वाटतं. म्हणून मला वाटतं की आपली जी या जगातली आणि विशेषत: आपल्या जीवनातली कल्याणाची कल्पना आहे तीच मुळापासून बदलायला पाहिजे. पैसा मिळणं, लग्न होणं, मुलं होणं, घर बांधणं ह्या सगळ्या गोष्टी म्हणजे जीवन नव्हे. जीवनातल्या त्या आनुषंगिक गोष्टी - by products आहेत. जीवनाचा खरा हेतू समाधान मिळणं हा आहे. आपलं आजचं जीवन अपूर्ण आहे. ते समाधान देऊ शकत नाही. म्हणून शाश्वत समाधान पाहिजे असेल तर स्वीकार करावाच लागेल.

श्री. भाऊसाहेब मॅट्रिकच्या वर्गात शिकत असतांना अक्कलकोटच्या स्वामींकडे गेले होते. तेथे खडीसाखरेवर मुंगळा होता तो दाखवून स्वामींनी हे काय आहे म्हणून विचारले. मुंगळा आहे असे भाऊसाहेबांनी सांगितल्यावर स्वामी म्हणाले, गाढव आहेस, असा चिकटशील. त्यांच्या मनाची ठेवणच निराळी होती. पण तरी मला ते आदर्श वाटतात कारण आपल्यासारखेच ते प्रापंचिक होते. त्यांना शिक्षणाची हौस होती. पण चार मुलांपैकी एकही मॅट्रिकदेखील झाला नाही. पण त्याबद्दल त्यांनी कधी तक्रार केली नाही. स्वीकाराचं बळ फार मोठं आहे.

**साधक ग** : The moment you accept Him, He has already accepted you, (तुम्ही भगवंताचा स्वीकार केलात की त्याने आधीच तुमचा स्वीकार केलेला असतो) असे श्रीअरविंदांनी म्हटले आहे.

**पू. बाबा** : तसं आपण श्रीमहाराजांना मानलेलं आहे का?

आहे तितुके देवाचे। ऐसे वर्तणें निश्चयाचे।
मूळ तुटे उद्वेगाचें। येणें रीती।।

असे समर्थांनी म्हटले आहे. अहो, ते (श्री. भाऊसाहेब) पडले. कमरेच्या हाडाला जरा चीर गेली. पंचाऐंशी वर्षांचं वय. अंथरुणावर पडून होते; तर म्हणाले महाराजांनी हाही अनुभव दिला. पण दुःख नाही. पण ते सगळ्यात मार्मिक आहे; त्यांच्या (श्रीमहाराजांच्या) कानावर घाला, मग आपली जबाबदारी संपली! राजाराम (श्री. दिनकररावांचा मुलगा) श्रीमहाराजांना म्हणाला, तात्यांना बसायला गाडी घ्यायची. श्रीमहाराज म्हणाले, रामाला सांग. पुढे मोटार आली तेव्हां मी श्रीमहाराजांना म्हटलं, असं मागितलं तर प्रत्येकाला राम देतो का? त्याची आज्ञा पाळली तर देतो, म्हणाले. साधक ग म्हणतात ते बरोबर आहे. त्यांचा स्वीकार मी केला पाहिजे. महाराज खऱ्या अर्थानं मायबाप वाटले पाहिजेत.

श्रीमहाराजांना एकदा विचारलं, अन्नाची वासना कशी जिंकावी? म्हणाले, ज्यांनी भिक्षा मागितली आहे त्याला विचारावं. आज काय मिळणार आहे कुठं माहीत असतं त्याला? घरात जेवतानासुद्धा ती वृत्ती ठेवावी? आहे आहे, नाही नाही. पण तसं राहात नाही. हे विचित्र कोडं आहे बघा. पण त्याची काहीतरी किल्ली आहे. ती मिळाली की सगळं मोकळं होईल.

फलाची आसक्ती आणि कर्तृत्वमद ही दोन बंधनं कर्म निर्माण करतं असं १८ व्या अध्यायात ज्ञानेश्वर महाराजांनी सांगितलं आहे. श्रीमहाराजांनी दिलेलं उदाहरण मी शिबिरात तुम्हाला सांगितलं होतं. कालाच्या प्रवाहात आपण एखाद्या काडीसारखे आहोत. काडी आडवी झाली तरी प्रवाह तिला खेचून नेतोच. त्यापेक्षा सरळ पडावे म्हणजे वाहातांना कष्ट नाहीत. आधीच, मी शरण आहे म्हणावं. जीवनाचे स्वाभाविक गुणधर्म ओळखले पाहिजेत. माझ्या मनात आलं की श्रीमहाराजांनी दिलेल्या नामाचा मी स्वीकार केला आहे का? स्वीकार म्हणजे ते माझ्या कल्याणाचं आहे, शेवटपर्यंत पोचवणारं आहे ही भावना स्थिर झाली आहे का? पूर्णपणे स्वीकार म्हणजे दुसरं काही सत्य नाही असं वाटलं पाहिजे. मग पुन्हा मनात आलं, भाऊसाहेब म्हणाले, त्यांना (श्रीमहाराजांना)

आवडतं म्हणून नाम घ्यायचं; तसा तरी स्वीकार व्हावा. नामाचा स्वीकार सोपा नाही. तिथं शरणागतीचा उगम आहे.

**|४८५|** (१७ जानेवारी १९९७) मालाड

**पू. बाबा :** आपल्या येथे श्री. शंकरराव टेमकर येतात त्यांना उत्तरेकडचे एक सत्पुरुष भेटले. दादर मार्केटमधल्या एका भाजीवाल्याकडे ते येतात. सुमारे चाळीस पंचेचाळीस वर्षांचे आहेत. तिकडे उत्तरेत ते पुष्कळ अन्नदान करतात. त्यांच्या गुरूंनी त्यांना प्रथम योग शिकवला आणि आता हे शिक्षण पुरे म्हणून सांगून नंतर त्रयोदशाक्षरी मंत्र देऊन आता याचा जप कर असे सांगितले. ह्या मार्गातले आणखी कोणी अनुभवी सत्पुरुष आहेत का असे त्यांनी त्यांच्या गुरूंना विचारले तेव्हां त्यांनी ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराजांचे नांव सांगितले.

जप चालू केल्यानंतर ह्या सत्पुरुषांना काही अडचणी आल्या. शरीरातील उष्णता खूप वाढली आणि काय करावे ते कळेना. एक दिवस ते ध्यानाला बसलेले असताना श्रीमहाराज ध्यानामधे आले आणि त्यांनी रोज सकाळी उठल्याबरोबर गंगेचे पाणी पी म्हणजे उष्णता कमी होईल असे त्यांना सांगितले आणि तसे करू लागल्यानंतर उष्णतेचा त्रास नाहीसा झाला.

पू. बाबा म्हणाले की गोंदवल्याला कसे सहज आणि पुष्कळ नाम झाले. अद्यापि त्याची छाया आहे पण तशी तंद्री नाही. असे का होते? मला वाटते, मुंबईचे आपल्या मनावर इतके दडपण - इम्पेक्ट आहे की नाम नकळत मंदावते. नवाथे नांवाचे एक ज्योतिषी होते; ते म्हणत की मुंबईची तूळ रास आहे. येथे प्रत्येकाच्या मनात सतत पैशाचे विचार असतात. बाहेरच्या ह्या वातावरणाचा आपल्यावर आघात होतो. त्यामुळे नाम घेण्याची इच्छा कमी होते. नामाची intensity - तीव्रता राहू द्या, पण सातत्यही राहात नाही. ते कसे टिकवायचे? खरे म्हणजे आपली प्रपंच, पैसा, मुलेबाळे यातली आसक्ती कमी झालेली नाही. ते आड येते.

**साधक प :** मी पाहिले आहे की माझे आईवडील, मुले, पैसा, मी करतो ते काम यातले काहीही शेवटी माझ्याबरोबर येणारे नाही पण माझा स्वभाव माझ्याबरोबर येणार आहे. म्हणून माझा हा स्वभाव, माझ्या सवयी मी बदलल्या पाहिजेत. प्रत्येक गोष्ट करतांना नामस्मरण करायचा अभ्यास केला पाहिजे.

**पू. बाबा :** तुम्ही म्हणता ते खरे आहे. ममत्व साधनाच्या आड येते.

**साधक ब :** अंगणातल्या फरशीवर झाडांची वाळलेली पाने पडतात आणि वाऱ्याची झुळूक आली की उडून जातात. फरशीवर त्यांचा मागमूसही राहात नाही. तसे आमचे वैखरीचे नाम आहे. मनामधे प्रपंचाच्या विचाराची झुळूक आली की ते गायब होते.

**साधक ग :** नाम शक्तिरूप आहे. आमची प्रपंचाची आसक्ती गेलेली नसल्यामुळे नामाने येणारी शक्ती नकळत आमच्या वासना पूर्ण करण्याकडे खर्च होते.

**साधक ब :** नाम उपाधिरहित आहे. त्यामुळे आपण उपाधिरहित झाल्याखेरीज नाम स्थिर होणार नाही.

**साधक ग :** विचारांनी भाव निर्माण होऊ शकतो का ?

**साधक प :** निश्चितच. आपण विचारपूर्वक आपले वागणे, सवयी बदलल्या तर भाव निर्माण होईल. प्राण्यांच्या बाबतीत देखील त्यांचा मालक बदलला आणि तो प्रेमाने वागू लागला तर ते पहिल्या मालकाला विसरतात तसे आपल्याला सवयी बदलून अभ्यास आणि वैराग्य यांच्या सहाय्याने प्रपंचातले प्रेम नामाकडे वळविता येईल.

**पू. बाबा :** गोंदवल्यात होतो तेव्हां आता चार दिवसांनी परत जायचे आहे हे जसे मनात होते तसे या जगातून केव्हांही, कोणत्याही क्षणी जावे लागणार आहे ही आठवण सतत राहिली तर साधन होईल. मग भाऊसाहेब म्हणायचे तसे इथून उठून महाराजांकडे जायचे आहे असे वाटेल. डोक्यातले नाम हृदयात उतरले की ह्या जन्माचे काम झाले असे श्रीमहाराज म्हणत. आता दिवस थोडे राहिले आहेत हे लक्षात घेऊन लगबग केली पाहिजे.

## **|४८६|** (२४ जानेवारी १९९७)

**पू. बाबा :** Mother's Agenda मधील शरणागतीसंबंधीचा हा उतारा पहा :

October 19, 1955

The three images of total self giving to the Divine

1) To prostate oneself at His feet in a surrender of all pride with perfect HUMILITY.

2) To unfold one's being before Him, to open entirely one's body from head to toe, as one opens a book, spreading open

one's centres so as to make all their movements visible in a total SINCERITY that allows nothing to remain hidden.

3) To nestle in HIS arms, to melt in HIM in a tender and absolute CONFIDENCE.

(ऑक्टोबर १९, १९५५)

ईश्वराला आत्मार्पण करण्याची तीन रूपे.

१) सर्व अभिमान ईश्वरार्पण करून पूर्ण लीनतेने त्याच्या पायांवर लोटांगण घेणे.

२) आपले अंतःकरण ईश्वरापुढे मोकळे करून, पायाच्या अंगठ्यापासून मस्तकापर्यंत आपला देह एखादे पुस्तक उघडल्याप्रमाणे त्याच्यासमोर उघडून आणि देहातील सर्व केंद्रातील हालचाली त्याला दिसतील, काहीही लपून राहाणार नाही अशा प्रकारे अतिशय प्रामाणिकपणे त्याच्यासमोर जाणे.

३) अत्यंत लडिवाळपणाने आणि संपूर्ण खात्रीने ईश्वराच्या मिठीत जाऊन त्याच्यामधे विरघळून जाणे.)

These movements may be accompanied by three formulas, or any one of them, depending upon the case.

1) May your will be done and not mine.

2) As you will, as you will.

3) I am yours for eternity.

Generelly when these movements are made in the right way, they are as followed by perfect identification, a dissolution of ego, bringing about the sublime felicity.

(या हालचालींबरोबर व्यक्तिनुसार तीन किंवा तीनापैकी एक सूत्र असते.

१) माझ्या इच्छेनुसार नव्हे, तुझ्या इच्छेनुसार होवो.

२) तू करशील तसे, तू करशील तसे.

३) अनंतकाळ मी तुझाच आहे.

सामान्यतः ह्या गोष्टी जेव्हां योग्य मार्गाने घडतात तेव्हां अहंकार विरघळून ईश्वराशी संपूर्ण ऐक्य घडते आणि (साधकाला) परमानंदाची प्राप्ती होते.)

नंतर काही जुन्या गोष्टींची उजळणी झाली. एकदा श्री. रामकृष्णपंत दामले यांनी श्रीमहाराजांना शरण जायचे म्हणजे काय असे विचारले तेव्हां श्रीमहाराज

म्हणाले :शरण जावे म्हणजे सर्व काही आपल्या गुरूंवर सोपवावे. ती पायवाट आहे.

## |४८७| (३१ जानेवारी १९९७)

**पू. बाबा** : योगी श्रीअरविंदांनी मदरना 'ॐ नमो भगवते' येवढाच मंत्र दिला होता. या मंत्राचा मदरनी उठता-बसता, खाता-पिता, येता-जाता अखंड जप केला आणि त्यामुळे त्यांचा देह नामाने भरून गेला. योगी श्रीअरविंद आणि मदर यांचा matter मधे म्हणजे स्थूलात बदल घडवून त्यायोगे जगाचा उद्धार करण्याचा प्रयत्न होता. त्यासाठी तीनशे वर्षेदेखील जगण्याची - वाट पहाण्याची त्यांची तयारी होती. त्यांनी जसा अखंड नामस्मरणाचा अभ्यास केला तसा अभ्यास आपल्या हातून का होत नाही? नाम शक्तिरूप आहे. नामाने शक्ती वाढते पण दृश्याच्या आघाताने आपण लगेच खाली घसरतो. उदाहरणच सांगतो. आमचे वडील फार रागीट होती. मी लहान होतो तेव्हा एवढ्या तेवढ्या कारणाने खूप मारीत असत. एक दिवस नाम घेतांना त्याची आठवण होऊन मन अस्वस्थ झाले आणि नामस्मरणाची पहिली पातळी पुन्हा यावयाला खूप त्रास झाला. मदरनी म्हटल्याप्रमाणे नामस्मरणातील स्मरण हे गतकालातल्या घटनांच्या स्मृतीप्रमाणे नसून आपले जे मूळ स्वरूप आहे त्याचे स्मरण आहे. समर्थांनी म्हटल्याप्रमाणे ते जाणिवेचे स्मरण आहे.

**साधक क** : वेदांच्याही आधी नाम कसे आहे ते एकनाथ महाराजांनी भागवतात फार छान सांगितले आहे. ते म्हणतात की वेद हे शब्दमय आहेत आणि ॐ कार हा पहिला शब्द आहे म्हणून वेदांच्याही आधी नाम म्हणजे ॐ कार आहे. केवळ ॐ किंवा हरि:ॐ ने मंत्रांची सुरुवात होते या अर्थाने नव्हे.

नामस्मरणामधे देहाचे विस्मरण आहे. ज्या प्रमाणात देहाचे विस्मरण होईल, आसक्ती कमी होईल त्या प्रमाणात नामस्मरण साधले असे म्हणता येईल. देहाच्या विस्मरणात शांतीचा समाधानाचा अनुभव आहे.

## |४८८| (८ फेब्रुवारी १९९७)

संध्याकाळी साडेचार वाजता मालाडला पू. बाबांकडे गेलो. आज त्यांना ८९ वे वर्ष लागले. आम्ही गेलो तेव्हां तेथे बरेच लोक आलेले होते आणि पू. बाबा प्रत्येकाची आस्थेने विचारपूस करत होते. थोड्या वेळाने त्यांनी आम्हाला पुढे बोलावले आणि गर्दी होती तरीही आमच्याशी सुमारे दहा मिनिटे बोलले. त्यांनी

एक जुनी आठवण सांगितली. त्यांचा ५० वा वाढदिवस होता तेव्हां श्रीमहाराज म्हणाले की माणसाचे आयुष्य १०० वर्षांचे धरले तर तुमचे अर्धे आयुष्य आता सरले. याचाच अर्थ आता प्रत्येक वाढदिवसाला मृत्यूच्या जास्त जवळ जाणार. असे असूनही मृत्यूचे स्मरण का राहात नाही?

श्रीमहाराजांनीच त्याची दोन कारणे सांगितली. त्यातले पहिले General Psychology ला धरून आहे पण दुसरे जे कारण त्यांनी सांगितले ते मात्र कोणत्याही पुस्तकात वाचायला मिळाले नाही. पहिले कारण असे की माणसाला केव्हांही आणि कोठेही मृत्यू येऊ शकतो. याचाच अर्थ तो सर्व काळ, सर्व ठिकाणी त्याच्याबरोबर वावरत असतो. त्यामुळे त्याचे स्मरण राहत नाही.

दुसरे आणि जास्त महत्त्वाचे कारण असे की मृत्यू होतो तो देहाचा. खरा मी जो आहे तो अजन्मा आहे. जो अजन्मा आहे त्याच्या बाबतीत मृत्यू संभवत नाही. त्यामुळे जे त्याच्या बाबतीत कधी घडत नाही त्याचे त्याला स्मरण कसे असणार? आपण जे नामस्मरण करतो ते त्या अजन्माचे स्मरण आहे. हा नामस्मरणाचा खरा अर्थ आहे. म्हणून खरे नामस्मरण देहबुद्धी गेल्याखेरीज होणार नाही. आज आपल्याला पैशाचा आधार वाटतो तो खरा नाही. या जगातून जातांना आपल्याबरोबर काय येणार आहे याचा माणसाने विवेक करावा म्हणजे हळूहळू त्याची प्रपंचातली आसक्ती कमी होईल. या दृष्टीने अलेक्झांडरची गोष्ट फार अर्थपूर्ण वाटते. मरण्यापूर्वी त्याने सांगितले की मृत्यूनंतर मला स्मशानात न्याल तेव्हां तिरडीवर माझे हात मोकळे ठेवा म्हणजे जगाला कळेल की येवढे साम्राज्य मिळवूनही बरोबर काहीही न घेता रिकाम्या हाताने जातो आहे. हे सांगून पू. बाबा म्हणाले की मृत्यूनंतर नामच आपल्याबरोबर येईल. तेव्हां जन्माला आल्यासारखे जातांना मी नामाच्या संगतीत जाणार आहे अशी खात्री वाटेल इतके नाम घ्या.

## |४८९| (१४ फेब्रुवारी १९९७)

**पू. बाबा :** मंगळवारी स्वामी नारायण पंथातले एक गृहस्थ मला भेटायला आले होते. अविवाहित आहेत. अलाहाबाद युनिव्हर्सिटीचे एम. ए. आहेत. मराठी चांगले समजते आणि ज्ञानेश्वरी वाचली आहे असे ते म्हणाले. स्वामी नारायण हे विशिष्टाद्वैती होते.

ते गृहस्थ म्हणाले, ज्ञानेश्वर महाराज इंद्रिय निग्रहावर भर देतात. प्रश्न असा आहे की इंद्रियांशिवाय जगणे आपल्याला शक्य आहे का?

**साधक प** : गाढ झोपेमधे आपली इंद्रिये काही काम करीत नाहीत.

**पू. बाबा** : हे बरोबर आहे. पण जागेपणी हे शक्य आहे का?

चर्चेमधे मुद्दा आला की इंद्रिये साधनाच्या आड येत नाहीतच. इंद्रियांच्या मागे असलेले मन इंद्रियांच्या द्वारा सुखदु:ख भोगते. विषयांमधील आसक्ती, ममत्व साधनाच्या आड येते. मन हे देखील एक इंद्रिय आहे हे तत्त्वदृष्ट्या ठीक आहे पण आज मी त्याच्या आहारी गेलो आहे; इतका की मनानेच मी चा ताबा घेतलेला आहे. आणि प्रत्येक माणसाच्या मनाने त्याचे स्वतंत्र जग निर्माण केले आहे. माझ्या इच्छेनुसार मी जसे माझे डोळे बंद करू शकतो तसे माझे मन जर मी पाहिजे तेव्हां स्वस्थ ठेवू शकलो तर इतर इंद्रियांसारखेच ते केवळ एक इंद्रिय म्हणून राहील. जगायचे म्हणजे कर्म करावे लागणारच. कर्म जड आहे. ते बाधक नसून आपले कर्तेपण बाधक होते ते आपल्या गुरूंना दिले पाहिजे.

**पू. बाबा** : तुकाराम महाराजांचा या बाबतीत एक फार छान अभंग आहे. तुम्हाला माहीत असेल, पण पुन्हा सांगतो.

जिंकावा संसार। येणें नांवे तरी शूर॥ १ ॥
येर काय ती बापुडीं। कीर अहंकाराची घोडी॥ २ ॥
पण ऐशा नांवें। देव धरिजेतो भावें॥ ३ ॥
तुका म्हणे ज्यावें। सत्कीर्तिनें बरवें॥ ४ ॥

परमार्थासाठी वनात जायला नको. संसारात राहूनच तो साधला पाहिजे. त्यात शूरपणा आहे. देहदु:ख येणारच. पण मन नामात रंगू लागले की माणसाला देहाचा विसर पडतो. शरीरदु:ख असते पण ते मनाला अस्वस्थ करीत नाही असा साधकांचा अनुभव आहे. उत्तम उदाहरण म्हणजे गुरुदेव रानडे. स्थितप्रज्ञाची लक्षणे सांगतांना गीतेने इंद्रिये त्यांचे भोग घेतात पण स्थितप्रज्ञाच्या ती ताब्यात असतात असे म्हटले आहे. "तस्माद्यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः। इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता॥ २.६८॥"

साधकाला अभ्यास आणि वैराग्य दोन्ही हवे आणि त्याचबरोबर अखंड सावधानता हवी.

## ।४९०। (२१ फेब्रुवारी १९९७)

**पू. बाबा** : दहा बारा दिवसांपूर्वी गुरुदेव रानड्यांकडे जाणारे एक गृहस्थ बऱ्याच दिवसांनी येथे आले होते. त्यांनी एका जुन्या गोष्टीची आठवण करून दिली. ती अतिशय महत्त्वाची आहे म्हणून सांगतो.

सांगलीचे राजेसाहेब राधास्वामी पंथाचे अनुयायी होते. गुरुदेव रानडे त्यांच्याकडे जात असत. तेथे त्यांनी तत्त्वज्ञान मंडळाची स्थापना केली होती. पू. बाबा म्हणाले, राधास्वामी पंथाचा कृष्णाशी काही संबंध नाही. परमेश्वर या अर्थाने ते हा शब्द वापरतात. (पंथाचे प्रवर्तक शिवदयाल सिंह यांच्या पत्नीचे नांव राधा होते. त्यामुळे गुरु आणि गुरुपत्नीचे एकत्र स्मरण करण्यासाठी हा शब्द आला असावा असे फार्कर यांनी म्हटले आहे.) मला भेटायला आलेल्या गृहस्थांनी सांगितले की सांगलीच्या राजेसाहेबांकडे या पंथाचे एक गुरु आलेले होते. त्यांनी नामाचे महत्त्व सांगताना सांगितले की माणसाचा अहम् त्याच्या नांवाशी जोडलेला आहे. नामस्मरण करणे म्हणजे तो अहम् विसरणे होय. हा अभ्यास आहे. मनुष्य नाम घेऊ लागला की प्रथम त्याला त्याचे दोष समजू लागतात आणि मग ह्या स्थितीत तो त्या दोषांकडे तिऱ्हाईतपणे पाहू लागतो. ते म्हणाले, इसके बाद वो एक छलांग लेता है और उसके बाद साक्षित्व आ जाता है।

श्रीमहाराजांना हे सांगितले तेव्हां ते म्हणाले की हे बरोबर आहे पण हे देहबुद्धीतले द्रष्टेपण आहे. हा साक्षीभाव नव्हे हे खरे, पण साक्षीभाव येण्याआधी त्याला जसे स्वतःचे दोष दिसू लागतात तसे दुसऱ्यांचे दोष दिसणे बंद होऊ लागते; कारण दुसरे सर्वजण भगवंताची रूपेच आहेत असे त्याला वाटू लागते. यानंतर मात्र तो साक्षी बनतो. देहबुद्धीचे द्रष्टेपण स्वतःपुरते असते तर साक्षीभाव सर्व जगासंबंधी होतो. पू. बाबा म्हणाले, आज आपल्या दृष्टीने पहिली पायरी म्हणजे स्वतःचे दोष कळणे हे घडले पाहिजे.

मागच्या शुक्रवारचाच इंद्रियांचा विषय पुन्हा निघाला. पू. बाबा म्हणाले, मन हे देखील इंद्रियच आहे. ते इतर इंद्रियांप्रमाणे ताब्यात आणले पाहिजे. स्वस्थ बसलो तर आपल्या लक्षात येते की आतल्या आत आपले chattering (पुटपुटणे) चाललेले असते. हा मनाचा स्वभाव आहे, कारण मेंदूतून एकसारखे काही संवेग किंवा sparking चालू असते. नामस्मरणाने एक विशिष्ट आकृतिबंध तयार करता येतो व chattering देखील मग नामाचेच चालते. हे अभ्यासाने शक्य होते. स्वप्नात म्हणजे subconscious मधे नाम जाणे ही पुढची पायरी आहे, unconsious मधील नामाचा आत्ताच विचार करायला नको.

मन ताब्यात असते म्हणजे काय याची दोन उदाहरणे पूर्वी दिलेली होती; पुन्हा सांगतो. १) गुरुदेव रानडे म्हणाले की मी साधनाला बसलो की माझे मन बाजूला ठेवतो. व्यवहार करायचा झाला की ते आत येते. तेवढ्यापुरता व्यवहार

झाला की ते पुन्हा बाजूला ठेवतो. २) लोकमान्य टिळक वामकुक्षी करत तेव्हां त्यांची पावले हलवीत असत. असे का करता म्हणून त्यांना विचारले तेव्हां ते म्हणाले मी माझे मन निर्विचार करतो. कृष्णमूर्तीही म्हणाले होते की ते फिरायला जात तेव्हां त्यांचे मन निर्विचार असे.

मन बाजूला ठेवता आले तर त्याची शक्ती वाया न जाता उलट वाढू लागते आणि त्याची साधन वाढण्यास मदत होते.

## ।४९१। (२८ फेब्रुवारी १९९७)

**पू. बाबा** : आपण अद्यापि कर्मात गुंतलेले आहोत. आपले नामस्मरण हेही एक कर्मच झालेले आहे. कर्म म्हटले की त्या कर्माचा हेतू आला. हा हेतू अगदी परमात्मदर्शन व्हावे असा असला तरी त्याला कर्माचे सगळे नियम लागतात. श्रीमहाराजांनी देहाचे कर्म आणि मनाचे कर्म असे दोन भाग केले. ते म्हणाले, वैखरीने नाम घेणे हे देहाचे कर्म होय. हे चांगले कर्म केव्हां ठरेल; तर देह थकेल, घशाला शोष पडेल, पुढे नाम घेणे शक्य नाही अशी स्थिती होईल. अशी देहाची स्थिती वारंवार होऊ लागली की नाम घेता घेता मन त्यात आपोआप रमू लागेल. मनाचे हे रमणे महत्त्वाचे आहे.

**साधक क** : वैखरीने नाम घेतांना आपोआप प्राणायाम होऊ लागतो आणि मनाची खळबळ शांत होते. अशा प्रकारे वैखरीने नाम घेतांना ते आपल्याच कानांनी ऐकत राहिले तर मन लवकर एकाग्र होते.

**पू. बाबा** : नामात मन रमू लागले की नामस्मरण हे मनाचे कर्म होते. मनात नाम होऊ लागते. तथापि मी नाम घेतो हा अहंकार असतो. मनाने नाम घेण्याची हद्द झाली की लक्षात येते की मी नाम घेतो हे म्हणणे खोटे आहे. माझे गुरूच ते माझ्याकडून करवून घेत आहेत हा भाव आला की अहंकार क्षीण होतो आणि तेथे शरणागतीची सुरुवात होते.

याच्या पुढची पायरी म्हणजे नाम घेतांना देहाचा विसर पडतो आणि त्यानंतर नाम तीन्ही अवस्थांना व्यापून राहाते. खरोखर, श्रीमहाराजांच्याइतके नामावर कोणीच प्रेम केले नाही. अनेक संतांची नामासंबंधी वचने आहेत पण श्रीमहाराजांसारखे आश्वासन कोणी दिलेले नाही. उदाहरणार्थ –

१) "अखंड नामस्मरण आणि भगवंताचे अनुसंधान याशिवाय मला काहीही प्रिय नाही. नामाची ज्योत जळती ठेवा. तुमच्या स्वाधीन होऊन मी राहीन, नव्हे तुमचा मी ऋणी होईन."

२) ''रामाला साक्ष ठेवून सांगतो की माझ्याशी आपलेपण ठेवा. मला आवडतें म्हणून नाम घ्या. तुमच्या पापाचा भार मी घेतला अशी खात्री बाळगा. तें पाप पुन: करूं नका, तुम्हाला रामाच्या चरणांशी नेण्याची हमी माझ्याकडे लागली.''

## |४९२| (७ मार्च १९९७)

सुरुवातीला पू. बाबांनी आमच्यापैकी एका साधकांजवळ श्री. भाऊसाहेब परांजपे यांच्या प्रकृतीची चौकशी केली. आज महाशिवरात्र. श्री. परांजपे यांचा ८७ वा वाढदिवस. पू. बाबांना हे माहीत नसतानाही त्यांनी आजच त्यांच्या प्रकृतीची चौकशी केली याचा अचंबा वाटला. सहज म्हणून पू. बाबांनी एक जुनी आठवण सांगितली. ते म्हणाले, मी एल्फिन्स्टन कॉलेजच्या होस्टेलमधे राहात होतो तेव्हां भाऊसाहेबही तेथे राहात होते. त्यावेळी ते Royal Institute मधे B.sc. करत होते. होस्टेलमधे त्यांचे ओक आणि कर्णिक नांवाचे दोन मित्र होते. पुढे भाऊसाहेब एस्. पी. कॉलेजात प्रोफेसर झाले, ओक रुइया कॉलेजचे प्रिन्सिपल झाले. कर्णिकांच्याबद्दल मला माहीत नाही. त्या काळातही भाऊसाहेबांचा स्वभाव अबोल आणि शांत होता. गोंदवल्यास राहात होते तेव्हांही ते एकटेच चिंतनात असत.

दोन दिवसांपूर्वी एक गृहस्थ मला भेटायला आले होते. सायन्समधे डॉक्टरेट केली आहे. ते गृहस्थ म्हणाले की जगात सगळीकडे द्वंद्वे आहेत. अशा स्थितीत शांतता कोठून येणार?

**साधक प** : निसर्गात जी द्वंद्वे आहेत त्यात समतोल आहे. तो प्रकृतीचा स्वभाव आहे. माणूस आपल्या मनाने त्यात द्वंद्व - विरोध निर्माण करतो.

**साधक ग** : जगामधे सामान्यत: Forces are opposite and equal. त्यामुळे समतोल राहातो. दुसरे असे की शीत आणि उष्ण यात गुणात्मक भेद (difference of kind) नसून अंशात्मक भेद (difference of degree) आहे. शीत आणि उष्ण एकाच मोजपट्टीवर आहेत. त्यापैकी काही भाग आपल्याला सुखाचा वाटतो आणि काही भाग दु:खाचा वाटतो.

**पू. बाबा** : आत्ता आठवले! श्रीमहाराजांना एकदा म्हणालो की हा राग गेला पाहिजे. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, असे कां म्हणता? हा देह आणि मन भगवंताचा प्रसाद आहे हे लक्षात आले की क्रोधाचे करुणेत रूपांतर होईल, कामवासनेचे ब्रह्मचर्यात रूपांतर होईल आणि लोभाचे निरासक्तीत रूपांतर होईल. म्हणजे येथे वास्तविक द्वंद्व नाहीच.

पू. बाबा पुढे म्हणाले, समर्थांनी म्हटल्याप्रमाणे वाटले पाहिजे की आत्तापर्यंतचे माझे आयुष्य विषयांच्या मागे लागून मी वाया घालवले. शाश्वत आनंद सोडून अशाश्वताच्या मागे धावलो. आता हे सगळे सोडून मी भगवंताला घट्ट धरीन. हे सोडणे मनाचे आहे. पण त्यासाठी झोकून देण्याचे धाडस लागते; ते कमी पडते. तथापि जर हे आत्ता केले नाही तर केव्हां करणार? एका नामाखेरीज बाकीचे सारे व्यर्थ वाटले पाहिजे.

**साधक प :** नामस्मरणातून मला भगवंताचे दर्शन व्हावे, समाधान मिळावे वगैरे आपल्याच मनाच्या कल्पना असतात. ते आपल्याच मनाचे प्रक्षेपण (projection) असते. खरे म्हणजे प्रत्येक नाम पूर्ण आहे, ते मी घेतो. त्याखेरीज आणखी काही करायचे किंवा व्हावयाचे आहे असे वाटताच कामा नये. असे झाले की नाम हे कर्म राहाणार नाही. जोपर्यंत काही तरी हेतू ठरवून मी नाम घेतो तोपर्यंत ते कर्मच होईल आणि साहजिकच कर्म अपूर्ण आहे. ते कधीच पूर्ण होणार नाही.

**साधक क :** वास्तविक भगवंत आतच आहे, बाहेरून कोठून आणायचा नाही. म्हणून जितके अंतर्मुख होऊ तितके त्याच्याजवळ जाऊ.

**साधक ब :** खरे म्हणजे आपले मन चुकीचे काय ते बरोबर सांगत असते. पण आपण त्याच्याकडे दुर्लक्ष करतो. सत्पुरुष विकार वापरतात तर आपण विकारांकडून वापरले जातो.

**पू. बाबा :** काय करावे! हे साधायची काहीतरी युक्ती आहे. नाहीतर आता त्यांनी (श्रीमहाराजांनी) डोक्यात काठी मारून तरी आमच्याकडून करवून घ्यावे!

### **|४९३|** (१४ मार्च १९९७)

**साधक ड :** श्री. भाऊसाहेब परांजपे आज पहाटे निधन पावल्याचा मला आज सकाळी पुण्याहून फोन आला होता.

**पू. बाबा :** होय, मलाही फोन आला होता. चांगले साधक होते ते! पण आत्ता तुम्हाला कसला सुगंध येतो आहे का?

सर्वांनाच ताज्या फुलांचा सुगंध येत होता.

पू. बाबा म्हणाले, माझ्या लक्षात आले की गेले दोन तीन आठवडे मला घाम आला की त्या घामाला सुगंध येतो आहे. ही शरीरातील पंचमहाभूते शुद्ध होण्याची क्रिया आहे. पृथ्वीतत्त्व सर्वात जड आहे. पृथ्वीचा गुण गंध आहे. त्यामुळे पृथ्वीतत्त्व शुद्ध झाले की असे होते. पुराणात अशी उदाहरणे आहेत. तमोगुण आणि रजोगुण कमी होऊन सत्त्वगुण वाढल्याची ही खूण आहे.

पू. बाबा म्हणाले, परमार्थात पश्चात्ताप आवश्यक आहे आणि सर्वांना त्यातून जावे लागते. स्वामी स्वरूपानंदांना याबद्दल त्यांच्याकडे जाणाऱ्या एका माणसाने विचारले होते. स्वामींचे साधनाकालातले लिखाण आहे त्यात पश्चात्तापाचे वर्णन आहे. पश्चात्तापाचे विविध प्रकार आहेत. तो नैतिक असू शकतो. आपण चुकलो, करायला नको ते केले असे वाटते. परमार्थात पश्चात्तापाला विशेष अर्थ आहे. खिश्चन धर्मात repentance ला महत्त्व आहे. confession हा रूढ प्रकार आहे.

दासबोधात मुमुक्षूलक्षणाच्या समासात (दशक पाचवा समास आठवा) पश्चात्तापाचे सुरेख वर्णन आहे. पश्चात्ताप ही आग असून ती मागील पाप जाळून टाकते असे श्रीमहाराज म्हणत. पश्चात्ताप म्हणजे आपण विकारांना बळी पडतो, दृश्याचे सुखदु:ख माझ्यावर परिणाम करतात, दृश्य मला खरे वाटते, मी वेळ वाया घालवतो, अहंकारी आहे, रोजच्या जीवनात भगवंताला विसरतो इत्यादी दोष ठळकपणे जाणवू लागतात. भगवंताला विसरणे हे पापच आहे आणि ह्या पापाचा पश्चात्ताप होणे आवश्यक आहे.

**साधक प** : पश्चात्ताप झाल्यावर रोजचे जीवन असह्य होईल.

**पू. बाबा** : मी M.A. चा रोज १८-१८ तास अभ्यास केला आहे. त्यावेळचा माझा अनुभव आहे की कोणीही आल्यास आणि त्यामुळे थोडाही वेळ वाया गेल्यास अतिशय वाईट वाटे. आमच्याकडे नजर फिरवून ते म्हणाले, तुम्हाला अजून वेळ आहे पण मला आता वेळ नाही. वेळ वाया घालवून चालणार नाही हे ही पश्चात्तापाचे अंग आहे.

**साधक क** : ठरवून पश्चाताप करता येईल का?

**पू. बाबा** : नाही; त्यासाठी शरणागती आणि प्रार्थना पाहिजे. तथापि प्रत्येकाला या अवस्थेतून जावेच लागते. साधन करू लागल्यानंतर आपले दोष दिसायला लागणे ही त्याची पहिली पायरी आहे. पश्चात्ताप खरा असला तर त्याचा परिणाम साधन वाढण्यात होईलच. मागचे सर्व सद्गुरु घेतील. खरा पश्चात्ताप टिकाऊ परिणाम घडवून आणील. थोडे बरे वाटू लागले की पश्चात्ताप संपतो. तसे होता कामा नये.

## |४९४| (२१ मार्च १९९७)

**पू. बाबा** : आपण नाम घेतो. काही वेळा त्यामधे खोलीही येते, पण व्यवहारातल्या क्षुल्लक गोष्टींनी किंवा घटनांनी ती नाहीशी होते. ज्याचा

आपल्या दैनंदिन जीवनाशी काहीही संबंध नाही अशा वर्तमानपत्रातल्या एखाद्या बातमीनेही नाम घेणे मंदावते. नाम सतत ताजे हवे. श्रीमहाराज एकदा म्हणाले, माणसाचे वय वाढू लागले की त्याचा देह थकू लागतो, शिळा होतो पण जिवंतपण म्हणून जे असते त्यात शिळेपणा असतो का? ते ताजेच असते. तसे नाम सतत ताजे पाहिजे. आपण बाहेरून घेतलेले ज्ञान आणि आत्मज्ञान यात फरक आहे. तरीदेखील बाहेरून घेतलेल्या ज्ञानाबद्दल किती खात्री वाटते! ते आपलेच ज्ञान आहे असे वाटते.

**साधक प :** जे ज्ञान internalise (आत्मसात) होते तेवढेच आपले आहे असे वाटते. वेगळ्या शब्दात सांगायचे तर ते स्मृतीत न राहाता तो आपला स्वभाव बनतो. नामस्मरण हे कर्म न राहाता तो स्वभाव होणे ही साधनाच्या प्रगतीची पहिली पायरी म्हणता येईल.

## |४९५| (४ एप्रिल १९९७)

आज पू. बाबांच्या घरात पाऊल टाकतानाच सुगंध येऊ लागला. पंधरा दिवसांपूर्वीही असेच झाले होते.

**पू. बाबा :** आज एका महत्त्वाच्या विषयावर तुमच्याशी बोलणार आहे. याच्यावर मी पुष्कळ विचार केलेला आहे. ऐकल्यानंतर तुम्हाला काय वाटते ते सांगा.

संत पाचलेगांवकरांची आणि माझी लहानपणापासूनची मैत्री. माझ्यापेक्षा ते एक दोन वर्षांनी लहान होते. अगदी लहान वयातच ते साप नाग हाताळू लागल्यामुळे ते आठ-दहा वर्षांचे असतानाच लोक त्यांना महाराज म्हणून ओळखत असत. एकदा मी श्रीमहाराजांबरोबर बुलढाण्याला गेलो होतो. उन्हाळा खूप होता. श्रीमहाराजांना भेटायला बरीच माणसे आली होती. श्री. काशीकर श्रीमहाराजांच्या मागे बसलेले होते. मी श्रीमहाराजांच्या उजव्या बाजूस बसलो होतो. चौथ्या रांगेत पाचलेगांवकर महाराज बसलेले मला दिसले. मी त्यांच्याकडे पाहिले पण त्यांनी ओळख दिली नाही. त्या दिवशी, का कोणास ठाऊक, श्रीमहाराजांनी जवळ जवळ चाळीस मिनिटे महंताच्या लक्षणांबद्दल सांगितले. प्रवचनानंतर पाचलेगांवकर श्रीमहाराजांना भेटायला गेल्यानंतर श्रीमहाराजांनीच त्यांना प्रथम नमस्कार केला. त्यांच्या धार्मिक सुधारणा, शुद्धीकरण इत्यादी कार्याची प्रशंसा केली आणि म्हणाले की हे सगळे करतांना भगवंताचे अनुसंधान असावे. पाचलेगांवकरांनी त्यांचे अनुसंधान

राहाते म्हणून सांगितले. पुढे काही वर्षांनी ते मालाडला श्रीमहाराजांना भेटायला आले होते. त्यावेळची हकिगत मी पूर्वी तुम्हाला सांगितली आहे. (पहा : अध्यात्म संवाद भाग १ संवाद क्र.११०) त्यावेळी श्रीमहाराज मी यांना म्हणजे मला साधक म्हणून ओळखतो म्हणाले होते. त्यावरून श्रीमहाराजांची माझ्याकडून काय अपेक्षा आहे हे लक्षात आले. मग त्या दृष्टीने मी विचार करू लागलो. तोच विचार आता तुम्हाला सांगणार आहे.

श्रीसमर्थांनी बद्ध, मुमुक्षू, साधक आणि सिद्ध असे चार प्रकार सांगितलेले आहेत. बद्ध जीव हा अज्ञानी जीव होय. तो केवळ भौतिक पातळीवर जगत असतो. त्याला जग सर्वस्वी खरे वाटते आणि मी म्हणजे देह ही भावनाही दृढ असते. बहुसंख्य माणसांचे जगणे आणि मरणे ह्या अवस्थेतच होते. बद्धांमधील काहीजणांना मात्र कौटुंबिक वा अन्य आघातांना सामोरे जावे लागले की जगाच्या खरेपणाबद्दल संशय वाटू लागतो. आपले जगणे केवळ पशूच्या पातळीवरचे आहे असे वाटू लागते आणि त्यांना खरा पश्चात्ताप होतो. आत्तापर्यंतचे आपले जीवन व्यर्थ दवडले असे वाटू लागते. या बद्ध दशेतून सुटका व्हावी असे वाटू लागते आणि तो मुमुक्षू होतो. तथापि सुटकेसाठी काय करावे ते त्याला समजत नसते आणि त्यामुळे योग्य असे साधनही घडत नाही. अशा स्थितीत एखाद्या सत्पुरुषाची गाठ पडली तर अनुतापाने तो त्याच्यापुढे लीन होतो. त्याने सांगितलेले साधन करावे असे त्याला वाटते पण ते नीटपणे घडत नाही. कारण त्याची आत्मशक्ती कमी पडते.

साधकाच्या बाबतीत ज्यूनिअर साधक आणि सीनिअर साधक अशी मी वर्गवारी करतो. ज्यूनिअर साधक साधन करीत असतो पण अजून तो साधनाला चिकटलेला नसतो. अद्यापि तो संशयरहित झालेला नसतो त्यामुळे साधनाच्या बाबतीत त्याचे पुढे जाणे मागे येणे चालू असते. गुरुकृपेने त्याचे संशय वितळू लागतात, देहबुद्धी कमी होऊ लागते आणि धारणा वाढू लागते. असे झाले की तो सिनिअर साधक झाला असे म्हणता येईल. तरीदेखील अजून खऱ्या अर्थाने तो शिष्य झालेला नसतो.

शिष्याचे मुख्य लक्षण म्हणजे तो गुरूला पूर्णपणे शरण गेलेला असतो. गुरुआज्ञा पाळणे हेच त्याचे साधन असते. थोड्याच काळात अशा शिष्याची गुरुकृपेने गुरूसारखी स्थिती होते. तो आत्मज्ञानी होतो. गुरु आणि शिष्य हा केवळ बाह्य भेद उरतो. ब्रह्मानंद महाराज म्हणाले, "महाराजांनी मला आपल्यासारखं केलं!"

ही वर्गवारी सांगून पू. बाबा म्हणाले की हे प्रकार केले तरी त्याचे water tight compartments होऊ शकत नाहीत. बद्धतेकडून सिद्धतेकडे जातांना मधे बऱ्याच छटा (shades) येतात.

**साधक ग** : यासाठीच प्रत्येक प्रकारात पुन्हा मंद, मध्यम आणि तीव्र असे उपप्रकार सांगितलेले आहेत.

**पू. बाबा** : ही वर्गवारी लक्षात घेऊन यात आपण कोठे आहोत याचा प्रत्येकाने विचार करावा आणि तेथून पुढे जाण्याचा प्रयत्न करावा. यासंबंधी आपण पुन्हा केव्हांतरी चर्चा करू.

उठता उठता पू. बाबांनी एक जुनी आठवण सांगितली. ज्ञानेश्वरीतील ऐसी कर्मसाम्यदशा। जैं होईल गा वीरेशा। श्रीगुरु आपैसा। भेटेल गा॥ ही ओवी चालू होती. मी म्हणालो की आम्हाला श्रीगुरु भेटले. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, भेट झाली पण कळली नाही. खरी भेट पुढेच आहे. ती कर्मसाम्यदशेनंतरच होईल!

## ।४९६। (११ एप्रिल १९९७)

पू. बाबांनी आज एका जुन्या आठवणीने सुरुवात केली. ते म्हणाले, मी एल्फिन्स्टन कॉलेजात शिकत होतो तेव्हां सील हे कॉलेजचे प्रिन्सिपल होते. त्यांचे वडील सर ब्रजेन्द्रनाथ सील हे अतिशय विद्वान गृहस्थ होते. माझ्यावर त्यांचे प्रेम होते त्यामुळे मला ते काही जुन्या आठवणी सांगत असत. सर ब्रजेन्द्रनाथांची आणि श्री. नरेन्द्र दत्तांची (पुढे स्वामी विवेकानंद झाले) मैत्री होती. कॉलेजात शिकत असतानाच ब्रजेन्द्रनाथांचे लग्न झाले. त्यांनी नरेन्द्रांना विवाहाचे निमंत्रण दिले तेव्हां ते ब्रजेन्द्रनाथांना म्हणाले, Don't get corrupted by marriage; get corrupted by God !

सर ब्रजेन्द्रनाथ हंटर कमिशनचे (Hunter commission on Education) सदस्य होते. हंटर आणि आइन्स्टाइन यांची चांगली ओळख होती त्यामुळे सर ब्रजेन्द्रनाथ आणि आइन्स्टाइन यांची एकदा भेट झाली. भेटीत भारतीय आणि पाश्चात्य विचारपद्धतींबद्दल चर्चा झाली. आइन्स्टाइन म्हणाले की सत्य आणि सौंदर्य ही महत्त्वाची आहेत. सर ब्रजेन्द्रनाथ म्हणाले की सत्य हेच सौंदर्य आहे. तेव्हां आइन्स्टाइन म्हणाले की त्यांना जगात सगळीकडे सौंदर्य दिसते. विचारांनादेखील सौंदर्य असते. सर ब्रजेन्द्रनाथ म्हणाले की तुम्ही सौंदर्य बाहेर पहाता, आम्ही सौंदर्य आत पहातो.

विचारांपेक्षाही भावनांचे सौंदर्य मनोरम असते. आइन्स्टाइननी विचारले की असा भावनांचे सौंदर्य पाहाणारा कोणी माणूस तुमच्या पाहाण्यात आहे का? ब्रजेन्द्रनाथांनी त्यांना रविन्द्रनाथांचे नांव सांगितले. पुढे रविन्द्रनाथ इंग्लंडला गेले होते तेव्हां आइन्स्टाइनच्या विनंतीवरून त्यांना भेटायला मुद्दाम जर्मनीत गेले होते. त्यावेळी पहिल्या महायुद्धाचे ढग जमू लागले होते. जर्मनीच्या कैसरनी युद्धाची तयारी सुरू केली होती. त्यास अनुलक्षून आइन्स्टाइन म्हणाले की त्यांना युद्धाची व एकूण अस्थिरतेची भीती वाटत आहे. रविन्द्रनाथ म्हणाले की या अस्थिरतेपेक्षाही आतील अस्थिरता जास्त भयप्रद आहे. ती नाहीशी केली की बाहेरची अस्थिरता नाहीशी होईल.

ही हकिगत सांगून पू. बाबा म्हणाले की परमेश्वराने जग आनंदातून निर्माण केले आहे. श्रीमहाराज म्हणत की जगातल्या प्रत्येक वस्तूवर भगवंताची सही आहे. व्हाइटहेडनेही जग हे एक ऑरगेनिझम आहे असे म्हटले आहे. **Even the movement of your eyelid has it's repurcussions on the remotest star** (तुमच्या पापणीच्या हालचालीचाही अत्यंत दूरच्या ताऱ्यावर परिणाम होतो) असे त्यांनी म्हटले आहे. भारतीय तत्त्वज्ञही यथा पिण्डे तथा ब्रह्माण्डे म्हणतात. पिण्ड म्हणजे जीव.

माणसाला वाटणाऱ्या अस्थिरतेच्या संदर्भात पू. बाबा म्हणाले, जुनी गोष्ट आहे, १९३२ साल असावे, सूर्यग्रहण होते. श्रीमहाराजांनी ग्रहणकालात जप करायला सांगितले. विंचवावरचे, सापावरचे किंवा अन्य काही मंत्र सिद्ध व्हावे म्हणून ग्रहणकालात त्यांचा जप करतात; तसाच तेरा अक्षरी मंत्र सिद्ध व्हावा म्हणून या कालात त्याचा जप करायचा का असे मी श्रीमहाराजांना विचारले तेव्हां ते म्हणाले की रामनाम स्वयंसिद्धच आहे. तथापि जगात चांगल्या शक्तींचा आणि दुष्ट शक्तींचा सतत वावर असतो. ग्रहणकालात दुष्ट शक्तींचा प्रभाव वाढतो. त्यांची बाधा होऊ नये म्हणून ग्रहणकालात जप करावयाचा. हे सांगून पू. बाबा म्हणाले, येत्या तीन चार महिन्यात दुष्ट शक्तींचा प्रभाव वाढणार आहे. विशेषत: दक्षिण गोलार्धात त्यांचा वावर जास्त होईल. काही नाही तरी मन उगीचच अस्वस्थ राहील, तेव्हां हा काळ सांभाळून राहा.

**साधक ग** : आपले मन का अस्वस्थ होते? ते अस्वस्थ होऊ नये म्हणून काय करावे?

**पू. बाबा** : माझेपणात अस्वस्थतेचे मूळ आहे. माझेपणात कर्तेपण आहे आणि अहंकारही आहे. आपली मुले विद्वान, कर्तृत्ववान निघाली तर त्यामुळे

माणसाचा अहंकार वाढतो. त्याचप्रमाणे माझे नुकसान होते, माझी माणसे आजारी पडतात त्यामुळे दु:ख होते, चिंता लागते. अशा प्रकारे मी चा विस्तार अस्वस्थता निर्माण करतो.

**साधक प** : आपण विचार करतो पण त्यापासून किंवा आपल्या अनुभवातून काही शिकत नाही. मुळात मीच जिथे नश्वर आहे तिथे माझेही नश्वरच असणार. मुख्य अडचण अशी येते की हा विचार आत शिरून स्थिर होत नाही. माझ्या जीवनात जे जे काही बरेवाईट घडते ते ते मला शिकविण्यासाठी आहे असे वाटले पाहिजे, आणि त्यासाठी कर्तेपण गुरूंकडे दिले पाहिजे. ज्याला असे कर्तेपणा देता आले त्याचे काम लवकर होते.

**साधक क** : विवेकानंद मास्टर महाशयाना म्हणाले की ठाकूरांकडे तुमचे लवकर साधले. मला फार कष्ट पडले कारण माझा अहंकार प्रबळ होता. मास्टर महाशय (महेन्द्रनाथ गुप्त 'म') प्रथम रामकृष्णांकडे गेले तेव्हां त्यांच्या पत्नीबद्दल श्रीरामकृष्णांनी चौकशी केली तेव्हां ते म्हणाले की ती अज्ञानी आहे. श्रीरामकृष्ण म्हणाले, तुम्ही चार बुके शिकलात म्हणजे ज्ञानी आणि ती अज्ञानी काय? या प्रसंगानंतर मास्टर महाशय श्रीरामकृष्णांना पूर्णतय: शरण गेले. त्यांच्यासंबंधी पुढे एकदा श्रीरामकृष्णही म्हणाले की ते इथे आले आणि त्यांचे चैतन्य जागृत झाले.

**साधक प** : सद्गुरु सांगतात ते अर्थ न काढता ऐकणे महत्त्वाचे असते. आपण जेव्हां काही पाहातो, ऐकतो तेव्हां त्याला आपल्या मनाचा फिल्टर (गाळणी) लावतो आणि आपल्याला पाहिजे तेवढेच आत घेतो. तसे होता कामा नये. अर्जुन भगवंताला पूर्णपणे शरण गेला आणि मला शिकव म्हणाला. शरण गेल्यानंतर खरे शिष्यपण सुरू होते.

**साधक ग** : आपल्यावर येणारी संकटे आपल्याला जागे करण्यासाठी असतात; पण ती नाहीशी करायला आपण गुरूंना सांगतो. त्यात आपला शक्तिपात होतो.

**साधक ब** : मी श्रीमहाराजांना सांगितले आहे की प्रापंचिक संकटे येतील तेव्हां मी तुमच्याजवळ रडेन. पण ती संकटे नाहीशी करण्याकरता माझा जप तुम्ही खर्च करू नका. मग भलेही संकटे तशीच राहोत. मला राहवले नाही, सहन होत नाहीसे झाले की रडण्याचा माझा स्वभाव आहे, पण त्यासाठी माझ्या साधनाला धक्का लावू नका.

चर्चेचा समारोप करतांना पू. बाबा म्हणाले, साधन जपले पाहिजे. दृश्याचे दडपण कमी होण्यासाठी आत जायचाच (म्हणजे अंतर्मुख होण्याचा) प्रयत्न करावा लागेल. त्यासाठी प्रार्थना हा उपाय आहे.

## ।४९७। (१८ एप्रिल १९९७)

संध्याकाळी सहाच्या सुमारास पू. बाबांकडे मालाडला गेलो. आम्ही त्यांना नमस्कार करून बसलो तेव्हां तुम्हाला गुलाबाचा वास येतो आहे का असे त्यांनी आम्हाला विचारले. गेले काही शुक्रवार आम्ही तेथे जातो तेव्हां हीना, मोगरा, केवडा अशा कोणत्या तरी अत्तराचा सुवास येतो. आज गुलाबाचा सुगंध दरवळला होता. शुद्ध सत्त्व होऊ लागले की साधकाच्या शरीराला, घामाला सुगंध येऊ लागतो असे या सुवासाचे पू. बाबांनी स्पष्टीकरण केले होते. आज येत असलेल्या गुलाबाच्या सुगंधासंबंधी ते म्हणाले की अलिकडे हा सुगंध येऊ लागल्यावर विचार केला की हे हुकमी होते का पाहू. म्हणून आज सकाळी जप करतांना आज गुलाबाचा सुवास येऊ दे असा संकल्प केला आणि त्याप्रमाणे आज वास येतो आहे. साधनातला हा एक टप्पा - milestone आहे. आता याच्यापुढे जात असल्यामुळे हे सुवास येणे हळूहळू नाहीसे होईल.

पू. बाबा पुढे म्हणाले, आपल्या जीवनात ज्या गोष्टी घडतात त्यामधे तीन गोष्टी स्थिर झाल्या म्हणजे साधनात कष्ट राहाणार नाहीत. त्या तीन गोष्टी अशा :

१) घडणारी प्रत्येक गोष्ट त्यांच्या इच्छेने घडते. खरे कर्तेपण त्यांचे आहे.

२) त्यांच्या इच्छेशिवाय काहीही घडणे शक्य नाही. आणि

३) जे जे घडते ते ते माझ्या कल्याणाचेच असते.

हा तिसरा भाव येऊन टिकणे फार कठीण आहे. पहिल्या दोन्हींच्या बाबतीत प्रथम माझे कर्तेपण लटके आहे असे वाटू लागले पाहिजे. हेही तसे कठीणच आहे. यातूनच आणखी एक मुद्दा निर्माण होतो. श्रीमहाराजांनी अखंड नामस्मरण करायला सांगितले आहे. मी प्रयत्न केल्याखेरीज ते शक्य आहे का? माझे प्रयत्न आवश्यक असले तर ते माझे कर्तेपणच नव्हे का?

**साधक प :** आपण नाम घेतो तेव्हां आपल्याला त्यापासून काहीतरी साधायचे, मिळवायचे असते. म्हणजे आपल्या कल्पनेनेच आपण नामाचा परिणाम ठरवत असतो. जोपर्यंत नाम घेतांना देहबुद्धी आहे तोपर्यंत प्रयत्न करावाच लागेल. सामान्यतः नाम घेणारा प्रत्येकजण मी देह आहे या खालच्याच भूमिकेवर असणार.

**साधक क** : नाम घेतल्यानेच हळूहळू देहबुद्धी कमी होईल.

**पू. बाबा** : असे पहा, आपण जेवायसाठी बसतो. पान मांडून ते वाढून होण्यास थोडा वेळ असतो. किंवा थोड्या वेळाने रोजचा चहा तयार होणार असतो. अशा मधून मधून मिळणाऱ्या रिकाम्या वेळात नाम घ्यायला काय हरकत आले? पण ते होत नाही. वास्तविक असा रिकामा वेळ नामात गेला पाहिजे. रिकामा मिळणाऱ्या या वेळात नाम घेतले तरी नामाच्या राशी पडतील असे श्रीमहाराज म्हणत. रोज संध्याकाळी साडेसात वाजताच मी माझे अंथरूण घालतो. त्यावेळी एकदम वाटते, अरे अरे, आजचा दिवस गेला! म्हणजे त्या मानाने साधन घडलेच नाही. उगीचच येणाऱ्या लोकांशी बोलताना दिवस व्यर्थ गेला.

**साधक ग** : अखंड नामस्मरण व्हावे अशी तळमळ लागत नाही.

**पू. बाबा** : तळमळीपेक्षाही यासाठी सावधानता पाहिजे. नाम हे साधन न राहाता ते साध्य झाले पाहिजे. कणशः क्षणशश्चैव विद्यामर्थंच साधयेत् म्हणतात तसे नामाचे आहे. कंजूष माणसाला जसा पैशाचा हव्यास असतो तसा नामाचा हव्यास हवा. त्याच्या आड काय येते? आपले मनच आड येते कारण त्याची दृश्याची ओढ अद्यापि कमी झालेली नाही. तथापि समर्थांनी मनाच्या श्लोकात सांगितल्याप्रमाणे ह्या मनालाच परमार्थाकडे, नामस्मरणाकडे वळविले पाहिजे. नाथांनी म्हटले आहे, ''या मनाची एक उत्तम गती। जरी स्वयें लागलें परमार्थी। दासी करी चारी मुक्ती। दे बांधोनि हातीं परब्रह्म॥''

## |४९८| (२५ एप्रिल १९९७)

**पू. बाबा** : आज तुमची वाट पहात होतो. परमार्थात कोणाला काय वाटते, कोणाची कशी प्रगती होते हे समजणे खरोखर कठीण आहे. बुधवारी एक बाई भेटायला आल्या होत्या. घरची सुस्थिती आहे. त्या पुष्कळ नाम घेतात. मुलगा दहावीच्या परीक्षेला बसला आहे, हुशार आहे; तोही नामस्मरण करतो. नवरा नामस्मरण वगैरे काही करत नाही पण त्याची यांच्या करण्याबद्दल आडकाठीही नाही. मात्र घरचे सगळे व्यवस्थित झाले पाहिजे यावर त्याचा कटाक्ष आहे. खूप नामस्मरण आणि तेही मनापासून करत असूनही त्या बाईंना गेले पंधरा-वीस दिवस उद्विग्नता (depression) आली आणि तसेच कारण झाल्यामुळे त्या मला भेटायला आल्या. त्या बाईंनी जे सांगितले त्यावरून Dark night of the soul म्हणजे काय याची थोडी कल्पना येईल. घडले ते असे :

या बाई रोज नियमाने मानसपूजा आणि नामस्मरण करतात. एक दिवस नामस्मरण करतांना त्यांच्या मनात विचार आला की मी जिवंत आहे की मेलेली आहे? त्यांनी श्रीमहाराजांची प्रार्थना केली आणि उत्तर आले की हे देहाचे मरण नसून अध्यात्मिक मरण आहे. यावर विचार करतांना त्यांना वाटू लागले की आपण जप करतो पण रोजचे जीवन पहावे तर त्याच त्या गोष्टी दररोज करतो आहोत. उठणे, खाणेपिणे, सैपाक, बाजारहाट जसे दररोज करते त्याप्रमाणे जपही दररोज करते आहे. म्हणजेच जीवनात शिळेपणा आलेला आहे. साधनाचे शिळेपण म्हणजे अध्यात्मिक मरणच आहे. यावर उपाय काय म्हणून त्यांनी चिंतन सुरू केल्यावर शब्दरूपाने उत्तर आले की मालाडला जाऊन केशवरावांना भेटावे. केशवराव म्हणजे मी हे त्यांना माहीत नव्हते. बुधवारी येथे आल्या तेव्हां हा उलगडा झाला आणि ही सगळी हकिगत त्यांनी सांगितली. त्या म्हणाल्या, मुलगा चांगला सद्‌गुणी आहे, जप करतो; पण त्याच्या ह्या चांगुलपणामुळे मी त्याच्यात गुंतते आहे हे लक्षात येते आणि काही वेळा तो चांगला नसता तर बरे झाले असते असे वाटते. साधनातला शिळेपणा आणि त्यामुळे आलेली उद्विग्नता घालवायला काय करावे ही त्यांची समस्या होती.

पू. बाबांनी आमच्यापैकी एका साधकांना विचारले की Ph.D.चे काम करतांना तुम्हाला कधी रितेपण, व्यर्थपण जाणवले होते का? ते होय म्हणाले तेव्हा दुसऱ्या साधकांना विचारले की पुस्तक लिहितांना तुम्हाला कधी हा अनुभव आला होता का? त्यांचेही होकारार्थी उत्तर ऐकून पू. बाबा म्हणाले की ज्याला दृश्याची पार्श्वभूमी आहे अशा ज्ञानाच्या बाबतीत देखील जर उद्विग्नता येते तर जेथे सगळा प्रांतच सूक्ष्माचा आहे तेथे अभ्यास करताना किती अवघड जात असेल? साधन करताना तुकाराम महाराजांची स्थिती अशी झाली की आपण करतो आहोत ते बरोबर आहे की नाही? "मज हा संदेह झाला दोन्हीसवा। भजन करूं देवा किंवा नको॥"

**साधक प :** नाम घेतांना आपल्या कल्पना थांबल्या पाहिजेत. सर्व काही श्रीमहाराजांच्या इच्छेने घडते येवढे ठसले तरी पुरेसे आहे. खरे म्हणजे ते माझ्या हिताचे, कल्याणाचे आहे या पुढच्या भागाची गरजच नाही; कारण माझे कल्याण देखील मीच ठरवतो. विश्वात सर्व काही त्यांच्या इच्छेने आणि सत्तेने चालते म्हटल्यावर कल्याणाचा प्रश्नच उरत नाही.

**साधक ग :** गीतेमधे भगवंतानी 'ना दत्ते कस्यचित् पापं न चैव सुकृतं विभुः।' असे म्हटले आहे.

**पू. बाबा** : (साधक ज ना) तुम्हाला काय वाटते?

**साधक ज** : श्रीमहाराजांची इच्छा, कल्याण वगैरे गोष्टींची मला आवश्यकता वाटत नाही. मी नाम घेतो आणि मला महाराजांच्यात विरघळून जायचे आहे असा माझा भाव आहे.

**साधक क** : साधन करतांना प्रत्येक साधकाचा त्याच्या स्वभावानुसार वेगळा भाव असू शकतो. कालिप्रसाद चंद्र (कालि-पुढे अभेदानंद झाले) साधन करत असतांना विवेकानंदानी त्यांना स्पर्श करायला सांगितले आणि तसे करताच त्यांचा भक्तिभाव बिघडून तेथे ज्ञानभाव येऊ लागला हे पाहून श्रीरामकृष्ण विवेकानंदाना रागावले. कालिप्रसादाना पुढे मूळच्या भक्तिभावावर येताना खूप कष्ट झाले. सर्वांना एकच भाव ठेवून साधन करता येईल असे नाही. आपला जो भाव असेल त्यात जास्तीत जास्त साधन केले पाहिजे.

**पू. बाबा** : रोज रात्री निजतांना आज मला शक्य होते त्या मर्यादेपर्यंत मी साधन केले असे स्वतःला सांगता आले पाहिजे. त्या दृष्टीने रोजची काही जपसंख्या ठरवून घ्यायला देखील हरकत नाही.

## |४९९| (२ मे १९९७)

पू. बाबा म्हणाले की आज चर्चेला तुम्हीच काही विषय काढा. पण मग त्यांनी In Mother's words ह्या पाँडीचेरीच्या मदरच्या पुस्तकातली काही वचने वाचून दाखवली आणि मग त्या वचनांच्या अनुषंगाने चर्चा झाली. नामस्मरण कसे करावे ते सांगतांना एका वचनात त्यांनी ingathering attitude असा शब्दप्रयोग केला आहे. याचा अर्थ नाम घेतांना वृत्ती अंतर्मुख झाली पाहिजे. अशी वृत्ती झाली म्हणजे ध्यान लागेल. नाम घेतांना ध्यानाच्या पहिल्या पायरीवर साधक स्वतःला बिसरेल. एरवी वागतांना त्याचा व्यवहार चुकणार नाही. पण ह्या अवस्थेतून तो पुढे गेला की त्याला जगाचे भानच राहाणार नाही. यावेळी साधकाचे गुरु त्याला बरोबर सांभाळतात.

दुसऱ्या एका वचनात मदरनी म्हटले आहे की तुम्ही एक गोष्ट म्हणजे आपला मीपणा पुनःपुन्हा आणि पूर्णपणे आपल्या गुरूंना देऊ शकता.

पूर्वी चर्चेत आलेले दोन मुद्दे पुन्हा चर्चेत आले.

१) माझे अस्तित्व मीच माझ्या अहंकारातून टिकवून धरत असतो. वास्तविक माझ्याविना कोणाचेच काही अडत नाही. इतकेच नव्हे तर मी

मेल्यावर दोन चार दिवसात लोक मला विसरून जातील. तथापि हे माहीत असूनही आज प्रपंचाची ओढ सुटत नाही हे मोठे आश्चर्य आहे.

२) ब्रह्मानंद महाराजांनी आपली विद्या श्रीमहाराजांच्या चरणी वाहिली आणि घेतली म्हणा तर पाय सोडतो म्हणाले. श्रीमहाराजांनी घेतली म्हटले आणि बुवाना आलिंगन दिले हा व्यवहार काय झाला? शास्त्रविद्या आत्मज्ञानाच्या आड येते असे ब्रह्मानंद महाराजांना का वाटले? आत्मज्ञान व्हावे या उद्देशाने त्यांनी व्यासंग केला होता. म्हणजे त्यांचे ध्येय लौकिक प्रतिष्ठा नव्हते. त्यामुळे विद्येचा फोलपणा त्यांना समजला. दुसरे म्हणजे विद्येने अहंकार वाढतो. त्यामुळेच पहिल्या दोन भेटीत श्रीमहाराजांना ते ओळखू शकले नाहीत. पुस्तकात दिलेली ब्रह्मज्ञान्याची लक्षणे ते श्रीमहाराजांमधे शोधत होते; त्यामुळे फसले. खरोखर ती अविद्याच होती. ती श्रीमहाराजांच्या पायी वाहिल्यावर त्यांना सद्गुरूंचे दर्शन घडले.

## |५००| (९ मे १९९७)

आम्ही मालाडला पू. बाबांकडे गेलो आणि आमच्या मागोमागच डॉ. उपाध्ये व त्यांची कन्या पंडित जसराज, त्यांची एक शिष्या व सहा सात वर्षांची नात यांना घेऊन आले.

पू. बाबांशी थोडा वेळ बोलणे झाल्यावर पंडित जसराजानी केवळ हार्मोनियमची साथ घेऊन निर्वाण षट्क; कृष्णभक्तीपर काही संस्कृत श्लोक व दरबारी रागातले एक हिंदी भजन गाऊन दाखविले. त्यांची नातही वयाच्या मानाने चांगले गात होती. पंडित जसराज नुकतेच बनारसला जाऊन आले. आता दोन महिने अमेरिकेत कार्यक्रम आहेत म्हणाले.

नादब्रह्माबद्दल बोलणे निघाले. पंडितजी म्हणाले की दोन वेळा गातांना त्यांना समाधीचा अनुभव आला. एकदा बदरिकाश्रमात गच्चीवर उभे राहून ते स्वत:शीच गात होते. एकाएकी वर वर चढत श्वास टाळूपर्यंत गेला व तेथे कपाळातून दोन पाकळ्या बाहेरच्या बाजूस उघडल्या. असाच अनुभव एकदा बैठकीत गात असतांना आला. ते म्हणाले, बैठकीत रमलो की पुढचे श्रोते दिसत नाहीत. काही वेळा विशेषत: भजने आणि देवीची पदे गातांना भाव आला तर गहिवर येतो आणि गाणे थांबते.

पू. बाबांनी सूर लागला नाही असे कधी होते का म्हणून विचारले. ते म्हणाले, होय, काही वेळा त्यांच्यावर (सुरांवर) प्रेम केले नाही की ते आपली

करामत दाखवतात. स्वप्नात नवनवीन चिजा सुचतात. पंडितजींच्या बोलण्यात आदब आहे. इतके मानसन्मान मिळालेले असूनही निगर्वी वाटतात.

पंडित जसराज गेल्यानंतर पू. बाबा आम्हाला म्हणाले की आज आता सांगण्यासारखे काही नाही. तथापि आमचा परमार्थ म्हणजे एक सोंग आहे असे वाटते. प्रपंच दु:खाचा असला किंवा सुखाचा असला तरी त्याचे महत्त्व परमार्थाच्या आड येते. दु:खापेक्षाही सगळे चांगले असले तर ते जास्त बाधक होते. खरोखर भाऊसाहेबांसारखे सगळे महाराजांवर सोपवून दिले पाहिजे.

## |५०१| (१६ मे १९९७)

आज सुरुवातीलाच पू. बाबांनी एक जुनी हकिगत सांगितली. ते म्हणाले, पुण्याच्या श्री. आण्णा मनोहरांचे चुलत भाऊ श्री. दाजी मनोहर अहमदाबादला राहात असत. तेथे एका मिलमधे ते वीव्हिंग मास्टर होते. बी. ए. ला त्यांनी तत्त्वज्ञानाचा, विशेषत: पाश्चात्य तत्त्वज्ञानाचा अभ्यास केला होता. श्रीमहाराज (पू. तात्यासाहेब) अहमदाबादला जाणार होते तेव्हां श्री. आण्णा मनोहरांनी श्री. दाजींना श्रीमहाराजांना भेटायला सांगितले. श्री. दाजींनी मला कोणा महाराजांना भेटण्यास रस नाही असे त्यांना कळवले. तथापि नंतर श्रीमहाराजांना भेटायला ते गेले. जातांना त्यांनी काही प्रश्न, विशेषत: ज्ञानासंबंधी लिहून नेले होते. श्रीमहाराजांनी त्यांच्या प्रश्नांची त्यांना पटतील अशी उत्तरे दिली. त्यामुळे पुढे रिटायर होऊन मुंबईत राहायला आल्यानंतर ते श्रीमहाराजांकडे येत असत. ते म्हणत की प्रपंच चांगला असला, मुलेबाळे गुणवान असली तरी माणूस प्रपंचात गुंतून राहातो आणि प्रपंचात दु:खे, अडचणी असल्या तरी तो प्रपंचात गुंततो. श्रीमहाराज तर प्रपंचाची आसक्ती सोडायला सांगतात. ते सांगतात ते मनाला पटतेही; पण मग त्याप्रमाणे आचरण का होत नाही? त्यांनी मला हा प्रश्न श्रीमहाराजांना विचारा म्हणून सांगितले. मी श्रीमहाराजांना विचारले तेव्हां याचे कारण तुम्हीच सांगा असे श्रीमहाराज म्हणाले. मी आणि दाजी दोघेही गप्प बसलो तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, कळणे आणि समजणे यात फरक आहे. समजणे केवळ बुद्धीच्या पातळीवर राहाते. प्रपंचाची आसक्ती सुटली पाहिजे हे समजते पण आचरणात येत नाही, म्हणजे ते कळत नाही. बुद्धीच्या पातळीवर समजले तरी अविद्येचा जोर इतका विलक्षण असतो की तसे वागावे असे वाटूनही प्रत्यक्षात तसे वागणे होत नाही. याला उपाय काय? जो अज्ञानात आहे त्याला आपल्या प्रयत्नाने

त्या अज्ञानाच्या बाहेर कसे पडता येईल? त्याला जे उपाय सुचतात तेही अज्ञानातूनच आलेले असतात. म्हणून ज्ञानी माणूसच त्याला बाहेर काढू शकतो.

प्रपंचाच्या आसक्तीतून बाहेर पडायला दोन मार्ग आहेत. आसक्ती सोडावी असे वाटते पण मन तसे करू देत नाही म्हणून पहिला मार्ग म्हणजे ते मनच नाहीसे करावे. पण मन मोठे लबाड आहे. ते स्वत:चा नाश होऊ देत नाही, म्हणून त्या मनाच्या मागे असलेला 'मी' कर्ता नाही, माझे गुरु किंवा भगवंत कर्ता आहे हे मनावर ठसवावे. कर्तेपणा गुरूंवर सोपवता आला की जीवनात जे जे घडते ते ते त्यांच्या सत्तेने घडते, माझे कर्तृत्व काहीच नाही हे कळेल आणि मग 'मी' नाहीसा होईल आणि त्याबरोबर माझेही नाहीसे होईल. प्रपंच माझा नाही हे कळले की त्याची आसक्ती आपोआप नाहीशी होईल. सद्गुरूंची सत्ता एकसारखी जागी ठेवायचा उपाय म्हणून एकसारखे नामस्मरण करावे.

प्रपंचाची आसक्ती सुटायला दुसरा मार्ग म्हणजे शरणागती. पण ती सोपी नाही; कारण त्यातही 'मी' शरण जाणार आहे हा भाव राहातो. तथापि प्रपंचातील आघातामुळे अथवा सत्पुरुषांच्या अनुग्रहामुळे ज्याला ही शरणागती येईल त्याचा प्रपंच त्याचा राहाणारच नाही.

**साधक प :** आपल्या जीवनात विशेषत: ज्या दु:खद घटना घडतात आणि ज्यामुळे आपण त्या त्या वेळी हादरलेले असतो त्या घटनांमधूनही आपण शिकत नाही. काही काळ गेला की त्या घटनांचे गांभीर्य, महत्त्व कमी होते. घटनांमधून बोध घेऊन तो टिकविण्याइतकी आपली धारणा नसते. उदाहरणार्थ, तुम्ही विचारलेल्या 'मला दु:ख होते' म्हणणारा 'मी' कोण अशासारखा एखादा प्रश्न घेऊन त्याचे उत्तर मिळेपर्यंत केवळ विचार केला तरी जीवनाचे खरे स्वरूप कळेल आणि माणूस मोकळा होईल. पण आपण समग्र जीवनाकडे पहात नाही. आपले पाहणे खंडित असते. लहान लहान गोष्टींमधे आपण त्या त्या वेळी गुंतलेले असतो. त्या महत्त्वाच्या नाहीत; त्यातून अंतिम सुख मिळणार नाही हे माहीत असूनही आपण त्यात गुंतून राहातो. उदाहरणार्थ, लोकलमधून प्रवास करतांना उभे राहावे लागले तर, फार तर अर्धा पाऊण तास उभे राहावे लागणार हे माहीत असूनही बसायला मिळते का हे पहाण्यात आपण गुंतून जातो. आणि ह्यामधे नाम राहून गेले हे लक्षातही येत नाही.

**पू. बाबा :** इतर गोष्टींचे ठीक आहे पण शरीरदु:ख होऊ लागले की सगळे लक्ष शरीराकडे जाते, नाम नाहीसे होते. अशा वेळी काय करायचे?

**साधक प :** होणाऱ्या दु:खावर योग्य तो उपाय करावा पण कल्पनेने त्यात गुंतून राहू नये. कारण आज गुडघे दुखायचे थांबले तर उद्या डोके दुखू लागते असे शरीराचे काहीतरी चालू राहाते.

**साधक क :** बरेच वेळा आपण कशाकरता काय करतो आहोत याचेच आपल्याला भान नसते. जीवनात आपण नेहमी सुखाच्या मागे असतो पण त्या सर्व धडपडीतून अंतिम सुख मिळणार नाही अशी खात्री झाली पाहिजे आणि त्याचबरोबर अंतिम सुख किंवा शाश्वत सुख फक्त नामस्मरणानेच मिळेल हे आपल्या गुरूंनी सांगितले आहे त्यावर संपूर्ण श्रद्धा पाहिजे.

**पू. बाबा :** सत्पुरुषांची संगत आणि त्यांनी सांगितलेले श्रद्धापूर्वक श्रवण करून आचरणात आणण्याचा प्रयत्न करणे महत्त्वाचे आहे. त्या श्रवणातून दुसरे काहीतरी कळेल असे वाटणे चूक आहे. कारण श्रवण - श्रद्धापूर्वक श्रवण हेच कळणे असते.

## |५०२| (१३ जून १९९७)

(दि. २३ मे ते ३० मे अखेर गोंदवल्यास नामसाधना अभ्यास शिबीर झाले.)

**पू. बाबा :** दृश्यात गुंतू नये हे साधकाला माहीत असते आणि तरीदेखील बाह्य गोष्टींच्या आकर्षणाला तो बळी पडतो. यासाठी त्याने नेहमी सावध राहिले पाहिजे. दृश्यापासून जो अलिप्त आहे अशा अनुभवी साधकाची संगत असली तर तो वेळीच आपली चूक आपल्याला दाखवून जागे करतो.

परवाच्या शिबिरात गोंदवल्यास असतांना ताटस्थ्य म्हणजे काय आणि त्याचा अनुभव कसा असतो असा मला प्रश्न पडला होता. नाम सर्व ठिकाणी आहे असे श्रीमहाराजांनी सांगितले आहे. मला वाटले की नामाप्रमाणे विचारांना देखील स्पंदने, आवाज, रंग, रूप असावे. मी विचारांच्या आवाजाचा मागोवा घेण्याचा प्रयोग केला. पण परवा सकाळी असा प्रयत्न केल्यावर मन एकाएकी निर्विचार झाले. निर्विचार म्हणजे स्थगित (फ्रीज) नव्हे तर नाहीसे (डेड्) झाल्यासारखे झाले. मनात कोणताही संकल्प येईना. त्यामुळे आता अमुक करावयाचे आहे असे ठरवून मन ढकलावे लागले. म्हणजे मनाला मुद्दाम जोराने कृती करण्यास सांगावे लागत होते; उदाहरणार्थ उठून गिझर सुरू करायचा प्रयत्न करावा लागला. ही अवस्था बराच वेळ होती. मनाचे सर्व responses (प्रतिसाद) थांबले होते. कोणतेही कर्म करतांना जोर लावून करावे लागत होते. हा जोर लावणारे जे आहे ते शोधायचा प्रयत्न केला पण त्याचे उत्तर मिळाले

नाही. तथापि त्या अवस्थेत बरे वाटत होते. कारण मनाची काहीच कटकट नव्हती. मग लक्षात आले की हाच ताटस्थ्याचा अनुभव. श्रीमहाराजांच्या मते ताटस्थ्याची अवस्था साधकाला चांगली नाही. एकनाथ महाराजांनीही भागवतात याचे वर्णन करून म्हटले आहे की यामुळे साधकाची प्रगती खुंटते, कारण या अवस्थेची साधकाला चटक लागते. ही जाणिवेची स्थगिती आहे आणि ह्यामधे विश्रांती असली तरी त्यामुळे अंतर्मनात बदल होत नसावा.

पू. बाबा म्हणाले की असे असले तरी माझे त्या अवस्थेत नामस्मरण सुरू होते पण एरवी असणारी श्रीमहाराजांच्या अस्तित्वाची जाणीव नव्हती. शिवाय त्या अवस्थेत आनंद नव्हता. ह्या अवस्थेतच मनात काय काय आहे ते कळू शकेल का असा विचार मनात आला पण लगेचच जिथे भगवंताचे स्मरण ठेवायचे आहे तिथे मनात काय आहे ते कळून काय होणार आहे असे वाटून तो विचार थांबला. ताटस्थ्याची ही अवस्था साक्षीभावापेक्षा वेगळी होती. खरे म्हणजे मन बदलायचे आहे. मन सतत श्रीमहाराजांच्या अनुसंधानात राहिले पाहिजे. त्यासाठी आत जाण्याचा प्रयत्न करावा लागेल. साधनाची सुरुवात देहाच्या पातळीवरच होते पण पुढे ती सूक्ष्म होत जाते. ही सूक्ष्मता येऊ लागली की बाहेरून आत भरलेल्या स्मृती - आठवणी काढून टाकाव्या लागतील. आठवणी अनुभवरूपाने साठलेल्या असतात. त्यांच्यामधे न रमण्याचा अभ्यास काहीसा सोपा आहे. पण दृश्याची ओढ जाणे महाकठीण आहे. कारण व्यवहारात मन सारखे दृश्यात ढकलत असते आणि ते इतके लबाड असते की आपली कृती कशी बरोबर आहे याचे ते समर्थन (rationalise) करू पाहाते. म्हणून मनात भगवंताची अस्तित्वभावना आणि प्रेम निर्माण होण्यासाठी आपली आतील सूक्ष्मता मनाच्या सूक्ष्मतेच्या दसपट झाली पाहिजे.

नंतर योगाचा विषय निघाला. पू. बाबा म्हणाले, योगाने चित्तवृत्तींचा निरोध साधतो पण त्यातून खाली घसरावयाची भीती असते. स्वामी रामदासांनी योगाचा अभ्यास सुरू केला होता पण नंतर तो सोडून ते पुन्हा नामाला चिकटले कारण नामाने सावकाश पण निश्चित प्रगती होते.

पू. बाबांनी त्यांचा मानसपूजेचा एक अनुभव सांगितला. ते म्हणाले श्रीमहाराजांना आंबट चुका आवडतो म्हणून एकदा बाजारातून ती भाजी आणली आणि ती करा असे घरात फर्मान सोडले (कडक शब्दात आज्ञा केली). मानसपूजेत जेवणाच्या वेळी श्रीमहाराज ती भाजी नको म्हणाले. मी त्यांना म्हणालो, आपण नका घेऊ; पण असे का? तेव्हां श्रीमहाराज म्हणाले

की त्यात नाम (प्रेम) नाही. माझ्या लक्षात माझी चूक आली. घरांत मी कडक शब्दात बोलून दुसऱ्यांचे मन दुखवले होते. तसे न करता महाराजांना आवडणारी भाजी आणली आहे, करता का असे म्हणायला पाहिजे होते.

## |५०३| (२० जून १९९७)

**पू. बाबा :** पॉंडीचेरीच्या मदरसंबंधी on Mother नांवाचे श्रीनिवास शास्त्रींचे एक पुस्तक आहे. या पुस्तकातला काही भाग पहा. मदर म्हणतात की नाम त्यांच्या अंगात इतके मुरले की शरीरातील प्रत्येक पेशी नाम मागू लागली अवघा देह नामाने भरून गेला. ज्ञानेश्वर महाराजांनीही एका अभंगात म्हटले आहे.

कां रे स्फुंदतोसी। कां रे स्फुंदतोसी। न भजतां विठ्ठलासी। नरकीं पडसी॥ १॥
पुण्यपाप बाधा। न पवसी गोविंदा। पावशील आपदा। स्मर परमानंदा॥ २॥
पुण्य करितां स्वर्ग। पाप करितां भोग। नाम जपतां सर्वांग। होईल पांडुरंग॥ ३॥

परवा गोंदवल्याला मला हा अनुभव आला. तेथे गेल्यापासून आपण ठरवले होते त्याप्रमाणे अखंड नामस्मरण चालू होते. शिबिराच्या दुसऱ्या दिवसापासून शेवटच्या दिवसापर्यंत शरीरात श्रीमहाराज भरलेले आहेत असे वाटत होते. रोज एकूण अडीच तास प्रवचनात बोलूनही थकवा वाटत नव्हता, इतकेच नव्हे तर नवे नवे विचार सुचत होते. गोंदवले सोडल्यानंतर हा भाव हळू हळू ओसरला. तथापि इतका चांगला अनुभव येत असूनही गोंदवल्यात आणखी काही दिवस राहावे असे मात्र वाटले नाही! म्हणजेच श्रीमहाराजांनी शरीर व्यापले तर ते अनायास टिकवून धरण्याची शरीराची अजून तयारी झालेली नाही.

साधन करावे असे वाटत असूनही ते का घडत नाही हा नेहमीचाच विषय चर्चेला आला. दृश्याची ओढ अद्यापि कमी होत नाही. आपल्या आड काय येते ते आपणच शोधले पाहिजे. नामाची प्रार्थना करून, त्यालाच शरण जाऊन काय आड येते ते विचारावे. अद्यापि खरा विवेकही झालेला नाही आणि वैराग्यही नाही. नामासाठीच जगायचे असा निश्चयही होत नाही, इतकेच नव्हे तर अशी कोंडीही झालेली नाही; कारण नकळत आपण इतर गोष्टींमधे रमून जातो. "घेई घेई माझे वाचे। गोड नाम विठोबाचे॥" या ओळीचा अर्थ सांगतांना श्रीमहाराज म्हणाले की तुकाराम महाराजांची सगळी इंद्रिये विठ्ठलाची मागणी करू लागली.

**साधक क :** नामात गोडी वाटत नाही याचा विचार करतांना विषयात, उदाहरणार्थ खाण्यात आपल्याला का गोडी वाटते याचा विचार केला पाहिजे.

**साधक प :** मला आंबा आवडतो. आज इतकी वर्षे मी आंबे खाल्ले आहेत तरी ही आवड टिकून आहे.

**पू. बाबा :** भूक पुन्हा पुन्हा लागते, त्याचप्रमाणे आवडीत स्मृतीचाही भाग असतो.

**साधक क :** स्मृती आणि कल्पना म्हणजेच भूतकाळ आणि भविष्यकाळ दोन्ही नाहीसे होऊन प्रत्येक क्षणाला जे आवडते ती खरी आवड.

**साधक ज :** दृश्याची आवड आणि नामाची आवड यात आवड हा एकच शब्द असला तरी ह्या आवडींच्या भिन्न पातळ्या आहेत.

**साधक ग :** नामाची खरी भूक नाही त्यामुळे आवडीचा प्रश्नच येत नाही. नामाची भूक, तळमळ लागली पाहिजे. आज आमचा विवेक बुद्धीच्या पातळीवर आहे, तो भावनेच्या पातळीवर आला तरच खरे वैराग्य उदय पावेल.

**पू. बाबा :** मला श्रीमहाराजांचे अस्तित्व आत जाणवले तर साधक आ यांना बराच काळ ते बाहेर जाणवले. काही काळानंतर नेहमीचे व्यवहार करतांना त्यांना ते अडचणीचे, भीतीचे वाटू लागले; कारण आपल्या मनात अपराधीपणाची भावना असते. नामाची खरी शक्ती आपल्याला माहीत नाही. गुरुदेव रानड्यांचे एक शिष्य नेहमी येथे येतात; तुमच्या ओळखीचे आहेत. ते सांगत होते की एकदा गुरुदेव रानड्यांना जीवघेणा खोकला झाला होता. सोलापूरच्या प्रख्यात डॉक्टरनी तपासून त्यांना औषध दिले होते. तथापि त्यांनी ते औषध घेतले नाही आणि केवळ नामस्मरणाने बरे झाले. त्यावेळी ते या गृहस्थांना म्हणाले, अरे! नामाच्या शक्तीची तुम्हा लोकांना कल्पना नाही.

## |५०४| (२ जुलै १९९७)

पू. बाबांना बरे वाटत नव्हते म्हणून आम्ही त्यांना भेटायला गेलो.

**पू. बाबा :** मला अतिशय अशक्तपणा आला आहे; उठवत नाही. गेले दोन तीन दिवस अन्नही जात नाही, पण माझे नाम फारच सुरेख चालले आहे. मला विलक्षण अनुभव आला तो असा की ज्याचा देहाशी संबंध नाही असे काहीतरी आहे. ते देहात असून देहाच्या पलीकडे आहे. ते अतिशय ताजेतवाने - फ्रेश आहे. ते चिन्मय आहे. आज पहाटे जप करत पडलो होतो. पहाटे जप करतो त्यावेळी साधारणत: श्रीमहाराजांचे दर्शन व्हावे अशासारखी इच्छा असते. श्रीमहाराजांचे अस्तित्व देहाने, विचाराने आणि नामात असे तीन प्रकारे जाणवू

शकते. आज ते नामात जाणवले आणि समाधान झाले. कदाचित त्यामुळे असेल, माहीत नाही; पण आजारातून बरे व्हावे असे आता मनात येत नाही.

**साधक क** : देहदु:खात नाम टिकण्यासाठी किंवा आपले अस्तित्व देहापलिकडे आहे हे कळण्यासाठी अगोदर अभ्यास करावा लागेल.

**पू. बाबा** : अभ्यास तर हवाच पण त्याबरोबरच त्या अभ्यासाला प्रार्थनेची जोड दिली पाहिजे. प्रार्थना ही कवाइत न होता तळमळून झाली पाहिजे. त्याच्यासाठी रडले पाहिजे.

**साधक क** : आयुष्यात एवढे साधले तरी पुरे!

**पू. बाबा** : काय अडचण आहे? हे साधायला हरकत नाही.

## |५०५| (१० जुलै १९९७)

काल पू. बाबांना ताप आला होता. आज ताप नाही पण पावलांवर बरीच सूज आहे. अशक्तपणाही खूप आहे. तथापि गेल्या आठवड्यातल्यापेक्षा आवाजात सुधारणा आहे. गेल्या रविवारी निरूपण झाले नाही. आम्ही गेलो तेव्हां आमच्याशी ते निजूनच बोलत होते पण बोलताबोलताच उठून बसले. म्हणाले, ह्या रविवारी निरूपण करणार आहे. सोमवारपासून (दि. १४) गुरुपौर्णिमेचा सप्ताह सुरू होईल. तेव्हांही रोजचे पंधरा वीस मिनिटांचे प्रवचन होईल.

पू. बाबा म्हणाले, आज सकाळी पुण्याहून डॉ. आप्पा आठवले भेटायला आले होते. ते म्हणत होते की श्रीमहाराजांविषयी प्रेम वाटते तसे नामाचे प्रेम वाटत नाही. नाम आणि महाराज वेगळे वाटतात. मी त्यांना सांगितले की ते वेगळे आहेत ही भावनाच आड येते. हेच आपल्या संशयाचे चिन्ह आहे. हा संशय नामानेच नाहीसा होईल. याबाबतीत माझा स्वत:चा अनुभव सांगतो. नाम आणि श्रीमहाराज एकच आहेत पण याबद्दल संशय येतो तो कसा जाईल असा विचार एकदा मनात सुरू झाला. नाम आणि महाराज हा विचार मग काही केल्या मनातून जाईना. तेव्हां हा प्रश्न श्रीमहाराजांना विचारण्याऐवजी ब्रह्मानंद महाराजांना विचारावा असे मनात आले. त्यांना विचारल्यावर कानडी हेल असलेले त्यांचे शब्द ऐकू आले, "कोणी करून पहात नाही. नाम आणि श्रीमहाराज एकच आहेत. नामाने सगळे संशय जातील."

दोन दिवसांपूर्वी आलेला अनुभव सांगतो. अंगात थंडी भरली म्हणून शाल पांघरून पडलो होतो. मनात विचार आला की नामाने ऊब (उष्णता) निर्माण

होऊ शकेल. तसाच नाम घेत पडलो होतो. काही वेळाने इतके गरम वाटायला लागले की अंगावरची शाल बाजूला केली. मनात विचार आला की ही उष्णता शाल पांघरल्यामुळे आली की नामामुळे? नामामुळे उष्णता येते ही आपल्या मनाची कल्पना आहे असा संशय आला. म्हणून मग ब्रह्मानंद महाराजांची प्रार्थना केली की ही नामाची उष्णता वाटते हे खरे आहे का? नंतर वाटू लागले की काहीतरी धुमसते आहे आणि त्यात हा संशय आणि अहंकार विरघळून जात आहेत. इतक्यात ब्रह्मानंद महाराजांचे शब्द ऐकू आले की "हा संशय आणि अहंकार तात्पुरते गेले आहेत. ते कायमचे गेले पाहिजेत. लोक नामस्मरण करीत नाहीत." या अनुभवामुळे असे वाटले की देह देहाच्या मार्गाने जाईल पण आतली अवस्था मात्र वेगळी राहील. म्हणजेच देहाचे अस्तित्व वेगळे आणि आतले वेगळे. व्हाइटहेडने विश्वभाषेबद्दल (Universal Language) सांगितले आहे. वाणीमुळेच माणसाला एवढे महत्त्व आले आहे. शब्दात किती सामर्थ्य असते! तथापि आपल्या सर्व वाणींपलीकडची जी विश्वभाषा आहे ती म्हणजेच नाम हे आपल्या लक्षात येत नाही.

श्री. अशोक खेर यांचे एक मित्र भेटायला आले होते. त्यांनी सांगितले ते सांगतो. त्यांच्या मुलाची मुंज श्रृंगेरीच्या श्रीशंकराचार्यांच्या मठात झाली. त्यांनी शंकराचार्यांना विचारले की आपला प्रधान उपदेश काय आहे? स्वामींनी त्यांना दुसऱ्या दिवशी सकाळी बोलावले आणि त्यांना आपल्या उपासनेच्या खोलीत घेऊन गेले. ते म्हणाले, मी आता केवल कुंभक करतो; जवळ बसून राहावे. थोड्या वेळाने त्यांना स्पष्ट ॐकार ध्वनी ऐकू येऊ लागला. सुमारे दहा मिनिटे झाल्यावर स्वामी म्हणाले, हे खरे सार आहे. मी संन्यासी असल्याने देवाच्या नामाऐवजी ॐकाराचा जप करतो. ॐकार आणि नाम एकच आहे. पू. बाबा म्हणाले की खरोखर हा त्यांना अनुग्रहच झाला. तुम्हाला अभ्यास करून सांगतो की नाम टिकवणे अवघड आहे. त्यासाठी तळमळ आणि प्रार्थना यांचा फार उपयोग होतो. प्रार्थना हे आपले शस्त्र आहे असे श्रीमहाराज म्हणत.

पू. बाबा आज बराच वेळ बोलले; तथापि हा सर्व वेळ ते अंतर्मुख आहेत असे जाणवत होते.

(श्रीमहाराजांनी प्रार्थनेला शस्त्र म्हटले आहे तर नाम हे निर्वाणीचे शस्त्र आहे असे तुकाराम महाराज सांगतात. या संबंधीचा एक अभंग असा :

गाये नाचे वाहे टाळी। साधन कली उत्तम हें॥ १॥
काय जाणों तरले किती। नाव आइती या बैसा॥ २॥

सायासाचे नाहीं काम। घेतां नाम विठोबाचे॥ ३॥
तुका म्हणे निर्वाणीचें। शस्त्र साचें हें एक॥ ४॥)

## ।५०६। (२० जुलै १९९७)

आज गुरुपौर्णिमा तथापि रविवार असल्यामुळे पू. बाबांनी सकाळी नऊ वाजता ज्ञानेश्वरीवरील निरूपण केले.

संध्याकाळी साडेचार वाजता आम्ही गेलो तेव्हां पू. बाबा खूप थकलेले दिसत होते म्हणून लगेच परत निघावयाचे म्हणून त्यांना नमस्कार करून आम्ही उभे राहिलो. पू. बाबा म्हणाले की बाकी सगळ्या गोष्टी सोडून फक्त नाम घ्यावे. एकसारखे नामाचे माप टाकत राहिले पाहिजे. भले आपले माप गळके असेल, पण एकसारखे टाकत राहिले की ते पाहून त्यांना दया येईलच की नाही? मुख्य अडचण म्हणजे proper valuation झालेले नाही, ते झाले पाहिजे.

आत्ताच आठवले ते सांगतो. गुरुदेव रानड्यांकडे दुसऱ्यांदा गेलो होतो तेव्हां त्यांचा ग्रंथसंग्रह पाहिला. अनेक भाषांतील - अगदी ग्रीक भाषेतलीही - पुस्तके होती. तीन कपाटे भरलेली होती, पण पुस्तकांवर धूळ जमलेली होती. त्यांना त्याबद्दल विचारले तेव्हां ते म्हणाले, अहो, नामाची खरी गोडी लागली की पुस्तकात काय आहे? त्या नुसत्या पत्रावळी आहेत!

**साधक प :** एकदा सत्य हाती आले की बाकीच्यात काय अर्थ वाटणार? जिला मूल झाले आहे ती बाहुलीशी कशाला खेळत बसेल!

**पू. बाबा :** आज श्रीमहाराजांची प्रार्थना करावी. नामात जीव रंगून जाऊ दे असे त्यांच्याकडे मागावे. हे जर केले नाही तर एवढ्या उत्सवाच्या अवडंबराला काय अर्थ आहे? कुणी मागत नाही; काय करावे! अभिमान, अहंकार नाहीसा करायला आज्ञापालन हाच उपाय आहे. कुणाचे तरी ऐकायला शिकले पाहिजे; मात्र तो कोणीतरी चांगला म्हणजे आपले हित जपणारा - आप्त पाहिजे.

## ।५०७। (२५ जुलै १९९७)

आम्ही गेलो तेव्हां पू. बाबा पलंगावर तक्क्यावर रेलून बसले होते. गुरुपौर्णिमेचा थकवा आहे, पाठ दुखते आहे. पावलांवर सूज आहे. पू. बाबा म्हणाले, आता सूज वर चढू लागली आहे आणि घट्ट आहे. आचरेकर वैद्यांचे औषध चालू आहे. त्यांनी मौक्तिक भस्म दिले होते पण बहुतेक त्यामुळेच

प्रोस्टेट ग्रंथी वाढू लागली म्हणून ते बंद करून आता पुनर्नवासव दिले आहे. पू. बाबा मोजके जेवण घेतात. दुपारी फक्त अर्धी पोळी, आमटी आणि भाजी, भात अजिबात नाही. एखादे फळ आणि दुपारी चार वाजता काढा घेतात आणि रात्री फक्त पाणी पितात. पू. बाबा म्हणाले, अशक्तपणा वाटतो पण पोट साफ असल्यामुळे मेंदू सतेज आहे. आज सकाळपासून थोडा ताप आहे पण नामस्मरण उत्तम चाललेले आहे. नाम चालले म्हणजे झाले, मग ताप असेना का असे ते म्हणाले. पुढे बोलण्याच्या ओघात म्हणाले की नामाची ऊब असते तोपर्यंत नाम छान चालते. पहाटे फार चांगले अनुभव येतात. दिवस वर आला आणि आजूबाजूला सगळ्यांचे व्यवहार सुरू झाले की काही वेळा या अनुभवांच्या खरेपणाबद्दल उगीचच शंका वाटू लागते.

नामातच श्रीमहाराज आहेत. बेलधडीच्या कृष्णराव इनामदारांच्या आईने ब्रह्मानंद महाराजांना श्रीमहाराजांनी देह ठेवल्यानंतर एकदा विचारले की महाराजांची भेट आता होईल का ? ते म्हणाले, नाम घ्या, नक्की भेट होईल. नंतर एक दिवस पहाटे त्या नाम घेत बसलेल्या असतांना श्रीमहाराज त्यांच्यासमोरून इकडून तिकडे जातांना दिसले. त्यांना वाटले की आपल्याला भास झाला, म्हणून त्यांनी ब्रह्मानंद महाराजांना विचारले तेव्हा ते म्हणाले, अहो, नामातच ते आहेत. ते आणि नाम भिन्न नाहीत.

**साधक क :** स्वामी रामदासांनी सांगितले आहे की नामाला वाहून घेतलेल्या एका अशिक्षित बाईंच्या खोलीत त्यांच्या मृत्यूनंतरही नाम ऐकू येत होते. ते ऐकण्यासाठी नंतर त्या बाईंचे गुरूही तेथे येऊन गेले.

**साधक म :** त्या अनपढ होत्या म्हणूनच गुरूंनी सांगितले त्याबद्दल त्यांच्या मनात निष्ठा उत्पन्न झाली. आपले वाचन संशय निर्माण करून आपला घात करते.

**पू. बाबा :** एकसारखे नाम घेतले पाहिजे आणि त्याकरिता सावधानता पाहिजे. श्रीमहाराज द्यायला तयार आहेत पण आपणच कमी पडतो. श्रीमहाराजांच्या पावलांपाशी सकाळी गुलाबाची फुले होती ती पाहून बहुधा ब्रह्मानंद बोवानी नाहीतर आनंदसागरांनी मानसपूजा केलेली दिसते असे ते म्हणाले. ही दोनच नांवे त्यांनी घेतली. मानसपूजेतून खरी फुले आली, ही खरी मानसपूजा! (पहा : अध्यात्म संवाद भाग ४ संवाद क्र. ४३४). श्रीमहाराजांचे अस्तित्वही ह्या मानसपूजेतून आलेल्या फुलांइतकेच खरे आहे. पण आपला भाव कमी पडतो. चालवीसी हाती धरूनिया हे काव्य नव्हे; हा तुकाराम महाराजांचा अनुभव आहे. पांडुरंग त्यांच्याबरोबर चालू लागण्याच्या आधीच्या

अवस्थेत ते म्हणाले, "तुका म्हणे मज आहे हा भरंवसा। विठ्ठल सरिसा चालतसे॥" ह्या भरंवशामुळेच विठ्ठलाला त्यांच्याबरोबर राहावे लागले!

आणखी एक गोष्ट. आपल्या पायांशी गुलाबाची फुले आहेत याचा श्रीमहाराजांना पत्ताच नव्हता. त्यांची विदेही स्थिती होती. सचिवालयातील श्री. पाटील यांच्यावर त्यांच्या शिपायाने चाकूचा वार केला. त्यांना हॉस्पिटलात नेत होते तेव्हां ते काय करत होते असे श्रीमहाराजांनी विचारले. बेशुद्ध होण्याच्या आधी ते नाम घेत होते असे सांगितल्यावर ते म्हणाले, त्यावेळी मी तेथेच होतो. जेथे नाम तेथे ते असतातच. त्यांच्या सर्वव्यापित्वाचे त्यांना भान असायलाच पाहिजे असे नाही. (पहा : अध्यात्म संवाद भाग ३ संवाद क्र ३३७) म्हणून त्यांचा सहवास पाहिजे असेल तर सतत नामस्मरण केले पाहिजे. त्याच्या आड आपणच येतो. उगीच जगाचे निमित्त सांगण्यात काही अर्थ नाही.

देह ठेवल्यानंतर बारा वर्षांनी श्रीमहाराज पुन्हा वाणीरूपाने आले आणि पू. तात्यासाहेबांच्या मुखाने बोलू लागले याचे कारण त्यांना विचारले होते तेव्हां ते म्हणाले की ज्या एकासाठी आलो त्याच्यासाठी पुन्हा जन्म घेऊन येण्याइतकी सवड नव्हती. पुन्हा जन्म म्हटले की अज्ञानाचे पांघरूण आले आणि फलोन्मुख प्रारब्ध इत्यादी गोष्टी आल्याच. उदाहरणार्थ, तुकाराम महाराज साक्षात्कारी संत झाले पण आयुष्यातला सुरुवातीचा काळ त्यांना प्रापंचिक कटकटीतून जावे लागले. वास्तविक त्यांनी म्हटले आहे की "मागें बहुतां जन्मीं। हेचि करित आलो आम्हीं। भवतापश्रमीं। दुःखी पिडले निववूं त्या॥" तरीदेखील पुन्हा जन्म घेतल्यावर प्रारब्धाचा झटका त्यांना सोसावा लागलाच!

## |५०८| (२७ जुलै १९९७)

आमच्यापैकी एक साधक त्यांच्या एका साधक मित्राला घेऊन पू. बाबांना भेटायला गेले होते. या साधक मित्रानी पू. बाबाना सांगितले की दोन वर्षांपूर्वी त्यांनी श्रीमहाराजांचे चरित्र वाचले आणि तेव्हांपासून ते नियमित जप करतात. आता जप आपोआप होतो. ते परशुरामाचा जप करतात. अद्यापि कोणाचाही अनुग्रह घेतलेला नाही. आध्यात्मिक प्रगतीसाठी काय करावे असे त्यांनी पू. बाबांना विचारले.

पू. बाबा म्हणाले की मागचे दोन जन्म तुम्ही श्रीसमर्थांची उपासना केलेली आहे असे मला दिसते. सध्या जप करता तो तुमचा मंत्र नाही. तुमचा तेरा अक्षरी मंत्र आहे. ज्या देवतेचा जप करावा तिचे गुण अंगी येतात. ब्रह्मानंद

महाराजांकडे श्रीविरूपाक्ष नांवाचे एक गृहस्थ होते. ते उग्र देवीचा जप करीत. त्याचा परिणाम त्यांच्यावर होऊन ते उग्र बनले. ज्या देवतेचा जप करायचा ती देवता सात्त्विक, त्रिगुणातीत, पूर्ण ज्ञानी असावी. तुम्ही सज्जनगडला किंवा गोंदवल्याला जाऊन अनुग्रह घ्या.

त्यांनी विचारले की अनुग्रह होईपर्यंत सध्याचा जप चालू ठेवू का? पू. बाबांनी नको म्हणून सांगितले. ते म्हणाले लगेचच तेरा अक्षरी मंत्राचा जप सुरू करायला हरकत नाही.

**|५०९|** (१ ऑगस्ट १९९७)

आम्ही गेलो तेव्हां पू. बाबा डोळे मिटून पडले होते. नामात रंगलेले असावेत कारण आम्ही तेथे उभे असल्याचे त्यांना काही वेळाने जाणवले आणि त्यांनी डोळे उघडले. दोन्ही पावलांवर खूप सूज आहे; वर चढली आहे. बोटाने दाबले की त्या जागी खळगा पडतो आणि थोड्या वेळाने पूर्ववत सूज दिसू लागते.

**पू. बाबा** : आज सकाळी खूप त्रास होत होता. तथापि नामस्मरण मात्र छान चालले आहे. नामाचा देहाच्या स्थितीशी तसा संबंधच नाही. नाथांनी म्हटले आहे, "सेवोनि नामाचें अमृत। एका जनार्दनी झाला तृप्त। म्हणोनी सर्वांसी सांगत। नाम वाचें वदावे॥" नामाचे अमृत पिऊन तृप्त झाले आहेत. शरीराची स्थिती काही का असेना, नाम चालावे. मस्त पडे है अशी नामाची खुमारी आली पाहिजे. कबीरांचे एक पद आहे, त्यात ते म्हणतात : "मन मगन भया अब क्यों बोले॥ मानसरोवर हंसा बैठे ताल तलैया क्यों डोले। सुरत कलाली भई मतवाली नशा पी गई बे तोले॥" सुरत म्हणजे जीव आणि कलाली म्हणजे दारू विकणारी स्त्री. जीव हाच कोणी दारू विकणारी स्त्री आहे. त्या जीवानेच बे तोले म्हणजे (नामाची) अमाप दारू स्वत:च प्राशन केली आणि असा मस्त होऊन गेला की त्याची वाचाच बंद झाली. जीवालाच हंसही म्हणतात. तो मानसरोवरात (परमात्मरूपात) विहार करू लागला की बाकीच्यांचे कामच राहात नाही. गुरुदेव रानड्यांनी म्हटले आहे ते खरे आहे. आध्यात्मिक अनुभवांची श्रीमंती पाहायची असेल तर महाराष्ट्रात ज्ञानेश्वर महाराज आणि उत्तरेत कबीर हे श्रेष्ठ आहेत. ज्ञानेश्वर महाराजांनी कितीतरी अभंगांतून त्यांना आलेले अनुभव सांगितले आहेत..

पू. बाबा पुढे सांगू लागले, आज सकाळी बरे वाटत नव्हते. नाम घेत पडलो होतो आणि एकाएकी मनात फ्लॅश आला की ॐकार हे मूळ नाम आहे.

ज्ञानेश्वर महाराजांनी त्याला आदिबीज म्हटलेले आहे. अस्तित्व हे या ॐकाराचे स्वरूप किंवा अर्थ आहे. कोरे अस्तित्व. त्यातून मग सर्व काही आलेले आहे. ह्यालाच Being म्हणतात. नाम घेणे म्हणजे त्या अस्तित्वापाशी पोचणे आहे. ते सद्गुरूंचे स्वरूप आहे. नाम हा महाराजांचा आवाज आहे असे ब्रह्मानंद महाराज म्हणाले. तुम्हाला काय वाटते ? की मी माझे म्हणणे तुमच्यावर लादतो आहे ? तसे नव्हे; हा अनुभव नाही, पण बुद्धीच्या पातळीवरदेखील हा अर्थ लक्षात आल्यावर मला फार आनंद झाला. गौडपादांच्या कारिकेवरील विवरणात अखण्डानन्दानीही ॐकाराला अस्तित्व म्हटले आहे. कठोपनिषदातही ॐकाराचे महत्त्व सांगितलेले आहे. भगवद्गीतेच्या आठव्या अध्यायात ॐकाराला एकाक्षर ब्रह्म म्हटलेले आहे. "ॐइत्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन्। यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम्॥८.१३॥"

साधन करावेसे वाटते पण दृश्याचे दडपण येते आणि त्यामुळे साधन होत नाही. या संदर्भात साधक प म्हणाले की दृश्य एकसारखे बदलते आहे आणि त्याबरोबर मीही सारखा बदलतो आहे - नव्हे, रोज माझा मृत्यू होतो आहे आणि त्यामुळे शाश्वत असलेले नाम मला धरून ठेवता येत नाही; कारण आत जग भरलेले आहे. चित्तशुद्धीखेरीज नाम स्थिर होणार नाही.

**पू. बाबा :** वृत्तींपर्यंत पोचल्याखेरीज नाम स्थिर होणार नाही. वृत्तींपर्यंत नाम पोचणे हा खरा परमार्थ आहे.

**साधक क :** आमची वृत्ती वासना घेऊनच येते. वासना क्षीण झाल्या पाहिजेत.

**पू. बाबा :** म्हणूनच वृत्तीच्या तोंडी नाम द्यावे असे श्रीमहाराजांनी सांगितले आहे. माझ्याकडे एक व्यापारी येतात. त्यांच्या व्यवहारात काही कमजास्त झाल्यामुळे ते इतके अस्वस्थ झालेले आहेत की झोपेतून ते दचकून उठतात असे त्यांची पत्नी सांगत होती. म्हणजे ही चिंता तीन्ही अवस्थात गेलेली आहे. तसे नामाचे झाले पाहिजे. नामाचा ध्यास लागला पाहिजे. श्री. भाऊसाहेबांना (केतकर) तो लागला होता. केवळ महाराजांना आवडते म्हणून ते नाम घेत होते. महाराजांनी जे सांगितले ते जसेच्या तसे त्यांनी मानले. त्यातून ते अर्थ काढत बसले नाहीत. त्या दृष्टीने आपली श्रद्धा कमी पडते. वास्तविक आपले सगळ्यांचे संसार झालेले आहेत. प्रकृतीची किंवा पैशाची तशी अडचण नाही. तेव्हां आत्ता केले नाही तर केव्हां करणार ?

द्वितीयात् भयम्च्या संदर्भात पू. बाबा म्हणाले की सार्त्रनेही The other is Hell असे म्हटले आहे. असे असले तरी भक्ताला मात्र वेगळे राहूनच भगवंताचे

प्रेम भोगावेसे वाटते. जीव आणि परमात्मा 'ऐक्यासनी' असतात पण तरी वेगळेपणाने राहातात. हे सगुणाचे प्रेम होय.

### |५१०| (८ ऑगस्ट १९९७)

पू. बाबांची प्रकृती खालावलेलीच आहे. पावलांवरची सूज आता बरीच वर चढली आहे. ॲनिमिया आहे; तथापि हेमोग्लोबीन ११% आहे. कोणतेही औषध, टॉनिक सोसत नाही. प्रकृतीची चौकशी केल्यावर ते म्हणाले, मला खाली कशाला ओढता? माझे नाम चांगले चालू आहे. बुधवारी दि. ६ रोजी साधक प पू. बाबांना भेटायला गेले होते तेव्हां त्यांना म्हणाले होते की एकसारखे नाम घ्यावेसे वाटते, पण ते होत नाही. आणि नाम चालते तेव्हांही ते खोल जात नाही. त्यांच्या ह्या अडचणींचा उल्लेख करून त्या संदर्भात पू. बाबांनी अलिकडे घडलेली एक घटना सांगितली.

श्रीमहाराजांचे एक अनुग्रहीत होते. खूप जप करीत असत. त्यांची पत्नी गुरुदेव रानड्यांची अनुग्रहीत. त्याही कष्टाने नाम घेत. त्यांना तीन मुली. तिघींचीही लग्ने झालेली. शेवटच्या आजारात हे गृहस्थ एकसारखा जप करीत होते. त्यांचा अंतकाळ जवळ आला तेव्हां बाईंची तयारी इतकी की त्या शेजारच्या खोलीत जाऊन जप करत बसल्या. तासभर त्यांचे देहभान गेले होते. भानावर आल्या तेव्हां नवरा गेल्याचे कळले. म्हणजे नाम किती खोल गेले होते पहा! आता पुढची हकिगत सांगतो म्हणजे साधक कसा गुंतलेला असला तर खाली घसरतो ते लक्षात येईल. ह्या बाईंचा एक जावई एक्झिक्यूटिव्ह एंजिनिअर होता. चांगला माणूस. मूलबाळ नव्हते. तो आणि त्याची बायको स्वत:च्या मोटारीने निंबाळला गेलेले असतांना मोटारीला अपघात झाला. बाई (म्हणजे या बाईंची मुलगी) अपघाताच्या जागीच गेली. गृहस्थांना सोलापूरला हॉस्पिटलात ठेवले होते. कोमात होते. पुढे आठ दिवसांनी तेही गेले. त्यांचे स्वत:चे घर होते. त्यांनी केलेल्या मृत्युपत्रानुसार या बाई जावयाच्या घरात राहू लागल्या. जावयाच्या भाऊबंदानी पोलिसांची मदत घेऊन त्यांना घरातून हुसकावण्याचा प्रयत्न केला. भाऊबंदांच्या गुंडगिरीमुळे त्या घाबरल्या आहेत आणि त्यामधे आत्तापर्यंतचे सगळे नाम, सगळे साधन गायब झाले आहे. रात्री अपरात्री उठून बसतात. भीती वाटते. वास्तविक त्या घराशी त्यांचे काही देणे घेणे नाही. त्या घराशिवाय त्यांचे काही अडलेले आहे असेही नाही. तथापि कशा गुंतल्या आहेत पहा! घराच्या पायात आत्तापर्यंत केलेल्या साधनाचे नुकसान झाले आहे याचा

पत्ताच नाही. तेव्हां साधक यांची अडचण बरोबर आहे. नाम अखंड पाहिजेच पण ते खोल गेले पाहिजे. आणि श्रीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे साधकाने अखंड सावध राहिले पाहिजे तरच काही अडचणी आल्या तरी नाम शेवटपर्यंत टिकेल. प्रपंचात अडचणी येणारच. काही नाही तरी प्रकृती खालावणार. तेव्हां ते कसे साधायचे पहा. नाम ही top priority झाली पाहिजे.

**साधक क** : अखंड नामस्मरण होण्यासाठी आणि ते खोल जाण्यासाठी ते व्यापक झाले पाहिजे. आपण जीवनाचे कप्पे करतो. तसे न करता, सर्व जीवन नामाने व्यापले पाहिजे. कृष्णमूर्ती Holistic view किंवा Totality म्हणतात ती हीच.

**साधक ग** : कान्हनगडच्या माताजी कृष्णाबाईंनी अखंड नामस्मरणाचा अभ्यास करतांना त्याला आणखी दोन गोष्टींची जोड दिली. सर्व प्राणिमात्रात 'पपांना' (त्यांचे गुरु स्वामी रामदास) पाहण्याचा प्रयत्न केला आणि त्याचबरोबर प्रत्येक कर्म ही त्यांचीच सेवा आहे असा भाव वाढविला.

**पू. बाबा** : अखंड नामस्मरणामधे आपणच आपल्या आड येतो. अगदी क्षुल्लक गोष्टींमुळे नाम विसरतो.

**साधक प** : सर्व गोष्टीत आणि घटनात श्रीमहाराजांना पाहायचा प्रयत्न केला तरच अनुसंधान टिकेल. एकांतात जाऊन राहातात त्यांची गोष्ट वेगळी.

**साधक क** : आपण एकसारखा प्रयत्न करीत राहिलो आणि प्रयत्न करूनही नाम टिकत नाही असे झाले तरी त्यांना करुणा येईल. तुलसीदासांच्या काही पदांत हा भाव आहे.

**साधक प** : (पू. बाबांना) तुम्ही नामाची प्रार्थना करावी म्हणता. श्रीमहाराजांची प्रार्थना करावी हे समजते पण नामाची प्रार्थना कशी करायची ?

**पू. बाबा** : नाम हे शक्तिरूप आहे हे आपल्या लक्षात येत नाही. आज आपल्या तोंडात जे नाम येते ते श्रीमहाराजांच्या कृपेनेच येते. त्यांनी आपल्याला शक्तिरूप नाम दिलेले आहे. नाम आणि श्रीमहाराज वेगळे नाहीतच. म्हणून तुम्ही सदैव माझ्याजवळ राहा अशी श्रीमहाराजांची प्रार्थना करणे जसे शक्य आहे तसे माझ्या मुखात सदैव राहा असे नामालाच अपील करावे; त्याची विनवणी करावी.

## ।५११। (१५ ऑगस्ट १९९७)

आम्हीं गेलो तेव्हां पू. बाबा पलंगावर पायाखाली उशा घेऊन झोपले होते. पायांना व पावलांना रग लागते. पावलांवरची सूज वाढली आहे. पाठही दुखते

आहे. मधूनच दु:खाचा सुस्कारा सोडतात. आम्ही गेल्यावर ते किंचित उठून बसले.

**पू. बाबा :** (साधक प ना) तुमच्या अडचणीवर विचार करत होतो, त्याचे उत्तर कृष्णमूर्तींच्या लेखनात मिळाले. उत्तर तसे नवीन नाही. शंकराचार्यांनी चर्पटपंजरिकेत हेच प्रश्न विचारलेले आहेत. "कस्त्वं कोऽहम् कुत आयात:। का मे जननी को मे तात:।" इत्यादी. मी कोण हे जाणणे हा परमार्थ आहे. प्लेटोच्या ॲकेडमीवर **Man, Know Thyself** असे वाक्य होते. उपनिषदांनीही आत्मानं विद्धि असे सांगितलेले आहे. या बाबतीत नाशिकच्या बाळशास्त्री फडक्यांशी श्रीमहाराजांचे संभाषण झाले होते ते आठवते; ते सांगतो. काय महाराजांचे ज्ञान होते! खरोखर अचंबा वाटतो. झाले असे : श्रीमहाराजांचे आणि बाळशास्त्र्यांचे संभाषण चालू होते. संभाषणाच्या ओघात बाळशास्त्री म्हणाले, परमार्थात 'मी कोण' शोधायचे आहे. महाराज म्हणाले, नव्हे, 'मी कोण' ओळखायचे आहे. म्हणजे ओळखणारा कोणीतरी वेगळा असला पाहिजे. तो जर वेगळा असला तर तो कोठे आहे? की तो हरवला आहे? शास्त्रीबोवा म्हणाले की महाराज त्याचे विस्मरण झाले आहे ते पुन्हा स्मरण करून घ्यायचे आहे. वेदान्ताने यासाठी साधनचतुष्टय सांगितले आहे. १) आत्मानात्मविवेक २) इहामुत्रफलभोगविराग ३) शमादि षट्क आणि ४) मुमुक्षुत्व. पू. बाबा म्हणाले थोडक्यात म्हणजे विवेक; वैराग्य; शम, दम, तितिक्षा, श्रद्धा, उपरति, समाधान आणि आत्मज्ञानाविषयी इच्छा ही सगळी तयारी झाली की माणूस आत्मज्ञानाचा अधिकारी होतो. पू. बाबांनी विचारले की असे असले तर प्रपंचात राहून आत्मज्ञान करून घेणे शक्य आहे की नाही?

पू. बाबांच्या ह्या प्रश्नावर सर्वांचे म्हणणे हे शक्य असलेच पाहिजे असे होते. कारण प्रपंचाची हेळसांड करा असे श्रीमहाराजांनी कोठेही सांगितलेले नाही. ज्याला प्रपंच नीट करता येणार नाही त्याला परमार्थही जमणार नाही असे ते म्हणत. अग्निब्राह्मणाच्या साक्षीने लग्न करता तो प्रपंच परमार्थाला बाधक कसा होईल? श्रीमहाराज सांगतात की सुखाने प्रपंच करा पण त्यात रामाला विसरू नका. प्रपंच बाधत नाही; प्रपंचाची आसक्ती बाधते. ती आसक्ती तेवढी प्रपंचातून काढून भगवंताकडे लावा असे महाराज म्हणत.

श्रीमहाराजांनी साधनचतुष्टयाच्या संदर्भात हा प्रश्न बाळशास्त्र्यांना विचारला. ते म्हणाले की ज्यांचे साधनचतुष्टय झालेले नाही त्यांनी काय करायचे? बाळशास्त्री म्हणाले, महाराज, मला माहीत नाही. तेव्हां श्रीमहाराज

म्हणाले, नामस्मरणातून विवेकवैराग्यादि येतात. तथापि 'मी' चा विसर का पडला आहे? फडकेशास्त्री म्हणाले, माया हे त्याचे कारण आहे. श्रीमहाराज म्हणाले, माया हा मोठा शब्द झाला. 'मी' चा विसर पडण्याचे कारण अविद्या आहे. नामस्मरणाने ही अविद्या नाहीशी झाली की 'मी' आहेच. त्याचे तादात्म्याने ज्ञान होते.

**साधक प** : देहबुद्धीतदेखील तादात्म्य आहे. मी पाहातो तेव्हां डोळ्यांनी पाहातो, ऐकतो तेव्हां कानांनी ऐकतो. तथापि मी पाहिले म्हणतो तेव्हां डोळ्यांनी पाहिले असा भाव नसून 'मी' पाहिले असाच भाव असतो.

**साधक क** : देहबुद्धी नाहीशी होण्यासाठी देहाकडे साक्षीभावाने पाहाता आले पाहिजे. जगाकडे आणि स्वत:कडे पाहातांना साक्षीभाव पाहिजे.

**पू. बाबा** : सद्गुरूंनी मार्ग दाखवला तरी परमार्थातील प्रवास ज्याचा त्यानेच करायचा आहे. एकट्याने करायच्या ह्या प्रवासाचे कृष्णमूर्तींनी चांगले वर्णन केलेले आहे. पूर्वी मी वाचून दाखवले होते, पुन्हा ऐका : (पहा : अध्यात्म संवाद भाग ३ संवाद क्र.२५० मधील पृष्ठ क्र. ३२ वरील It is a Journey (Saanen 1964 p.7 हा उतारा)

उतारा वाचून झाल्यावर पू. बाबा म्हणाले, श्रीमहाराज म्हणत की प्रपंचाच्या गोष्टी बोलतांना माझे ओठ करपतात आणि तरीदेखील मला तेच करावे लागते. खरोखर इतका त्रास होत असूनही श्रीमहाराज सामान्य प्रापंचिकांना उपदेश का करीत होते?

**साधक ज** : त्यांना त्रास होत होता, तथापि अज्ञानी जीवांबद्दल त्यांना अपार करुणा होती.

**पू. बाबा** : एक गंमत सांगतो. नुकत्याच एक बाई भेटायला आल्या होत्या. रिझर्व बँकेत ऑफिसर आहेत. त्या म्हणाल्या की तुम्ही सांगता तसा जप करते आहे तरी अजून माझ्या घराच्या व्हरांड्याचे काम होत नाही! तुम्ही सांगा, त्यांना काय सांगायचे?

## |५१२| (५ सप्टेंबर १९९७)

पू. बाबांची प्रकृती आणखी बिघडली आहे. पण आज ते फार प्रसन्न दिसत आहेत.

**पू. बाबा** : एक जुनी गोष्ट आठवली, ती सांगतो. एकदा पू. तात्यासाहेबांना ताप आला होता. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, याला ताप आहे, निरूपण नको.

पोथी दुपारी काढा. दुपारी मी ज्ञानेश्वरीतील बाराव्या अध्यायाची सुरुवात काढली. त्यात ज्ञानेश्वर महाराजांनी गुरुकृपेला वंदन केलेले आहे. त्याबद्दल सांगतांना पू. तात्यासाहेबांच्या तापाचा विषय माझ्या मनात होता. मला मधेच थांबवून श्रीमहाराज म्हणाले ते त्रिताप (आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक) असतात ना, त्यातला हा एक. त्याला काय घाबरायचे? पुढे म्हणाले, आपण देहाला फार महत्त्व देतो. त्याचे भोग हे पूर्वकर्माचे फळ असते हे जाणून शांत राहावे. माझ्या मनात आले की कोणत्या कर्माचे हे फळ आहे हे कुठे समजते? लगेच श्रीमहाराज म्हणाले, समजा, अमुक कर्माचे फळ असे जरी समजले तरी मनाची खुटखुट राहातेच. दु:खाचा भोग नको असेच वाटते. म्हणजे कारण समजून देखील समाधान होतच नाही. त्याकरता रामाच्या इच्छेने होते असे म्हटले तरच समाधान होईल.

पू. बाबा पुढे म्हणाले, कालच एका बाईचा फोन आला होता. पंधरा दिवसांपूर्वी खूप पाऊस झाला आणि लोकल गाड्या बंद पडल्या आणि त्यांची मुलगी बाहेर गेली होती ती घरी परत आली नाही. त्यांना फार काळजी वाटू लागली. नंतर श्रीमहाराजांची मानसपूजा करतांना त्यांना झोप लागली. झोपेत स्वप्न पडले. स्वप्नात त्या श्रीमहाराजांजवळ बसून रडत होत्या. श्रीमहाराजांनी त्यांना कुशीत घेऊन सांगितले, काळजी करू नये आणि त्यांना लगेच शांत वाटू लागले. दुसरे दिवशी सकाळी सात-आठ वाजता मुलगी घरी आली. त्या आनंदात बाईंना श्रीमहाराजांचा विसर पडला आणि दुपारी बारा-एक वाजता श्रीमहाराजांची आठवण झाली. मी तुम्हाला विचारतो की अनुसंधान ठेवण्यासाठी काय करावे? अनुसंधान चुकले तर ते श्रीमहाराजांना आवडणार नाही असे वाटावे. तुम्हाला सांगतो, माझे अनुसंधान चुकले तर बरेचदा मला रडू येते. अनुसंधानाचा अभ्यास करणे जरूर आहे. आता अनुभवाने सांगतो, म्हातारपण फार कठीण आहे. आत्ता हा जो आजार आहे तो मला शिकविण्यासाठी श्रीमहाराजांनी पाठवला आहे असेच खरोखर वाटते. नामस्मरण जास्त आणि छान होते आहे; मरणाची भीती वाटत नाही. पण आजारपण श्रीमहाराजांच्या कृपेने आले आहे असे मात्र वाटत नाही. बाकी सर्व गोष्टी छान चालू आहेत. माणसे भेटायला आली तरी अनुसंधान टिकते आहे.

**साधक क :** गेल्या आठवड्यात गोंदवल्यास गेलो होतो तेव्हां तेथे नामाची जी तीव्रता होती ती इथे टिकत नाही

**पू. बाबा :** यावर काय करावे?

**साधक प** : मला वाटते, रोजच्या सर्वसामान्य घटना घडत असतांनाच त्यांची अनित्यता जाणवली पाहिजे.

**पू. बाबा** : शिवाय त्यामधे श्रीमहाराजांचा हात दिसला पाहिजे. मी श्रीमहाराजांचा आहे हे जाणिवेत आले म्हणजे काम झाले. आपले पूर्ण समर्पण होत नाही. हातचे काही राखून ठेवू नये. इथून श्रीमहाराजांकडे जाणार अशी भाऊसाहेबांची भावना स्थिर झालेली होती. हे साधायला हवे. मग मरणाची भीती नाही. 'मी' किंवा अहंकार कसा मारायचा याबद्दल उदाहरण देतांना श्रीमहाराज म्हणाले, सर्कशीमधे बाईला तक्त्यासमोर उभी करून चाकू असे मारतात की ते तिला न लागता बाजूला लागतात. तसे नको तेव्हढे गळून पडायला हवे.

## |५१३| (दि. १२ सप्टेंबर १९९७)

पू. बाबांना बरे वाटत नसल्यामुळे आज येऊ नका असा त्यांनी निरोप पाठवला होता. पण काहीजणांना निरोप मिळाला नाही त्यामुळे ते मालाडला गेले होते, त्यांच्याशी पू. बाबा थोडा वेळ बोलले.

**पू. बाबा** : रात्री उठल्यावर वाटले, माझ्यावर श्रीमहाराजांची कृपा आहे का? वाटले, इतके सर्व लिखाण, निरूपण होते ते त्यांच्या कृपेनेच होते. पण पुन्हा यात कसली कृपा असेही वाटले. नंतर आजार त्यांच्या कृपेने आला असे वाटले आणि मनापासून त्याचा स्वीकार झाला आणि मन शांत झाले. असे वाटले की आता अंतकाळ आला तर? तर नाम शेवटी यावे किंवा नामात अंतकाळ व्हावा असे वाटले. पण नंतर मनात आले की जगाच्या कल्पना आहेत त्यांचे काय होते? की त्याही बरोबर येतील. मग कळून आले की मला जग अजूनही खरे वाटते आणि याचा अर्थ मी जगात गुंतलो आहे.

**साधक प:** : जगाचे खरेपण देहावर अवलंबून असल्याने देहाला काही झाले तर बाकीचे काही गोड लागत नाही.

**पू. बाबा** : मदरच्या एका वाक्यात अगदी trivial - क्षुल्लक गोष्टी देखील त्याच्या इच्छेने घडतात असे वाटू लागले की अनुसंधान टिकते असे म्हटले आहे. अनुसंधान व्यापक झालेच पाहिजे.

गेले चार-पाच दिवस पू. बाबांना फारच त्रास झाला; आत्ताही होतो आहे. तरीदेखील ते अतिशय प्रसन्न आहेत.

|५१४| (दि. १९ सप्टेंबर १९९७)

पू. बाबांची प्रकृती अद्यापि ठीक नाही. पावलांवर, पिंढऱ्यांवर, मांड्यांवर सूज आहे. तक्क्याला रेलून बसले आहेत. पिंढऱ्यांखालीही उशा घेतल्या आहेत. त्रास होतो आहे पण तरीदेखील मुद्रा प्रसन्न आहे.

**पू. बाबा :** काही जुन्या आठवणी सांगतो.

(१) सध्या इथं राहातो ह्या जागेच्या पहिल्या मालकास - दामोदरदास यांना कृष्णदास नावाच्या मुलगा होता. स्वभावाने फार चांगला होता; पुष्कळ जप करत असे. त्याला मूलबाळ नव्हते. एकदा तो त्याच्या पत्नीसह गोंदवल्यास गेला. जुनी गोष्ट; त्या वेळी तिथे काही आजच्यासारख्या सोयी नव्हत्या. मातीची घरे, शेणाने सारवलेल्या जमिनी, ढेकूण, डास सगळं काही होतं. तो जातांना काही भांडीकुंडी, गाद्या, डासांचा त्रास होऊ नये म्हणून मच्छरदाण्या इत्यादी घेऊन गेला होता. ते सगळे सामान पाहून श्रीमहाराज म्हणाले, बरोबर मुंबई आणायची असेल तर गोंदवल्याला कशाला यायचे! ह्या कृष्णदासाला लोणावळ्याला अकाली मृत्यू आला. त्याचे प्रेत येथे आणले तेव्हां श्रीमहाराज त्याला जिवंत करतील अशी दामोदरदासांना आशा होती. त्यांनी तसे सुचविल्यावर श्रीमहाराज म्हणाले, वेड्यासारखे काहीतरीच काय सांगता? जे घडते ते प्रारब्धानुसार घडते.

(२) I. C. S. सुखटणकर काही काळ बिहारचे गव्हर्नर होते. त्यांचा मुलगा सीनिअर केंब्रिजची परीक्षादेखील पास झाला नाही याचे त्यांना दु:ख होते. एकदा ते आणि त्यांची पत्नी श्रीमहाराजांना भेटायला आले. बोलण्याच्या ओघात श्रीमंतीचा विषय निघाला तेव्हां श्रीमहाराजांनी चार प्रकारची श्रीमंती सांगितली.

(अ) वस्तूंची श्रीमंती. पैसा, घरेदारे, सोनेनाणे इत्यादींमुळे येणाऱ्या श्रीमंतीतही माणसांना असुरक्षित वाटते; समाधान तर नसतेच,

(ब) मनाची श्रीमंती ही त्यापेक्षा श्रेष्ठ आहे. वस्तूंची श्रीमंती नसतानाही काही माणसे स्वाभाविकपणे मनाने श्रीमंत आणि उदार असतात. पू. बाबा म्हणाले, एक भटजी होते. सामान्य उदरनिर्वाह चालायचा. पण लोकांनी काही वस्त्रे - धोतर, शाल इत्यादी दिले की ती ते कोणाला तरी देऊन टाकयचे! त्यांची पत्नीही त्यांना शोभेशी होती. तांब्याची भांडी वगैरे दान म्हणून आली की ती भांडी कोणाला तरी गरीबाला देऊन टाकायची. म्हणजे वस्तूची श्रीमंती

असली तर माणूस मनाने श्रीमंत असतोच असे नाही. पण तो मनाने श्रीमंत असेल तर त्याचे वस्तूसाठी अडत नाही.

(क) श्रीमहाराजांनी सांगितलेली तिसरी श्रीमंती विचारांची. काही माणसांना नवे भव्य, दिव्य विचार सुचतात. मात्र त्यानुसार त्यांचे आचरण असेलच असे नाही. पण संतांचे मात्र तसे नसते. भगवंताचे विचार हे उच्च विचार. ते संतांजवळ असतात आणि त्या उच्च, दिव्य विचारांप्रमाणे त्यांचे आचरणही असते. विचाराने श्रीमंत असलेली कित्येक मोठी माणसे व्यवहारात अति सामान्य असतात.

(ड) प्रेमाची श्रीमंती ही संत सत्पुरुषांपाशीच आढळते. आपण आपल्या मुलाबाळांवर प्रेम करतो त्यापेक्षा कितीतरी पटींनी जास्त प्रेम ते त्यांच्या सहवासात आलेल्या जीवांवर करतात. कित्येकदा त्यांच्याजवळ राहाणाऱ्या लोकांना त्याची किंमतही वाटत नाही किंवा समजत नाही, पण ते संतांचे निरपेक्ष प्रेम भोगत असतात. श्रीमहाराज त्यांच्याजवळ असलेल्या माणसांपैकी काही माणसांबद्दल एकदा म्हणाले होते की ही माणसे बाहेर गेली तर खून पाडतील. पण त्यांच्यावरही श्रीमहाराजांनी प्रेम केले. संतांचे प्रेम ज्यांना लाभले आणि समजले ते धन्य होत.

नंतर चर्चा पू. बाबांच्या आजाराकडे वळली. पू. बाबा म्हणाले, वेगवेगळ्या तपासण्या झाल्या पण अजूनही डॉक्टरांना आजाराचे निदान होत नाही. ते सांगतात ती औषधे मी घेतो, पण माझी खात्री झाली आहे की श्रीमहाराजांनी मला शिकविण्यासाठीच हा आजार दिला आहे. आता काही वेळा तरी त्यांच्या कृपेने झाला आहे असे वाटते आणि बरा झालो तर त्यांच्या कृपेने, औषधाने नव्हे असे खात्रीने वाटते. माझा जप चांगला चालला आहे, अनुसंधानही अखंड टिकते आहे. परवादिवशी मानसपूजा करतांना श्रीमहाराजांची लंगोटी लावून डाव्या हातात कुबडी घेऊन उच्चासनावर बसलेली गुटगुटीत मूर्ती डोळ्यांसमोर होती. त्यांचे ते रूप मला फार आवडते. मानसपूजा करतांना एका बाजूस नाम चालू होतेच आणि पहाता पहाता ती मूर्ती नामात विलीन झाली! मला नामात पहा असे श्रीमहाराज म्हणतात तथापि आपल्याला दृश्याचा अडथळा ओलांडून जाता येत नाही. मग मी विचार करू लागलो की महाराजांचे स्वरूप काय आहे? आणि मला वाटले की ह्या विश्वाला चालवणारी एक विराट शक्ती आहे आणि ती शक्ती ज्या व्यक्तीमधे प्रत्यक्ष अवतरते ती व्यक्ती म्हणजे आपले गुरु होत. विश्वाला चालवणाऱ्या शक्तीची आपण कल्पना करू शकत नाही, पण

गुरूंचा अखंड सहवास झाला तर त्या विश्वशक्तीत आपला समावेश होईल. त्यासाठी बाकी सर्व सोडून अखंड नामस्मरण करणे हाच उपाय आहे. वाचनाने घडणारी ही गोष्ट नव्हे. वर्तमानात एकसारखा सद्गुरूंचा सहवास असावा. गेल्या पंचाऐंशी वर्षांत मी काय शिकलो ते थोडक्यात शब्दबद्ध केले आहे ते तुम्हाला देतो ते पहा :

## माझ्या जीवनांत मी काय शिकलो

**- के. वि. बेलसरे**

आणखी चार महिन्यांनी मी नव्वदाव्या वर्षात पदार्पण करणार आहे. मला माझ्या चौथ्या वर्षापासूनची स्पष्ट स्मृति आहे. मी या ८५ वर्षांत जें शिकलो तें प्रत्येकाला उपयोगी पडेल म्हणून सांगतो.

(१) आपल्या जीवनाला जसा आरंभ होतो तसा त्याचा शेवट कधीच होत नाही - कारण सगळंच कल्पनेबाहेर बदलतं. परिस्थिती पण बदलतेच. माणसें बदलतात, घटना बदलतात, इतकेच नव्हे तर आपलें शरीर व मनदेखील बदलून जाते.

(२) जीवन म्हणजे एक गूढ प्रवास आहे. आपण कोठून या जगांत आलों, कां आलों, कोणी पाठवलें हें आपल्याला कळत नाही. तसेंच हें जग कशा परिस्थितीत सोडायचें, कोठें सोडायचें, कशा अवस्थेत सोडायचें हें आपल्याला ठाऊक नाही. बरें, जग सोडल्यावर आपण कोठें जातो, आपल्याला कोण भेटतात, त्यांच्या सहवासात किती काळ रहायचे हें आपल्याला माहीत नाही. एकूण जीवनाचा आरंभ अज्ञानात होऊन त्याचा अंतदेखील अज्ञानात घडून येतो.

(३) आपण आपल्या इच्छा तृप्त करण्याचा जन्मभर सतत प्रयत्न करतो. परंतु ते घडवून आणण्याची शक्ति आपल्या अंगीं नसते. पुढें जें घडून यावें असें वाटते त्याची उपायरचना आपण सतत करतो. पण आपले सर्व ठोकताळे दृश्यावर - म्हणजे समकालीन माणसांच्यावर आणि घटनांवर अवलंबून असतात. त्यामुळें प्रत्यक्षात जें घडून येतें तें आपल्या मनाच्या उलट असतें किंवा मनासारखें घडलेंच तर त्यानें मनाचें समाधान होत नाही.

(४) यावरून मी असें शिकलो की मानवी जीवन माणसानें ठरवलेल्या सिद्धान्तांप्रमाणें चालत नाही. ते आगगाडीच्या रूळांप्रमाणे ठरलेले नाही. ते एखाद्या समुद्राकडे धावणाऱ्या नदीप्रमाणे आहे. कोणाच्या वाट्यास काय प्रसंग येईल हें कोणास सांगता येत नाही.

(५) आपल्याला मनासारखें व्हावें असें तर वाटतें आणि तसें घडण्याची खात्री नसते, म्हणून प्रत्यक्ष जीवन जगतांना मनाला एक प्रकारची "अस्वस्थता, काळजी, भीति आणि असुरक्षितता" व्यापून राहातात. त्यांतून मोकळे होण्यास अज्ञाताची कास धरल्यावाचून गत्यंतर उरत नाही. अज्ञात दोन प्रकारचे आहे.

(१) या विश्वाला चालवणारी प्रचंड शक्ती; आणि

(२) ती शक्ती ज्या व्यक्तींमधें प्रत्यक्ष अवतरते त्या व्यक्तींचा सहवास.

(६) विश्व चालवणाऱ्या अज्ञात शक्तीला नियति असे म्हणतात. नियतीलाच संत प्रारब्ध असें म्हणतात. नियतीवर पूर्ण श्रद्धा ठेवून जीवन जगणें सामान्य माणसाला फार कठीण जाते. नियति आपल्या जीवनांत कोणत्या वेळी काय उलटापालट करील याचा अंदाज कोणालाच करता येत नाही.

(७) म्हणून ज्या मानवी व्यक्तीमधें विश्वशक्ती साकार होते अशा सद्गुरूला मनानें घट्ट धरणें हा जीवनातील काळजी, भीति व असुरक्षितपणा नाहीसा करण्याचा रामबाण उपाय आहे हें मी या जीवनांत अत्यंत स्पष्टपणें शिकलो.

(८) संताला मनानें घट्ट धरणे म्हणजे त्याला आपल्या जीवनात सर्वांत महत्त्वाचें स्थान द्यायचें. मी शरीरानें व्यवहारांत वागत असतांना "मी त्याचा आहे, म्हणून त्याचे स्मरण सतत बाळगणे" ही संताचे झाल्याची खरी खूण आहे. आपल्याला अज्ञाताची इच्छा काय आहे तें कळत नाही. म्हणून आपल्या इच्छेमधें व त्याच्या इच्छेमधें संघर्ष येतो. तो नाहीसा व्हावा यासाठीं आपण आपली इच्छा त्याच्या इच्छेत विलीन करण्याचा अभ्यास करावा. या अभ्यासालाच 'नामस्मरण' असे संत म्हणतात. म्हणून नामस्मरणाने माणसाचें जीवन अज्ञाताच्या सत्तेनें भरून जातें. एकदा तें भरलें की मग कोणत्याही परिस्थितीत माणसाचें समाधान भंगत नाही, असा अनुभव येतो. यासाठीं माझ्या या शेवटच्या दिवसांत मी सगळे सोडून नामस्मरण करतो.

पू. बाबा म्हणाले, आपल्या प्रत्येक कृतीमधे सद्गुरु आहेत, त्यांची प्रेरणा आहे असे वाटले पाहिजे. अनुसंधानात राहता आले तर आजार राहीना का? श्रीमहाराज म्हणाले की महाभारतात तीन स्त्रिया, कुंती, द्रौपदी आणि सुभद्रा या कृष्णाच्या खऱ्या भक्त होत्या. कुंती आणि द्रौपदी भक्त होत्या हे आपणाला माहीत आहे. पण सुभद्रा, कृष्णाची बहीण, मोठी भक्त कशी म्हणून विचारले तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, अश्वत्थाम्याने ब्रह्मास्त्र सोडल्यावर उत्तरेच्या उदरातला

गर्भ (परीक्षित) जळू लागला तेव्हां ती सुभद्रेला म्हणाली की सासूबाई, कृष्णाला सांगून याला वाचवा. तेव्हां सुभद्रा म्हणाली की आजपर्यंत मी त्याच्याकडे काही मागितलं नाही. पण आज मागते आहे. आपला भाऊ परमात्मा आहे हे माहीत असूनही तिने त्याच्याकडे कधी काही मागितलं नाही!

आज आपल्याला भविष्य माहीत नाही ते माहीत झाले तर काय होईल असा गंमतीचा विषय निघाला. तुमच्या जीवनाचा हेतू काय आहे यावर भविष्य कळल्यावर तुमची कृती अवलंबून राहील असा चर्चेचा निष्कर्ष होता. उदाहरणार्थ, आठ दिवसात मृत्यू येणार हे कळताच परीक्षिताने शुकाकडून भागवत ऐकले आणि तो तरून गेला. पूर्वीच्या जन्मांवर आणि भविष्यावर परमेश्वराने टाकलेल्या अज्ञानाचा पडदा योग्यच आहे नाही का?

आपल्याला नामाचा अर्थ आणि त्याचे महत्त्व कळत नाही. नामस्मरण करतांना भगवंताचे अस्तित्वही जाणवत नाही. असे असले तरी अखंड नामस्मरणाचा अभ्यास केला पाहिजे याविषयी साधक क यांनी पूर्वी सांगितलेली श्रीरामकृष्णांनी सांगितलेली गोष्ट पुन्हा सांगितली. एकदा दोन मुलांचे भांडण झाले. त्यांच्यापैकी जो लहान तीन-चार वर्षांचा होता त्याने त्याच्यापेक्षा मोठ्या असलेल्या मुलाला शिवी दिली म्हणून मोठ्या मुलाने त्याला मारले. लहान मुलगा रडत वडिलांकडे गेला. मारणाऱ्या मुलाला वडील म्हणाले, कशाला मारलेस त्याला? त्याला त्या शिवीचा अर्थ तरी कळतो का? तेव्हां मारणारा मुलगा म्हणाला, त्याला नसेल अर्थ माहीत, पण मला माहीत आहे ना! तसे आपल्याला माहीत नसले तरी भगवंताला त्याच्या नामाचा अर्थ आणि महत्त्व माहीत आहे म्हणून आपण त्याचे नाम घेत राहावे. खरोखर, नाम ही भगवंताला मारलेली हाक आहे.

## |५१५| (दि. २६ सप्टेंबर १९९७)

पू. बाबांच्या पावलांवरची आणि पायांवरची सूज कमी झाली आहे. त्यातून पाणी येऊन सूज उतरली आहे. दोन दिवस ताप येत होता म्हणून डॉक्टरांनी ॲंपिसिलीनच्या गोळ्या दिल्या त्यामळे भूक आणखी मंदावली आहे. आज दिवसभर पाऊस पडत असल्यामुळे हवेत गारठा आहे म्हणून पू. बाबांनी अंगात स्वेटर घातला आहे. ते म्हणाले, जगण्याचा कंटाळा आलेला नाही पण शरीराची काहीशी किळस वाटू लागली आहे. शरीरातील रक्त कमी झाले आहे. तपासणीसाठी लागणारे रक्तही डॉक्टरांना दोन तीन वेळा प्रयत्न करून घ्यावे

लागले. डॉक्टर सोनारांना मी दोन गोष्टी विचारल्या. (१) तुम्ही म्हणता त्याप्रमाणे रक्त कमी झाल्यामुळे प्रथम सूज पावलांवर येऊन मग ती पायांवर आली. पण मग ती कमरेच्यावर का चढली नाही? (२) माझा आहार अतिशय कमी आहे. रक्तही कमी झालेले आहे; मग मेंदू इतके काम कसे करतो आहे? त्याला अन्न कसे मिळते आहे? डॉ. सोनार म्हणाले, आज पुष्कळ वर्षे तुम्ही कमी खात आहात त्यामुळे तुमच्या मेंदूला कदाचित तशी सवय झालेली असेल. पण हे काही खरे उत्तर नव्हे.

पू. बाबांना काही जुन्या गोष्टी आठवल्या. कार्लाइलच्या समकालीन एका तत्त्वज्ञान्याने प्लेटोच्या ग्रीक तत्त्वज्ञानाचे इंग्रजीत भाषांतर केले होते. त्याची आणि कार्लाइलची भेट झाली तेव्हां त्याला कार्लाइलने विचारले की यातले तुझ्या जीवनात किती उतरले आहे? तो म्हणाला प्लेटोचे तत्त्वज्ञान मला बुद्धीने कळले आहे पण ते हृदयात उतरलेले नाही. जोपर्यंत तत्त्वज्ञान जीवनात येत नाही तोपर्यंत त्याचा काय उपयोग? कार्लाइलला भेटायला अमेरिकेतून इमर्सन आला होता. कार्लाइलच्या घराबाहेरच्या बागेत दोघेहीजण पाईप ओढत तास दीड तास काही न बोलता बसले आणि इमर्सन परत गेला. **We had a wonderful dialogue** असे तो म्हणाला.

गुरुदेव रानडे यांनी ग्रीक तत्त्वज्ञानावर लिहिले, त्याचे त्यांना दोन हजार रुपये मिळाले. त्यातून त्यांनी पुण्याला दुमजली घर बांधले आणि त्याला कार्लाइल हाउस असे नांव दिले. सन १९१०च्या सुमारास त्यांना क्षय झाला. खूप अशक्तपणा आला. आता ते त्यातून वाचणार नाहीत असे वाटू लागले तेव्हां त्यांची आई त्यांना त्यांच्या गुरूकडे - भाऊसाहेब उमदीकर यांच्याकडे इंचगिरीला घेऊन गेली. याचे (गु. रानड्यांचे) काय होणार असे तिने गुरूंना विचारले तेव्हां ते म्हणाले, बाई, काळजी का करता? त्याची त्रिखंडात कीर्ती होईल. पुढे तीन चार महिन्यांनी त्यांना बरे वाटू लागले.

पाश्चात्य आणि भारतीय तत्त्वज्ञानाचा, विशेषत: उपनिषदांचा सखोल अभ्यास केल्यामुळे गुरुदेव रानड्यांना सुरुवातीच्या काळात नामाने काय होणार असे वाटत असे. तथापि नामानेच सगळ्या शंका नाहीशा होतात असे त्यांच्या गुरूंनी सांगितल्यामुळे ते नाम घेत असत. तरीदेखील नामाच्या शक्तीचा अनुभव त्यांना कसा आला ते त्यांनी पू. बाबांना एकदा सांगितले. (१) ते घड्याळ ठेवून अर्धा तास नामस्मरण करत माडीवरच्या एका खोलीत चटईवर बसत असत. दुसऱ्या खोलीत त्यांचे अंथरूण असत असे. एकदा त्यांचे

घड्याळ दुरुस्तीला दिलेले होते. तरीदेखील त्या खोलीत घड्याळात किती वाजले आहेत ते त्यांना दिसले आणि बरोबर तेवढेच वाजलेले होते. (२) एकदा नाम घेत ते बसलेले असतांना पलीकडच्या खोलीतल्या भिंतीवरचा विंचू त्यांना दिसला. नामाचा खरा अनुभव कोणता असे पू. बाबांनी त्यांना विचारले तेव्हां अनाहत नाद हाच नामाचा खरा अनुभव असे ते म्हणाले.

पू. बाबा म्हणाले की दोन दिवसांपूर्वी रात्री त्यांचे नामस्मरण चालू होते, पण त्याचबरोबर जवळ जवळ दोन तास अनाहत नाद येत होता. ते म्हणाले, हा अनाहत नाद ऐकतांना बहुतेक जास्त वेळ मनाची सूक्ष्मता न राहिल्यामुळे माझी मान थोडी एकीकडे कलली आणि झोप लागली. थोड्या वेळाने जाग आली पण तो नाद थांबला होता. आपल्याला झोप लागली याचे मला वाईट वाटले, पण मग ज्ञानेश्वर महाराजांच्या ''आहार तरी सेविजे। परि युक्तीचेनि मापें मविजे। क्रियाजात आचरिजे। तयाचि स्थिती ॥३४९॥ मपितला बोलीं बोलिजे। मितलां पाउलीं चालिजे। निद्रेही मानु दीजे। अवसरें एकें ॥३५०॥'' - या सहाव्या अध्यायातील ओव्यांची आठवण होऊन समाधान मानले. गोंदवल्यास ऐकलेल्या अनाहत नादापेक्षा हा नाद वेगळा होता. दगड, झाड अशांसारख्या वस्तूंनाही नाद असतो असे कृष्णमूर्तींनी म्हटले आहे.

आपली इच्छा असूनदेखील आपले साधन चांगले होत नाही कारण आपले ध्येय निश्चित झालेले नाही. आता केवळ नामाकरताच जगतो आहे असे झाले पाहिजे. दृश्याचा तिटकारा वाटला पाहिजे. प्रपंचातदेखील रात्री १२ ते ३ आपला एकांत असे श्रीमहाराजानीच सांगितले आहे. नाम हे आपल्या गुरूंचे अस्तित्व असे आपल्याला वाटते का? देहापलीकडच्या अस्तित्वाची आपण कल्पना करू शकत नाही. नामस्मरण करतांना ते अस्तित्व जाणवले पाहिजे. साधनाची इतकी खटपट करूनही साधत नाही कारण आपल्या साधनाला गळती लागते. आपल्या नकळत व्यवहारात आपले नाम जाते. ध्येयाचा विसर पडतो. अखबार मत पढो असे नारायणस्वामींनी म्हटले आहे ते खरे आहे. कृष्णप्रेमनीही जवळ जवळ चार वर्षांनंतर वर्तमानपत्र पहिले आणि ते म्हणाले की जग पूर्वीसारखेच चालले आहे! भ्रष्ट पुढाऱ्यांचे आचरण वाचून आपले मन गढूळ होते आणि साधनावर त्याचा परिणाम होतो. तसेच व्यवहारी मनही (calculating mind) परमार्थाच्या आड येते. कित्येकदा गळती होते आहे हेही आपल्या लक्षात येत नाही म्हणून अतिशय सावध राहिले पाहिजे.

|५१६| (दि. ३ ऑक्टोबर १९९७)

पू. बाबांच्या पायांतून पाणी झरते आहे. पाय आणि पावले लाल झाली आहेत आणि ओलसरपणामुळे कातडीही जाते आहे. पू. बाबा म्हणाले, अतिशय आग होते आहे. परवा रात्री अतिशय आग होत होती. झोप येईना. मी माझे नामस्मरण एकसारखे चालू आहे असे म्हणत होतो पण त्या आग होण्यामुळे मात्र नाम थांबले आणि सुमारे पंधरा मिनिटांनी भानावर आलो. देह आजारी असतांना नाम चालणे सोपे आहे पण देहाला वेदना होत असतांना नाम चालणे किती अवघड आहे ते मला महाराजांनी दाखवले! वाटले, मी लोकांना इतके सांगतो तरीदेखील अनुसंधान सुटले! मग मी एक प्रयोग केला; काही अंशी तो साधला. होणाऱ्या वेदनांना एक लय होती. काही वेळा वेदना तीव्र असत. मग त्या मंद होत. त्या लयीवर नाम घ्यायला मी सुरुवात केली. ते जमले कारण त्यामधे एक हार्मनी होती. शंकराचार्यांनी अविरोध हे पारमार्थिक जीवनाचे सूत्र सांगितलेले आहे. सर्व दु:ख, सर्व त्रास होतात ते हार्मनी बिघडल्यामुळे. "सहनं सर्वदु:खानां अप्रतीकारपूर्वकम्। चिन्ताविलापरहितं तितिक्षा सा निगद्यते।।" असे आचार्यांनी म्हटले आहे. तथापि अप्रतीकार आणि अविरोध यात फरक आहे. अप्रतीकारात प्रतिकार माहीत आहे पण साधन म्हणून तो करायचा नाही. अविरोधात विरोधाची कल्पनाच नाही. म्हणून अविरोध ही अप्रतीकाराच्या - तितिक्षेच्या पुढची पायरी आहे. योगी अरविंदानी त्यांच्या The Life Divine मधे All problems of existence are essentially problems of harmony असे म्हटले आहे. नामाने हार्मनी साधते. ह्या आजारात मी शांत आहे, पण प्रसन्नता ही त्याच्या पुढची आहे. ती अद्याप नाही. तथापि दु:ख होत असतांना ते त्याच्याकडून आले आहे म्हणून शांत राहाणे देखील फार कठीण आहे. खरोखर संसाराची तऱ्हा मोठी विचित्र आहे. किती माणसे येतात आणि त्यांच्या किती विविध प्रकारच्या अडचणी असतात. त्यात मन शांत ठेवून साधन चालू ठेवता आले पाहिजे.

**साधक ज :** जोपर्यंत आपण आणि सुख किंवा दु:ख वेगळे असतो तोपर्यंत सुख किंवा दु:ख होते. त्या दु:खाच्या जागी जर आपल्याला राहता आले तर दु:ख नाहीच. उदाहरण सांगतो. एकदा माझी दाढ खूप दुखत होती तेव्हां माझे अस्तित्व केवळ त्या दाढेच्याच ठिकाणी आहे अशी भावना केली आणि माझे दु:ख कमी झाले.

**साधक ग** : दुःख दोषानुदर्शनम् हे गीतेने ज्ञानाच्या लक्षणात सांगितले आहे.

**साधक प** : (पू. बाबांना) गीतेच्या नवव्या अध्यायाचे मर्म काय?

**पू. बाबा** : व्यक्तीसाठी ज्ञान, योग ही अध्यात्मसाधने सांगून झाली. कर्मयोग, कुंडलिनीयोग, एकाक्षर ब्रह्म हे सांगितले. पण हे सर्व मार्ग सामान्य माणसाच्या दृष्टीने फार अवघड आहेत म्हणून नवव्यात भक्तियोगच राजविद्याराजगुह्य म्हणून सांगितला. "अपि चेत् सुदुराचारो भजते माम् अनन्यभाक्।" हा सर्वांना सुधारण्याची संधी देणारा आणि "स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रः" सर्वांना वाटचाल करता येईल असा विस्तृत राजमार्ग म्हणजे भक्तिमार्ग होय.

पू. तात्यासाहेबांप्रमाणे त्यांच्या पत्नी सौ. ताईंनाही प्रत्येक गोष्ट श्रीमहाराजांच्या इच्छेने घडते आणि आपण जे काही करतो ते श्रीमहाराजांसाठी असे वाटत असे. या संदर्भातली एक गोष्ट पूर्वी मी तुम्हाला सांगितली होती पण मला ती फार महत्त्वाची वाटते म्हणून पुन्हा सांगतो; ऐकण्यासारखी आहे. एकदा रात्री अकरा वाजल्यानंतर वऱ्हाडातली पाचसहा माणसे पू. तात्यासाहेबांकडे श्रीमहाराजांना भेटण्यासाठी आली. सर्वांची जेवणे व्हायची होती. पू. तात्यासाहेबांनी सौ. ताईंना आत्ता जेवायला काय करता म्हणून विचारले. त्या पहाते म्हणाल्या. आलेल्या मंडळीत एक बाई होत्या त्यांना त्यांनी ह्या मंडळींना काय आवडते म्हणून विचारले. त्या म्हणाल्या, भजेभात. इतक्या रात्री सौ. ताईंनी त्या सर्वांसाठी भजेभातासह सगळा सैपाक केला. सर्वांची आनंदाने पोटभर जेवणे झाली. दुसऱ्या दिवशी सकाळी सगळी कामे उरकण्यास सौ. ताईंना थोडा उशीर झाला तेव्हां मी त्यांच्याजवळ आदल्या रात्रीच्या सैपाकाचा आणि त्यांना झालेल्या त्रासाचा उल्लेख केला तेव्हां त्या म्हणाल्या, अहो, त्यात कसला त्रास. महाराज जेवून तृप्त झाले, त्यात सगळे आले! रात्री अवेळी आलेल्या पाहुण्यांच्या ठिकाणीदेखील त्यांनी श्रीमहाराज पाहिले!

## |५१७| (दि. १० ऑक्टोबर १९९७)

पू. बाबांच्या पावलांपासून पोटापर्यंत सूज चढली आहे. हातांवरही सूज आहे. पाणी झरून सूज कमी होते पण त्याबरोबर कातडी जाते, आग होते. पाठीला मालीश केल्यावर त्यांना थोडे बरे वाटले. पण सगळे मांस आणि जी थोडी चरबी होती, तीही झडल्यामुळे आता हाडे टोचतात. आजच्या चर्चेनंतर पू. बाबांशी चर्चा अशी झाली नाही.

पू. बाबा म्हणाले, श्रीमहाराजांना (पू. तात्यासाहेबांना) कोणीतरी योगी अरविंदांचे The Life Divine दिले. हजार अकराशे पानांचे ते पुस्तक. तेव्हां त्याची किंमत वीस रुपये होती. ते पुस्तक श्रीमहाराजांनी मला दिले. मी विचारले, हे मी वाचू का ? श्रीमहाराज म्हणाले, त्यांना नवीन काय सांगायचे आहे ते पहावे. पू. बाबा म्हणाले, तुम्हाला सांगतो, अध्यात्मिक अनुभवांच्या बाबतीत महाराष्ट्रामधे ज्ञानेश्वर महाराज आणि उत्तरेस कबीर यांच्यानंतर अरविंदांचेच नांव घ्यावे लागेल. जवळ जवळ दररोज त्यांना नवनवे अनुभव येत असत.

हे सगळं आठवायचं कारण म्हणजे, काल रात्री शौचाला लागली. दादाने बेडपॅन दिले, नंतर अंग पुसले आणि त्यानंतर स्वस्थ पडलेलो असतांना माझ्या मनात आले की खरोखर आपल्याला माणसांची जोड किती चांगली लाभली आहे! यांच्यामुळे (सौ. आई) संसार चांगला झाला. श्रीपाद, शोभा नंतर या मुली सगळे आपल्याला जपतात. हे विचार मनात आले आणि श्रीमहाराजांची आठवण होऊन त्यांना म्हटले, माझे काही चुकले का ? आतून महाराजांचा आवाज आला, थोडेसे चुकले; हे सर्व तिकडून आले आहे असे वाटले पाहिजे.

अरविंदांनी म्हटले आहे की आपल्या वरच्या व्यवहारी मनाखाली अंतर्मन आहे. या मनाला दोन तोंडे आहेत. एक वासनापुंजात्मक आणि दुसरे भगवंताकडे नेणारे - Super Ego. वास्तविक ही दोन्ही अहंकाराचीच रूपे आहेत. वरच्या मनात आणि अंतर्मनात एक सुसंवाद असतो. अंतर्मनाच्याही खाली अबोध मन आहे. सामान्यत: वासनात्मक देह वेगवेगळ्या वासना तृप्त करण्याच्या मागे लागतो. वासना तृप्त करतांना माणसावर समाजाची, नीतीची बंधने पडतात. विशिष्ट वासनांमुळे वेगवेगळे गंड - complex निर्माण होतात. उदाहरणार्थ, भयगंड. माणूस झोपला की अंतर्मनावरचे समाज, नीती इत्यादींचे दडपण ढिले होते व मग स्वप्नात अबोध मनातील गटार वाहू लागते. माणसाला विकारवश करणारा अहंकार - Ego तर विकारांचे उन्नयन करणारा अहंकार - Id असे फ्राइडनी म्हटले आहे.

प्रत्येक घटनेत त्याची इच्छा पहाता आली पाहिजे असे श्रीमहाराजांनी म्हटले आहे ते खरे आहे. पॉंडीचेरीच्या मदरची एक परमनंट डायरी आहे. त्यातील प्रत्येक पानावर त्यांचे एक वचन दिलेले आहे. एका पानावर (६ जानेवारी) म्हटले आहे. What thou willest, What thou willest, What thou willest. तुझी इच्छा. ते माझ्या हिताचे आहे असे वाटणे ही त्याच्या पुढची पायरी आहे. आणखी एका (२४ एप्रिल) प्रार्थनेत त्या म्हणतात.....O

supreme Lord of the universe, We implore Thee, give us the strength and the beauty, the harmonious perfection needed to be Thy divine instrumenents upon earth.

पाश्चात्य तर्कशास्त्र Observation (निरीक्षण) व Experience (अनुभव) ही दोन प्रमाणे मानते तर भारतीय न्यायशास्त्र शास्त्रप्रचीति, आप्तवाक्य आणि आत्मप्रचीति ही तीन प्रमाणे मानते. तथापि पाश्चात्य तत्त्वज्ञानाने आप्तवाक्य - Authority हे तिसरे प्रमाण मानले आहे.

नुकतेच पू. बाबांनी आपले ध्येय आणि साधना याबाबत काही मार्गदर्शन केले. कु. कल्याणी बेलसरे यांनी ते लिहून घेतले. त्याच्या प्रती पू. बाबांनी दिल्या. हे मार्गदर्शन अतिशय महत्त्वाचे आहेच. शिवाय पू. बाबांबरोबर शुक्रवारी झालेल्या चर्चापैकी शेवटच्या चर्चेत ते मिळाले म्हणून येथे ते देत आहे. यानंतर आम्ही दर शुक्रवारी भेटत होतो पण चर्चा अशा झाल्या नाहीत.

## आपलें ध्येय आणि ते अनुभवण्याची साक्षात् साधना

ईश्वरदर्शन हे मानवी जीवनाचे सर्वस्व ध्येय आहे. ईश्वर म्हणजे पूर्ण कोरें अस्तित्व होय. हें प्रचंड विश्व त्या ईश्वराचा अफाट विस्तार आहे. विश्वाहून ईश्वराला वेगळा काढता येत नाही. प्रत्येक क्षण ईश्वराचा आहे. प्रत्येक प्रसंग ईश्वरमय आहे; प्रत्येक ठिकाणी ईश्वर हजर आहे. त्या शुद्ध अस्तित्वाचा माणसाला विसर पडतो. त्या विस्मृतीमुळें त्याच्या जीवनांत माणसाला चांगले-वाईट, सुख-दु:ख इत्यादि अनुभव येतात. त्या अस्तित्वाची जाणीव माणसाला होणे म्हणजे परमार्थाला आरंभ झाला असें समजावें. एक गोष्ट ध्यानांत ठेवावी कीं, ईश्वररूपी अस्तित्व प्रत्येकाच्या हृदयात आहे. ईश्वराशी आपला एखादा संबंध असा नाही. मी ईश्वरच आहे असा साक्षात् अनुभव येणे म्हणजेच अनुभवाची उच्च पायरी गाठणे होय.

ईश्वराच्या अनुभवाच्या चार कक्षा सांगता येतात. -

(१) जितका मी खरा आहे तितका माझा ईश्वर खरा आहे असे नि:संशयपणे वाटणें. त्यामुळें जीवनामधें कितीही बदल झाला तरी ईश्वराच्या असण्याला धक्का न लागणे ही पहिली पायरी होय.

(२) ईश्वर ज्ञानमय असल्यामुळें जीवनामधें ज्या ज्या गोष्टी घडतात; सुख-दु:खांचे, यशापयशांचे, मानापमानाचे जे प्रसंग येतात ते ईश्वराच्या संमतीने येत असतात अशी पूर्ण धारणा बनल्याने कोणत्याही वेळी व कोणत्याही

प्रसंगात मन अस्वस्थ होत नाही. ईश्वराच्या स्मरणात हा महत्त्वाचा टप्पा समजावा.

(३) ईश्वराने आपल्या जीवनावर ताबा मिळवला आहे ही खात्री झाल्यानंतर तक्रार करण्याचे नाहीसे होते.

(४) मानवी दृष्टीनें बिपरीत दिसणाऱ्या प्रसंगांमधें ईश्वराचें साक्षात् सान्निध्य लाभल्याने, प्रत्येक प्रसंगाला त्याच्या लीलेचे स्वरूप येते. आपण चाललो की तो आपल्याबरोबर चालतो. आपण बोललो की आपल्या तोंडानें तो बोलतो. आपण जेवलो की त्याला तृप्ती येते. आपल्या इंद्रियांचे व्यापार तो करतो - थोडक्यात आपल्याला तो बाहुलीसारखा नाचवतो.

(५) शेवटच्या अवस्थेत जीव सर्वांगांनी ईश्वरमय झाल्यामुळे त्याला वेगळेपण उरत नाही. अशा माणसाच्या हृदयांत ईश्वर आणि 'मी' दोघे एकत्र नांदतात.

(६) या अनुभवमालिकेचा आरंभ श्रीसद्गुरूनें दिलेल्या नामापासून होतो. अगदी सुरुवातीपासून जे नाम चालते तें ईश्वराचें अस्तित्व जाणवूनच चालत असतें. त्या नामाला जसजसें खरेंपण येत जातें, तसतसें 'मी'चें आणि प्रपंचाचें अस्तित्व क्षीण होत जाते. अखेर ईश्वर अंतर्धान पावतो, 'मी' चा विलय होतो आणि श्रीगुरूंनी दिलेलें नाम तेवढे देहांत उरते. हीच ब्रह्मज्ञानी पुरुषाची अवस्था असते.

## ।५१८।

डिसेंबर १५ ते डिसेंबर २४ सन १९९७ ह्या श्रीमहाराजांच्या पुण्यतिथीच्या उत्सवाच्या काळात आमच्यापैकी एका साधकास पू. बाबांनी Braun च्या इलेक्ट्रिक रेझरने दाढी करवून घेण्यासाठी दोन-तीन वेळा बोलावले होते. त्यांनी पुढील हकिगत दिली आहे. ते लिहितात - "मी दाढी करावयास गेलो तेव्हां पू. बाबांच्या हातापायांवर खूप सूज होती. हलक्या हाताने मालीश करून शेकले की त्यांना थोडे बरे वाटे. मी दाढी करत असे त्यावेळी एकूण पंधरा-वीस मिनिटे पू. बाबांशी एकट्याने बोलावयास मिळाले. त्यावेळी त्यांची अतिशय विकलांग अवस्था झाली होती. शरीराच्या बाबतीत आता ते सर्वस्वी दुसऱ्यांवर अवलंबून होते. ते म्हणाले की शरीराच्या अशा अवस्थेतही नाम सहजपणे सतत चालू राहते; मात्र वेदना होऊ लागल्या की ते टिकविण्यासाठी थोडा प्रयत्न करावा लागतो. आता देह सोडतांना बरोबर केवळ नामच येणार हे मी

तुम्हाला खात्रीने सांगतो. शेवटपर्यंत केवळ नामच आपल्याबरोबर यावे यासाठी सतत नाम घ्या. निष्ठेने आणि चिकाटीने अभ्यास करणाऱ्या कोणालाही याचा अनुभव घेता येईल. त्यासाठी सतत नाम घेण्याचा अभ्यास करा. नामस्मरणाचा आणखी एक परिणाम सांगतो. केवळ नामामुळेच शेवटपर्यंत विचार स्वच्छ आणि शुद्ध राहू शकतो."

"धुळ्याचे श्री. शंकरराव देव रमणमहर्षींकडे गेले होते तेव्हां रमणमहर्षींनी विचारले म्हणून देवांनी समर्थ रामदासांच्या मनाच्या श्लोकांचे त्यांच्यापाशी असलेले संस्कृत भाषांतर वाचायला दिले. रमणांनी त्यांना 'देहेबुद्धि हे ज्ञानबोधें त्यजावी। विवेकें तये वस्तुची भेटि घ्यावी।' ह्या १७० व्या श्लोकाचे चिंतन करून तो आचरणात आणावा म्हणून सांगितले." पू. बाबा मला म्हणाले, "रमणांनी सांगितले होते तेच तू कर." (पहा : अध्यात्म संवाद भाग २ संवाद क्र. १७५)

## |५१९| (३१ डिसेंबर १९९७)

(प्रा. श्रीपाद केशव बेलसरे आणि सौ. शोभना वहिनी यांना दि. ३१ रोजी पू. बाबांनी जे सांगितले ते सौ. शोभना वहिनींनी मला लिहून दिले. ते सर्व येथे देत आहे - संपादक)

१९९७ सालच्या डिसेंबरमधील श्रीमहाराजांच्या पुण्यतिथीच्या उत्सवास जाऊन आल्यानंतर पू. बाबा अतिशयच क्षीण झाले होते. शनिवार दि. ३ जानेवारी १९९८ रोजी पूज्य बाबांनी देह ठेवला. त्याच्या आधी दोनच दिवस म्हणजे बुधवारी सायंकाळी ५-५॥ च्या सुमारास बाबांनी मला व ह्यांना (प्रा. श्रीपादराव) जवळ बोलावले. घरात दुसरे कोणीही नव्हते. आम्ही सारखे त्यांच्या जवळपासच राहायचो. बाबा पलंगावर झोपले होते. त्यांच्या सांगण्यावरून आम्ही दोघे त्यांच्या उशाशी जमिनीवर बसलो. त्यावेळी बाबांनी आम्हाला पुढील दोन गोष्टी सांगितल्या; त्या त्यांच्याच शब्दात देत आहे व जसेच्या तसे लिहीत आहे. बाबा खूपच क्षीण आवाजात बोलत होते.

बाबा म्हणाले, "उत्सवाहून आल्यावर आपले बोलणे झालेच नाही, नाही का! तुम्हाला दोघांना एक गोष्ट सांगायची राहूनच गेली. गोंदवल्याहून परततांना मला श्रीमहाराजांच्या दर्शनासाठी समाधीपाशी नेले ना - तुम्ही नव्हतात नाही का तेव्हां! त्यावेळी मी श्रीमहाराजांची प्रार्थना केली बघ - 'महाराज, आजपर्यंत आपला निरोप मी जर प्रामाणिकपणे जसाच्या तसा लोकांपर्यंत

पोहोचवला असेल तर मला आपण त्याची काहीतरी प्रचीति द्या.' आणि बघ, समाधीतून तेजस्वी असा निळा प्रकाशाचा झोतच्या झोत बाहेर पडला व सर्व गर्भागार त्या प्रकाशाने भरून गेले. त्या तेजाने काही वेळ माझे भान हरपले व शरीरावरील ताबा गेला. पण मग मी भानावर आलो.

नंतर म्हणाले, बाळ, तुम्हाला एक सांगतो, तुम्ही कधीही श्रीमहाराजांना सोडू नका. त्यावर मी पटकन् म्हणाले, बाबा, ते कसे शक्य आहे?

पुढे बाबा म्हणाले, ज्या वेळेला ज्या व्यक्तीची जरूर असेल त्यावेळी ती व्यक्ती येऊन हजर होईल. जेव्हां ज्या गोष्टीची निकड भासेल तेव्हां त्या गोष्टीची सोय होईल. योग्य वेळेला योग्य ती मदत मिळेल. अडचणीत श्रीमहाराज हात देतील.

नंतर कोणीतरी आले आणि आम्ही तेथून उठलो. पूज्य बाबांचे आमच्याशी वैयक्तिक असे हे शेवटचे संभाषण होते.

## |५२०| (२ जानेवारी १९९८)

दर शुक्रवारी संध्याकाळी पू. बाबांना भेटणारे आम्ही पाच-सहा जण संध्याकाळी मालाडला गेलो. श्रीमहाराजांच्या मठात थोडा वेळ नामस्मरण करत बसलो. पू. बाबांची प्रकृती खूपच खालावलेली होती म्हणून दारात उभे राहून केवळ त्यांना पाहून परत फिरायचे ठरवून आम्ही त्यांच्या घरी गेलो. आम्ही त्यांच्याकडे पहात दारात उभे होतो. आम्हाला पाहताच सौ. शोभना वहिनींनी आम्हाला घरात बोलावले. आत जाऊन आम्ही पू. बाबांच्या पलंगाच्या बाजूस उभे राहिलो. पू. बाबांनी डोळे मिटलेले होते. त्यांच्या शरीरावरची व चेहेऱ्यावरची सूज पूर्णपणे उतरली होती आणि त्यामुळे गालांची हाडे उंच दिसू लागली होती. त्यांची ती अवस्था पाहून आजची रात्र जाणे कठीण आहे असे वाटले. इतक्यात पू. बाबांनी डोळे उघडून आमच्याकडे पाहिले. तेजाने त्यांचे डोळे लुकलुकत होते. आमच्याकडे पाहून जणू काही आशीर्वाद देण्यासाठी आणि निरोप घेण्यासाठी त्यांनी उजवा हात किंचित वर उचलला. त्यांना नमस्कार करून आम्ही परतलो. अध्यात्म संवादाचा हा शेवटचा शुक्रवार आणि पू. बाबा देहात असताना त्यांचे आम्हाला झालेले हे अखेरचे दर्शन.

## परिशिष्ट
## १

## प्रा. के. वि. बेलसरे व प. पू. गुरुदेव रानडे यांच्यातील प्रश्नोत्तरे

श्री गुरुभक्तिपरायण गुरुदेव रामभाऊ रानडे यांचा माझ्यावर विशेष लोभ होता. मी तत्त्वज्ञानाचा विद्यार्थी असून भगवंताचे नामस्मरण करतो इतकेच कारण त्यांच्या माझ्यावरील प्रेमास पुरे होते. सन १९४२ साली निंबाळला मी त्यांना प्रथम पाहिले. त्याच्या आधी माझ्या थिसीसचे परीक्षक म्हणून पत्रोपत्री माझा त्यांच्याशी परिचय झाला होता. त्याच्या नंतर १०/१२ वेळा त्यांच्याशी भेट होऊन त्यांच्याबरोबर अनेक विषयांवर चर्चा करण्याची संधी मला मिळाली. त्यांना विचारलेल्या अनेक प्रश्नांची त्यांनी दिलेली उत्तरे खाली देत आहे.

**प्रश्न १** आपण नामाचा अभ्यास कसा वाढविला?

**उत्तर** मी दोन गोष्टी केल्या १) आपण आता नामासाठी जगायचे हे पक्के ठरवून टाकले, २) नोकरी व वाचन सांभाळून जेवढा वेळ मिळेल तेवढा नामाला लावला.

**प्रश्न २** सध्या नाम किती होते?

- सध्या नामाला वेळ कमी पडतो. पोटभर नाम घ्यायला मिळणे हीदेखील महाराजांची कृपा असते.

**प्रश्न ३** नाद व प्रकाश यांचे पुष्कळ अनुभव आपल्याला आले असे ऐकतो. हे खरे का?

- तुम्ही विचारता म्हणून सांगतो. माझी हेरिडिटी जरा तीव्र नर्व्हची आहे. अशा माणसाला हे अनुभव अधिक येतात. पण नामात चित्त 'रंगणे' हा नामाचा खरा अनुभव समजा. **Mark the word** 'रंगणे'. नाटक रंगते असे म्हणतात. कोणतेही अनुभव न येता साधक नामात रंगला तर तो झपाट्याने पुढे जातो.

**प्रश्न ४** गुरूवर प्रेम करायला आपण कसे शिकला?

- आधी माझे त्यांच्यावर प्रेम आहे हे खरे नाही. कल्याणाने समर्थांच्यावर प्रेम केले. ज्ञानेश्वर महाराजांनी निवृत्तीनाथांवर प्रेम केले. आमचे प्रेम त्यांच्या पासंगाला तरी लागते का? पण त्यांनी (म्हणजे महाराजांनी) माझ्यावर इतके प्रेम केले की मला लाजेखातर त्यांच्यावर उलट प्रेम करावे लागले. बाकी प्रेम साधले की सगळे साधले.

प्रश्न ५ प्लेटोला आपण ज्ञानी मानता का?

- 'प्लेटो, सॉक्रेटिस या दोघांना मी ज्ञानी साक्षात्कारी मानतो. प्लॉटीनसदेखील साक्षात्कारी होता. ॲरिस्टॉटल मोठा Thinker खरा पण ज्ञानी नव्हे. गौडपाद, शंकराचार्य, गोविंदपाद, पद्मपाद, विद्यारण्य ही सगळी मंडळी खरी साक्षात्कारी होती. कांट मोठा विचारशूर होता. रसेल, मूर, व्हाईटहेड हेही विचारशूर होते.

प्रश्न ६ गीतेपासून आपण काय शिकला?

- या जगात आपल्याकडून जे काहीं घडायचे आहे ते भगवंताच्या हाती म्हणजे महाराजांच्या हाती आहे, हे मी शिकलो. तो आटो (Otto) एकदा मला म्हणाला, "रानडे, गीतेचा ११ वा अध्याय तुम्हांला समजला का? जगातील वाङ्मयापैकी तो एक हिरा आहे, आटोचे म्हणणे बरोबर आहे. आपण नुसती बाहुली! खेळ करणारे ते (म्हणजे महाराज).

प्रश्न ७ आपल्याला निंदेने त्रास होतो का?

- पहिल्यापासून लोक काय बोलतात याबद्दल मी थोडा बेफिकीरच आहे. तरी साधक मित्रांनी निंदा केली तर वाईट वाटे. नाम खोल जाऊ लागल्यावर तेही आपोआप थांबले.

प्रश्न ८ हे कसे घडले?

- तुम्ही का करून पहात नाही! नाम अनकॉंशसमध्ये शिरले की मन व्यापक होते. आपली निंदा करणारा व स्तुती करणारा दोघांचेही अंतरंग समजते. खाऱ्या पाण्याच्या विहिरीतून खारेच पाणी यायचे. त्याचे वाईट कसे वाटेल?

प्रश्न ९ आपण योगाचा मुद्दाम अनुभव घेतला आहे का?

- मी तुम्हाला सांगतो की नामामध्ये योगाचे सर्व अनुभव आहेत. पण नामधारक अभ्यास करता करता इतका तयार होतो की त्याचे मन हव्या त्या साधनात शिरू शकते. तसा योगाचा थोडा अभ्यास आपण केला! पण त्याची जरुरी नाही, हे मात्र मुद्दाम सांगतो.

प्रश्न १० ही कुंडलिनी काय भानगड आहे?

- आपल्या वेदांतात शक्ती म्हणून सांगितलेली जी एनर्जी आहे तिचे अगदी सूक्ष्म रूप म्हणजे कुंडलिनी. तो साप, त्याची साडेतीन वेटोळी हे सगळे सिंबॉलिक आहे.

**प्रश्न ११** आपल्याला स्वत:चे संपूर्ण विस्मरण कधी होते का?

- वास्तविक स्वत:बद्दल मी फार कमी बोलतो. आपण अनुभव घ्यावा व दुसऱ्याच्या शब्दात सांगावा. पण तुमच्यावर सद्गुरूंचा वरदहस्त मला दिसतो म्हणून मोकळेपणाने बोलावेसे वाटते. मध्यंतरी काही दिवस सारखे देहाचे विस्मरणच होते. नामाचा प्रचंड प्रवाह मात्र चालू होता. नाम घ्या, सर्वकाही घडते.

**प्रश्न १२** खरंच का माणसाला सुखदु:खाच्या पलीकडे पूर्णपणे जाता येते?

- सॉक्रेटिसचे उदाहरण आहे ना? साधकाचे मन जसे बदलते तसे शरीरपण बदलावे. त्याच्या नर्व्हज फार मजबूत बनतात. म्हणून शीत, उष्ण, सुखदु:ख वाटेल ते सोसण्याची शक्ती येते.

**प्रश्न १३** मनुष्य अन्नावाचून किती जगू शकेल?

- महाराज म्हणायचे की नामामृताचे सेवन केल्याने देह व मन दोन्ही अगदी तृप्त होऊन जातात. मग झोप नाही की तहानभूक नाही. तरी साधक नॉर्मल जीवन जगेल. सगळ्यांसारखे खाईल पिईल.

**प्रश्न १४** सध्याचे राजकारण आपल्याला पसंत आहे का?

- राजकारण असेच चालायचे. सगळा स्वार्थाचा व्यवहार. तरीपण मुत्सद्दी जर परमार्थी असला तर फार स्वार्थी होणार नाही. सध्याच्या पुढाऱ्यांत नांव घेण्यासारखे दाखविणे सोपे नाही. म्हणूनच समाजात साधक जितके जास्त तितके राजकारणाला वळण चांगले. महाराष्ट्रीय संतांत ही जाणीव अधिक होती असे दिसते. पुढाऱ्याला आधी संतापाशी ठेवावा व मग राजकारणात सोडावा. खरे का नाही?

**प्रश्न १५** साधकाला मृत्यूची चाहूल लागते का?

- त्यासाठी साधकच कशाला हवा! साधा मनुष्य आपल्याकडे सूक्ष्मपणाने पाहू लागेल तर त्याला थोडासा अंदाज येईल. पण नामात रहाणाऱ्याला जास्त स्पष्टपणे कळते हे मात्र खरे. महाराजांना तसे कळले होते.

**प्रश्न १६** आपले गुरु पोहोचलेले होते काय?

- अहो, यात काय संशय! प्रथम मला पण अशी शंका आली. नंतर नामाचा अभ्यास होऊन माझी वाढ झाली, तेव्हां त्यांची अवस्था किती उच्च होती हे ध्यानात आले. आपण नाम धड घेत नाही खरे ना!

२

## श्रीब्रह्मचैतन्य महाराज गोंदवलेकर व श्री. पांगारकर यांच्यामधील संवाद

श्री. पांगारकर : आपण सिद्ध आहात काय?

श्रीमहाराज : मला माहीत नाही.

श्री. पांगारकर : आपण ईश्वर पाहिला आहे काय?

श्रीमहाराज : होय, पाहिला आहे. पण ज्या डोळ्यांनी तो पाहिला ते डोळे हे नव्हेत.

श्री. पांगारकर : ईश्वराला मिळविण्याचा मार्ग कोणता?

श्रीमहाराज : ईश्वर कोठे आहे?

श्री. पांगारकर : ईश्वर सर्व ठिकाणी आहे, सर्व जग व्यापून आहे.

श्रीमहाराज : म्हणजे तो माझ्यामधेही आहे.

श्री. पांगारकर : अर्थात तो माझ्यामधे आहे.

श्रीमहाराज : ईश्वर माझ्यामधे कोठे राहतो?

श्री. पांगारकर : तो माझ्या हृदयात राहतो.

श्रीमहाराज : जो खरा मी आहे तो कोठे राहतो?

श्री. पांगारकर : तो माझ्या हृदयात राहतो.

श्रीमहाराज : म्हणजे ईश्वर आणि खरा मी हृदयात एकाच ठिकाणी राहतात, याचा अर्थ काय?

श्री. पांगारकर : ईश्वर माझे स्वरूप आहे.

श्रीमहाराज : असे जर आहे तर - म्हणजे मीच ईश्वर असेन तर मला मिळविण्याचा "मार्ग" कसा असणार?

श्री. पांगारकर : होय, हे खरे आहे.

श्रीमहाराज : जी वस्तू आपल्याहून वेगळी आहे व हरवली आहे, ती मिळवण्याचा मार्ग असू शकतो. "मी"च्या बाबतीत हे शक्य नाही.

श्री. पांगारकर : आपण म्हणता ते खरे आहे.

श्रीमहाराज : तरी पण आज ईश्वर मला प्राप्त नाही हे खरेच आहे. मग काय झाले असेल?

श्री. पांगारकर : (गप्प बसले)

श्रीमहाराज : एकच घडणे शक्य आहे. मला माझ्या स्वरूपाची म्हणजेच ईश्वराची विस्मृती होणे मात्र शक्य आहे.

श्री. पांगारकर : आपले म्हणणे पटले.

श्रीमहाराज : म्हणून ईश्वराला मिळवण्याचा मार्ग त्याची स्मृती जागी करणे हाच असला पाहिजे. यालाच मी नामस्मरण म्हणतो.

श्री. पांगारकर : शास्त्र हेच सांगते.

श्रीमहाराज : मी अडाणी माणूस! मला शास्त्र कोठले ठाऊक? पण माझा अनुभव असा की भगवंताच्या नामाने वासना क्षीण होते, खोटा मी नाहीसा होतो, आणि आपल्या ठिकाणीच ईश्वराचे दर्शन घडते.

श्री. पांगारकर : नामस्मरणाचे मर्म मला आज उलगडले.

श्रीमहाराज : तरीपण नामस्मरणात रंगल्यानेच त्याचे खरे मर्म अनुभवास येते. आपण नुसते नाम घ्या. आपल्यावर राम कृपा करील, हाच माझा आशीर्वाद.

३

## श्रीमहाराजांच्या शिकवणुकीचे सार

नाम सदा बोलावें, गावें, भावें जनांसि सांगावें।
हाचि निरोप गुरूंचा, नामापरतें न सत्य मानावें॥ १॥
नामांत रंगुनीया व्यवहारीं भोग सर्व सेवावे।
हाचि निरोप गुरूंचा, भोगासंगें कुठें न गुंतावें॥ २॥
आनंदांत असावें, आळस, भय, द्वेष दूर त्यागावे।
हाचि निरोप गुरूंचा, अनुसंधाना कधीं न चुकवावें॥ ३॥
गोड सदा बोलावें, नम्रपणें सर्वलोकप्रिय व्हावें।
हाचि निरोप गुरूंचा, भक्तीनें रघुपतीस आळवावें॥ ४॥
स्वांतर शुद्ध असावें, कपटाचरणा स्वयें न वश व्हावें।
हाचि निरोप गुरूंचा, मन कोणाचें कधी न दुखवावें॥ ५॥
माझा राम सखा, मी रामाचा दास, नित्य बोलावें।
हाचि निरोप गुरूंचा, रामापाशीं अनन्य वागावें॥ ६॥
यत्न करून करिन मी, यश दे रामा, न दे, तुझी सत्ता।
हाचि निरोप गुरूंचा, मानावा राम सर्वदा कर्ता॥ ७॥
आचार-संयमानें युक्त असा नीतिधर्म पाळावा।
हाचि निरोप गुरूंचा, खेळाऐसा प्रपंच मानावा॥ ८॥
दाता राम सुखाचा, संसारा मान तूं प्रभू-सेवा।
हाचि निरोप गुरूंचा, संतोषा सर्वदा मनीं ठेवा॥ ९॥
स्वार्थ खरा साधा रे, नित्य तुम्ही नामगायनीं जागा।
हाचि निरोप गुरूंचा, मीपण जाळोनिया जगीं वागा॥ १०॥
अभिमान शत्रु मोठा सर्वांना जाचतो सुखाशेनें।
हाचि निरोप गुरूंचा, मारावा तो समूळ नामानें॥ ११॥
राज्याधिकार येवो, किंवा जावो समस्त धन मान।
हाचि निरोप गुरूंचा, भंगावें ना कदा समाधान॥ १२॥
प्रेमांत राम रमतो, प्रेमाला मोल ना जगामाजीं।
हाचि निरोप गुरूंचा, गुरुरायाला तहान प्रेमाची॥ १३॥

**॥ जानकीजीवन स्मरण जयजयराम ॥**

("श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज - चरित्र आणि वाङ्मय. लेखक प्रा. के. वि. बेलसरे" या ग्रंथातून)

## प्रा. के. वि. बेलसरे यांची ग्रंथसंपदा

• The Saint of Gondavali. प्रकाशक: 'चैतन्योपासना' गोंदवले.

• सार्थ दासबोध. प्रकाशक : श्रीसमर्थ सेवामंडळ - सज्जनगड सातारा.

• श्रीमद् दासबोध प्रवचन पारिजात. प्रकाशक : श्रीसमर्थ सेवामंडळ - सज्जनगड सातारा.

• रामदास स्वामीकृत आत्माराम. प्रकाशक : श्रीसमर्थ सेवामंडळ - सज्जनगड सातारा.

• मनाचे श्लोक. प्रकाशक : श्रीसमर्थ सेवामंडळ - सज्जनगड सातारा.



**त्रिदल प्रकाशन** - राणी बिल्डिंग, प्रार्थना समाजजवळ, गिरगांव, मुंबई ४००००४ यांनी प्रकाशित केलेली पुस्तके.

• श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज - चरित्र आणि वाङ्मय • अध्यात्म दर्शन • साधकांसाठी संतकथा • ईश्वर : स्वरूप आणि साक्षात्कार • श्रीज्ञानदेवांचा हरिपाठ (सार्थ) • आनंदसाधना • साधकाच्या अभ्यासाची रूपरेषा. • **मनाची** शक्ति : साठवणूक आणि नागवणूक • भगवंताच्या नामाचे दिव्य संगीत अथवा अनाहत नादश्रवण • भगवंताचे अनुसंधान • नामसाधनेतील अध्यात्म आणि तुकारामांची नामसाधना • संतांचे आत्मचरित्र • श्रीमहाराजांचे विचारसौंदर्य • नामसाधना, परमार्थ प्रदीप • प्रेमयोग • अंतर्यात्रा • शरणागती • चैतन्य गीता • नामसमाधी सहजसमाधी • भावार्थ भागवत • नामसमाधीचा अभ्यास • श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज यांची बोधवचने • श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज (चित्रमाला) • ज्ञानेश्वरमहाराज पुण्यतिथी निरूपण (पुस्तिका) • श्रीसमर्थ रामदासस्वामी (पुस्तिका) • श्रीमद्‌भगवद्गीता • उपनिषदांचा अभ्यास

• Tukaram (in English)

श्रीसमर्थ रामदास स्वामी - चरित्र व तत्त्वज्ञान

बृहदारण्यक उपनिषद - जनक याज्ञवल्क्य संवाद

वंदनीय कै. तात्यासाहेब केतकर - पुण्यस्मरण (पुस्तिका)

श्रीभगवद्नाम अमृतपान (पुस्तिका) • महाराज मी शरण आहे (पुस्तिका)

नामामृतपान (पुस्तिका) • ईश्वरदर्शन (पुस्तिका)